भारत-गौरव-ग्रंथमाला-पुष्प ९१ वें.

# श्रीमन्महाभारतार्थ

( महाभारताचें सुबोध मराठी भाषांतर )



## तृतीय खंड.

वनपर्व, अध्याय २२—१८५.



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

—भ. गी. अ. ४, ३८.

लेखकः—

आचार्यभक्त विष्णु वामन बापटशास्त्री,

संस्थापक आचार्यकुल, पुणें.

न हि धर्ममविज्ञाय वृद्धाननुपसेव्य च । धर्मो वै वेदितुं शक्यो बृहस्पतिसमैरपि ॥

पृ. ३७०

शके १८५२. ] किंमत साडे तीन रुपये. [ सन १९३०.

## —वाचकांस—



भगवान् श्रीकृष्णाच्या कृपेनें महाभारतार्थाचा तृतीय भाग वाचकांच्या सेवेस सादर करीत आहों. दुसरा भाग प्रसिद्ध होऊन बरेच दिवस झाले तरी तिसरा भाग न मिळाल्यामुळें बरेच वाचक आमच्यावर रुष्ट झाले आहेत व नाइलाजास्तव आम्हांस त्यांना रुष्ट करावें लागलें आहे.

मालेचे ग्राहक भिन्नभिन्न रुचीचे असल्यामुळें व सर्वांना एकाच वेळीं संतुष्ट करणें अशक्य असल्यामुळें भारतार्थभोक्त्यांची थोडा वेळ निराशा करावी लागली. वस्तुस्थिति अशी असली तरी झाला हा विलंब क्षम्य नाहीं हें आम्हांसही कबूल आहे. यापुढें पुढील भागांच्या प्रकाशनांत असा विलंब होणार नाहीं व झालेल्या विलंबाची भरपाई करण्याचे शक्य ते प्रयत्न करूं, असें आश्वासन देऊन तूर्त आमच्या वाचकांची रजा घेतों.

**मंगेश नारायण कुळकर्णी.**

# विषयानुक्रमणिका



## ३ वनपर्व (पुढें चालू)

## अर्जुनाभिगमनपर्व ३. पृ. १–५८

---

## कैरातपर्व ४. पृ. ५९–७१.

---

## इंद्रलोकाभिगमनपर्व ५. पृ. ७२–९२.

---

## नलोपाख्यानपर्व ६. पृ. ९३–१७२.

---

## तीर्थयात्रापर्व ७. पृ. १७२–३८२

---

## जटासुरवधपर्व ८. पृ. ३८३–३८८.



---

## यक्षयुद्धपर्व ९. पृ. ३८८–४१३.

---

## निवातकवचयुद्धपर्व १०. पृ. ४१४–४४०.

---

## आजगरपर्व ११. पृ. ४४१–४६४.

---

## मार्कंडेयसमास्यापर्व १२. पृ. ४६५–४७९.



---

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर )



### तृतीय खंड.



### ३ वनपर्व–( पुढें चालू )



### अर्जुनाभिगमनपर्व ३.



### अध्याय २२ वा.



[ १ श्रीकृष्णानें केलेला शाल्ववध. २ यादवादिकांचें स्व-स्व-स्थानीं गमन. ]

( १ ) वासुदेव—हे भरतश्रेष्ठा युधिष्ठिरा, त्यानंतर मीं माझें सर्वोत्कृष्ट धनुष्य हातांत घेऊन सौभनगरींतील देवशत्रूंच्या मस्तकांचा छेद केला व त्यांचीं शरीरें खालीं पाडिलीं. मीं विषारी सर्पांच्या आकाराचे, प्रखर, तेजस्वी, ऊर्ध्वगामी पुंखयुक्त बाण शाल्वावर सोडिले असतां तें सौभनगर मायेनें अदृश्य झालें. तें पाहून मला विस्मय वाटला. मला आश्चर्यानें थक्क झालेला पहातांच विकृत मुखें व मस्तकें, यांनीं युक्त असलेला तो दानवसमूह मोठ्यानें आक्रोश करूं लागला. तेव्हां सौभनगर अदृश्य झाल्यामुळें त्या महायुद्धांत त्यांचा वध करण्यासाठीं मीं शब्दवेध करणारें अस्त्र धनुष्याला जोडिलें. त्याबरोबर तो सर्व प्रचंड ध्वनि शांत झाला व पूर्वीं ज्यांनीं आक्रोश केला होता, ते सर्व दानव त्या सूर्याप्रमाणें प्रखर शब्दवेधि अस्त्रानें गतप्राण होऊन पडले.

पण हे धर्मराजा, त्या वेळीं एका बाजूचा शब्द जरी शांत झाला तरी दुसऱ्या बाजूला तशीच गर्जना झाली. तेव्हां मीं त्या दिशेकडे बाण सोडिले. याप्रमाणें त्या असुरांनीं दाही दिशा सर्व बाजूंनीं निनादित केल्या असतां मीहि त्या सर्वांचा अस्त्रप्रयोगानें वध केला.

इतक्यांत हे राजेंद्रा, ती कामगामी सौभपुरी पूर्व समुद्राच्या तीरावरील 'प्राग्जोतिष'-नगराकडे जाऊन प्रकट झाली. त्या सौभाकडे पहातांच माझ्या दृष्टीला मोह पडूं लागला. त्या लोकांतक भीषण दानवानें माझ्यावर प्रचंड शिलांचा वर्षाव करून मला झांकून टाकिलें. पुनः पुनः होणाऱ्या त्या पर्वत-वृष्टीनें मी एखाद्या वारुळाप्रमाणें पर्वतराशीमध्यें झांकून गेलों व अश्व आणि सारथि यांसह कोणालाच दिसेनासा झालों. तेव्हां माझ्या सेनेंतील सर्व यादव-वीर भीतीनें एकदम दश-दिशांकडे पळूं लागले.

हे राजा, याप्रमाणें मी दिसेनासा झाल्यामुळें स्वर्ग, पृथ्वी व अंतरिक्ष यांत हाहाकार उडाला. माझे सर्व आप्त व सुहृद् शोकाकुल होऊन दुःखानें आक्रोश करूं लागले. तेव्हां माझ्या शत्रूंना हर्ष झाला व मित्रांना दुःख झालें. हे राजन्, अशाप्रकारें सौभराजानें मला जिंकल्यासारखें भासविल्याचा हा वृत्तांत मला मागाहून कळला. माझी मूर्च्छा गेल्यानंतर सारथ्याच्या मुखानें मीं तो ऐकला.

त्यानंतर मीं इंद्राचें वज्रास्त्र सोडून त्या पर्वतराशींचें विदारण केलें. त्या वेळीं पर्वतांच्या भारानें माझे अश्व अतिशय व्याकुळ व श्वासोच्छ्वास करण्या-सहि असमर्थ होऊन थरथरां कांपत होते. याप्रमाणें मेघमंडलाचा भेद करून आकाशांत उदय पावणाऱ्या आदित्याप्रमाणें मला पर्वतराशींतून बाहेर पडलेलें पाहून माझ्या सर्व बांधवांना पुनः संतोष झाला.

माझ्या अश्वांची अशी शोचनीय अवस्था पाहून माझा सारथि त्या कालाला योग्य असें वचन बोलला. तो म्हणाला—"हे प्रभो, सौभपति शाल्व तुझ्यापुढें उभा आहे. त्याच्याकडे चांगलें लक्ष दे. हे वार्ष्णेया, त्याची उपेक्षा पुरे झाली. आतां त्याच्या नाशाचा सत्वर यत्न कर. हे कृष्णा, शाल्वावरील स्नेह व दया सोडून दे. याचा सत्वर वध कर. त्याला जिवंत ठेवूं नको. हे शत्रु-नाशक वीरा, आपला सर्व पराक्रम खर्च करून शत्रूचा वध करावा. बलवानानें दुर्बल शत्रूचीहि उपेक्षा करूं नये. युद्ध न करणाऱ्या व आपल्या नगरींत स्वस्थ बसून रहाणाऱ्या शत्रूचाहि नाश करावा अशी नीति आहे. मग समरांगणांत

युद्धाला उभ्या राहिलेल्या शत्रूविषयीं काय सांगावें! यास्तव हे वृष्णिकुलश्रेष्ठा, आतां विलंब लावूं नको. सर्व प्रयत्नांनीं याचा वध कर. अशा मार्दवानें त्याला जिंकतां येणार नाहीं. किंवा हा तुझा सखाहि नाहीं. यानेंच अगोदर तुझ्याशीं युद्ध आरंभिलें व द्वारकेवर चाल करून तिला उध्वस्त करून सोडिलें, हें विसरूं नको."

हे युधिष्ठिरा, सारथ्याचें हें वचन ऐकून त्याचें म्हणणें मला योग्य वाटलें. मीं युद्धामध्यें शाल्वाचा वध आणि सौभ-नगरीचा नाश करण्याचा निश्चय केला. 'दारुका, क्षणभर थांब,' असें बोलून मीं आपलें प्रिय आग्नेयास्त्र धनुष्याला जोडिलें. तें दिव्य अस्त्र अभेद्य, अति तेजस्वी, युद्धांत दानवांचा अंत करणारें आणि यक्ष, राक्षस व विपरीत आचरण करणारे म्लेच्छ-राजे यांचें भस्म करणारें होतें.

त्याचप्रमाणें कालांतक यमाचीच ज्याला उपमा आहे, असें तीक्ष्ण धारेचें सुदर्शन चक्र मीं मंत्रविलें आणि 'माझे सर्व शत्रु व सौभ नगर यांचा स्वसामर्थ्यानें नाश कर' असें म्हणून तें मोठ्या क्रोधानें सौभावर सोडिलें. तें शत्रूंचा संहार करणारें अद्वितीय चक्र आकाशांत जात असतां जणुकाय प्रलयकालीं उगवणारा दुसरा सूर्यच वर येत आहे, असें भासलें.

तें दिव्य सुदर्शन सौभनगरापर्यंत जाऊन पोंचलें व करवतीनें एखादें लाकुड जसें कापावें, तसें त्यानें त्या नगराचे मधोमध दोन तुकडे केले. तेव्हां महेश्वराच्या बाणानें उडविलेल्या त्रिपुराप्रमाणें सुदर्शनाच्या बलानें छिन्न-भिन्न झालेलें तें सौभनगर मोठ्या वेगानें खालीं पडलें.

याप्रमाणें त्या सौभनगराचा नाश करून सुदर्शन चक्र परत माझ्या हातीं आलें. तें मीं पुनः अभिमंत्रवून 'आतां वेगानें शाल्वावर जा' असें म्हणून सोडिलें. तेव्हां हातांत प्रचंड गदा घेऊन ती गरगर फिरवीत असलेल्या शाल्वाचे त्यानें आपल्या प्रखर तेजानें एकदम दोन तुकडे केले. अशाप्रकारें त्या शाल्ववीराचा वध झाला असतां माझ्या बाणांनीं पूर्वींच व्यथित झालेले सर्व दानव हाहाकार करीत भीतीनें दश-दिशा पळून गेले.

त्यानंतर मीं आपला रथ सौभनगराच्या समीप उभा करून मोठ्या हर्षानें शंखनाद केला. तो ऐकून माझ्या सुहृदांना परम संतोष झाला. त्या सौभनगराचा आकार मेरूच्या शिखरासारखा असून त्यांतील गोपुरें व वाडे, यांचा

विध्वंस झाला होता. तें नगर जळत असलेलें पाहून त्यांतील स्त्रिया इतस्ततः धावूं लागल्या.

हे युधिष्ठिरा, याप्रमाणें युद्धामध्यें शाल्वाचा वध व सौभाचा निःपात करून मी आनर्तदेशाला परत आलों. तेव्हां माझ्या सर्व सुहृद्-बांधवांना परम आल्हाद झाला. हे धर्मराजा, या कारणामुळें मीं त्या द्यूतप्रसंगीं हस्तिनापुरास येऊं शकलों नाहीं. मीं जर त्या वेळीं तेथें आलों असतों, तर हें द्यूत झालें नसतें अथवा दुर्योधन जिवंत राहिला नसता. परंतु जलप्रवाहानें धरण फोडल्यावर त्याला जसें अडवितां येत नाहीं तसें आतां वेळ निघून गेल्यावर मी तरी काय करणार !

( २ ) वैशंपायन—राजा जनमेजया, श्रीमान् मधुसूदन असें बोलून व सर्व पांडवांचा निरोप घेऊन निघाला. त्यानें युधिष्ठिराला वंदन केलें असतां धर्मराज व भीमसेन यांनीं त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें. अर्जुनानें त्याला आलिंगन दिलें व नकुल-सहदेवांनीं त्याला अभिवादन केलें. धौम्यानें त्याचा सत्कार केला आणि द्रौपदीनें आपल्या अश्रूंनीं पुरुषोत्तमाचें पूजन केलें.

याप्रमाणें पांडवांनीं सत्कार केला असतां श्रीकृष्णानें सुभद्रा व अभिमन्यु यांस आपल्या सुवर्णमय रथांत बसविलें आणि युधिष्ठिराला आश्वासन देऊन तो वासुदेव आपल्या शैब्य व सुग्रीव या सर्वोत्कृष्ट अश्वांनीं युक्त असलेल्या आदित्यतुल्य रथांत बसून द्वारकेस निघून गेला.

दाशार्ह श्रीकृष्ण निघून गेला असतां त्याच्या मागोमाग धृष्टद्युम्न द्रौपदी-पुत्रांना घेऊन आपल्या नगराला गेला. शिशुपालाचा पुत्र धृष्टकेतु आपली भगिनी जी नकुलभार्या रेणुमती, तिला घेऊन आपल्या चेदिदेशाकडे निघाला. त्याचप्रमाणें सहदेवाचे शालक केकयराजपुत्र पांडवांना भेटून व त्यांची अनुज्ञा घेऊन आपल्या रम्य शुक्तिमती-नगरीकडे परत फिरले.

त्यानंतर सर्व ब्राह्मण, वैश्य व इतर नागरिक यांनाहि पांडवांनीं निरोप दिला. परंतु ते त्या महात्म्या पांडवांना सोडून जाईनात. काम्यकवनांतील त्या सर्व महात्म्यांचा तो समागम अभूतपूर्व होता. तथापि युधिष्ठिरानें त्या विप्रांचा निरोप घेतला व सारथ्यांना रथ सज्ज करण्याची आज्ञा केली. ३. ३. २२.

## अध्याय २३ वा.

[ १ पांडवांचें वनाकडे गमन. २ त्यांस पौरजनांचा निरोप. ]

( १ ) **वैशंपायन**—हे पारिक्षिता, याप्रमाणें तो देवकीनंदन परत गेला असतां द्रौपदी व पुरोहित यांच्यासह ते पांची पांडव भ्राते उत्कृष्ट अश्वांनीं युक्त असलेल्या रथांत बसून वनाकडे जावयास निघाले. महेश्वराप्रमाणें शोभणाऱ्या त्या वीरांनीं निघतेवेळीं वेदवेत्त्या विद्वान् ब्राह्मणांना एकशें आठ सुवर्ण नाण्यांचा एक, असे अनेक निष्क, वस्त्रें, आणि गायी यांचें दान दिलें.

त्या पूर्वीच त्यांचे शस्त्रयुक्त वीस सेवक शस्त्रें, दिव्य बाण, धनुष्यें, ज्या, यंत्रें व खड्ग घेऊन द्वारकेस निघून गेले होते. त्यानंतर इंद्रसेनहि सुभद्रेचीं वस्त्रें, भूषणें व दासी यांसह, रथांत बसून त्वरेनें द्वारकेस गेला.

त्या वेळीं इंद्रप्रस्थांतील उदार नागरिक तेथें आले व त्यांनीं धर्मराजाला प्रदक्षिणा घातली. प्रसन्नमुख ब्राह्मण व कुरुजांगल देशांतील प्रमुख प्रजाजन, युधिष्ठिराशीं बोलूं लागले असतां भ्रात्यांसह धर्मराजानेंहि प्रसन्न मनानें त्यांच्याशीं संभाषण केलें. कुरुजांगल-देशांतील तो जनसमूह पाहून त्यांचा अधिपति महात्मा धर्मराज स्वस्थ उभा राहिला. पित्याचें जसें आपल्या पुत्रांवर प्रेम असतें, तसेंच युधिष्ठिराचें त्या आपल्या प्रजेवर होतें आणि ते प्रजाजनहि पुत्र जसे पित्यावर लोभ करितात, तसेच धर्मराजाला प्रिय मानीत असत.

हे राजेंद्रा, अशा प्रकारचा तो प्रमुख नागरिकांचा समुदाय धर्मराजाच्या सभोंवार उभा राहिला आणि 'हे प्रभो, हे धर्मराजा, आम्हांला आतां या असल्या कुराज्यांत रहावें लागणार ना!' असें बोलत लज्जित होऊन अश्रु ढाळूं लागला.

(२) ते दुःखित झालेले पौरजन पुनः म्हणाले—आम्हां प्रजेला पितृतुल्य असलेला हा श्रेष्ठ धर्मराज आज या सर्व नागरिकांना सोडून कोठें चालला ! हे प्रभो, सर्वदा धर्मनिष्ठ असलेल्या तुला द्यूतांत जिंकून जे अशा प्रकारें संकटांत घालूं इच्छितात त्या निष्ठुर धृतराष्ट्रपुत्राला, शकुनीला व कर्णाला धिक्कार असो !

ज्यानें स्वसामर्थ्यानें इंद्रप्रस्थ नगर वसवून कैलासाप्रमाणें शोभणाऱ्या त्या अप्रतिम नगरींत प्रवेश केला, तो हा आमचा अचिंत्य पराक्रमी महाराज युधिष्ठिर कोठें चालला !

महात्म्या मयासुरानें देवसभेसारखी अद्वितीय सभा ज्याच्यासाठीं निर्माण केली, तो धर्मराज देवांनीं रक्षण केलेली ती मयसभा सोडून कोठें जात आहे !

पौरजन याप्रमाणें शोकाकुल होऊन विलाप करीत असतां धर्म, अर्थ व काम यांस यथार्थ जाणणारा अत्यंत तेजस्वी धनंजय त्या सर्वांस उच्च स्वरानें म्हणाला —"हे पौरजनहो, हा धर्मराजा वनवासाचा काल समाप्त होतांच दिव्य सभास्थानादि आपलें ऐश्वर्य व शत्रूंचें यश यांचें पुनः हरण करील. यास्तव तुम्ही सर्व या तपस्वी ब्राह्मणांना एकत्र व पृथक् पृथक् प्रसन्न करून आमच्या अर्थसिद्धीसाठीं त्यांची प्रार्थना करा."

राजा, पार्थाचें हें भाषण ऐकून त्या ब्राह्मणादि सर्व वर्णांच्या प्रजाजनांनीं मोठ्या संतोषानें महात्म्या धर्मराजाला प्रदक्षिणा घातली व त्याचें अभीष्ट चिंतिलें. नंतर द्रौपदीसह पांची भ्रात्यांचा निरोप घेऊन खिन्न मनानें त्यांनीं स्वनगरीकडे प्रयाण केलें. ३. ३. २३.

---

## अध्याय २४ वा.

[ १ पांडवांचा द्वैतवनांत प्रवेश. ]

( १ ) वैशंपायन—राजा, ते सर्व प्रजाजन परत गेले असतां सत्यप्रतिज्ञ युधिष्ठिर आपल्या चारी भ्रात्यांना म्हणाला—"हे वीरांनो, आपल्याला आतां बारा वर्षें निर्जन वनांत काढावयाचीं आहेत. यास्तव ज्या प्रदेशांत विपुल हरिणें व द्विज असतील असें एखादें महारण्य शोधून काढा. पुण्य जनांनीं युक्त व फल-पुष्पांनीं समृद्ध असलेल्या स्थळीं आपण हीं बारा वर्षें सुखानें राहूं."

धर्मराजाचें हें वचन ऐकून, अर्जुन पितृतुल्य असलेल्या त्या उदार नरेंद्राचा गुरूप्रमाणें सत्कार करून म्हणाला—"हे भरतश्रेष्ठा, तूं वृद्ध महर्षींची परिचर्या केलेली आहेस. या लोकीं तुला अज्ञात असें कांहींच नाहीं. तूं कृष्णद्वैपायनादि महातपस्व्यांची व श्रेष्ठ ब्राह्मणांची नित्य उपासना करीत असतोस. ज्या देवर्षींचा देवलोक, ब्रह्मलोक व गंधर्वादि इतर सर्व लोक यांत नित्य संचार असतो त्या श्रेष्ठ नारदमुनीचाहि तुला सहवास आहे. त्यामुळें ब्राह्मणांचा कर्तव्याकर्तव्याविषयींचा निश्चय व त्यांचें निग्रहानुग्रहसामर्थ्य तूंच जाणतोस. त्याचप्रमाणें हे महाराज, निःश्रेयस–मोक्ष व त्याचें साधन, यांचें तुला पूर्ण ज्ञान आहे. यास्तव तुझी जेथें रहाण्याची इच्छा असेल तेथेंच आम्ही सर्व राहूं.

हे धर्मराजा, हें ‘ द्वैतवन ’-नांवाचें सरोवर पवित्र जलानें युक्त आहे. तसेंच हें वन विविध फल-पुष्पांनीं समृद्ध आहे आणि नानाप्रकारचे पक्षी व द्विज यांचें निवासस्थान आहे. शिवाय शोक-मोहादि द्वंद्वांनीं रहित असल्यामुळेंहि या स्थलास द्वैतवन म्हणतात. यास्तव याच ठिकाणीं आपण बारा वर्षें सुखानें रहावें, असें मला वाटतें. हे राजन्, तुझी याला अनुमति आहेना ? किंवा तुझा निराळाच कांहीं विचार आहे !”

युधिष्ठिर—हे धनंजया, तुझें म्हणणें मला संमत आहे. आपण त्या प्रसिद्ध द्वैतवन-सरोवराकडेच जाऊं या.

वैशंपायन—राजा, असें बोलून ते धर्माचरण करणारे पांडव अनेक ब्राह्मणां-सह त्या पवित्र ‘ द्वैतवन ’-सरोवराकडे गेले. तेथेंहि अग्निहोत्र करणारे, निरग्नि, वेदाध्ययन करणारे व भिक्षेवर निर्वाह करणारे, अशा अनेक वनवासी ब्राह्मणांचा समुदाय युधिष्ठिराच्या भोंवतीं जमला. त्यांत तपस्वी, सिद्ध व तीव्र व्रतें धारण करणारे पुष्कळ महात्मेहि होते. त्या असंख्य ब्राह्मणांसह श्रेष्ठ राज-पुत्रांनीं त्या रम्य द्वैतवनांत प्रवेश केला.

त्या वनांत साल, ताल, आम्र, इत्यादि नानाप्रकारचे प्रचंड वृक्ष होते. राष्ट्रपति युधिष्ठिरानें वर्षाकाल संपल्यावर असंख्य पुष्पित वृक्षांनीं सुशोभित झालेलें तें महावन पाहिलें. त्यांतील महावृक्षांच्या शिखरांवर मयूर, कोकिल, ससाणे इत्यादि नानाप्रकारचे पक्षी मधुर ध्वनि करीत होते. त्याचप्रमाणें त्या वनांत धर्मराजानें हत्तिणींच्या कळपासह चाललेले मदोन्मत्त महागजहि पाहिले. ते पर्वतासारखे प्रचंड हत्ती आपल्या कळपाचें संरक्षण करीत असलेले दिसले.

तेथील मनोरम सरस्वती-नदीच्या तीरावर जटाधारी महात्म्यांचीं निवास-स्थानें होतीं. त्या वनामध्यें धर्मात्म्या पांडवांना अनेक सिद्ध व ऋषि यांचें दर्शन झालें.

धर्मराजानें आपले भ्राते व इतर परिवार यांसह रथांतून उतरून, इंद्र जसा स्वर्गांत प्रवेश करितो तसा त्या वनांत प्रवेश केला. त्या वेळीं सिद्ध, चारण आणि वनवासी जन त्या सत्यप्रतिज्ञ धर्मराजाला पहाण्याच्या इच्छेनें तेथें जमले व त्या नरेंद्रसिंहाच्या सभोंवार उभे राहिले. तेव्हां धर्मधारण करणारांतील श्रेष्ठ युधिष्ठिरानें त्या सर्व सिद्धगणाला वंदन केलें; उलट त्या सर्वांनींहि त्याचा राजा आणि देव, यांप्रमाणें सत्कार केला.

त्यानंतर धर्मराजा आपल्या सर्व परिवारासह त्या वनांतील एका विशाल कदंब वृक्षाखालीं जाऊन राहिला. तेव्हां अनेक तपस्वी जनांनीं त्या पुण्यशीलाचा पित्याप्रमाणें सत्कार केला. त्या पुष्पयुक्त वृक्षाखालीं धर्मात्मा युधिष्ठिर बसला असतां द्रौपदीसह चारी पांडुपुत्र व त्यांचे अनुचर त्यांच्या समीप येऊन बसले. रथाचे अश्व सोडून इतर सेवकहि तेथें आले. तेव्हां वीर पांडवांनीं ज्याच्या मुळाचा आश्रय केला आहे असा तो शाखांनीं आवृत्त व नम्र झालेला महावृक्ष हत्तींच्या कळपांनीं परिवेष्टित झालेल्या पर्वताप्रमाणें शोभला. ३. ३. २४.

---

## अध्याय २५ वा.

[१ मार्कंडेय-मुनीचें युधिष्ठिराकडे आगमन. २ त्याचा धर्माचरणाविषयीं उपदेश.]

(१) **वैशंपायन**—हे नृपश्रेष्ठा, याप्रमाणें त्या सरस्वतीनदीच्या तीरावरील श्यालवनामध्यें राहून ते इंद्रतुल्य राजपुत्र वनवासाच्या संकटकालाचें सुखानें आक्रमण करूं लागले. महात्म्या धर्मराजानें त्या वनांतील यति, मुनि व इतर सर्व ब्राह्मणादि यांना फळें व कंद-मुळें यांनीं तृप्त केलें. पांडव त्या महावनांत रहात असतां त्यांना पितृवत् असलेला धौम्य-पुरोहित त्याच्या दर्श-पौर्णमासादि इष्टि व दर्शश्राद्धादि पितृयज्ञ यथासांग करीत असे.

अशाप्रकारें ते धर्मनिष्ठ पांडव राज्यभ्रष्ट होऊन वनांत रहात असतां एकदा पुराण-ऋषि मार्कंडेय त्या उदारबुद्धि पांडवांच्या आश्रमास आला. देव, ऋषि व मानव यांना पूज्य व प्रदीप्त अग्नीप्रमाणें महातेजस्वी असलेला तो ऋषि आपल्याकडेच आला आहे, असें पहातांच धर्मात्म्या युधिष्ठिरानें त्याचें अर्घ्यपाद्यादिकांनीं पूजन व स्वागत केलें.

त्या वेळीं त्या अनुपम तेजस्वी पांची भ्रात्यांना व पांचालीला पाहून त्या पुराणऋषीला श्रीरामचंद्राचें स्मरण झालें आणि त्या सर्व तपस्विसमुदायामध्यें तो स्वतःशींच विस्मयानें हंसला. तें पाहून धर्मराज खिन्न होऊन म्हणाला—“हे महर्षे, हे सर्व तपस्वी गंभीरपणानें येथें बसले आहेत. त्यांच्या समक्ष आपण परम संतोषानें मजकडे पाहून हंसत आहां, हें काय ?”

---

१. या पुढील दोन अध्यायांत मार्कण्डेय आणि दाल्भ्य यांनीं अधर्मत्याग व गो-ब्राह्मणभक्ति हेंच राजाचें आद्य कर्तव्य होय, असें प्रतिपादिलें आहे.

(२) मार्कंडेय—अरे बाबा, मीं हृष्ट झालों नाहीं किंवा आनंदानें उन्मत्त होऊनहि हंसत नाहीं. तुझी ही आपत्ति पाहून मला सत्यप्रतिज्ञ दाशरथि रामाचें स्मरण झालें. तो नृपश्रेष्ठहि पूर्वीं पित्याच्या आज्ञेनें भ्रात्या लक्ष्मणासह वनांत राहिला होता. मीं त्या महात्म्याला हातांत धनुष्य घेऊन ऋष्यमूक-पर्वतावर फिरत असतांना पाहिलें आहे. तो पराक्रमी राघव प्रत्यक्ष यमाचा निग्रह करण्यास समर्थ होता. नमुचीचा वध करणाऱ्या इंद्रासारखा प्रतापवान् होता, तरीहि त्यानें पित्याची आज्ञा 'स्वधर्म' म्हणून पाळिली व कष्टकर वनवास पत्करिला. तो इंद्रतुल्य सामर्थ्यवान् व युद्धांत अजिंक्य असूनहि सर्व सुखोपभोगांचा त्याग करून वनांत राहिला. परंतु त्यानें स्वसामर्थ्याच्या दर्पानें अधर्म आचरिला नाहीं!

युधिष्ठिरा, पूर्वीं नाभाग, भगीरथ, इत्यादि अनेक नृपश्रेष्ठांनीं ही सागरान्त पृथ्वी जरी जिंकिली होती, तरी त्यांनीं सत्यानेंच सर्व लोकांना अधीन करून घेतलें. समर्थ असूनहि अधर्माचरण केलें नाहीं.

हे नरेंद्रा, काशी व करूष-देशांचा राजा अलर्क सत्यव्रत असून त्याला सर्व लोक महात्मा समजत. तोहि धर्मासाठीं आपलें राज्य व धन यांचा त्याग करून वनांत राहिला. यावरून आपल्या अंगीं कितीहि सामर्थ्य असलें तरी अधर्मा-चरण करूं नये, हेंच सिद्ध होतें. विधात्यानें वेदविहित अग्निहोत्रादि जीं कर्में सांगितलीं आहेत, त्यांच्या अनुष्ठानानेंच हे सप्तर्षि आकाशामध्यें शोभत आहेत. यास्तव सामर्थ्याच्या दर्पानें अधर्माचरण करूं नये.

हे राजेंद्रा, पशूदेखिल आपल्या बलाच्या दर्पानें कधीं अधर्माचरण करीत नाहींत. महाबलाढ्य गजेंद्र पहा! हे मत्त गज पर्वतशिखरासारखे विशाल, तीक्ष्ण दांतांनीं युक्त व अतिशय सामर्थ्यवान् आहेत. तरीहि ते विधात्याच्या नियतीचें उल्लंघन करीत नाहींत. यास्तव सामर्थ्याच्या बलावर अधर्म करूं नये. हे धर्मराजा, हीं सर्व सर्पादि भूतें पहा! तीं स्वजन्मानुरूप विधात्यानें नेमून दिलेलींच कर्में करीत असतात. सामर्थ्यसंपन्न असूनहि अधर्माचरण करीत नाहींत. हे कौंतेया, सत्य, धर्म, सदाचरण, अकार्याविषयीं लज्जा यांच्या योगानें तुझी उज्ज्वल कीर्ति सर्व भूतांचें अतिक्रमण करून सूर्याच्या प्रखर तेजा-प्रमाणें पसरली आहे. हे महाभागा, तुझ्या प्रतिज्ञेप्रमाणें हा क्लेशकारक वन-

१. नेशे बलस्येति चरेदधर्मम् ॥

वास पूर्ण झाल्यावर तूं आपलें ऐश्वर्य कौरवांपासून स्वपराक्रमानें हरण करून घेशील.

वैशंपायन—हे राजा, त्या तापसांच्या समुदायांत असें भाषण करून तो महर्षि मार्कंडेय धौम्य, पांडव व इतर सुहृद् यांचा निरोप घेऊन उत्तर दिशे-कडे निघून गेला. ३. ३. २५.

---

## अध्याय २६ वा.

[ १ बकदाल्भ्याचा पांडवांस उपदेश. ]

( १ ) वैशंपायन—हे जनमेजया, महात्मे पांडव द्वैतवनामध्यें रहात असतां ब्राह्मणांनीं तें महारण्य व्यापून टाकिलें. तें पवित्र 'द्वैतवन'-सरोवर सतत वेदघोषानें दुमदुमून गेल्यामुळें ब्रह्मलोकाप्रमाणें भासलें. तेथें यजुः, ऋक् व साम या तीन वेदांच्या व इतर गद्यग्रंथांच्या पठनाचा हृदयंगम ध्वनि पसरला होता. पांडुपुत्रांच्या धनुष्याचा टणत्कार व बुद्धिमान् ब्राह्मणांचा वेदघोष या दोहोंचा तो संमिश्र ध्वनि सुश्राव्य होता. खरोखर, अशा प्रकारचा तो ब्राह्मण-क्षत्रियसमागम तेथें अधिकच शोभला.

राजा जनमेजया, एकदा युधिष्ठिर आपलें संध्योपासनादि सर्व सायंकर्मे उरकून ऋषिसमुदायांत बसला असतां बकदाल्भ्य ऋषि त्याला म्हणाला—"हे धर्मराजा, ही होमवेला पहा ! या द्वैतवनांतील तपस्वी ब्राह्मणांनीं या वेळीं अग्नि प्रज्वलित केला आहे. तूं संरक्षण केल्यामुळें भृगु, अंगिरा, वसिष्ठ, कश्यप अगस्त्य व अत्रि या महाभाग्यशाली सहा ऋषींच्या श्रेष्ठ कुलांतील हे तीव्र व्रत धारण करणारे तापस या पवित्र वनांत राहून धर्माचरण करीत आहेत. तुला या जगांतील श्रेष्ठ ब्राह्मणांचा सहवास घडत आहे.

हे नरेंद्रा, मी तुला आतां जें परम वचन सांगत आहें तें आपल्या भ्रात्यां-सह लक्षपूर्वक ऐक. हे नृपश्रेष्ठा, ज्या वेळीं ब्राह्मण व क्षत्रिय परस्परांशीं सहकार्य करितात, त्या वेळीं वायूचें साह्य असलेला अग्नि जसा वनांत वणवा पसरून त्याचें भस्म करून टाकितो, तसे ते शत्रूला दग्ध करितात.

---

१. ब्रह्म क्षत्रेण संसृष्टं क्षत्रं च ब्रह्मणा सह। उदीर्णे दहतः शत्रून् वनानीवाग्नि-मारुतौ ॥

ब्राह्मणरहित नृपाचें ऐश्वर्य शाश्वत टिकत नाहीं. त्याची उत्कट इच्छा असली तरी त्याला ऐहिक व पारलौकिक जय दुर्लभ होतो. धर्मार्थांचें यथार्थ ज्ञान असलेल्या मोहरहित ब्राह्मणाचें साह्य असलें तरच भूपाल शत्रूंचा निःपात करूं शकतो. यास्तव इह व परलोक जिंकण्याची इच्छा करणाऱ्या नृपालानें अधीत ब्राह्मणाचें साह्य घेतल्यावांचून राहूं नये.

बलीलाहि ब्राह्मणांच्या सहकार्यानेंच त्रिलोकींचें राज्य मिळालें. परंतु तो पुढें विप्रांशीं वैर करूं लागतांच त्याचा नाश झाला. ज्या नृपाला द्विजाचें साह्य नसेल त्याच्यापाशीं ही भूमि चिरकाल केव्हांहि टिकणार नाहीं.

जो पृथ्वीपति ब्राह्मणांच्या संमतीनें राज्यशासन करितो, त्याच्या अधीन सर्व समुद्रवलयांकित पृथ्वी रहाते. संग्रामामध्यें अंकुशावांचून गजावर आरूढ होणारास जसा त्या हत्तीचा निग्रह करितां येत नाहीं, त्याप्रमाणेंच विप्ररहित क्षत्रियांचें सामर्थ्य नष्ट होतें.

हे धर्मराजा, ब्राह्मणाची अनुपम दृष्टि व क्षत्रियांचें अप्रतिम सामर्थ्य, हीं दोन्ही जेव्हां परस्परांस अनुकूल असतात, तेव्हां सर्व लोक प्रसन्न होतात. ज्याप्रमाणें अग्नि वायूच्या साह्यानें प्रदीप्त होऊन तृणाला जाळतो, त्याप्रमाणें ब्राह्मणांच्या साह्यानें क्षत्रिय आपल्या शत्रूला दग्ध करितो. यास्तव हे पृथापुत्रा, अप्राप्त वस्तूच्या प्राप्तीसाठीं व प्राप्त संपत्तीच्या वृद्धीसाठीं बुद्धिमान् राजानें द्विजांच्या ज्ञानाचा संग्रह करावा.

हे कुंतीकुमारा, यास्तव ऐश्वर्याची प्राप्ति व वृद्धि होण्यासाठीं आणि प्राप्त धनाचा सत्पात्रीं विनियोग होण्यासाठीं तूं यशस्वी, वेदवेत्त्या, विद्वान् व बहुश्रुत ब्राह्मणांनाच आश्रय दे. हे युधिष्ठिरा, ब्राह्मणांशीं तुझें नित्य उत्कृष्ट वर्तन असतें, त्यामुळें तुझें विपुल यश सर्व लोकीं प्रकाशत आहे.

राजा जनमेजया, त्या बकदाल्भ्याचें हें भाषण ऐकून तेथें जमलेल्या सर्व ब्राह्मणांनीं त्याचें पूजन केलें व त्या विप्रश्रेष्ठानें युधिष्ठिराची आणखी स्तुति केली असतां तो सर्व द्विजसमूह प्रसन्न झाला.

त्यानंतर द्वैपायन, नारद, जामदग्न्य, पृथुश्रवा, इंद्रद्युम्न, भालुकि, कृतचेता, सहस्रपात्, कर्णश्रवा, मुंज, लवणाश्व, काश्यप, हारीत, स्थूणकर्ण, अग्निवेश्य,

१. नाब्राह्मणस्तात चिरं बुभूषेदिच्छन्निमं लोकममुं च जेतुम्। विनीतधर्मार्थमपेतमोहं लब्ध्वा द्विजं नुदति नृपः सपत्नान्॥

शौनक, कृतवाक्, सुवाक्, बृहदश्व, विभावसु, वृषामित्र, सुहोत्र, होत्रवाहन आणि इतरहि तीक्ष्ण व्रतें धारण करणारे ब्राह्मण यांनीं पूर्वी ऋषींनीं केलेल्या इंद्राच्या सत्काराप्रमाणें अजातशत्रु युधिष्ठिराचा सन्मान केला. ३. ३. २६.

---

## अध्याय २७ वा.

[ १ द्रौपदीचें दुःखनिवेदन. ]

( १ ) **वैशंपायन**—हे परिक्षित्पुत्रा, याप्रमाणें ते पांडुपुत्र वनामध्यें कालक्रमण करीत असतां एकेदिवशीं सायंकाळीं ते दुःख-शोकपरायण झालेले भ्राते द्रौपदीसह गोष्टी बोलत बसले होते. तेव्हां त्या पराक्रमी पांडवांची प्रिय पत्नी पंडिता पांचाली युधिष्ठिराला म्हणाली—

" हे प्रभो, त्या दुरात्म्या दुर्योधनानें माझ्यासह आपणांसारख्या वीरांना वल्कलें धारण करून वनवासास पाठविलें, पण याविषयीं त्या पाप्याला यत्किंचित्हि खेद झाला नाहीं. कारण आम्ही वनवासाला निघालों असतां, त्या दुर्मतीला मुळींच पश्चात्ताप झालेला दिसला नाहीं. खरोखर त्या दुष्टाचें हृदय लोखंडाचेंच असलें पाहिजे. त्या निष्ठुर धार्तराष्ट्राला आपणांसारख्या ज्येष्ठ व परम धर्मनिष्ठ भ्रात्यास कठोर वचनें ऐकविण्यांत मोठा हर्ष वाटला.

ज्या वेळीं दुर्योधन, दुःशासन, कर्ण व शकुनि या चौघां पापी पुरुषांनीं निरंतर सुखांत राहिलेल्या व दुःख भोगण्यास असमर्थ असलेल्या आपणांस अशाप्रकारचे क्लेश दिले, त्या वेळीं त्यांच्या नेत्रांत अश्रूंचा एक बिंदुहि आला नाहीं. परंतु त्या चौघां दुरात्म्यांवांचून इतर सर्व दुःखाकुल झालेल्या कुरुश्रेष्ठांच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहिल्या !

हे महाराज, आपल्या सारख्या राजैश्वर्यांत वाढलेल्या उदारात्म्याची ही शय्या पाहून मला पूर्वीच्या वैभवाचें स्मरण होतें आणि माझें मन दुःखाकुल होतें. आपलें सभेंतील तें रत्नजडित हस्तिदंती आसन कोठें व आतांचें हें तृणासन कोठें ! हें विचित्र स्थित्यंतर पाहून शोकानें माझा कंठ दाटून येतो.

हे राजन्, सभेमध्यें नृपांनीं परिवेष्टित झालेल्या आपणांस पहाणारी मी आज आपल्याला या स्थितींत पाहून आपलें मन कसें शांत ठेवूं ! हे नृपश्रेष्ठा, ज्या सूर्यतुल्य तेजस्वी नरवरांस मीं चंदनाची उटी व उंची रेशमी वस्त्रें यांनीं

युक्त असलेलें पूर्वी पाहिलें त्यांस आतां धुळीनें मलीन झालेलें व वल्कलें धारण केलेलें पाहून माझें मन दुःखानें भ्रांत होत आहे.

हे पृथ्वीपते, ज्या आपल्या गृहांत हजारों ब्राह्मण–यति, ब्रह्मचारी व गृहस्थ षड्रस उत्तम अन्नाचें सुवर्णाच्या पात्रांतून नित्य भोजन करीत असत, अतिथींच्या सर्व कामना पुरविल्या जात असत आणि द्विजांचा यथाविधि सत्कार केला जात असे, त्या धर्मात्म्याची ही विपन्नावस्था पाहून माझ्या हृदयाला शांति कोठून मिळणार !

हे धर्मज्ञा, आपल्या या तरुण भ्रात्यांकडे पहा ! या कुंडलें धारण करणाऱ्या राजपुत्रांना कुशल सूपकार उत्कृष्ट प्रकारचें रुचकर अन्न तयार करून देत. ते सुखांत वाढलेले आहेत. हे अशा प्रकारचे क्लेश भोगण्यास पात्र नाहींत, तथापि त्या सर्वांना वनवासांतील हा वन्य आहार सेवन करीत असलेलें पाहून माझें मन अतिशय व्यथित होतें.

वनवासांत असलेला हा भीमसेनहि किती दुःख सोशीत आहे पहा ! हे महाराज, त्याचे क्लेश पाहून तरी आपला क्रोध कसा वाढत नाहीं ! स्व-स्वभावापासून कधींहि च्युत न होणारा व सुखांत राहिलेला हा भीमसेन आतां स्वतः सर्व कामें करीत आहे. विविध वाहनें व उंची वस्त्रें यांनीं ज्याचा सदैव सत्कार होत असे अशा या वृकोदराला दुःखांत खितपत पडलेलें पाहून आपल्याला शत्रूंचा क्रोध कसा येत नाहीं ! हा बलाढ्य भीमसेन रणामध्यें कौरवांचा संहार करण्यास समर्थ आहे. परंतु आपला प्रतिज्ञाकाल पूर्ण होण्याची प्रतीक्षा करीत तो हे सर्व क्लेश मुकाट्यानें सहन करीत आहे !

हे नरेंद्रा, सहस्रबाहु कार्तवीर्याप्रमाणें शीघ्र शरसंधान करण्यांत प्रवीण असलेला हा द्विबाहु अर्जुन कालांतक यमासारखा आहे. ज्या धनुर्धराच्या शस्त्रप्रतापानें सर्व भूपाल नम्र होऊन आपल्या राजसूय यज्ञांत ब्राह्मणांची सेवा करण्यास उभे राहिले, त्या या देव-दानवांना पूज्य असलेल्या पुरुषव्याघ्राला असा चिंतामग्न पाहूनहि हे राजन्, आपणांस संताप कसा येत नाहीं ! हे धर्मनिष्ठा, ऐश्वर्यामध्यें वाढलेल्या या पार्थाचा हा वनवास पाहून आपणांस अणुमात्रहि खेद होत नाहीं, हें पाहून माझें मन अतिशय व्यथित होतें.

ज्या वीरानें एका रथानें देव, मनुष्य व सर्प यांना जिंकिलें, जो सर्वदा अद्भुत आकाराच्या रथावर आरूढ होऊन उत्तम अश्व व गज यांनीं वेष्टिलेला असे,

ज्यानें अनेक भूपालांकडून बलात्कारानें वित्त जिंकून आणिलें, जो एकाच वेळीं वेगानें पांचशें बाण सोडण्यास समर्थ आहे, अशा या श्रेष्ठ धनुर्धराला आज वनवास भोगावा लागत आहे, हें पाहून आपला क्रोधाग्नि कसा भडकत नाहीं!

हे प्रभो, या शूर व सुंदर माद्रीपुत्रांचा विचार करा. हा ढाल-तलवार धारण करणारांतील श्रेष्ठ, तरुण, उंच व सुस्वरूप नकुल हे वनवासाचे क्लेश सहन करीत आहे. तसाच हा वीर सहदेवहि या महारण्यांत दुःख भोगीत आहे. दुःखाला उचित नसलेल्या या भ्रात्यांना असल्या दुःसह संकटांत पाहूनहि हे महाराज, आपण शत्रूला कशी क्षमा करितां !

हे प्रभो, द्रुपदाच्या कुलांत उत्पन्न झालेली, महात्म्या पांडुनृपतीची स्नुषा, धृष्टद्युम्नाची भगिनी, वीरपत्नी आणि आपणांस सदैव अनुकूल असलेली मी सम्राज्ञी एखाद्या दरिद्रेप्रमाणें वनवासिनी झालें आहे, हें पाहूनहि हे धर्मराज, आपण शत्रूला क्षमा कशी करितां !

खरोखर, मला तर असें दिसतें कीं, आपल्या अंतःकरणांत क्रोधच नाहीं. त्यामुळें भ्राते व मी यांचे क्लेश पाहूनहि आपलें मन व्यथा पावत नाहीं. परंतु 'कोणीहि क्षत्रिय क्रोधरहित नसतो' असें वचन लोकांमध्यें श्रुत आहे. आपल्या ठिकाणीं तर मला याच्या विपरीत अनुभव येत आहे !

हे नृपश्रेष्ठा, जो क्षत्रिय योग्य काल प्राप्त झाला असतांहि आपला क्रोध प्रकट करीत नाहीं, त्याचा सर्व भूतांकडून पराभव होतो. यास्तव हे राजन्, आपण शत्रूला केव्हांहि क्षमा करूं नये. आपण नुस्त्या तेजानेंच त्यांचा नाश करण्यास समर्थ अहां, यांत संशय नाहीं. त्याचप्रमाणें जो क्षत्रिय क्षमेच्या कालींहि शांत होत नाहीं तो सर्व प्राण्यांना अप्रिय होऊन, इहलोकीं व परलोकींहि नाश पावतो. ३. ३. २७.

---

## अध्याय २८ वा.

[ १ क्षमेविषयीं बलि व प्रह्लाद यांच्या संवादाचा द्रौपदीनें केलेला अनुवाद. ]

(१) **द्रौपदी**—हे महाराज, याविषयीं एका पुरातन इतिहासाचें उदाहरण देत असतात. पूर्वी विरोचनाचा पुत्र बलि व प्रह्लाद या दोघांचा संवाद झाला. असुरेंद्र प्रह्लाद महाप्राज्ञ व धर्माचें रहस्य जाणणारा होता. एकदा बलीनें त्या आपल्या पितामहाला असा प्रश्न केला—

बलि म्हणाला—"हे धर्मज्ञ तात, क्षमा श्रेष्ठ कीं तेज श्रेष्ठ! माझ्या या संशयाचें यथार्थ निरसन कर. क्षमा व तेज या दोहोंतील जें प्रशस्यतर असेल, तें मला सांग. म्हणजे मी तुझ्या उपदेशाप्रमाणें वर्तन करीन.

बलीनें असें विचारिलें असतां त्याचा तो सर्वनिश्चयवेत्ता पितामह त्याला म्हणाला—"वत्सा, निरंतर क्षमाशील असणेंहि योग्य नव्हे व सर्वदा क्रोध प्रकट करणेंहि उचित नाहीं. हाच या दोहोंविषयीं निश्चित नियम आहे, असें तूं निःसंशय जाण.

जो मनुष्य नित्य क्षमायुक्त असतो तो अनेक दोषांना पात्र होतो. त्याचे सेवक त्याचा अवमान करितात. त्याचे शत्रु व तटस्थ लोक त्याचा पराभव करितात. सर्व प्राणिमात्र त्याच्यापुढें केव्हांहि नम्र होत नाहींत. म्हणून नित्य क्षमा पंडितांनींहि वर्ज्य मानिली आहे.

क्षमाशील स्वामीचे सेवक नित्य त्याची अवज्ञा करून अनेक अपराध करितात. ते मूढ सेवकजन क्षमावान् प्रभूच्या धनाचा अपहार करितात. त्याचप्रमाणें अन्न-पानादिकांच्या संरक्षणासाठीं नियुक्त केलेले भृत्य आपल्या धन्याचीं वाहनें, वस्त्रें, अलंकार, शयनें, आसनें आणि भोजनादि या सर्वांचा आपल्या इच्छेप्रमाणें व्यय करितात. स्वामीनें 'ही वस्तु याला दे' अशी आज्ञा केली असतांहि ते अविचारी सेवक त्याप्रमाणें वागत नाहींत. किंवा ते या क्षमावान् स्वामीचा कोणत्याच प्रकारें योग्य आदरहि करीत नाहींत. वत्सा, या लोकांतील अवज्ञा मरणाहूनहि निंद्य आहे. पण नित्य क्षमाशील पुरुषाला त्याचे पुत्र, भृत्य, दास-दासी व उदासीन वृत्तीनें राहिलेले लोकहि कटु शब्द बोलतात. त्याचा आश्रित वर्ग आपल्या स्वामीच्या भार्येचाहि अपहार करण्याची इच्छा करितो.

क्षमावानाच्या स्त्रिया स्वैर वर्तन करितात. त्यांना आपल्या भर्त्याकडून अल्पहि शिक्षा होण्याची भीति नसल्यामुळें त्या यथेच्छ आनंदोत्सव व विहार करूं लागतात. दंडाच्या अभावीं त्या दूषित होतात व सेवक त्याला अपाय करूं लागतात. बले, हे व असेच आणखीहि अनेक दोष क्षमावानाच्या ठिकाणीं उद्भवतात.

हे वैरोचने, आतां अक्षमावानाचे दोष सांगतों, तेहि ऐक. जो मनुष्य स्थानीं व अस्थानीं सर्व काळ रजोवृत्ति धारण करून क्रुद्ध होतो व क्रोधानें विविध-

प्रकारचे दंड करूं लागतो, तो मित्रांचेंहि वैर संपादन करितो आणि आप्तजन व लोक यांच्या द्वेषास पात्र होतो. इतरांचा अवमान केल्यामुळें त्याला द्रव्य-हानि, धिक्कार, अनादर, संताप, द्वेष, मोह आणि शत्रु यांची प्राप्ति होते.

असहनशील पुरुष क्रोधानें नानाप्रकारचे दंड केल्यामुळें आपलें ऐश्वर्य व आप्तजन यांच्यापासून सत्वर भ्रंश पावतो आणि स्वतःच्या प्राणांसहि मुकतो. धनादिकांची वृद्धि करणाऱ्या उपकारी व चोरादि अपकारी लोकांस जो क्रोधानें समान वागवितो, त्याला घरांत शिरलेल्या सर्पाप्रमाणें सर्व लोक भितात. वत्सा, ज्याला पाहून सर्व लोक उद्विग्न होतात, त्याचा उत्कर्ष कसा होणार ! लोक त्याचें छिद्र पहात बसतात व तें सांपडतांच त्याची सर्वत्र निंदा करूं लागतात. यास्तव नित्य मृदुहि नसावें व सतत क्रोधयुक्तहि नसावें.

मनुष्यानें जसा काळ प्राप्त होईल तसें वर्तन करावें. जो मनुष्य योग्यसमयीं क्षमा धारण करितो व योग्यकाळीं आपलें उग्र स्वरूप प्रकट करितो, त्यालाच इह-परलोकीं सुख प्राप्त होतें.

हे वत्सा, क्षमेचा काल कोणता, तें मी आतां तुला सविस्तर सांगतों ऐक. केव्हांहि क्रोधानें या क्षमाकालाचें अतिक्रमण करूं नये, असें विद्वानांचें म्हणणें आहे. ज्यांनीं पूर्वीं उपकार केला असेल, त्यांनीं कितीहि मोठा अपराध केला तरी त्यांस नित्य क्षमाच करावी. मूढबुद्धि आश्रितांनीं अपराध केला असतां त्यांसहि क्षमा करावी. कारण सर्व मनुष्यांना पांडित्य सुलभ नाहीं.[1] परंतु एखा-द्यानें बुद्धिपुरस्सर अपराध करून तो अबुद्धिपूर्वक झाल्याचें म्हटलें, तर मात्र त्याचा अपराध अल्प जरी असला तरी त्याला दंड करावा. त्याचप्रमाणें कपटा-चरण करणारासहि अवश्य शिक्षा करावी.

पुरुषाचा एक अपराध नेहमीं सहन करावा, परंतु त्यानेंच जर पुनः दुसरा अपराध केला व तो अल्प जरी असला, तरी त्याला कडक शासन करावें. एखाद्यानें न जाणतां एखादा अपराध केला, तर तो खरोखरच बुद्धिपूर्वक केलेला नाहीं, असा निश्चय करून त्याला क्षमा करावी. सामानें उग्र व सौम्य अशा दोन्ही प्रकारच्या पुरुषांना अनुकूल करून घेतां येतें. सामाला असाध्य असें कांहींच नाहीं. यास्तव क्रूरतेपेक्षां मार्दवच अधिक बलवान् आहे.

---

१. न हि सर्वत्र पांडित्यं सुलभं पुरुषेण वै ॥

पण स्वतःचें बलाबल व देशकाल पाहूनच त्या त्या प्रसंगाला योग्य असें वर्तन ठेवावें. कारण देश-काल अनुकूल असल्यावांचून कोणतेंहि कार्य घडत नसतें. यास्तव देश-कालाची प्रतीक्षा अवश्य करावी. लोकांच्या भीतीनें खऱ्या अपराध्याला केव्हांहि क्षमा करूं नये. याप्रमाणें मीं तुला हे क्षमेचे काल सांगितले आहेत. यावरून तुला क्रोधाच्या कालाचें ज्ञान सहज होईल. पूर्वोक्त कालाहून इतर सर्व कालीं आपलें तेज अवश्य प्रकट करावें.

द्रौपदी—महाप्राज्ञ प्रह्लादानें बलीला पूर्वी हें धर्मरहस्य सांगितलें. त्यावरून हे धर्मराजा, आपल्या क्रोधाचा हा काल आहे, असें मला वाटतें. कारण आम्हांला सतत अपकार करणाऱ्या व लुब्ध झालेल्या धृतराष्ट्रपुत्रांस क्षमा करण्याची ही वेळ नाहीं. आपलें तेज प्रकट करण्याचा काल प्राप्त झाला आहे. या वेळीं तें व्यक्त करणेंच योग्य होय. हे महाराज, लोक नित्य-क्षमाशीलाची अवज्ञा करितात व नित्य-क्रोधी पुरुषाला भितात. यास्तव योग्य प्रसंग आला असतां क्षमा व अक्षमा यांतील कशाचें अवलंबन करावें, हें जो यथार्थ जाणतो तोच खरा पृथ्वीपति होय. ३. ३. २८.

---

## अध्याय २९ वा.

[ १ युधिष्ठिरानें वर्णिलेलें क्षमामाहात्म्य. ]

( १ ) युधिष्ठिर म्हणाला—हे महाबुद्धिमति पांचालि, माझें म्हणणें ऐकून घे. क्रोध मनुष्यांचा नाश करितो आणि क्रोधाला जिंकिलें असतां त्यांचा उत्कर्ष होतो. यास्तव क्रोधच उत्कर्ष व अपकर्ष यांचें मूळ आहे, असें तूं समज. जो सहिष्णु मनुष्य क्रोधाला शांत करितो, त्याचा अभ्युदय होतो व जो असहिष्णु पुरुष क्रोधाच्या अधीन होतो, त्याचा तो दारुण क्रोधच नाश करितो.

या लोकीं प्रजांचा विनाश होण्याचें कारण क्रोधच आहे, असें दिसतें. तेव्हां आत्मा व स्वर्ग यांचा नाश करणाऱ्या या क्रोधाचें अवलंबन मीं कसें बरें करावें !

क्रुद्ध झालेला पुरुष पापाचरण करितो, गुरूंचीहि हिंसा करितो आणि श्रेष्ठ पुरुषांचा कठोर वचनानें अवमान करितो. क्रोधाविष्ट पुरुषाला वाच्य व अवाच्य यांचें भान रहात नाहीं. क्रोधावस्थेंत त्याला अवाच्य आणि अकार्य असें कांहींच नसतें.

क्रोधी पुरुष अवध्यांचा वध करितो आणि वध्यांना वंद्य मानितो. तो क्रोधानें आत्महत्याहि करितो. हे सर्व दोष जाणणाऱ्या व इह-परलोकीं परम श्रेयाची इच्छा करणाऱ्या अनेक विद्वानांनीं या निंद्य क्रोधाला यत्नानें जिंकलें आहे व त्याला वर्ज्य केलें आहे. तेव्हां अशा त्या दुष्ट क्रोधाचा आश्रय मी कसा बरें करूं !

हे साध्वि द्रौपदि, क्रोध महापापी आहे, हें जाणत असल्यामुळेंच माझा क्रोधाग्नि प्रदीप्त होत नाहीं. क्रुद्ध झालेल्या मनुष्याशीं जो उलट क्रोधानें वागत नाहीं, तो स्वतःचें व इतरांचेंहि फार मोठ्या भयापासून रक्षण करितो व दोघां-च्याहि दोषांचें निवारण करितो.

हे भामिनि, जो मूढ मनुष्य दुर्बल असतांहि केवळ क्लेश होतात म्हणून बलवान् मनुष्यांवर क्रुद्ध होतो, तो आपणच आपला नाश करितो. तो विवेक-हीन मनुष्य आत्मघात करून उत्तम लोकाला मुकतो. यास्तव हे द्रौपदि, विवेकी पुरुषानें सामर्थ्यहीन स्थितींत क्रोधाला जिंकावें, असें स्मृत आहे. त्यायोगें आत्महत्या व परहिंसा या दोन्ही दोषांचें निवारण होतें.

जो ज्ञानी पुरुष समर्थ असूनहि क्लेश सहन करितो, क्लेश देणाराचा क्रोधानें नाश करीत नाहीं, तो इह-परत्र सुखांत रहातो. तस्मात् बलवान् व दुर्बल अशा दोन्ही प्रकारच्या विवेकी पुरुषांनीं सर्वदा क्षमाच करावी.

हे कृष्णे, सत्पुरुष नेहमीं क्रोधजयाचीच प्रशंसा करितात. क्षमावानाचा इहलोकीं विजय होतो, असें सज्जनांचें मत आहे. असत्याहून सत्य श्रेष्ठ आहे व निर्दयतेहून मार्दव श्रेयस्कर आहे. क्रोध अनेक दोषांनीं युक्त आहे. तो सज्ज-नांना संमत नाहीं. तेव्हां माझ्या सारख्यानें केवल दुर्योधनाच्या वधासाठीं क्रोधाचा आश्रय कसा करावा !

हे याज्ञसेनि, 'आपलें तेज प्रकट करण्याचा हा काल प्राप्त झाला आहे' असें जें तूं म्हटलेंस, त्याचें उत्तर ऐक—ज्यानें क्रोधाला जिंकिलें आहे, त्यालाच दीर्घदर्शी पंडित 'तेजस्वी' असें म्हणतात. तेजस्वी पुरुषाच्या अंतःकरणांत क्रोध वास करीत नाहीं. जो विवेकी पुरुष मनांत क्रोध उद्भवला असतांहि आपल्या विवेकशक्तीनें त्याला प्रतिबंध करितो, त्यालाच तत्त्वदर्शी विद्वान् 'तेजस्वी' समजतात.

हे मानिनि, क्रोधाला न जिंकल्यास कोणते दोष उद्भवतात तें तुला सांगतों, ऐक. क्रुद्ध पुरुष कर्तव्याकर्तव्य योग्यप्रकारें जाणूं शकत नाहीं. त्याला मर्यादेचें भान रहात नाहीं. तो क्रोधावेशांत अवध्याचा वध करितो. पूज्य गुरुजनांसहि पीडा देतो, हें मी तुला नुक्तेंच सांगितलें आहे. यास्तव खरें तेज संपादन करण्यासाठीं विवेकी पुरुषानें क्रोधापासून दूर रहावें.

क्रोधाधीन झालेल्या पुरुषाला स्वधर्माख्य कर्मांतील दक्षता, शत्रूनें केलेल्या अपकाराचें उपायचिंतन, दुसऱ्याचा पराभव करण्याची शक्ति आणि शीघ्रत्व हे तेजाचे गुण सत्वर प्राप्त करून घेतां येणें शक्य नसतें. परंतु क्रोधाचा त्याग केलेला पुरुष उत्तम प्रकारच्या तेजानें संपन्न होतो.

हे महाप्राज्ञे, देश व काल यांस योग्य असलेलें तेज अतिशय दुःसह असतें. मूर्ख मनुष्यें क्रोधालाच 'तेज' असें निश्चयानें म्हणतात. परंतु वास्तविक तें खरें नव्हे. क्रोध हा रजोगुणाचा परिणाम असून तो मानवांचा नाश करण्या-साठीं उद्भवतो. यास्तव सदाचरणी पुरुषानें क्रोधाचा नित्य त्याग करावा.

स्वधर्मापासून च्युत झालेला जातिभ्रष्ट मानव जर क्रोधहीन असेल तर तो स्वधर्मस्थ क्रुद्ध नरापेक्षांहि श्रेष्ठ होय, असें श्रुत आहे. क्षमा, आर्जव इत्यादि श्रेष्ठ गुणांचें महत्त्व न जाणणारे मूढ जरी या नियमाचें उल्लंघन करीत असले तरी माझ्या सारख्यानें त्यांचें अतिक्रमण कसें करावें !

हे अनिंदिते कृष्णे, मनुष्यांमध्यें पृथ्वीसारखे क्षमाशील पुरुष जर विद्यमान नसते, तर त्यांच्यामध्यें ऐक्य कधीं राहिलेंच नसतें. कारण क्रोधच कलहाचें मूळ आहे. क्रुद्ध पुरुष क्लेश देणारास उलट क्लेश देतो. पूज्य व वडिल आप्तानें ताडन केल्यास तो त्यांवरहि प्रत्याघात करितो. मग इतरांविषयीं काय सांगावें !

याप्रमाणें क्रोधामुळें प्राण्यांचा विनाश होऊन अधर्म पसरतो. क्रोधी पुरु-षाला कोणी कठोर वचन बोलल्यास तो त्याला तशाच निष्ठुर वाणीनें ताडन करितो. प्रहार केल्यास प्रतिप्रहार करितो. हिंसा केल्यास प्रतिहिंसा करितो.

हे पांचालि, क्रुद्ध पिता पुत्रांचा घात करितो व क्रोधाविष्ट झालेला पुत्र पितरांचे प्राण घेतो. फार काय सांगावें, हे पतिव्रते, क्रोधी पति भार्येचा वध करितो व क्रोधावेशांत स्त्री पतीला यमसदनीं पाठविते.

याप्रमाणें हे कृष्णे, सर्व लोक संक्रुद्ध झाले असतां दांपत्यप्रेम नष्ट होऊन प्रजोत्पत्तिहि होणार नाहीं. प्रजांची उत्पत्ति दांपत्यप्रेमावर अवलंबून आहे,

हें तूं निस्संशय जाण. प्रजेचा संतोषहि राजाच्या क्षमाशीलतेवर अवलंबून आहे. राजा क्रोधपरायण झाल्यास सर्व प्रजेचा नाश होतो. क्रोध मनुष्यांच्या विनाशाला व अनैश्वर्याला कारण होतो. या लोकीं पृथ्वीसारखे क्षमावान् पुरुष दृष्टीं पडतात, म्हणूनच प्राण्यांची उत्पत्ति व उत्कर्ष होत आहे. परंतु याच्या उलट क्रोधाचें प्राबल्य झाल्यास दांपत्यांच्या अभावीं प्रजेचाच असंभव होईल !

हे सुशोभने, यास्तव सर्व आपत्तींमध्यें पुरुषानें क्षमाच करावी. क्षमावान् प्राण्याच्याच जन्माला खरा जन्म असें म्हटलें आहे. बलवान् स्वामीनें क्रुद्ध होऊन दुर्भाषण किंवा ताडन केलें असतां दुर्बल आश्रितवर्ग जसा तें मुकाट्यानें सहन करितो, त्याचप्रमाणें प्रभाववान् असूनहि जो क्षमा करितो, तोच उत्तम पुरुष होय. जो क्रोधाला स्वाधीन ठेवितो त्याचीच या लोकीं प्रसिद्धि होते व त्यालाच सनातन लोक प्राप्त होतात.

जो मूढ क्रूरस्वभाव असतो, त्याचा या लोकीं व परलोकींहि नाश होतो. कृष्णे, महात्म्या काश्यपानें गाइलेली ही क्षमावानांची गाथा सामान्य लोक नेहमीं सांगत असतात.

" क्षमाच धर्म, यज्ञ, वेद व शास्त्रज्ञान आहे. जो धर्मादिकांच्या फलाची इच्छा करणारा पुरुष हें जाणतो, तो सर्वांना क्षमा करूं शकतो. क्षमाच ब्राह्मण जाति आहे. क्षमाच सत्य म्ह० परब्रह्म आहे. क्षमाच भूत व भविष्यत् तप आहे. क्षमाच त्या तपाचें रक्षण करिते. क्षमा हेंच शौच म्ह० अंतर्बहिः-शुद्धि असून क्षमेनेंच हें जगत् धारण केलें आहे.

क्षमावान् पुरुष यज्ञवेत्ते, वेदवेत्ते व तपस्वी यांच्या फलाचें उल्लंघन करून जातात. यजुर्वेत्ते व कर्माचरण करणारे कर्मठ यांना स्वर्गांतील इतर लोक प्राप्त होतात. म्ह० इष्टापूर्त कर्म करणारे फार तर स्वर्गापर्यंत जाऊन पोंचतात. पण क्षमावान् ब्रह्मलोकीं जातात. त्यांना ब्रह्मलोकामध्यें प्राप्त होणारें फल नित्य व परम पूज्य आहे. क्षमा हेंच तेजस्व्यांचें तेज, तपस्व्यांचें तप, सत्यवानांचें सत्य, यजमानांचा यज्ञ व विरक्त संन्याश्याचा शम आहे.

हे द्रौपदि, जिच्यामध्यें ब्रह्म, सत्य, यज्ञ व लोक अधिष्ठित आहेत, त्या श्रेष्ठ क्षमेचा माझ्या सारखा पुरुष कसा बरें त्याग करील ! विवेकी पुरुषानें सर्वदा शत्रूंचे अपराध सहन करावे. जेव्हां तो क्षमा करितो, तेव्हांच ब्रह्माला प्राप्त होतो. क्षमावानास इहलोक व परलोक या दोहोंची प्राप्ति होते. या लोकीं त्याचा मोठा सत्कार होतो व परलोकीं शुभगति मिळते.

ज्या मनुष्यांचा क्रोध क्षमेनें शांत होतो, त्यांना परात्पर लोक प्राप्त होतात. म्हणूनच क्षमा अतिशय श्रेष्ठ मानिलेली आहे."

हे पांचालि, काश्यपानें नित्य-क्षमावानांची अशी प्रशंसा केली आहे, ती ऐकून तूंहि प्रसन्न हो. अशी क्रुद्ध होऊं नको.

पितामह शांतनव, देवकीनंदन कृष्ण, आचार्य द्रोण, क्षत्ता विदुर, शारद्वत कृप, संजय, सोमदत्त, युयुत्सु व द्रोणपुत्र, हे सर्व आमच्या शमाचाच सत्कार करतील.

आमचा पितामह व्यास नित्य शमाचाच उपदेश करीत असतो. या सर्व श्रेष्ठ लोकांनीं धृतराष्ट्र-राजाला शमाची पुनः पुनः प्रेरणा केली असतां तो आम्हांला आमचें राज्य परत देईल, असें मला वाटतें. पण त्यांच्या उपदेशाचा अनादर करूनहि जर तो लोभानें आमचें राज्य परत न देईल तर निःसंशय नाश पावेल.

हे याज्ञसेनि, भरतकुलाच्या नाशाचा हा दारुण काल ओढवला आहे, असा मीं पूर्वींच निश्चय केला आहे. सुयोधन राज्याला अपात्र आहे, म्हणून त्याच्या ठिकाणीं क्षमेचा अभाव झाला असून मी पृथ्वीच्या राज्याला पात्र असल्या-मुळेंच माझ्या ठिकाणीं क्षमेचा प्रादुर्भाव झाला आहे. क्षमा हेंच विद्वानांचें सद्वृत्त, सनातन धर्म व दयालुत्व आहे. यास्तव मीं या प्रसंगीं पूर्णपणें क्षमे-चाच आश्रय करणार. ३. ३. २९.

---

## अध्याय ३० वा.

[ १ द्रौपदीनें उपहासपूर्वक केलेली विधात्याची निंदा. ]

(१) द्रौपदी म्हणाली—हे धर्मज्ञ महाराजा, ज्या ईश्वरानें आपल्या मनांत असा मोह उत्पन्न केला व ज्या विधात्यानें म्हणजे पूर्व कर्मानें आपणांस अशा प्रकारची बुद्धि दिली त्या उभय देवांना नमस्कार असो. आपल्या पितृ-पितामहांनीं ज्या मार्गानें राज्याचें आक्रमण केलें त्याच्या विपरीत वागण्याची ही दुर्बुद्धि आपणांस कशी आठवली !

ईश्वरहि स्वातंत्र्यानें कोणाला कोणतेंच कर्मफल देत नाहीं. ज्याचें जसें पूर्व-कर्म असेल, त्याप्रमाणें तो त्याला फल देत असतो. तस्मात् कर्मफल अपरिहार्य आहे. कर्मानेंच प्राण्याला ऊर्ध्वगति व अधोगति आणि उत्तम, मध्यम व अधम योनींतील जन्म प्राप्त होतात. प्राण्यांच्या कर्मांनींच या जगांतील पृथक्

पृथक् भोगसाधनें उत्पन्न केलीं आहेत. तथापि पुरुष मोहानें या दुःखरूप कर्मफलापासून मुक्त होण्याची इच्छा करितो. या लोकीं पुरुषाला धर्म, दया, क्षमा व आर्जव यांच्या योगानें ऐश्वर्य प्राप्त होत नाहीं आणि लोकापवादाच्या भीतीनें तर तें कधींच मिळत नाहीं.

हे भारता, स्वतः आपण व आपले हे महापराक्रमी भ्राते यांवर हें दुःसह संकट ओढवलें आहे. खरोखर आपणांवरहि अशी आपत्ति यावी, हें दुर्दैवच होय. हे राजन्, पूर्वीं राज्य करीत असतांना व आज राज्यापासून च्युत झाल्यावरहि आपणां सर्वांना धर्माहून अधिक प्रिय कांहींच नाहीं. फार काय, पण तुम्हांला जीविताहूनहि धर्म प्रिय आहे. आपलें राज्य व जीवित हीं दोन्ही धर्मासाठीं आहेत, हें ब्राह्मण, गुरु व देवताहि जाणतात.

आपण धर्मासाठीं आपले चार भ्राते व ही धर्मपत्नी यांचाहि प्रसंगीं त्याग कराल, पण धर्माचा त्याग करणार नाहीं, असें मला वाटतें! धर्मरक्षक राजाचें तो सुरक्षित धर्मच रक्षण करितो, असें मीं श्रेष्ठांच्या तोंडून ऐकिलें आहे. पण तो धर्म तुमचें मात्र रक्षण करीत नाहीं, असेंच मला दिसतें.

हे नरश्रेष्ठा, पुरुषाच्या छायेप्रमाणें आपली बुद्धि सतत धर्मालाच अनुसरते. ती धर्माला सोडून अन्य विषयाचें कधीं चिंतनच करीत नाहीं. आपण आपल्या बरोबरीच्या लोकांचा तर कधीं अपमान करीत नाहींच, पण हीनांचाहि करीत नाहीं. मग श्रेष्ठांचा कसा कराल! सर्व पृथ्वी प्राप्त झाली असूनहि आपला प्रभुत्वाभिमान कधींहि वाढला नाहीं.

हे प्रभो, आपण स्वाहाकारांनीं देवांची, स्वधाकारांनीं पितरांची व आदरातिथ्य, सत्कार इत्यादिकांनीं द्विजांची सतत सेवा करीत असतां. इंद्रप्रस्थांत असतांना आपण ब्राह्मणांचे सर्व मनोरथ पूर्ण करून त्यांना सतत तृप्त करीत होतां. आपल्या गृहीं मुमुक्षु संन्याशी व गृहस्थ सुवर्णपात्रांत भोजन करीत असत व मी त्यांना वाढीत असें. आपण वानप्रस्थांना सुवर्ण व रौप्य पात्रें देत असां. ब्राह्मणांना अदेय असें आपल्या गृहीं कांहींहि नव्हतें.

सर्व भूतांच्या शांतीसाठीं आपल्या गृहीं नित्य वैश्वदेव होत असे. अतिथि व कीट-पतंगांपर्यंत सर्व भूतें यांस तृप्त केल्यावर अवशिष्ट राहिलेलें विघससंज्ञक अन्न भक्षण करून आपण स्वतःचें शरीर रक्षण करीत असां. आपल्या पवित्र गृहांत सर्वदा काम्य व नैमित्तिक इष्टि, पशुबंध, पाकयज्ञ म्हणजे गृह्याग्निसाध्य इष्टि व इतर यज्ञकर्म सतत चालत असे.

हे नरेंद्रा, आतां आपण राज्यभ्रष्ट होऊन चोरादि हीन जनांनीं सेविलेल्या या घोर वनांत येऊन जरी राहिलां आहां, तरी आपला धर्म लुप्त झालेला नाहीं. तो अविच्छिन्न चालू आहे. अश्वमेध, राजसूय, पुंडरीक व गोसव या महायज्ञांनीं आपण देवांना संतुष्ट केलें व त्या यज्ञांत विपुल दक्षिणा देऊन ब्राह्मणांनाहि तृप्त केलें. पण हे राजन्, विपरीत बुद्धीनें कपट द्यूतांत प्रवृत्त होऊन आपला पराभव झाला व त्यांत राज्य, विविध धन, आयुधें, भ्राते व ही धर्मपत्नी या सर्वांचा अपहार करविला.

हे नृपश्रेष्ठा, आपण सरलमार्गी, दयाळु, उदार, ऱ्हीयुक्त व सत्यवादी असूनहि तुम्हांला या द्यूताचें संकट उत्पन्न करणारी ही दुर्बुद्धि कशी झाली! आपलें हें दुःख व ही अशा प्रकारची आपत्ति पाहून माझें मन अतिशय व्यथित होतें व विवेक नष्ट होतो. सर्व लोक ईश्वराच्याच अधीन रहातात, जीवाच्या अधीन नसतात, याविषयीं हा पुरातन इतिहास श्रुत आहे.

ईश्वरच प्राण्यांच्या पूर्व कर्मरूप बीजाला सर्वथा अनुसरतो व त्यांना सुख-दुःख, प्रिय-अप्रिय इत्यादि देतो. जशी कळसूत्री बाहुली सूत्रधाराच्या प्रेरणेप्रमाणें हाल-चाल करिते, तशी सर्व प्रजा ईश्वराच्या प्रेरणेप्रमाणें आपलीं हस्तपादादि अंगें हालविते.

सर्वांतर्यामी ईश्वर आकाशाप्रमाणें सर्वभूतांना आंतून व बाहेरून व्यापून त्यांच्या कर्मांप्रमाणें त्यांचें कल्याण व अकल्याण करितो. सूत्रबद्ध पक्ष्याप्रमाणें हा जीव कर्मबद्ध असून सतत ईश्वराच्या अधीन होऊन रहातो. तो विद्योपदेशक उपाध्यायादि दुसऱ्या कोणाच्याहि अधीन रहात नाहीं. त्यामुळें तो आपल्या इच्छेप्रमाणें वागण्यास समर्थ नाहीं.

सूत्रांत ओंवलेला मणि, वेसण घातलेला बैल व नदीच्या महाप्रवाहांत पडलेला तीरावरील वृक्ष हे जसे सूत्र, वेसण व जलप्रवाह यांना अनुसरतात, त्याप्रमाणें जीव ईश्वराच्या आज्ञेला अनुसरतात. कारण मृन्मय घट उत्पत्ति, स्थिति व लय या तिन्ही कालीं जसा मृत्तिकारूप असतो, त्याप्रमाणें जीवहि ईश्वराचाच एक अंश असल्यामुळें सर्वदा तन्मय आहे.

ईश्वरापासूनच तो पृथक् भासतो व ईश्वरामध्येंच लीन होतो. त्यामुळें स्थितिकालींहि तो त्याच्या प्रेरणेनेंच सर्व व्यवहार करितो. हा मानव स्वातंत्र्यानें कोणत्याहि अनुकूल किंवा प्रतिकूल कालाला प्राप्त होत नाहीं. हा अज्ञ जंतु

आपल्या सुख-दुःखांविषयीं पराधीन आहे. ईश्वरानें प्रेरणा केली असतां तो स्वर्गाला जातो व नरकांतहि पडतो.

ज्याप्रमाणें तृणाचीं अग्रें सर्वथा वावटळीच्या अधीन असतात, त्याप्रमाणें सर्व भूतें धात्याच्या अंकित असतात. मनुष्याला त्याच्या प्रारब्धानुसार पुण्य किंवा पाप यांमध्यें नियुक्त करणारा ईश्वर आहे. पण तो अन्तर्यामी असल्यामुळें 'हाच सर्व करविता आहे' असें एखाद्या प्रेरक राजाप्रमाणें कोणालाच ओळखितां येत नाहीं.

सर्वांतर्यामी प्रभु ज्या साधनानें कर्में करवितो, तें हें 'क्षेत्र'-संज्ञक शरीर केवल हेतुमात्र आहे. त्या प्रभूच्या सांनिध्यानें जड असलेल्याहि क्षेत्रामध्यें कर्तृत्वशक्ति उद्भवते. त्यामुळें क्षेत्रच सर्व विहित व निषिद्ध कर्में करितें, असें वाटतें. पण तें स्वतः जड असल्यामुळें अंतर्यामीच्या साह्यावांचून त्याला स्वतः कांहींच करितां येत नाहीं. म्हणून हा प्रभु अंतर्यामी शुभाशुभ फल देणारें कर्म त्याच्याकडून करवितो, असें म्हणतात.

अंतर्यामी ईश्वर चिदाभासयुक्त लिंगशरीरांत इच्छाशक्ति, ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति उत्पन्न करितो व त्यांच्या द्वारा सर्व प्राण्यांकडून व्यवहार करवितो. अघटित घटना घडवून आणणाऱ्या मायेचा हा सर्व प्रभाव आहे. तिच्या द्वाराच शरीराभिमानी जीवांना मोहित करून ईश्वर भूतांचा परस्पर नाश करवितो.

आकाशांतून संचार करणाऱ्या सूर्याचे तेजोमय किरण मूढांना खऱ्या जला-सारखे भासतात. पण तत्त्वज्ञानी त्यांनाच माया, इंद्रजाल, स्वप्न, मृगजल इत्यादि आकारांनीं पहातात. वस्तुतः अनित्य, अशुचि व दुःखरूप असलेल्याहि शरीरेंद्रियांना मूढ लोक नित्य, शुचि व सुखस्वरूप मानितात.

त्याचप्रमाणें ईश्वरहि कधींच उत्पन्न न झालेल्या पदार्थांना अंकुरादि क्रमानें उत्पन्न करून दाखवितो व विद्यमान असलेल्या पदार्थांचा नाश करितो. काष्ठा-नेंच काष्ठाचा, दगडानेंच दगडाचा व लोखंडानेंच निश्चेष्ट व अचेतन असलेल्या लोखंडाचा जसा छेद करावा, त्याप्रमाणें तो पूज्य स्वयंभू प्रपितामह मायेच्या द्वारा भूतांच्या हातून भूतांचा नाश करवितो.

स्वेच्छेनें क्रीडा करणारा बालक सोंगट्यानें जसा खेळतो, तद्वत्च हा प्रभु आपल्या इच्छेप्रमाणें भूतांचा संयोग व वियोग घडवून आणितो. हे राजन्, हा जगत्प्रभु भूतांशीं जननीप्रमाणें किंवा जनकाप्रमाणें वर्तन करितो, असें वाटत

नाहीं. तर तो एखाद्या प्राकृत पुरुषाप्रमाणें क्रुद्ध होऊन सर्वांना दुःख देण्यासच प्रवृत्त झाला आहे, असें भासतें.

खरोखर हा ईश्वर दयाळु नसून निर्दय आहे. त्याचें दुर्जनांवर प्रेम व सज्जनांशीं हाडवैर आहे, असेंच प्रत्ययाला येतें. कारण या जगांत जे श्रेष्ठ, शीलवान् व अकार्याविषयीं लज्जित होणारे सज्जन आहेत, त्यांना खावयास अन्नहि मिळत नाहीं आणि जे शीलभ्रष्ट व अनार्य आहेत, ते ऐश्वर्य भोगीत आहेत, हें पाहून माझें मन अतिशय विह्वल होतें.

हे प्रभो, आपली आपत्ति व सुयोधनाची समृद्धि पाहून मी त्या विधात्यालाच दोष देतें. कारण तो या आपल्या कृतींत विरोध पहात नाहीं.

क्रूर, लुब्ध, धर्मांचा घात करणारा आणि शिष्ट व शास्त्र यांच्या वचनाचें उल्लंघन करून वागणारा जो धृतराष्ट्रपुत्र दुर्योधन त्याला हें एवढें ऐश्वर्य देऊन त्या धात्याचें काय इष्ट होणार! कांहींच नाहीं.

केलेलें कर्म जर कर्त्यालाच अनुसरत असेल व तें दुसऱ्या कोणाला प्राप्त होत नसेल, तर या अन्यायाचें पाप त्या ईश्वरालाहि खचित लागेल आणि दुर्जनांना सुखी करून सज्जनांना दुःख देणाऱ्याहि धात्याला जर पाप न लागत नसेल तर बल हेंच त्याचें कारण आहे, असें समजून मी दुर्बलांची कींव करीन! खरोखर सामर्थ्यांच्या अभावीं ते शोच्य आहेत!! ३. ३. ३०.

---

## अध्याय ३१ वा.

[ १ युधिष्ठिराचा द्रौपदीला धर्मोपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, याप्रमाणें द्रौपदीनें धर्म व ईश्वर यांवर आक्षेप घेतला असतां प्रत्यक्ष, अनुमान व आगम यांच्या योगानें त्यांचें समर्थन करण्यासाठीं धर्मराज म्हणाला—" हे याज्ञसेनि, तूं फार उत्तम बोललीस. तुझें भाषण मोठें मनोहर आहे. मीं तें लक्षपूर्वक ऐकिलें. पण तें ऐकून तुझ्या नास्तिक्याविषयीं मला फार खेद झाला. अधर्मज्ञांनाच प्रिय वाटणारें हें तुझें वचन वेदविरुद्ध आहे. पण हे राजपुत्रि, मी कर्मफलाचा अभिलाष धरून धर्माचरण करीत नाहीं, हें तूं निश्चित समज.

दान देणें व यज्ञ-याग करणें हें मज गृहस्थाचें कर्तव्य आहे. म्हणून मी सत्पात्रीं दान देतों व विहित कालीं याग करितों. हे कृष्णे, गृहस्थाश्रमामध्यें

रहाणाऱ्या पुरुषानें जें कर्म अवश्य करावें म्हणून शास्त्रानें सांगितलें आहे, तेंच मीं यथाशक्ति करीत असतों, मग त्याचें फल मिळो किंवा न मिळो.

हे शुभे, मला धर्माचें फल मिळावें म्हणून मी धर्माचरण करीत नाहीं. तस्मात् मला दुःखांत पाहून 'धर्म निष्फल आहे' असें जरी तुला वाटत असलें, तरी मी तसें समजत नाहीं. कारण मी जर सुखाच्या इच्छेनें धर्माचरण करून दुःखी झालों असतों, तर हा तुझा आक्षेप योग्य झाला असता! जो धर्माचा क्रय-विक्रय करितो म्हणजे फलाच्या इच्छेनें त्याचें आचरण करितो तो मुख्य फलापासून च्युत होतो. म्हणूनच धर्मवेत्ते त्याला हीन समजतात. लोक गायीला पुष्कळ खाऊं घालून तिचें विपुल दूध काढण्याची जशी इच्छा करितात, त्याप्रमाणें पुष्कळ धर्माचरण करून विपुल फलाची इच्छा करणारा मूढ मुख्य फलास प्राप्त होत नाहीं.

आत्म्याला जाणण्याची इच्छा होणें, हेंच धर्माचरणाचें मुख्य फल आहे. त्यामुळें स्वर्गादि अमुख्य फलासाठीं धर्माचरण करणारास आत्मजिज्ञासा कधींच होत नाहीं. जो पापी नास्तिकपणें या निष्काम धर्मावर विश्वास ठेवीत नाहीं, त्यालाहि तें मुख्य फल प्राप्त होत नाहीं.

मी हें तुला केवल वेदप्रमाणाच्या आधारानेंच सांगत आहें. यास्तव हे कल्याणि, तूं या धर्माविषयीं अशी साशंक होऊं नको. वेदोक्त धर्माविषयीं जो साशंक असतो, तो पशु-पक्ष्यादि तिर्यग्योनींत उत्पन्न होतो. ज्या दुर्बुद्धि पुरुषाचा मंत्रद्रष्ट्या ऋषींच्या व मन्वादि स्मृतिकारांच्या वचनांवर विश्वास नसतो, त्याला मोक्षरूप अजरामर लोक प्राप्त होत नाहीं. तर वेदांपासून शूद्र जसा दूर रहातो, तसा अनात्म लोकाची इच्छा करणारा तो अविवेकी आत्मलोकापासून दूर रहातो.

हे विदुषि द्रौपदि, उत्तम कुलांत जन्म घेऊन वेदाध्ययन करणारा व धर्मपरायण होऊन श्रेष्ठ धर्मांचें आचरण करणारा राजर्षि वृद्धांमध्यें गणना करण्यास योग्य होतो. धार्मिक लोक त्याची श्रेष्ठांत गणना करितात.

जो मंदबुद्धि पुरुष शास्त्राचें अतिक्रमण करून धर्माविषयीं साशंक होतो, तो शूद्र व तस्कर यांहूनहि हीन होय. महातपस्वी मार्कंडेय ऋषि तूं प्रत्यक्ष पाहिलाच आहेस. तो महात्मा धर्माचरणानेंच दीर्घायु झाला. व्यास, वसिष्ठ, मैत्रेय, नारद, लोमश, शुक हे व असेच दुसरेहि सर्व ऋषि धर्मानेंच ज्ञानी झाले.

दिव्य योगसामर्थ्यानें युक्त असलेल्या या सर्वांस तूं प्रत्यक्ष पहातेसच. हे ऋषि शाप देण्यास व अनुग्रह करण्यास समर्थ असून देवांहूनहि वरिष्ठ आहेत. त्यावरून धर्माचरणाचें फल प्रत्यक्ष आहे, तें केवल वेदावरूनच ज्ञात होतें, असें नाहीं, हें सिद्ध होतें. हे सर्व वेदवेत्ते ऋषि 'प्रथम धर्माचरण करावें' असेंच सर्वदा सांगतात. त्यांच्या बुद्धि वेदार्थाला साक्षात् जाणतात. ते सर्व देवतुल्य तेजस्वी आहेत व प्रत्येक मनुष्यानें निष्काम धर्मच आचरावा, असा आम्हां सर्वांस ते सतत कर्तव्योपदेश करितात. यास्तव हे कल्याणि, तूं दुःखानें अविवेकी बनून धर्म व धाता यांची अशी निंदा करूं नको व धर्माच्या परम फलाविषयीं साशंकहि होऊं नको.

ज्यांचा तत्त्वनिश्चय झाला आहे, ते उन्मत्त आहेत, असें मूढ लोक समजतात. पण त्या धर्मनास्तिकांना दुसऱ्या कोणापासूनहि प्रमाणभूत बुद्धि प्राप्त होत नाहीं. कारण त्यांचा कोणावर विश्वासच नसतो. ते मूढ स्वतःलाच प्रमाण मानितात, ते मोठे दर्पयुक्त असतात, धर्माचा अवमान करितात आणि इंद्रियांना तृप्त करणारे लोक प्रत्यक्ष स्थूल जगालाच सत्य मानितात. 'आम्हांला जें प्रत्यक्ष दिसतें तेवढेंच खरें' असें मानणारे ते मूढ अतींद्रिय धर्मादिकांवर विश्वास ठेवीत नाहींत. पण हे राज्ञि, धर्माविषयीं साशंक होणाऱ्या अशा पुरुषांना प्रायश्चित्त सांगितलेलें नाहीं.

धनादि विषयांचेंच सतत चिंतन करणाऱ्या पुरुषाला धर्मानेंच प्राप्त होणारे लोक कधीं मिळत नाहींत. वेदसंज्ञक श्रेष्ठ प्रमाणापासून पराङ्मुख होऊन वेद-शास्त्रार्थाची निंदा करणारा व काम-लोभांमध्यें अत्यंत आसक्त होणारा मूढ घोर नरकांत पडतो.

पण जो शुद्धबुद्धि पुरुष धर्मालाच श्रेष्ठ मानून निःशंक मनानें सतत त्याचेंच आचरण करितो, तो परलोकीं अनंत सुख भोगितो. ऋषींनीं दिव्य दृष्टीनें जाणलेल्या वेदप्रामाण्याचें उल्लंघन करून धर्माला झुगारून देणारा व सर्व शास्त्रार्थांचें अतिक्रमण करून यथेच्छ आचरण करणारा मूढ अनंत जन्म सुखाला पारखा होतो. हे भामिनि, ज्याला ऋषींचें वेदवाक्य व शिष्टाचार यांतील कांहींच प्रमाण वाटत नाहीं, त्याला परलोकहि नाहीं व हा लोकहि नाहीं, असें तूं निश्चित जाण.

हे याज्ञसेनि, सर्वज्ञ व सर्वार्थदर्शी ऋषींनीं सांगितलेल्या सनातनधर्माचें आचरण शिष्टलोक मोठ्या श्रद्धेनें करितात, हें तुलाहि अवगत आहे, यास्तव हे

**कृष्णे, तूं धर्माविषयीं अशी साशंक होऊं नको. हे द्रौपदि, निरतिशय सुखस्वरूप स्थानाला जाऊन पोंचण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाला धर्म हेंच श्रेष्ठ साधन आहे.**

**समुद्राच्या परतीरास जाण्याची इच्छा करणाऱ्या वैश्यांना नौका हेंच जसें श्रेष्ठ साधन, त्याप्रमाणें मुमुक्षूंना धर्म हेंच परम साधन आहे. हे भामिनि, धर्माविषयीं वेद हें श्रेष्ठ प्रमाण असून महात्मे ऋषि हें प्रत्यक्ष प्रमाण आहे, असें मीं तुला सांगितलें. आतां धर्माविषयीं अनुमान प्रमाण कसें संभवतें तेंहि मी तुला सांगतों.**

**हे शुभे, धार्मिक लोकांनीं श्रद्धेनें आचरिलेला धर्म जर निष्फल झाला, तर हें**

१ धर्माचरणाचें जर कांहींच फल नसतें तर या सृष्टींत कोणाचाच अभ्युदय झाला नसता. सर्व सृष्टि एकसारखीच दिसली असती. पूर्वसंस्कारामुळें मनुष्यादि-स्थावरान्त जीवांना पुनः पुनः तीच ती योनि प्राप्त झाली असती. सर्वांना अंधतमाची प्राप्ति झाली असती व त्यामुळें श्रुति-स्मृतिरूप शास्त्र अप्रमाण ठरलें असतें. पण याच्या उलट शास्त्र व धर्म यांचें प्रामाण्य मानिल्यास पशु-पक्ष्यादि तिर्यक् प्राण्यांचीहि विशिष्ट देशांत रहाणें, विशिष्ट जनांचा सहवास इत्यादि कारणांनीं ऊर्ध्वगति संभवते. कारण सहवासानें त्यांच्या पुण्याचाहि संभव आहे. आतां यावर कोणी असें म्हणेल कीं, जसें गायीनें खाल्लेल्या तृणापासून दूध, दुधापासून दहीं, इत्यादि क्रमानें उत्तरोत्तर परिणाम होतात, त्याप्रमाणें विशिष्ट देह प्राप्त झाला असतां ऊर्ध्वगति प्राप्त होईल. त्यासाठीं धर्मच कशाला पाहिजे? तर त्याचें उत्तर असें—गाईनें खाल्लेल्या दह्यापासूनहि दूध, गोमूत्र इत्यादि परिणाम झालेले दिसतात. यास्तव हें म्हणणें अयुक्त आहे. शिवाय धर्माच्या अभावीं मोक्षाची असिद्धि होईल. कारण ज्ञानरहित मनुष्यादि प्राणी पशूप्रमाणें वागूं लागतील व त्यामुळें अंधतमांत प्रवेश करतील. त्यांच्या अज्ञानाची निवृत्ति कालत्रयींहि होणार नाहीं. यावर कदाचित् म्हणाल कीं, ते तसेच अज्ञ राहिनात! विद्या व मोक्ष घेऊन काय करावयाचें आहे! तर तेंहि बरोबर नाहीं. कारण प्रत्येक प्राण्यामध्यें सुख-दुःख व त्यांचीं साधनें यांचें वैचित्र्य दिसतें. कर्माच्या वैचित्र्यावांचून त्याची उपपत्ति लागत नाहीं. या जन्मांतील यत्नावांचूनहि मनुष्य, पशु इत्यादिकांमध्यें ज्ञान, ऐश्वर्य इत्यादिकांचें तारतम्य म्ह० न्यूनाधिक्य दिसतें. त्यावरूनहि पूर्वजन्मांतील विचित्र पुण्य-पापांचें अनुमान होतें. त्यावांचून जगद्वैचित्र्य, अकस्मात् होणारा लाभ, आयुष्याचें न्यूनाधिक्य इत्यादिकांची उपपत्ति लागत नाहीं.

सर्व जगत् प्रतिष्ठारहित अंधतमामध्यें बुडेल. हे सुक्षत्रिये, धर्म जर निष्फल असता तर परमसुख कोणालाच मिळालें नसतें. धर्माच्या अभावीं सर्व प्राणी पशूप्रमाणें वागूं लागले असते, परमार्थविद्येचा अभाव झाला असता आणि धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थांतील एखादा पुरुषार्थहि कोणाला कधीं लाधला नसता.

हे पांचालि, धर्माच्या अस्तित्वाविषयीं व सफलतेविषयीं वेद, प्रत्यक्ष व अनुमान हीं तीन प्रबल प्रमाणें जशीं आहेत तसेंच शिष्टाचार हें चवथें प्रमाण आहे. कारण हे भामिनि, तप, ब्रह्मचर्य, यज्ञ, स्वाध्याय, दान व आर्जव हीं जर निष्फल असतीं तर आपले पूर्वज व त्यांचेहि पूर्वज यांनीं त्यांचें आचरण केलें नसतें. यज्ञादि धर्म हा जर केवल विप्रलंभ असता, ती जर निव्वळ फसवणूक किंवा लबाडी असती तर ऋषि, देव, गंधर्व, असुर व राक्षस, हे सर्व समर्थ असतांना, त्यांनीं मोठ्या आदरानें धर्माचरण कशाला केलें असतें? पण हे साध्वि, ज्याअर्थीं त्या ईश्वरांनींहि कष्टकर धर्माचें आचरण केलें आहे त्याअर्थीं धर्म नित्य फल देणारा आहे, धर्माचरण केव्हांहि व्यर्थ नाहीं, असें जाणूनच त्यांनीं त्या श्रेयःसाधनाचें आचरण केलें, हें निर्विवाद सिद्ध होतें.

यास्तव हे भामिनि, धर्म हें सनातन श्रेयःसाधन आहे. आचरिलेला धर्म केव्हांहि निष्फल होत नाहीं. पांचालि, धर्म जसा निष्फल नाहीं तसाच आचरिलेला अधर्महि निष्फल होत नाहीं. तोहि कर्त्याला प्रत्यवायरूप फल भोगावयास लावितोच. विद्या व तप यांचीं फलें प्रत्यक्ष अनुभवास येतात. तूंहि धर्माचें फल अनुभविलें आहेस व पुढेंहि अनुभवशील. कृष्णे, तुझा जन्म कसा झाला, याचा तूंच विचार कर. तुझा भ्राता प्रतापी धृष्टद्युम्न कसा झाला, तेंहि तुला अवगत आहे. हे सुंदरि, धर्माच्या सफलतेविषयीं हाच एक दृष्टान्त पुरे आहे. कारण धर्मफल तुझ्या अनुभवानेंच सिद्ध झालें आहे. यास्तव हे भीरु, तूं धर्माचा अवमान करूं नको.

द्रौपदि, विद्वान् पुरुषाला कर्माचें फल प्रत्यक्ष मिळतें व तो कर्माच्या आदरानें अल्प अन्नाच्छादनानेंहि तृप्त होतो. पण धर्मावर श्रद्धा न ठेवणारे अविवेकी नेहमीं असंतुष्ट असतात. त्यांना विपुल अन्नाच्छादन जरी मिळालें तरी त्यांची तृप्ति होत नाहीं. त्या मूढांची भोगतृष्णा व धनादिकांचा लोभ वाढतच जातो. त्यांना मरणोत्तरहि धर्मजन्य सुखलेश लाधत नाहीं.

हे कल्याणि, वेदानें ज्या कर्मांचें पुण्य हें फल सांगितलें आहे व ज्यांचें पाप हें फल सांगितलें आहे त्यांच्यापासून क्रमानें स्वर्ग व नरक यांची प्राप्ति होते. अविद्या हें त्यांचें मूळ आहे. विद्येनें त्यांची निवृत्ति होते. पण हीं सर्व देवगुह्यें आहेत. तीं केवल वेदविचारानेंच ज्ञात होतात. पशुतुल्य अविवेकी पुरुषांना तीं कळावीं, असें देवांना वाटत नाहीं. त्यामुळें कोणी एखादाच महात्मा त्यांना जाणतो. इतर सर्व प्रजा त्यांविषयीं मोहित होते. ती विद्येला अविद्या व अविद्येला विद्या, तसेंच पुण्याला पाप व पापाला पुण्य समजते. पण जो एखादा धर्माला तत्त्वतः जाणतो तो देवांना इष्ट असलेलें सकाम कर्म कल्पांतींहि आचरीत नाहीं. यास्तव हे भामिनि, देवांचीं हीं गुह्यें प्रकट करण्यासारखीं नाहींत.

हे राजपुत्रि, देवांची माया अति गूढ आहे. ज्यांनीं आपल्या सर्व कामनांचा त्याग केलेला असतो; ज्यांचा आहार हित, मित व पवित्र असतो; जे शम-दमादि साधनांनीं संपन्न असतात; ज्यांनीं आपलें सर्व पाप श्रवण-मननादि विचाररूप तपानें दग्ध करून सोडलेलें असतें व ध्यानाच्या योगानें ज्यांचें मन प्रसन्न झालेलें असतें, तेच द्विजोत्तम हीं देवगुह्यें जाणतात. धर्माचरणाचें फल जरी प्रत्यक्ष न मिळालें तरी धर्माविषयीं साशंक होऊं नये. देवतांविषयींहि नास्तिक होऊं नये. तर प्रयत्नानें याग करावे व निर्दोष बुद्धीनें दान द्यावें.

कर्म कधींहि निष्फल होत नाहीं, असा पूर्ण विश्वास ठेवावा. कारण 'फल देणें' हा धर्माचा नित्य स्वभाव आहे. ब्रह्मदेवानें आपल्या पुत्रांना हेंच तत्त्व सांगितलें व कश्यपमुनि तें पूर्णपणें जाणतो. यास्तव हे कृष्णे, तुझ्या मनांतील हा धर्मविषयक संशय धुक्याप्रमाणें निवृत्त होवो. धर्मादि सर्व आहे, असाच तूं निश्चय कर. हा आपला नास्तिक्यभाव सोडून दे.

हे भामिनि, धर्माप्रमाणें ईश्वराचेंहि श्रेष्ठत्व तूं मान्य कर. सर्वांचा नियंता व कर्मफलांचा दाता ईश्वर मुळीं नाहींच, असें तूं समजूं नको. एखाद्या नास्तिकाप्रमाणें तूं त्या जगन्नियामकाची निंदा करूं नको. हे राजपुत्रि, शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशानुसार तूं त्या महेश्वराचें स्वरूप समजून घे. त्याला प्रणाम कर. धर्म व ईश्वर यांविषयीं तुझी अशी विपरीत बुद्धि न होवो. कृष्णे, ज्या लोकाधिपतीच्या अनुग्रहानें त्याचा मर्त्य भक्त अमरणभावास प्राप्त होतो, त्या उत्तम देवतेचा तूं असा अवमान केव्हांहि करूं नको. ३. ३. ३१.

---

## अध्याय ३२ वा.

[ १ द्रौपदीनें केलेलें पुरुषार्थाचें सोपपत्तिक सविस्तर वर्णन. ]

( १ ) **वैशंपायन**—पांडवनंदना, धर्मराज युधिष्ठिराचें हें धर्मप्रधान वचन ऐकून तुझी पूर्वपितामही द्रौपदी त्यास म्हणाली—"महाराज, मी धर्माचा अवमान करीत नाहीं किंवा त्याची कधीं निंदाहि करणार नाहीं. मग प्रजापालक सर्वेश्वराचा अवमान माझ्या हातून कसा घडेल ! हे प्रभो, मी दुःखानें आर्त होऊन हा प्रलाप करीत आहें, असेंच तुम्ही समजा. मी आणखींहि असाच विलाप करणार आहें, तो तुम्ही शांत चित्तानें ऐका—

भगवन्, बुद्धिमान् पुरुषानें या लोकीं विहित कर्म अवश्य करावें, कारण कर्म केल्यावांचून वृक्षादि-स्थावर किंवा पशु-पक्षि-मनुष्यादि इतर जीव यांतील कोणीच जिवंत राहूं शकत नाहींत. अहो युधिष्ठिरमहाराज, आम्हां मानवांच्या जीविकेप्रमाणें स्थावरांची जीविकाहि पूर्वकर्मांचेंच फल आहे. गायीचें वत्स उत्पन्न होतांच स्तनपान करावयास लागतें. यावरून त्याच्या पूर्वजन्मसंस्कारांची सिद्धि होते. या दृष्टान्तापासून शत्रूच्या छायेला पीडा देणें, येथपर्यंत सर्व सुखदुःखभोग कर्मांचेंच फल आहे, असा निश्चय होतो. हे भरतश्रेष्ठा, विशेषें करून जंगम प्राण्यांतील मानव इहलोकांतील व मरणोत्तर परलोकांतील वृत्ति—जीविका कर्मानेंच संपादन करण्याची इच्छा करितात. सर्व प्राणी पूर्वकर्मसंस्कारांप्रमाणें कर्मांमध्यें प्रवृत्त होतात व त्यांचें फल भोगितात. त्यावरून कर्म, त्याचे संस्कार, त्यांपासून पुनः कर्म व फलभोग, अशी ही अनादि परंपरा प्रवृत्त झाली आहे. प्राणी या लोकीं न केलेल्या कर्मांचेंहि फल अकस्मात् भोगितो. त्यावरून पूर्वकर्मांची व त्यापासून उत्पन्न झालेल्या संस्कारांची सिद्धि होते. सर्व जीव पूर्वसंस्कारवशात् आपल्या जीविकेमध्यें प्रवृत्त होतात.

---

१ कौलिकशास्त्रांत शत्रूला पीडा देण्याचे परोक्ष उपाय सांगितले आहेत त्यांत आपल्या शत्रूची प्रतिमा तयार करून विशिष्ट विधीनें तिच्या अंगाला कंटकादिकांचे वेध केले असतां शत्रूला व्यथा होते, असें सांगितलें आहे. त्यांत व्यथेचें धातुवैषम्यादि आंतर निमित्त किंवा कंटकवेधादि बाह्यनिमित्त प्रत्यक्ष नसतें तर तें अप्रत्यक्षच असतें. याच न्यायानें सर्व प्राणी आपल्या पूर्व अदृष्ट कर्मानेंच जीवनास प्राप्त होतात.

आपल्यापुढें असलेल्या या बकाकडे पहा. तो पूर्वसंस्कारामुळें कोणाच्या उपदेशावांचूनच जीविकेसाठीं ध्यान करीत बसला आहे. ईश्वरहि अनादि संस्कारवशात् पूर्व पूर्व कल्पांतील सृष्टीसारखीच उत्तरोत्तर कल्पांतील सृष्टि निर्माण करितो. धर्महि पूर्वसंस्कारांच्या अनुरोधानेंच कर्मे प्रवृत्त करितो. याप्रमाणें संस्कारांचें अनादित्व न स्वीकारल्यास कृतप्रणाश व अकृत-अभ्यागम हे दोन अपरिहार्य दोष प्राप्त होतात.

महाराज, मीं हें आपल्याला प्राक्तनकर्माचें प्राबल्य सांगितलें. ऐहिक कर्माचेंहि तितकेंच प्राबल्य आहे. कोणताहि प्राणी कांहींना कांहीं कर्म केल्यावांचून आपल्या जीविकेला प्राप्त होत नाहीं. यास्तव दैववादी होऊन प्रत्यक्ष फल देणारें ऐहिक कर्म कधींहि सोडूं नये. हे प्रभो, आपणहि पुरुषप्रयत्नरूप कर्म करा. असे हताश होऊन बसूं नका. प्रयत्न करण्यास सज्ज व्हा. प्राक्तनकर्म जाणणारा मनुष्य सहस्रावधि लोकांमध्यें एखादाहि सांपडणें शक्य नाहीं. ऐहिक कर्म करणें मात्र आपल्या स्वाधीन आहे, पण तें कसें करावें, हें जाणणाराहि दुर्लभ आहे. दैववशात् प्राप्त झालेल्या ऐश्वर्याचें रक्षण व वृद्धि करण्यासाठींहि यत्नाची आवश्यकता आहे.

एखादा मनुष्य हिमालयाप्रमाणें जरी आढ्य असला तरी तो जर प्राप्त अर्थाचा संग्रह न करितां नुस्ता भोगच घेत राहील, तर निश्चयानें क्षय पावेल. यास्तव मनुष्यानें दैववशात् प्राप्त झालेल्या स्थितींत कधींहि संतुष्ट राहूं नये. तर प्राप्त ऐश्वर्याच्या वृद्धीसाठीं यत्न करावा. प्रभो, या भूलोकीं जर कोणीं कधींच कर्म केलें नसतें तर सर्व प्रजांचा उच्छेद झाला असता. केलेलें कर्म जर निष्फल झालें असतें तर या सर्व प्रजांची वृद्धि कधींच झाली नसती. प्रत्येक प्राण्याचा यत्न नेहमींच फलद्रूप होतो, असें नाहीं. तथापि लोक कर्म—यत्न करीत असलेले आढळतात. यास्तव कांहीं प्रसंगीं कर्म जरी निष्फल झालें, तरी तें सतत करीत रहावें. त्यावांचून कोणत्याहि प्राण्याची ऐहिक जीविका सिद्ध होणार नाहीं. मंत्र, औषधि इत्यादि अदृष्ट उपायांनींच इष्टार्थ संपादन करणाऱ्या

१ या जन्मीं केलेल्या शुभाशुभ कर्मांचा फलप्राप्तीवांचून नाश होणें हा कृतप्रणाश व या जन्मीं न केलेल्या कर्माचें फल भोगावें लागणें, हा अकृत-अभ्यागम. पुनर्जन्म मानिल्यास यांतील पहिला दोष व पूर्वजन्म न मानिल्यास दुसरा दोष अपरिहार्य होतो.

पुरुषाला 'कौलिक' म्हणतात व पूर्वजन्माचा अभाव असल्यामुळें पूर्वी न केलेल्या कर्माचेंच फल या लोकीं मिळतें असें मानणाऱ्या पुरुषाला 'चार्वाक' म्हणतात. पण हे दोन्ही प्रकारचे लोक शठ आहेत. कारण ते पूर्वकर्म मानीत नाहींत. पण याच्या उलट जो प्राक्तन कर्म व ऐहिक कर्म अथवा दैव व प्रारब्ध हीं दोन्ही मिळून ऐहिक फल मिळतें असें मानितो तोच बुद्धिमान् होय.

त्याचप्रमाणें जो दैवावर विश्वास ठेवून कांहीं न करितां खुशाल पडून रहातो तो दुर्बुद्धि पुरुष जलांत टाकिलेल्या अपक्व घटाप्रमाणें नाश पावतो. जो कर्म करण्यास समर्थ असूनहि तें करीत नाहीं, तो 'हठी' मूढ एखाद्या अनाथ दुर्बला-प्रमाणें फार दिवस जिवंत राहूं शकत नाहीं. एखाद्या पुरुषाला अकस्मात् म्ह० ऐहिक यत्नावांचूनच मोठें ऐश्वर्य मिळतें व 'तें हठानें मिळालें' असें कांहीं मूढ मानितात. कारण त्यासाठीं त्यानें कांहींच यत्न केलेला नसतो. यास्तव अतर्कित लाभ होणें यालाच 'हठ' म्हणतात.

कांहीं लोक आपल्या भाग्याचीच उपासना करितात व देवताराधनादि उपायानें इष्टार्थ साधितात. याला 'दैव' असें म्हणतात. कांहीं लोक स्वतः कर्म करून फल मिळवितात व या लोकीं यत्न करणारालाच फल मिळतें, असें अनुभवास येतें. हेंच 'पौरुष' होय. एखादा पुरुष क्षुद्र फलासाठीं यत्न करीत असतांहि पूर्वकर्माच्या अनुग्रहानें त्याला महत् फल मिळतें. त्याच्या त्या लाभाचें प्रत्यक्ष कारण कांहींच दिसत नाहीं. अशा फलाला 'स्वभावात्मक' फल म्हणतात.

हे प्रभो, याप्रमाणें या लोकीं हठ, दैव, कर्म व स्वभाव या चार कारणांनीं इष्टार्थ लाभ होत असलेला दिसतो. पण वस्तुतः तें सर्व पूर्वकर्माचेंच फल आहे. कर्मफलदाता ईश्वरहि प्राण्याच्या पूर्वकर्माला अनुसरून हठादि चार निमित्तांतील कोणत्या तरी एका निमित्ताला प्राधान्य देऊन प्राक्तन कर्माचें फल विभागून देत असतो. हा पुरुष या लोकीं जें कांहीं शुभाशुभ कर्म करितो, तें सर्व पूर्वकर्माचें फलच आहे, असें आपण समजा. विधात्याच्या प्रेरणेनेंच तें त्याला प्राप्त होतें.

कर्मामध्यें प्रवृत्त होणारा हा मनुष्यदेह पूर्वकर्माचें फल आहे. पूर्व मानुष-देहांत हा जें कर्म करितो तेंच विधात्याला प्रेरणा करितें व विधाता त्याच्या पूर्व-कर्मानें प्रेरित होऊनच बिजांकुराप्रमाणें त्याला हा वर्तमान देह देतो. अर्थात् प्राण्याचें पूर्वकर्म विधात्याचें प्रेरक आहे व विधाता वर्तमान देहाचा प्रेरक आहे.

तो महेश्वर प्राण्याला त्याच्या पूर्वकर्माप्रमाणें शुभाशुभ कर्मांत प्रवृत्त करितो. सर्व भूतें कर्माधीन असल्यामुळें ईश्वर त्यांच्याकडून पुण्य-पाप करवितो. कोणताहि पुरुष आपल्या मनानें अगोदर आपल्या कर्तव्याचा निश्चय करितो आणि मग तो स्वतः बुद्धिपुरःसर तें कर्म आचरितो. यास्तव कर्तव्याच्या निश्चयाला पूर्वकर्माची आवश्यकता असून ऐहिक प्रवृत्तीला पुरुषाच्या यत्नाची आवश्यकता आहे.

हे पुरुषश्रेष्ठा, या लोकांतील कर्मांची गणना करितां येत नाहीं. पुरुषार्थानें गृह-नगरादिकांची सिद्धि होते. 'प्राक्कर्मच त्याचें कारण आहे आणि पुरुषप्रयत्न नाहीं' असा निश्चय करितां येत नाहीं. पूर्वकर्मानें तिळामध्यें तेल, गायीमध्यें दूध व काष्ठामध्यें अग्नि सिद्ध असतो. पण यत्नानें त्याला प्रकट करावें लागतें. त्यांची प्राप्ति कशी करून घ्यावी हें बुद्धिमान् पुरुष जाणतो व उपायानें त्यांना प्राप्त करून घेतो.

तिळांना घाण्यांत घालून रगडणें, गायीचें दोहन व काष्ठांचें मंथन या उपायांनीं तैलादिकांची प्राप्ति होते आणि त्या कर्मजन्य सिद्धीवर जीव आपली उपजीविका करितात. एकाच प्रकारच्या कर्मांनीं भिन्न भिन्न फलें उत्पन्न होतात. त्यांतील उत्तमाधम फलांकडे पाहून हें कुशल कर्त्यानें केलें कीं हें अकुशल कर्त्यानें केलें, याचा निश्चय होतो. त्यावरूनहि ऐहिक कर्माचें प्राबल्य सिद्ध होतें. हा पुरुष कर्मानें साध्य होणाऱ्या फलाचें निमित्त जर नसता तर यागादि इष्ट व तडागादि पूर्त कर्मांचें शास्त्रानें विधान केलें नसतें व त्यांचें फलहि प्रत्ययास आलें नसतें.

त्याचप्रमाणें कोणी कोणाचा शिष्य झाला नसता व कोणी कोणाचा गुरु झाला नसता. पुरुषाला कर्तृत्व असल्यामुळेंच त्याच्या कर्माची सिद्धि झाली असतां लोक त्याची प्रशंसा करितात व कर्माचा नाश होऊन असिद्धि झाली असतां निंदा करितात. यावरूनहि प्रयत्नाचें श्रेष्ठत्व सिद्ध होतें.

चार्वाकादि वादी 'सर्व कर्मफल हठानें किंवा स्वभावानें सिद्ध होतें' असें म्हणतात, कौलिक 'दैवानेंच फलसिद्धि होते' असें मानितात व प्राकृत पुरुष केवल प्रयत्नानेंच फलसिद्धि इच्छितात. महाराज, कर्मफलाविषयीं अशा तीन प्रकारच्या लोकांचीं अशीं तीन मतें आहेत. पण वैदिक म्हणतात कीं या तीन कारणांनींच कोणतेंहि कार्य सिद्ध होत नाहीं; तर जें धर्माधर्मरूप पूर्वकर्म तेंच

दैव, हठ इत्यादि सर्व आहे. पण यावर पूर्ववादी म्हणतो कीं, कांहीं कार्य दैवानें, कांहीं हठानें व कांहीं स्वभावतः म्हणजे अयत्नानेंहि होतें. पुरुषाला जें फल मिळतें, त्याचें पूर्वकर्मादि चवथें कांहीं कारण असतें असें दिसत नाहीं.

हे प्रभो, चार्वाकादिमहातत्त्ववेत्ते अशी प्रतिज्ञा करीत असतात, पण त्या मूढांना असें कळत नाहीं कीं, भूतांना इष्टानिष्ट फल देणारा धाता जर नसता तर आब्रह्म-स्तंबपर्यंत प्राण्यांमध्यें कृपण कोणीच दिसला नसता. प्राक्तन कर्म जर नसतें, तर पुरुषानें फलाच्या इच्छेनें केलेलें सर्वच कर्म सफल झालें असतें. जे अविवेकी लोक हठ, दैव व स्वभाव हीं तीन अर्थ व अनर्थ यांच्या सिद्धीचीं द्वारेंच असून तिचें मुख्य कारण कर्मच आहे, असें जाणत नाहींत, ते देह किंवा काष्ठ-पाषाण यांप्रमाणें जडच आहेत, यांत संशय नाहीं.

पुरुषानें कर्म अवश्य करावेंच असा मनूनें निश्चय केला आहे. सर्वथा प्रयत्न-शून्य असलेला हठवादी नियमानें पराभूत होतो. जो प्रयत्न करीत असतो, त्याला केव्हांना केव्हां तरी फलसिद्धि मिळतेच. आळशी मनुष्याला मात्र फलप्राप्ति नियमानें होत नाहीं. एखादें कर्म करूनहि त्याचें फल न मिळाल्यास त्यांत कांहीं तरी वैगुण्य झालें आहे, असें समजावें. पण तें कर्मच व्यर्थ आहे असें कधीं म्हणूं नये.

सांग कर्म करूनहि जर फल न मिळालें तर त्याचा दोष पुरुषाकडे येत नाहीं. उलट तो कर्माच्या ऋणांतून मुक्त होतो. कोणत्याहि प्रकारचा यत्न न करितां आळसानें निजून रहाणाऱ्या पुरुषाला अलक्ष्मी प्रासते. पण जो स्वकर्तव्यामध्यें दक्ष असतो, त्याला निश्चयानें फलप्राप्ति होते व तो ऐश्वर्याचा अनुभव घेतो. संशयी लोक अर्थहीन असतात व संशयरहित पुरुष सिद्धि मिळवितात. बुद्धि-मान् पुरुष कर्तव्यामध्येंच रत असतात. पण खरोखर असे संशयहीन पुरुष विरळा आढळतात !

हे प्रभो, आपल्यावर या वेळीं हा राज्यभ्रंशरूप महान् अनर्थ कोसळला आहे. पण, आपण पुरुषार्थ कराल तर तो खचित नाहींसा होईल, आणि कदाचित् यत्न करूनहि जर हा अनर्थ न टळेल तर आपण व हे आपले भ्राते राज्याला अपात्र अहांत, हेंच पूर्णपणें प्रमाणानें सिद्ध होईल व मग मला त्याविषयीं खेदहि होणार नाहीं.

पण वृकोदर, अर्जुन व नकुल-सहदेव यांचा पराक्रम कसोटीला लागेपर्यंत माझा हा उद्वेग शांत होणें शक्य नाहीं. आमचें किंवा दुसऱ्या कोणाचेंहि कर्म सफल होतें कीं निष्फल होतें, हें कर्म केल्यावांचून ठरणें शक्य नाहीं. परंतु आपण कर्म न करितां त्याच्या फलाचा निश्चय कसा करणार !

कृषीवल नांगरानें भूमि नांगरतो व बीज पेरतो आणि मीं आपलें कर्तव्य केलें आहे असें समजून स्वस्थ बसतो. त्याचें शेत उगवून चांगला फललाभ होणें पर्जन्यावर अवलंबून आहे. दैववशात् वृष्टिच जर न झाली तर तो बिचारा शेतकरी त्याला काय करणार ! भूमि नांगरून बीं पेरल्यानेंच तो आपल्या कर्तव्यांतून मोकळा झाला. 'माझ्या सारख्या अन्य पुरुषानें जें केलें असतें तें सर्व मीं केलें आहे. हेंच माझें फल आहे. मी माझ्या कर्तव्यांत कांहीं प्रमाद केला नाहीं,' असें समजून बुद्धिमान् पुरुषहि तसाच स्वस्थ बसतो. स्वतःला दोष देत नाहीं. उलट कर्तव्याचा प्रसंग आल्यास तो पुनः तें करावयास चुकत नाहीं. यास्तव 'कितीहि यत्न केला, तरी तो निष्फल होतो' असें समजून कर्तव्याला कधींहि कंटाळूं नये.

प्रयत्न व उत्साह अशीं फलसिद्धीचीं दोन कारणें आहेत. कार्यांची सिद्धि होवो किंवा न होवो, कांहीं झालें तरी यत्न कधींहि सोडूं नये. कारण अनेक निमित्तें जेव्हां एकत्र जुळतात, तेव्हांच कार्यांची सिद्धि होते. मनुष्याच्या अंगांत शौर्यादि गुण नसल्यास प्रयत्नाचें फल कमी मिळेल, पण केलेला प्रयत्न अगदीं व्यर्थ जाणार नाहीं. पण याच्या उलट शौर्यादि गुण असूनहि प्रयत्नच न आरंभिल्यास त्या गुणांचा कांहीं उपयोग होत नाहीं. ते असून नाहींसे होतात.

राजन्, धीर पुरुष आपल्या बुद्धीनें स्वकल्याणासाठीं देश, काल व उपाय यांची यथाशक्ति योजना करितो. खरोखर पुरुषानें सावधान चित्तानें कार्यांचा आरंभ करावा. पराक्रम हाच मुख्य कार्यकर्ता आहे. सर्व कर्तव्यांमध्यें पराक्रम श्रेष्ठ आहे व तो सर्व लोकप्रसिद्ध आहे. यास्तव पुरुषानें नेहमीं पराक्रम करीत रहावें. बुद्धिमान् पुरुषानें सामादि उपायांतील कोणत्या उपायाची योजना केल्यानें आपलें कल्याण होईल, याचा नेहमीं विचार करावा.

महाराज, जेथें सामाचा उपयोग होण्यासारखा असेल तेथें साम करावा व आपला इष्टार्थ साधावा. जेथें भेदाचा किंवा दानाचा उपयोग होण्यासारखा असेल तेथें त्यांचा उपयोग करावा. पण दुर्योधनासारख्या दुष्ट पुरुषाचे ठिकाणीं

साम, भेद व दान यांतील एकाहि उपायाचा उपयोग नाहीं. यास्तव अशा प्रसंगीं दंड हा शेवटचा उपायच श्रेयस्कर आहे.

हे प्रभो, सागर किंवा महा पर्वत यांनाहि स्वस्थानापासून च्युत करून त्यांचा विध्वंस करितां येणें शक्य आहे. मग या दुर्योधनासारख्या मरणधर्मी दुरात्म्याची काय कथा ! शत्रूंचें छिद्र पाहण्यामध्यें जो नेहमीं तत्पर असतो, तो स्वतः व त्याचे अमात्यादिकहि दोषी ठरत नाहींत. पुरुषानें स्वतःला ‘ मी असमर्थ आहें ’ असें कधींहि मानूं नये. कारण जो स्वतःला असमर्थ समजतो, त्याचें ऐश्वर्य कधींहि वाढत नाहीं.

हे प्रभो, या लोकांतील सिद्धि ही अशा स्वरूपाची आहे. यास्तव काल व अवस्था यांचें आनुकूल्य नेहमीं पहात रहावें व तें दिसतांच यत्नास आरंभ करावा. अनुकूल काल व अवस्था पाहून यत्नाला आरंभ करणें, हेंच सिद्धीचें मूळ आहे.

पूर्वीं माझ्या पित्यानें एका विद्वान् ब्राह्मणाला आपल्या घरीं ठेवून घेतलें होतें. बृहस्पतीनें सांगितलेली ही सर्व नीति त्यानें माझ्या पित्याला कथन केली व माझ्या भ्रात्यांना शिकविली. तो महापंडित माझ्या पित्याला व भ्रात्यांना ही नीति सांगत असतां मी कांहीं कार्यासाठीं पित्यापाशीं गेलें. तेव्हां माझें सान्त्वन करून त्यानें मला आपल्यापाशीं बसवून घेतलें व मलाहि ती सांगितली. ३. ३. ३२.

---

## अध्याय ३३ वा.

[ १ भीमसेनाचें युधिष्ठिरास निंदापूर्वक युद्धाविषयीं प्रोत्साहन. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, याज्ञसेनीचें हें वचन ऐकून अति क्रोधी भीमसेन दीर्घ श्वास सोडीत युधिष्ठिरराजापाशीं गेला आणि मोठ्या क्रोधानें त्यास म्हणाला—“अहो महाराज, सत्पुरुषाला उचित अशा राज्याच्या धर्म्य पदवीला प्राप्त व्हा. क्षत्रियाला उचित अशा धर्म्य मार्गानें आपलें राज्य प्राप्त करून घेण्याचा यत्न करा. हठादि सर्व उपायांमध्यें पुरुषप्रयत्नच श्रेष्ठ आहे, असें जें द्रौपदी म्हणते तें अगदीं खरें आहे. दुर्जनानें कपटानें राज्य हरण केल्यामुळें धर्म, अर्थ आणि काम यांस मुकलेल्या आम्हांला कालप्रतीक्षा-

रूप अधर्म्य मार्गाचा स्वीकार करून काय करावयाचें आहे? अशा रीतीनें वनांत वास करणाऱ्या आम्हांला काय लाभ होणार!

दुर्योधनानें आमचें राज्य धर्मानें, आर्जवानें किंवा पराक्रमानेंहि हरण केलें नाहीं. तर कपट द्यूताचा आश्रय करून आमच्या संपन्न राज्याचा अपहार केला आहे. बलाढ्य सिंहाचें आमिष एखाद्या दुर्बल कोल्ह्यानें जसें हिरावून घ्यावें, त्याप्रमाणें त्या नीचानें आमचा भाग हरण केला आहे. काकबळीचा लेश भक्षण करणाऱ्या श्वानानें व्याघ्राचें भक्ष्य जसें हरण करावें, तसाच हा प्रकार झाला आहे.

हस्तविकल मनुष्याजवळचीं फळें किंवा पंगूच्या गाई जशा एकाद्यानें हरण करून न्याव्या, त्याप्रमाणें आम्ही चौघे भ्राते जिवंत असतांना तुझ्या निरुत्साहामुळें शत्रूंनीं आमचें ऐश्वर्य हरण केलें. धर्माभासावर विश्वास ठेवून बसलेल्या तुझें प्रिय करण्यासाठींच आम्हांवर हा एवढा अनर्थ कोसळला आहे. हे राजा, आम्ही तुझ्या शमवचनांनीं आपलें नियमन करून स्वमित्रांना दुःख देत आहों व शत्रूंना आनंद देत आहों. कारण तुझ्या शमोपदेशाला प्रमाण मानून आम्हीं धृतराष्ट्र पुत्रांना त्याच वेळीं तेथल्या तेथें मारलें नाहीं. पण आतां तें आमचें अकार्यच आम्हांला संताप देत आहे.

हे राजन्, मृगयाशील पुरुषाप्रमाणें असलेली आपली ही वनचर्या किती कष्टकर आहे, याचा तूं विचार कर. दुर्बल लोकच असल्या जीविताचा आश्रय करितात. बलवान् लोक असली दुःस्थिति क्षणभरहि सहन करीत नाहींत. या दुःस्थितीचें अभिनंदन कृष्ण, अर्जुन, पितृतुल्य पराक्रमी बाल अभिमन्यु, स्वतः मी व हे माझे वीर कनिष्ठ भ्राते माद्रीपुत्र, यांतील कोणीहि करीत नाहीं. सृंजयांनाहि हा तुझा शम संमत नाहीं.

हे राजा, तूं 'धर्म, धर्म' म्हणत बसला आहेस व त्यामुळें आपल्या सत्यव्रतानें नित्य कृश होत आहेस. पण हे युधिष्ठिरा, तूं वैराग्यामुळें तर या क्लीब जीविकेला प्राप्त झाला नाहींसना? पण हे भ्रात्या, हीन मनुष्यच या निष्फल व स्वार्थाचा घात करणाऱ्या विरक्तीचा आश्रय करितात. जे लोक शत्रूनें हरण केलेली आपली 'श्री' त्याच्या हातांतून हिरावून घेण्यास असमर्थ असतात तेच या वैराग्याला प्रिय मानितात.

हे महाराजा, तूं विद्वान् व समर्थ आहेस. आमचा पराक्रम तुला माहित आहे. असें असूनहि तूं केवल दयापरायण होऊन आपल्या अनर्थाकडे लक्ष

कसें देत नाहींस ! हे धृतराष्ट्राचे पुत्र समर्थ असलेल्याहि आम्हांला असमर्थ मानितात. आम्ही त्यांस क्षमा करितों, हें ते जाणतहि नाहींत; याचेंच मला अतिशय दुःख होतें. संग्रामांतील वधाची मला भीति नाहीं. कपटानें युद्ध न करणाऱ्या व संग्रामांतून परत न फिरणाऱ्या आम्हां पांडवांचा युद्ध करीत असतांना शत्रूंच्या हातून सर्वथा नाश जरी झाला, तरी तो या वनचर्येहून श्रेष्ठ आहे. त्या वीर शयनामुळें आम्हांला मरणोत्तर उत्तम लोकाची प्राप्ति होईल. किंवा उलटपक्षीं आम्हीं या धृतराष्ट्राच्या पुत्रांना मारून सर्व पृथ्वीचें राज्य संपादन केलें, तरी तेंहि श्रेयस्करच आहे.

स्वधर्माचें अनुष्ठान करणाऱ्या आम्हां क्षत्रियांचें तें कर्तव्यच आहे. विपुल कीर्तीची इच्छा करणाऱ्या व शत्रूंचा सूड उगविणाऱ्या आम्हां वीरांना मरण व राज्य हीं दोन्ही सारखींच आहेत. स्वार्थासाठीं युद्ध करणाऱ्या आम्हांला आमच्या कर्तव्याचें स्वरूप उत्तमप्रकारें अवगत आहे. त्यामुळें युद्धामध्यें आमचा पराभव करून शत्रूंनीं आमचें राज्य जरी हरण केलें तरी त्यामुळें आमची निंदा न होतां प्रशंसाच होईल.

जो धर्म आपल्या व आपल्या मित्रांच्या क्लेशांना कारण होतो, तो धर्म नव्हे, तर तें महद्व्यसन आहे. हे राजन्, तो कुधर्म आहे. जो दुर्बल पुरुष सर्वथा धर्मपरायण होऊन रहातो, त्याला धर्म व अर्थ हे दोन्ही पुरुषार्थ सोडितात. हे राजा, प्रेताला सुख-दुःख जसें सोडतें, तसे त्या धर्मभोळ्या मनुष्याला धर्म व अर्थ सोडितात.

ज्याचा धर्म केवल धर्मासाठीं असतो व अर्थासाठीं नसतो, तो पुरुष केवल क्लेश भोगतो. तो पंडित नव्हे. आंधळयाला सूर्याची प्रभा जशी दिसत नाहीं, त्याप्रमाणें तो धर्माचा अर्थ जाणत नाहीं. त्याचप्रमाणें ज्याचें वित्त स्वार्थासाठीं असतें, तो अर्थाचें प्रयोजन जाणत नाहीं. ज्याप्रमाणें एखादा गुराखी अरण्यांत गायींचें रक्षण करितो तसाच तो धनाचें रक्षण करीत राहतो.

जो अतिशय धनलोलुप असतो व त्यामुळें धर्म व काम यांचें सेवन करीत नाहीं तो सर्व भूतांना वध्य व महापातक्याप्रमाणें निंद्य होतो. तसाच जो सतत कामलोलुप असतो व त्यामुळें धर्म आणि अर्थ आचरीत नाहीं, त्याचे सर्व मित्र नाश पावतात आणि तो धर्म व अर्थ या दोन्ही पुरुषार्थांस मुकतो. धर्मार्थहीन असलेल्या त्या पुरुषाचें कामाच्या शेवटीं निधनच सांगितलें आहे.

एखाद्या जलाशयांतील जल आटून गेलें असतां त्यांतील मत्स्यांचें मरण जसें ओढवतें, त्याप्रमाणें कामामध्यें रत असलेल्या पुरुषाचा कामनिवृत्ति होतांच नियमानें नाश होतो. यास्तव विवेकी पंडित धर्म व अर्थ यांकडे केव्हांहि दुर्लक्ष करीत नाहीं. 'अरणी' हें जसें अग्नीचें उत्पत्तिस्थान आहे, त्याचप्रमाणें 'धर्मार्थ' हें कामाचें निमित्त आहे.

मेघ व सागर हे जसे परस्परांच्या आश्रयानें राहतात त्याप्रमाणें अर्थ धर्ममूल आहे व धर्माचें कारण अर्थ आहे. मेघामुळें सागराचें पोषण होतें व सागरापासून मेघाची पूर्ति होते, हें प्रसिद्ध आहे. त्याप्रमाणें धर्मामुळें अर्थप्राप्ति होते व अर्थाच्या बळावर धर्माचरण करितां येतें.

पुष्पमाला, चंदन इत्यादि द्रव्यांचा स्पर्श व सुवर्णादि अर्थाची प्राप्ति झाली असतां जी प्रीति उत्पन्न होते तोच काम होय. चित्ताचा संकल्प हेंच त्याचें स्वरूप असून त्याहून निराळें स्वरूप उपलब्ध होत नाहीं.

हे राजा, धनार्थी पुरुष परम धर्माची इच्छा करितो व कामार्थी पुरुष धनाची इच्छा करितो; पण कामापासून तो दुसऱ्या कशाचीच इच्छा करीत नाहीं. कारण कामानें अन्य काम साध्य होत नाहीं. काम हें फल आहे. उपभोगानें त्याची निवृत्ति होते. काम मनुष्याच्या मनांत प्रीति उत्पन्न करून कृतार्थ होतो. काष्ठापासून भस्माचा लाभ होतो, पण भस्मापासून कांहींच निष्पन्न होत नाहीं. तोच न्याय या कामालाहि लागू आहे.

युधिष्ठिरा, पारधी जशी पक्ष्यांची हिंसा करितो, त्याप्रमाणें अधर्म भूतांची हिंसा करितो. भूतांची विशेष प्रकारें हिंसा करणें हेंच अधर्माचें मूळ आहे. जो मूढ काम व लोभ यांच्या अधीन होऊन धर्माचें स्वरूप जाणत नाहीं, तो या लोकीं व परलोकींहि सर्व लोकांना वध्य होतो.

हे राजन्, कामाख्य प्रयोजन द्रव्याच्या योगानें संपादन करितां येतें, हें तुला चांगलेंच अवगत आहे. कारण स्त्री, धन, गायी, हत्ती, अश्व इत्यादि सर्व प्रयोजन द्रव्याच्या योगानें सिद्ध होतें. स्त्री-धनादि ही द्रव्याची प्रकृति आहे आणि त्याग व भोग ही विपुल विकृति आहे, हेंहि तुला अवगत आहे. स्त्री-धनादिरूप द्रव्याचें अदर्शन झालें असतां, प्राप्त द्रव्याचा वियोग झाला असतां आणि स्त्री आदि धनाला जरा किंवा मरण प्राप्त झालें असतां आपल्यावर हा एक अनर्थच ओढवला आहे, असें पंडितलोक समजतात.

राजा, ऐश्वर्याच्या विनाशामुळें आम्हांवर तोच अनर्थ ओढवला आहे. यास्तव त्याचा परिहार करण्यासाठीं या वेळीं आम्हांला धर्माचें उल्लंघन करणें उचित आहे.

पांच इंद्रियांचे शब्दादि पांच विषय, मनाचा संकल्प व बुद्धीचा निश्चय, अशा या सात विषयांमध्यें रहाणाऱ्या पुरुषाच्या अंतःकरणांत जी प्रीति उत्पन्न होते तोच काम आहे असें माझें मत आहे. कर्माचें उत्तम फलहि तेंच आहे.

युधिष्ठिरा, याप्रमाणें धर्म, अर्थ व काम यांना अगदीं पृथक् जाणून पुरुषानें केवळ धर्मपर, केवळ अर्थपर किंवा केवळ कामपरायण होऊं नये. तर या सर्वांचें सर्वदा सेवन करावें. दिनपूर्वभागीं धर्माचरण करावें. मध्यकालीं धनार्जन करावें व शेवटीं कामसेवन करावें, असा शास्त्रकारांनीं निर्णय केला आहे. त्याचप्रमाणें पूर्ववयामध्यें काम, मध्यवयामध्यें धन व अंतिम वयामध्यें धर्माचरण करावें, असाहि त्यांनीं नियम केला आहे. यास्तव हे श्रेष्ठा, कालज्ञ पुरुषानें कालविभागानें धर्म, अर्थ व काम या तिन्ही पुरुषार्थांचें चांगल्याप्रकारें सेवन करावें.

सुखार्थी पुरुषांना एक मोक्ष तरी सुखकर असतो किंवा राज्यप्राप्तीसारखें ऐश्वर्य तरी सुखावह होतें. पण आपल्याला यांतील काय उचित आहे, याचा निश्चय करून तूं त्याच्या प्राप्तीचा यत्न कर. हे राजा, आपला महोदय व्हावा अशी जर तुझी इच्छा असेल तर सत्वर त्यासाठींच यत्न कर व आपला मनोरथ पूर्ण करून घे. एखाद्या रोग्याच्या जीविताप्रमाणें असें दुःखद जीवित कंठित राहूं नकोस. जो पुरुष अभ्युदय किंवा मोक्ष यांतील कोणत्याच पुरुषार्थाच्या उद्योगास लागत नाहीं, त्या मध्यवर्ती पुरुषाचें जीवित दुःखद होतें.

हे महाराज, तुला धर्म काय आहे, हें ठाऊक आहे. तूं सतत धर्माचरणहि केलें आहेस. तुझे विद्वान् सुहृद् तुला प्रवृत्तिजनक वेदवाक्यांचा उपदेश करितात. युधिष्ठिरा, दान, यज्ञ, शिष्टांची पूजा, वेदाध्ययन, आर्जव हा श्रेष्ठ धर्म आहे. तो या लोकीं व परलोकींहि उत्तम फल देण्यास समर्थ आहे. पण हे राजा, हा यज्ञादिरूप धर्म धनहीन पुरुषाला आचरितां येणें शक्य नाहीं. एखादा पुरुष सर्व गुणांनीं संपन्न असूनहि जर निर्धन असेल तर तो धर्माचरण करण्यास समर्थ होत नाहीं.

युधिष्ठिरा, हें सर्व जगत् धर्ममूल आहे. धर्माहून श्रेष्ठ कांहीं नाहीं. पण विपुल धन असेल तरच तो धर्म साध्य होतो. भिक्षाचरणानें किंवा भित्रेपणानें अर्थप्राप्ति कधींहि होत नसते. केवल धर्मबुद्धीनेंच धन संपादन करितां येणें

शक्य आहे. हे राजन्, तुला याचना विहित नाहीं. ब्राह्मणच याचनेनें सिद्ध होतो. यास्तव हे पुरुषश्रेष्ठा, तूं आपल्या पराक्रमानें विपुल धन संपादन करण्याचा यत्न कर.

हे राजा, विशेषतः क्षत्रियाला ब्राह्मणांची भैक्ष्यचर्या जशी विहित नाहीं, त्याप्रमाणें वैश्य व शूद्र यांची वृत्तिहि विहित नाहीं. तर बल व उत्साह हाच त्याचा धर्म आहे. हे वीरा, तूं स्वधर्माचा आश्रय कर व एकत्र जमलेल्या सर्व शत्रूंचा नाश कर. माझ्या व धनंजयाच्या हातून धार्तराष्ट्रवनाचा समूल उच्छेद करीव.

विद्वान् लोक ईश्वरत्वालाच धर्म म्हणतात. यास्तव तूं त्या ईश्वरभावाचाच अंगीकार कर. अशा अनैश्वर्यांत राहूं नकोस ! हे राजेंद्रा, तुला सनातन धर्म अवगत आहेत. त्यांचेंच स्मरण कर. ज्याला सर्व लोक भितात त्या हिंसात्मक क्षात्रधर्मानें युक्त असलेल्या क्षत्रियकुलांत तूं उत्पन्न झाला आहेस. प्रजापालनरूप धर्मानें संपादन केलेल्या फलाची निंदा कोणीहि करणार नाहीं. कारण त्या महत्कर्मापासून उत्पन्न झालेलें फल सर्वथा अनिंद्य आहे. युधिष्ठिरा, प्रजापालन हाच सनातनधर्म तुझ्यासाठीं नियत केला आहे.

हे पृथापुत्रा, तूं त्या आपल्या प्रसिद्ध धर्मापासून जर च्युत झालास तर या लोकीं उपहासास पात्र होशील. भ्रात्या, मनुष्यानें स्वधर्मापासून च्युत होणें सर्वथा अयोग्य आहे. धर्मभ्रंशाची प्रशंसा कोणीहि करीत नाहीं. यास्तव तूं ही मनाची दुर्बलता टाकून, क्षत्रियाप्रमाणें आपलें हृदय निष्ठुर करून व क्षात्र वीर्याचा आश्रय करून एखाद्या धुरंधराप्रमाणें क्षात्रधर्माचा भार आपल्या मस्तकावर वहा. केवल धर्मदृष्टीच असलेला कोणताहि राजा आजवर पृथ्वीला जिंकूं शकला नाहीं व आपलें नष्ट झालेलें ऐश्वर्यहि मिळवूं शकला नाहीं. !

युधिष्ठिरा, व्याध मृगांना भक्ष्य देऊन व त्यांना विश्वास दाखवून त्यांचा वध करितो, त्यामुळें त्यास पोटभर आहार मिळतो. किंवा जसा शल्यक पक्षी जीभ बाहेर काढून बसतो व तिचा रसास्वाद घेण्यासाठीं माशा येऊन बसल्या कीं त्या सर्वांस गट्ट करितो, त्याप्रमाणें क्षुद्रचित्त असलेल्या शत्रुपक्षीय लोकांना प्रिय वस्तु देऊन, धनादिकांचा लोभ दाखवून व मधुर भाषण करून आपलेंसें करून घे व शत्रूंचा नाश कर.

असुर, हे देवांचे ज्येष्ठ भ्राते होत. ते सर्व प्रकारें अतिशय समृद्ध होते. तथापि देवांनीं त्या महाबलाढ्य भ्रात्यांनाहि कपटानें जिंकलें. हे धर्मराज, या सर्व प्राचीन नीतीचा विचार करून तूं दुर्योधनादिकांशीं कपटाचरण कर. मीमांसकांच्या मताप्रमाणें 'संवत्सर' हा शब्द दिनपर मानून शत्रूंचा नाश कर. कपटी शत्रूंशीं कोणताहि व्यवहार सरळ मनानें करणें, हें नीतीला धरून नाहीं. यास्तव तूं ही धर्मबुद्धि टाक व दुर्योधनाचा समूल नाश होईपर्यंत कपटाचा आश्रय कर.

युद्धांत आपला पराभव होईल, ही शंका तूं मनांतहि आणूं नको. अर्जुनासारखा धनुर्धर या त्रिभुवनांत नाहीं व माझ्यासारखा गदाधरहि दुर्लभ आहे. बलवान् पुरुषहि स्वसामर्थ्यानेंच शत्रूंशीं युद्ध करितो. तो मोठा संघ किंवा वृथा उत्साह यांची अपेक्षा करीत नाहीं. यास्तव राजा, तूं स्वसामर्थ्याचा आश्रय करून सावधान चित्तानें व मोठ्या उत्साहानें शत्रूंशीं युद्ध कर. पुरुषाचें सत्त्व म्हणजे बल हेंच सर्व अर्थाचें मूळ आहे. सत्त्वावांचून इतर सहायसंपत्ति व्यर्थ आहे. कारण शीतकालीं वृक्षाची छाया कोणालाहि इष्ट वाटत नाहीं. शेतकरी पुढें विपुल लाभ होण्यासाठीं प्रथम आपल्यापाशीं असलेलें सर्व धान्य भूमींत पेरतो, त्याप्रमाणें पुढें आपलें परम कल्याण व्हावें, अशी इच्छा करणाऱ्या पुरुषानें प्रथम अर्थाचा त्याग करावा, अशी नीति आहे.

हे पृथापुत्रा, दुर्योधनाला राज्य दिल्यानें आपलें यत्किंचित्हि हित न होतां उलट अपकारच होईल! गायीला खाजविल्यास ऐहिक व पारलौकिक हित होतें, पण गर्दभाला खाजवूं लागल्यास तत्काल स्नान करावें लागतें व परलोकींहि कांहीं पुण्यफल मिळत नाहीं. दुर्बुद्धि दुर्योधनाला प्रसन्न करण्याचा प्रयत्न करणें गर्दभकंडूयनासारखेंच सर्वथा निष्फल आहे. यास्तव हे भ्रात्या, तूं त्या मदोन्मत्त शत्रूंशीं 'आपण युद्ध कसें करावें' ही शंकाहि मनांत आणूं नको. तो दुर्बुद्धि जरी कदाचित् अनुकूल झाला व कांहीं अर्थलाभ झाला तरी तो अनर्थावहच आहे. त्यापासून आपला उत्कर्ष केव्हांहि होणार नाहीं. अशा नीच पुरुषाशीं केलेली आपली प्रतिज्ञा पुरी करणें व्यर्थ आहे.

राजा, मी वर कृषीवलाचा जो दृष्टान्त दिला आहे, त्याला अनुसरून तूं प्रतिज्ञापालनाचा आग्रह सोडून म्हणजे त्या अल्पधर्माचा त्याग करून राज्यलाभानंतर होणाऱ्या दान-यागादिरूप महद्धर्माचा आदर कर. जो अल्प धर्माचा त्याग करून महद्धर्माचा आश्रय करितो तोच बुद्धिमान् मानिला जातो. नीति-

वेत्ते पंडित मित्रसंपन्न असलेल्या शत्रूंच्या पक्षांत भेद उत्पन्न करून, मित्रहीन झालेल्या त्या मतिमंदाला आपल्या स्वाधीन करून घेतात.

हे पृथ्वीपते, एखादा बलाढ्य राजाहि स्वसामर्थ्यानें युद्ध करितो, तो केवल उद्यम किंवा सांत्ववचन यांनीं प्रजेला आपल्या अधिकारांत वागवूं शकत नाहीं. हें तत्त्व मीं तुला वर सांगितलेंच आहे. मधमाशा मधाचें पोळें न्यावयास आलेल्या मनुष्यावर एक मतानें चोंहोंकडून हल्ला करितात व आपल्या विषयुक्त दंशांनीं जर्जर करून सोडितात, हें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें आपल्या राज्याचा अपहार करणाऱ्या शत्रूवर आपण एकमतानें प्रहार करूं या. प्रतिज्ञाकालाची प्रतीक्षा करीत राहिल्यास शत्रु तेरा वर्षांत बलाढ्य होईल व तो आमचाच पराभव करील.

हे भूपाला, सूर्य आपल्या किरणांच्या योगानें सर्व प्रजांपासून रसाचें शोषण करून घेतो व वृष्टीच्या योगानें त्यांचें पालन करितो. त्याप्रमाणें तूं दुर्योधनादिकांना आपल्या अधीन करून घे व मग त्यांचें पालन कर. भूमीचें यथाविधि पालन करणें, हेंहि अनादि तप आहे, असें आम्हीं ऐकलें आहे. आमच्या पितामहांनींहि तेंच आचरिलें आहे. क्षत्रियाला विहित धर्म्य युद्धानें, विजयानें किंवा संग्रामांत संमुख मरणानें जसे उत्तम लोक प्राप्त होतात तसे ते तपानें प्राप्त होत नाहींत. धर्मराजा, तुझी ही व्यथा पाहून सर्व सज्जन लोक 'सूर्यापासून त्याची कांतिहि वियुक्त होईल व चंद्राला त्याची स्वाभाविक शोभाहि सोडील' असें मानूं लागले आहेत !

हे राजन्, कुरुदेशांतून व इतर प्रदेशांतून आलेले ब्राह्मण सभेमध्यें बसून वारंवार तुझी प्रशंसा करितात व शत्रूची निंदा करितात. तुझी सत्यप्रतिज्ञा पाहून ते अतिशय संतुष्ट होतात. कुरुदेशांतील सर्व प्रजा विशेषें करून तुझ्या गुणांचें सतत वर्णन करितात. कारण तूं मोहानें, दैन्यानें, लोभानें, कामामुळें किंवा वित्तासाठींहि कधीं अनृत भाषण केलेलें नाहींस, हें त्या सर्व श्रेष्ठांना विदित आहे. परंतु हे नृपते, भूमीची प्राप्ति होण्यासाठीं राजा जें कांहीं पाप करितो, तें सर्व पाप त्याला राज्य मिळाल्यावर त्यानें केलेल्या विपुल दक्षिणायुक्त यज्ञांनीं निवृत्त होतें.

चंद्रमा राहुमुखांतून जसा मुक्त होतो, त्याप्रमाणें ब्राह्मणांना हजारों गायी व ग्राम देणारा राजा सर्व पापांपासून मुक्त होतो. हे कुरुनंदना, सर्व नगरवासी व देशवासी आबालवृद्ध जन तुझी स्तुतिच करितात. खरोखर, कुत्र्याच्या कात-

ड्याच्या पिशवींत ठेवलेलें दूध, शूद्राला शिकविलेला वेद, चोराला केलेला सत्याचा उपदेश व स्त्रीचें बल हीं जशीं व्यर्थ, त्याप्रमाणें दुर्योधनाचें राज्य व्यर्थ आहे. खरोखर तो दुर्जन राज्याला पात्र नाहीं, असें सर्व लोक म्हणतात. यास्तव त्याला कुरु, शांतनु, यांसारख्या भूपालांनीं भूषित केलेल्या कुरुराज्यापासून दूर करणेंच उचित आहे. युधिष्ठिरा, आबाल-वृद्ध पौर-जानपदांचेंच हें मत आहे, असें नाहीं. तर कुरुजांगल देशांतील स्त्रियाहि नित्य वेदवाक्याप्रमाणें हाच मंत्र नेहमीं म्हणतात.

हे शत्रुमर्दना, तूं आम्हांसह या अवस्थेस प्राप्त झाला आहेस. हर हर, त्यामुळें आम्ही सर्व जिवंत असून नसल्यासारखे झालों आहों. हे महाराज, तुझ्यामुळें आम्हांला हा राजभ्रंश सहन करावा लागत आहे. यास्तव तूं आतां सर्व उपकरणांनीं युक्त असलेल्या रथावर बसून, जयानें मिळविलेलें धन ब्राह्मणांना देण्यासाठीं, मोठ्या त्वरेनें शत्रूवर चाल करून जा. आजच ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करवून अस्त्रज्ञ व दृढधनुर्धर भ्रात्यांसह हस्तिनापुरास चल आणि वृत्राचा वध करणारा इंद्र जसें असुरांचें मर्दन करितो, तसा तूं शत्रूंचा नाश कर.

इंद्र उग्रवेष धारण करणाऱ्या नागांप्रमाणें वीर्यवान् असलेल्या देवांच्या साह्यानें जसा आपल्या शत्रूंचा विध्वंस करितो, त्याप्रमाणें तूं आम्हां भ्रात्यांच्या साह्यानें दुर्योधनादिकांचा संग्रामांत वध कर आणि त्यांच्यापासून आपली राज्यलक्ष्मी परत मिळीव.

हे वीरा, ज्यांना गृध्रपक्ष्यांचीं पिसें लाविलीं आहेत व ज्यांचा स्पर्श विषारी सर्पासारखा दुःसह आहे, अशा गांडीव धनुष्यापासून सुटलेल्या शरांचा वेग एकहि मर्त्य सहन करूं शकणार नाहीं आणि संग्रामांत क्रुद्ध झालेल्या माझ्या गदेचा वेग सहन करील, असा एकहि वीर, हत्ती किंवा अश्व या लोकीं निपजलेला नाहीं, हें तूं सत्य सत्य जाण. सृंजय, कैकेय व वृष्णिश्रेष्ठ वासुदेव यांचें साह्य असल्यावर आम्हांला आमचें राज्य परत मिळणार नाहीं, असें कधींच घडणार नाहीं. हे वीरा, तूं उत्साह धरून महद्बलानें युक्त झाल्यास शत्रूंच्या हातीं गेलेली आपली भूमि परत मिळविणार नाहींस, असें कधीं तरी होईल का ! छे ! ही गोष्ट त्रिकालींहि शक्य नाहीं." ३. ३. ३३.

---

१ श्वदृतौ क्षीरमासक्तं ब्रह्म वा वृषले यथा । सत्यं स्तेने बलं नार्यां राज्यं दुर्योधने तथा ।

## अध्याय ३४ वा.

[ १ युधिष्ठिराचें भीमास खेदयुक्त उत्तर. ]

(१) वैशंपायन—राजा जनमेजया, क्रुद्ध भीमसेनानें सत्यव्रत अजातशत्रु युधिष्ठिराला अनेक प्रकारें दोष देऊन आतांच युद्ध आरंभण्याविषयीं असें प्रोत्साहन दिलें असतां तो उदारात्मा युधिष्ठिर मोठ्या धैर्यानें त्यास म्हणाला—"हे भारता, तूं मला आपल्या वाक्शल्यानें असा वारंवार कां टोंचीत आहेस हें मी जाणतों. तूं जें म्हणतोस तें अगदीं सत्य आहे, यांत कांहीं संशय नाहीं. पण तूं असें प्रतिकूल भाषण करितोस म्हणून मी तुझी निंदा करीत नाहीं, कारण माझ्याच अपराधामुळें तुम्हांवर हें मोठें संकट ओढवलें आहे! मीं धृतराष्ट्रपुत्रापासून सर्व राष्ट्रासह त्याचें राज्य हरण करण्याच्या इच्छेनें हातांत फांसे घेतले, पण दुर्योधनासाठीं शठ द्यूतकार सुबलपुत्र शकुनि माझ्याशीं खेळूं लागला. त्या महामायावी पर्वतेश्वरानें सभेमध्यें फांसे टाकले व कपटद्यूत न जाणणाऱ्या मला मायेनें जिंकलें. त्यामुळें हे भीमसेना, मजवर हें दुःखद संकट ओढवलें.

फांसे शकुनीला अनुकूल व मला प्रतिकूल पडत आहेत हें पाहून मीं द्यूतापासून निवृत्त व्हावयास पाहिजे होतें. पण क्रोधवश झाल्यामुळें मला आपलें मन त्या कपटद्यूतापासून परतविण्याची बुद्धि झाली नाहीं! खरोखर, क्रोध पुरुषाच्या धैर्याचा नाश करीत असतो. बा वृकोदरा, यत्न, मान व वीर्य यांनीं युक्त असलेला पुरुषहि आपल्या मनाचें नियमन करूं शकत नाहीं.

वत्सा, मी तुझ्या या कटुभाषणामध्यें दोषदृष्टि ठेवीत नाहीं. कारण भवितव्यताच तशी होती. तिचें निवारण कोण करणार? तो धृतराष्ट्राचा पुत्र आमच्या राज्याच्या लोभानें कपटद्यूत करावयास प्रवृत्त झाला व त्यानें आम्हांला या संकटांत पाडलें; इतकेंच नव्हे, तर आमच्या पदरीं दास्यहि बांधिलें. पण हे वीरा, या द्रौपदीनें आम्हांला त्यांतून सोडविलें. हा वृत्तान्त तुला व धनंजयालाहि ठाऊक आहे. त्यानंतर धृतराष्ट्राच्या आज्ञेनें पुनः द्यूतासाठीं सभेंत आलेल्या आम्हांला धृतराष्ट्राचा पुत्र सर्व भरतकुलोत्पन्नांसमक्ष एकाच पणासाठीं जें बोलला तेंहि तुम्हांला विदित आहे.

"हे राजपुत्रा, तूं या द्यूतांत पराजित झाल्यास वनामध्यें बारा वर्षें उघड उघड वाटेल तेथें रहावेंस, व पुढें एक वर्ष सर्व भ्रात्यांसह कोठें तरी गुप्त रीतीनें वास करावास. पण याप्रमाणें अज्ञातवासांत असतांना जर तुला भारतांच्या हेरांनीं ओळखिलें तर तूं पुनः बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञात-

वास भोगावास, असा एकच पण आम्ही लावतों. याचा तूं निश्चय कर व प्रतिज्ञापूर्वक द्यूताला तयार हो. पण हे राजा, माझ्या हेरांना मोहित करून तूं एक वर्षभर जर गुप्त राहिलास, तर वितस्तादि पांच नद्यांनीं युक्त असलेला हा सर्व देश तुझाच आहे. याच्या उलट तूं जर आम्हांला द्यूतांत जिंकलेंस तर आम्ही सर्वहि शंभर भ्राते हाच नियम पाळूं." असा पण त्या दुष्टांनीं लाविला.

तेव्हां मीं 'ठीक आहे' असें म्हटलें व त्या हीन द्यूतांत प्रवृत्त झालों. त्यांत आमचा पराभव होऊन आम्ही राज्यभ्रष्ट झालों व हा कष्टकर वनवास स्वीकारला. सुयोधनहि शांतीची इच्छा न करितां क्रोधवश झाला व त्यानें त्याच्या अधीन असलेल्या सर्व इष्ट कुरूंना दुर्ग, देश इत्यादिकांचें पालन करण्याच्या कार्यांत नियुक्त केलें.

हे भ्रात्या, त्या वेळीं सज्जनांच्या समक्ष अशी प्रतिज्ञा केल्यावर केवळ राज्यासाठीं तिचा भंग कोण करील! धर्माचें उलंघन करून पृथ्वीचें राज्य मिळविण्यापेक्षां माझ्यासारखा पुरुष मरणहि श्रेयस्कर मानील. द्यूत चाललें असतां शत्रूंना दग्ध करण्यासाठीं तूं परिघाला हात घातलास; पण त्या वेळीं अर्जुनानें तुझें निवारण केलें. तेव्हांच जर तूं हें वीरकर्म केलें असतेंस व मीं प्रतिज्ञा करण्यापूर्वींच असा संतापला असतास, तर त्यांत कांहींच अनिष्ट झालें नसतें.

तूं जर आपलें सामर्थ्य जाणत होतास, तर मी प्रतिज्ञा करण्यापूर्वींच कां बोलला नाहींस! आतां तो काळ निघून गेल्यावर व या माझ्या विपत्तीचा स्वीकार केल्यावर मला असें कां बोलतोस! हे भीमसेना, ते दुष्ट कौरव याज्ञसेनीला क्लेश देत आहेत, असें पाहूनहि आपण त्यांना क्षमा केली, याविषयीं मला वारंवार दुःख होत आहे. विषाचा रस प्याल्यावर शरीराचा जसा दाह होतो त्याप्रमाणें माझ्या मनाचा व शरीराचा दाह होत आहे. पण आतां काय करूं?

हे भारतप्रवीरा, कुरुवीरांच्या सभेमध्यें मी जें बोललों तें आतां अन्यथा करतां येणें शक्य नाहीं. यास्तव हे वीरा, कृषीवल फळें पक्क होण्याची जशी वाट पाहतो तशी तूं आपल्या सुखोदयाच्या कालाची प्रतीक्षा कर. जो वीर पुरुष पूर्वीं शत्रूकडून फसविला गेला असतां, दीर्घकालानें आपला शत्रुसमूह अतिशय पुष्ट झाला आहे; असें जाणूनहि आपल्या पराक्रमानें त्याचा उच्छेद करितो त्याचाच या लोकीं मोठा उत्कर्ष होतो. त्याला समग्र ऐश्वर्य प्राप्त होतें,

त्याचें यश त्रिभुवनांत पसरतें, त्याचे शत्रु नम्र होतात, मित्र लवकरच त्याचे भक्त बनतात व इंद्राच्या सामर्थ्यावर उपजीविका करणाऱ्या देवांप्रमाणें त्याचे आप्त त्या पुरुषाच्या ऐश्वर्यावर आपली उपजीविका करितात. हे वृकोदरा, माझी ही सत्यप्रतिज्ञा तूं पुनः एकदा ऐकून ठेव. मी स्वर्गांतील देवत्व व या लोकींचें जीवित यांचा त्याग करून केवल सत्य-धर्माचाच आश्रय करणार ! कारण राज्य, पुत्र, धन व यश हें सर्व सत्याच्या सोळाव्या कलेचीहि बरोबरी करूं शकत नाहीं." ३. ३. ३४.

---

## अध्याय ३५ वा.

[ १ भीमानें युधिष्ठिरास पुनः केलेला युद्धोपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा पारिक्षिता, युधिष्ठिराचें हें निश्चित भाषण ऐकून हताश झालेला भीमसेन मोठ्या खेदानें त्यास म्हणाला—"हे युधिष्ठिरा, तूं सर्वांचा नाश करणाऱ्या व बाणाप्रमाणें शीघ्रगामी असलेल्या कालावर विश्वास ठेवून व अनंत, अप्रमेय आणि सर्वांचें क्रमानें हरण करणाऱ्या त्याच्याशीं संधि करून हें सर्व बोलत आहेस ! भविष्यत्काळ जणु काय तुला प्रत्यक्षच ज्ञात झाला आहे, असें तूं समजतोस; परंतु बाबारे, मर्त्य सर्वथा कालवश झालेला आहे. तो फेनाप्रमाणें निःसार व फलाप्रमाणें पतनशील आहे. तेव्हां ज्याचें आयुष्य एकेका निमेषानेंहि क्षीण होत असतें, त्यानें कालाची प्रतीक्षा कां बरें करावी ? जो दीर्घायु व सर्व प्रमाणांना जाणणारा असेल व ज्यानें तिन्ही कालांना प्रत्यक्ष पाहिलें असेल त्यानेंच कालाची प्रतीक्षा करावी.

हे महाराज, आम्हांकडून प्रतीक्षा केला गेलेला काल आमच्या आयुष्याचीं तेरा वर्षें क्षीण करून आम्हांला मरणाच्या संनिध नेईल ! प्राण्यांचें मरण सतत त्यांच्या शरीराचा आश्रय करून राहिलेलें असतें. यास्तव आपण मरण येण्यापूर्वींच राज्य परत मिळविण्याचा यत्न करूं या. वैराची फेड करून, शत्रूंचा सूड उगवून जो उत्तम कीर्ति संपादन करीत नाहीं व शौर्यादिकांच्या अभावीं जगांत प्रसिद्धि पावत नाहीं, तो एखाद्या निष्फल वृषभाप्रमाणें भूमीला भारभूत होतो. ज्याचें सामर्थ्य व उद्यम हीन आहे असा पुरुष वैराची फेड करीत नाहीं म्हणून त्याचा जन्म निष्फल आहे, असें मी समजतों. अशा कुजन्मन्यानाचें मरणच श्रेयस्कर आहे.

हे पृथापुत्रा, तुझे दोन्ही बाहु सुवर्णाचे स्वामी आहेत. पृथुराजाच्या कीर्ती-सारखी तुझी कीर्ति सर्व जगभर पसरली आहे. यास्तव तूं संग्रामांत शत्रूंना मारून बाहुबलानें संपादन केलेलें ऐश्वर्य भोग. हे शत्रुनाशका, वंचक शत्रूला मारून एखादा पुरुष तत्काल मोठ्या आपत्तींत जरी पडला तरी त्याला ती आपत्तिहि स्वर्गाप्रमाणें सुखावह होते. राजा, क्रोधापासून उत्पन्न झालेला संताप दीप्त अग्नीच्या तापाहूनहि अतिशय दुःसह असतो. मला अमर्षजन्य संताप एक सारखा जाळीत आहे. त्यामुळें मला रात्रीं व दिवसाहि झोंप लागत नाहीं. गांडीवधनुष्याची प्रत्यंचा ओढण्यांत वरिष्ठ असलेला हा माझा कनिष्ठ भ्राता बीभत्सु पिंजऱ्यांत कोंडलेल्या सिंहाप्रमाणें अत्यंत संतप्त होऊन राहिला आहे. जो पृथेचा कनिष्ठ पुत्र, एकटाच भूलोकांतील सर्व धनुर्धरांचा नाश करण्याचें सामर्थ्य धारण करितो तो एखाद्या गजेंद्राप्रमाणें आपला मनःसंताप मोठ्या कष्टानें सहन करीत आहे. नकुल, सहदेव, व वीरांना जन्म देणारी आमची वृद्ध माता तुझेंच प्रिय करण्याच्या इच्छेनें एखाद्या जडाप्रमाणें किंवा मुक्याप्रमाणें स्तब्ध बसली आहेत.

राजा, सृंजयांसह सर्व बांधव तुझें प्रिय करण्याच्या इच्छेनें कांहीं बोलत नाहींत. एकटा मी व ही प्रतिविंध्याची दीन माता, अशीं दोघें मात्र तुझी ही आपत्ति पाहून संतप्त होत आहों. पण मी जें कांहीं सांगत आहें तें सर्वां-नाच प्रिय आहे व त्यांतच सर्वांचें हित आहे. आम्ही सर्वच या संकटांत सांप-डलों आहों व युद्धाचें अभिनंदन करणारे आहों. हे राजन्, नीच व हीनबल कौरव आमचें राज्य हिरावून घेऊन त्याचा यथेष्ट उपभोग घेत आहेत, यापेक्षां अधिक कष्टावह आपत्ति दुसरी कोणतीच नाहीं! युधिष्ठिरा, तूं स्वभावदोषा-मुळें 'मी सत्य कसें टाकूं?' असें म्हणून लज्जेनें अधोमुख होतोस व दयालुत्वा-मुळें क्लेश सहन करितोस. पण या तुझ्या कृतीची प्रशंसा दुसरा कोणीहि करीत नाहीं.

अरे पांडुपुत्रा, गुरूनें सांगितलेलीं अक्षरें घोकणाऱ्या अतिमंद व अविवेकी श्रोत्रियाप्रमाणें तुझी ही बुद्धि अर्थज्ञानशून्य वेदाक्षरमात्रग्रहणानें मंद झाली आहे. ती धर्मग्रंथांचा तत्त्वार्थ जाणत नाहीं. तूं क्षत्रियकुलामध्यें असा दया-शील ब्राह्मणरूप कसा निपजलास! या क्षत्रयोनीमध्यें प्रायः क्रूरबुद्धि पुरुषच निपजतात. तूं मनूनें सांगितलेले राजधर्म ऐकले आहेस. असें असतांना क्रूर, कपटी, शमरहित व दुर्बुद्धि धृतराष्ट्रपुत्रांना क्षमा कां करितोस! क्षात्र कर्तव्य

प्राप्त झालें असतां असा अजगरासारखा स्वस्थ कसा बसला आहेस ! हे पांडवा, तूं बुद्धि, वीर्य, विद्या व श्रेष्ठ कुल यांनीं युक्त असून, मूठभर तृणानें हिमालय-पर्वताला आच्छादित करण्याची इच्छा जशी करावी, तशी आम्हांला एक वर्षभर अज्ञातवासामध्यें ठेवण्याची इच्छा कशी करितोस !

हे पार्था, सूर्याला अंतरिक्षांतून गुप्तपणें संचार करणें जसें शक्य नाहीं, त्या-प्रमाणें लोकप्रसिद्ध असलेल्या तुला पृथ्वीवर गुप्तपणें रहातां येणें शक्य नाहीं. जलप्रचुर प्रदेशांतील शाखा, पल्लव व वृक्ष यांनीं युक्त असलेल्या विशाल साल-वृक्षाप्रमाणें किंवा शुभ्रवर्ण दिग्गजाप्रमाणें असलेला हा जिष्णु एक वर्ष अज्ञात-वासांत कसा राहूं शकेल ! सिंहाप्रमाणें दिसणारे हे आमचे कनिष्ठ भ्राते नकुल–सहदेव गुप्त कसे राहूं शकतील ! या माद्रीपुत्रांना भूलोकांतील कोणीहि मनुष्य सहज ओळखील ! तशीच ही पुण्यकीर्ति वीरमाता राजपुत्री द्रौपदी सर्व पृथ्वीभर प्रख्यात आहे. ती तीनशें साठ दिवस अज्ञानवासांत कशी राहूं शकेल ! मलाहि ही सर्व आबालवृद्ध प्रजा चांगलीच ओळखते. त्यामुळें मेरूला झांकून ठेवणें जसें अशक्य तशीच माझी अज्ञातचर्याहि मला अशक्य दिसते.

आम्हीं अनेक राजे व राजपुत्र यांना पदच्युत करून त्यांच्या राष्ट्रांतून बाहेर घाल-विलें आहे. ते आतां आमचे शत्रु बनून धृतराष्ट्राला अनुकूल झाले आहेत. त्यामुळें तोडलेल्या वेताप्रमाणें तेहि शांत रहाणार नाहींत. दुर्योधनाचें प्रिय करण्याच्या इच्छेनें ते आमचें अप्रिय करण्यास तयार होतील व आमचा शोध लावण्यासाठीं आपले गुप्त हेर सर्वत्र पाठवितील आणि त्यांना आमचा शोध लागला म्हणजे दुर्योधनाला निवेदन करतील. त्यामुळें आम्हांवर पुनः फार मोठें संकट ओढवेल !

यास्तव हे राजा, मी तुला पुनः पुनः सांगतों कीं, आतां आम्हीं तेरा महिने चांगल्या प्रकारें वनवास भोगला आहे. त्या मासपरिमाणानें आम्हीं तेवढीं वर्षेंच वनवास भोगला आहे, असें समज. मास हा संवत्सराचा प्रतिनिधि आहे. कारण ‘ यो मासः स संवत्सरः ’ अशी श्रुति आहे. त्याचप्रमाणें पूतिकावल्ली सोमवल्लीचा प्रतिनिधि आहे. कारण ‘ सोमाभावे पूतिकानभिषुणुयात् ’ अशी श्रुति आहे. यांत सोमाच्या अभावीं पूतिकांचा रस काढावा, असें सांगितलें आहे. हें मत विद्वानांनाहि मान्य आहे.

किंवा हे राजा, एका पुष्ट व धुरंधर वृषभाला पोटभर गवत खावयास घातलें म्हणजे आपण या असत्य दोषापासून मुक्त होऊं. कारण धर्मशास्त्रांत

'अनडुहे पूर्णं घासमुपाहृत्यानृतान्मुच्यते' असें प्रायश्चित्त सांगितलें आहे. तृप्ति होईपर्यंत भोजन दिल्यानेंहि मिथ्या वादामुळें लागलेल्या पापाची निवृत्ति होते. यास्तव हे राजा, तूं शत्रुवधाचा निश्चय कर. कोणत्याहि क्षत्रियाला युद्धावांचून अन्य धर्म विहित नाहीं. ३. ३. ३५.

---

## अध्याय ३६ वा.

[ १ युधिष्ठिराचा मनस्ताप. २ व्यासाचें आगमन व ३ उपदेशपूर्वक प्रतिस्मृति-विद्याप्रदान. ]

( १ ) वैशंपायन—हे पांडवेया, भीमसेनाचें हें वचन ऐकून कुंतीपुत्र युधिष्ठिरानें एक दीर्घ निःश्वास सोडला व तो शत्रुतापन पुरुषव्याघ्र मनांतल्या मनांत असा विचार करूं लागला. 'मीं राजधर्म ऐकले आहेत व वर्णधर्मांचाहि पूर्ण निश्चय केला आहे. त्यावरून मला असें वाटतें कीं, जो वर्तमान कालाचा व उत्तर कालाचाहि चांगला विचार करितो, तोच पंडित होय. एखाद्यानें मेरूच्या उच्छेदास जसें अविचारानें तयार व्हावें, त्याप्रमाणें श्रेष्ठ धर्मांची अति दुर्ज्ञेय गति जाणत असतांना मी केवल बलाचा आश्रय करून युद्धास कसा बरें तयार होऊं ?'

राजा, याप्रमाणें क्षणभर विचार करून व आपल्या कर्तव्याचा निश्चय करून युधिष्ठिर तत्काल भीमसेनास म्हणाला—"हे भारता, तूं म्हणतोस तें खरें आहे. पण हे वाक्यविशारदा, मी आणखीं कांहीं सांगतों तें ऐक. एखादा पुरुष पूर्वापर विचार न करितां जीं घोर कर्में आरंभितो, तीं त्याला परिणामीं क्लेश देतात. पूर्ण विचार करून उत्साहपूर्वक पुण्यकर्म आरंभिलें असतां अर्थसिद्धि होते. आपण जें कार्य करीत आहों तें निर्दोष आहे, असा निश्चय करूनच कोणत्याहि कार्याला आरंभ करावा. म्हणजे दैव अनुकूल असल्यास सिद्धि मिळते.

भीमा, तूं शरीरसामर्थ्य व गर्व यांचा आश्रय करून केवल चापल्यानें 'आतांच युद्धाला आरंभ करावा' असें म्हणतोस. पण बाबारे, त्याविषयीं माझें काय म्हणणें आहे तें ऐक. भूरिश्रवा, शल, जलसंध, भीष्म, द्रोण, कर्ण, अश्वत्थामा, दुर्योधनादि धृतराष्ट्रपुत्र हे सर्वहि कृतास्त्र असून दुर्धर्ष व आततायी आहेत. आम्हीं ज्यांना पीडा दिली आहे, ते सर्व राजे कौरवपक्षाला अनुकूल

झाले आहेत. त्यांचा परस्परांवर स्नेह जडला असून ते दुर्योधनाच्या हितामध्यें रत आहेत. अर्थात् ते आतां आम्हांला अनुकूल होणें शक्य नाहीं.

ते सर्वहि पूर्ण कोश व सैन्य यांनीं युक्त असून संग्रामांत विजय मिळविण्यासाठीं दीर्घ प्रयत्न करतील. पुत्र, अमात्य व सैनिक यांसह ते सर्व कौरव-सैन्याच्या अंशास पात्र झाले असून म्ह० ते कौरवांच्या सैन्याचे घटक बनले असून त्यांच्या सर्व भोगांचेहि भागीदार झाले आहेत. दुर्योधनानेंहि त्यांचा विशेष सन्मान केला आहे. त्यामुळें त्याच्यासाठीं ते सर्व वीर संग्रामामध्यें प्राणत्यागहि करतील, असें मला वाटतें.

भीष्म, द्रोण व महात्मा कृप यांची कौरव व आम्ही पांडव यांच्या ठिकाणीं जरी समवृत्ति असली तरी त्यांना राजाच्या खाल्लेल्या अन्नाचें उतरायी होणें अवश्य आहे. त्यामुळें तेहि संग्रामामध्यें दुर्योधनासाठीं आपले दुर्लभ प्राणहि सोडतील. ते दिव्यास्त्रें जाणणारे धर्मपरायण व इंद्रासह सर्व देवांना अजेय आहेत, अशी माझी निश्चित मति आहे.

त्यांतल्या त्यांत महारथ कर्ण असहनशील व सतत क्षुब्ध होणारा आहे. तो सर्व अस्त्रें जाणतो व अभेद्य कवचानें युक्त आहे. त्यामुळें तोहि अजिंक्य आहे. या सर्व पुरुषश्रेष्ठांना रणामध्यें जिंकल्यावांचून असहाय असलेल्या तुला दुर्योधनाला मारतां येणार नाहीं. वृकोदरा, तुला काय सांगूं ? सर्व धनुर्धरांहून सूतपुत्राचें हस्तचापल्य विशेष आहे. त्याचें चिंतन करीत असतांना मला रात्रींच्या रात्रीं झोंप येत नाहीं.

(२) वैशंपायन—राजा जनमेजया, युधिष्ठिराचें हें वचन ऐकून अति क्रोधी भीमसेन खिन्न व संतप्त झाला व युधिष्ठिराला पुनः कांहीं बोलला नाहीं. पण ते दोघे पांडुपुत्र आपसांत असें बोलत असतांना महायोगी सत्यवतीपुत्र व्यास तेथें आला.

आपला पितामह व्यास समीप आला आहे, असें पाहून पांडवांनीं त्याची यथाविधि पूजा केली. तेव्हां तो वक्त्यांतील श्रेष्ठ मुनि युधिष्ठिरास म्हणाला—
"हे महाबाहो, या वेळीं तुझ्या मनांत कोणती मोठी चिंता उत्पन्न झाली आहे, तें मीं अतींद्रिय ज्ञानानें जाणलें व येथें सत्वर आलों. भीष्म, द्रोण, कृप, कर्ण, अश्वत्थामा, राजपुत्र दुर्योधन व त्याचे दुःशासनादि भ्राते, यांचें जें

भय तुला वाटत आहे व तूं आपल्या मनांत ज्याचें सतत चिंतन करीत आहेस तें तुझें भय शास्त्रविहित कर्मानें मी नाहींसें करितों. मीं सांगत असलेला उपाय लक्षपूर्वक ऐकून घे, धैर्य धर, तो आचरणांत आण व हे राजेंद्रा, त्याच उपायानें तूं आपला मनःसंताप दूर कर.

राजा जनमेजया, त्यानंतर द्वैपायन व्यास युधिष्ठिराला एकान्तांत घेऊन गेला व त्यास असें सर्वथा युक्त वचन बोलला—“ हे शत्रुनाशका, तुझ्या परम उत्कर्षाचा काल प्राप्त झाला आहे. धनुर्धर पार्थ रणांत सर्व शत्रूंचा उच्छेद करील. मी आतां शरण आलेल्या तुला मूर्तिमान् सिद्धीप्रमाणें असलेली ही प्रतिस्मृति-नांवाची विद्या देतों, तिचें ग्रहण कर. या विद्येला प्राप्त होऊन महाबाहु अर्जुन दिव्य अस्त्रें संपादन करील.

हे पांडवा, अर्जुनाला अस्त्रांसाठीं महेंद्र, रुद्र, वरुण, कुबेर व धर्मराज यम यांच्याकडे जाऊं दे. तपःसामर्थ्य व पराक्रम यांच्या योगानें तो देवांना पाहण्यास समर्थ होईल. हा महातेजस्वी जिष्णु नारायणाचा सखा पुराण ऋषि आहे. तो शाश्वत देव अजिंक्य व आपल्या स्वभावापासून कदापि च्युत न होणारा आहे. तो महाबाहु पांडव इंद्र, रुद्र व इतर लोकपाल यांपासून अस्त्रांचें ग्रहण करून महत्कार्य करील.

कौंतेया, तूं आतां हें वन सोडून दुसऱ्या वनांत जाऊन रहा. तुम्हांला यापेक्षां तें दुसरें वनच अधिक सुखावह होईल. दीर्घकाल एकाच स्थानीं वास केल्यास तें स्थल रुचेनासें होतें व या सर्व तापासांनाहि या एकाच स्थानाचा आतां उद्वेग आला असेल. तुम्हीं या वनांतील बहुतेक मृगांचा वध केला आहे. येथील औषधि व वनस्पति यांचा क्षय झाला आहे. कारण हे राजा, तूं असंख्य वेद-वेदांगपारग ब्राह्मणांचें पोषण करीत आहेस, यास्तव मी तुला स्थानांतर करण्याचा उपदेश करितों. ”

जनमेजया, इतकें बोलून त्या सर्वज्ञ महर्षीनें पवित्र होऊन शरण आलेल्या युधिष्ठिरास ती ‘प्रतिस्मृति’-नामक सर्वोत्कृष्ट विद्या उपदेशिली आणि तत्काल तो लोकतत्त्वज्ञयोगी त्याची अनुज्ञा घेऊन तेथेंच अंतर्धान पावला. तेव्हां धर्मात्मा युधिष्ठिरहि मनानें त्या मंत्राचें धारण करून वारंवार त्याचीच आवृत्ति करूं लागला. कांहीं कालानें व्यासाच्या स्थानान्तरोपदेशानें संतुष्ट झालेला तो पांडव सरस्वतीतीरावरील काम्यकवनास जावयास निघाला.

हे महाराज, ऋषि जसे देवेंद्रास अनुसरतात त्याप्रमाणें वेदशास्त्राध्ययनानें संपन्न व तपानें युक्त असलेले ब्राह्मणहि पांडवांच्या मागोमाग त्या वनांकडे निघाले. महात्मे पांडव अनुयायी विप्रांसह पुनः त्या काम्यक वनास प्राप्त झाले व अमात्य आणि परिवार यांसह तेथेंच राहूं लागले. धनुर्वेदामध्यें विशारद असलेले ते मानी वीर उत्तम वेदाध्ययन श्रवण करीत कांहीं काल तेथें स्वस्थ राहिले. मृगांची इच्छा करणारे ते शुद्ध बाणांनीं नित्य मृगया करीत व मृगयेनें संपादन केलेल्या मृगमांसानें देव, पितर व ब्राह्मण यांस तृप्त करीत. १. ३.३६.

---

## अध्याय ३७ वा.

[ १ धर्मापासून पार्थाला प्रतिस्मृतिविद्येची प्राप्ति. २ तपश्चर्येसाठीं अर्जुनाचें प्रयाण. ३ त्या प्रसंगीं द्रौपदीनें केलेलें अभीष्टचिंतन. ४ इंद्रकीलपर्वतावर ब्राह्मणरूपी इंद्र व पार्थ यांचा संवाद. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें काम्यक वनांत कांहीं काल घालविल्यावर मुनीचा संदेश आठवून नरश्रेष्ठ युधिष्ठिरानें अर्जुनाला एकांत प्रदेशीं नेलें व सान्त्ववचनपूर्वक त्याच्या अंगावरून हात फिरविला आणि प्रस्तुत वनवासाचा क्षणभर विचार करून त्यास म्हटलें—

" हे वीरा, भीष्म, द्रोण, कृप, कर्ण व अश्वत्थामा, यांच्या ठिकाणीं या वेळीं चतुष्पाद धनुर्वेद सुप्रतिष्ठित आहे. ते पांची शत्रुपक्षीय वीर दैव, ब्राह्म व धनुर्बाणादि मानुष अस्त्र जाणतात. त्यांचें ग्रहण, धारण व प्रयोग त्यांस चांगले अवगत आहेत.

शत्रूंनीं योजिलेल्या तिन्ही प्रकारच्या अस्त्रांचा प्रतिकार कसा करावा, हेंहि त्यांना माहित आहे. हे पांची वीर सर्व अस्त्रांचा प्रयोग पूर्णपणें जाणतात. धृतराष्ट्राच्या पुत्रानें त्या सर्वांना अनुकूल करून घेतलें आहे. सर्व उपभोग्य पदार्थ मुक्त हस्तानें देऊन त्या दुष्टानें त्यांना प्रसन्न करून घेतलें आहे. तो कपटी दुर्योधन त्यांच्याशीं पूज्य गुरुप्रमाणें वर्तन करितो. इतर सर्व योद्ध्यांवरहि तो अतिशय प्रीति करितो.

दान व मान यांच्या योगानें संतुष्ट झालेले त्याचे पुरोहित दोषपरिहाराचा सतत प्रयत्न करीत असतात. योग्य कालीं सत्कार केले गेलेले तेहि त्याचें सामर्थ्य उद्दीपित केल्यावांचून रहाणार नाहींत.

पार्था, आज ग्राम, नगरें, सागर, वनें व खाणी यांसह सर्व पृथ्वी दुर्योधनाच्या अधीन आहे. अर्जुना, आम्हांला तूंच प्रिय आहेस व शत्रूंना जिंकण्याचा सर्व भार तुजवर येऊन पडला आहे. या वेळीं हेंच एक प्राप्तकाल कर्तव्य मी समजतों. वत्सा, कृष्णद्वैपायनापासून मीं एका रहस्य विद्येचें ग्रहण केलें आहे. तिचा अभ्यास केल्यानें सर्व जगत् चांगल्याप्रकारें प्रकाश पावतें.

हे वीरा, तूं शांतचित्त व जितेंद्रिय होऊन त्या व्यासोक्त मंत्राच्या बलानें योग्य कालीं देवतांचा प्रसाद संपादन कर. तूं धनुष्मान्, कवची, खड्गी व साधुव्रतामध्यें स्थित असा मुनि होऊन उग्र तपश्चर्या कर. कोणालाहि मार्ग न देतां तूं आतां उत्तर दिशेकडे जा.

इंद्रापाशीं सर्व दिव्य अस्त्रें आहेत. कारण वृत्रासुराला भ्यालेल्या देवांनीं त्याच्या वधप्रसंगीं आपलें सर्वास्त्ररूप बल इंद्राला अर्पिलें. त्यामुळें तीं सर्व अस्त्रें एका इंद्रापाशींच आहेत. तुझ्या उग्र तपश्चर्येनें प्रसन्न झालेल्या देवेंद्रापासून तुला तीं प्राप्त होतील. यास्तव तूं शक्रालाच शरण जा. तो तुझा जनक पिता तुला सर्व दिव्य अस्त्रें देईल. कृष्णद्वैपायनाच्या आज्ञेनें मीं आतांच सांगितल्याप्रमाणें उग्र तपश्चर्येची दीक्षा घेऊन तूं आजच पुरंदर-देवाच्या दर्शनास जा.

(१) राजा पारिक्षिता, इतकें बोलून प्रभु धर्मराजानें यथाविधि दीक्षा घेतलेल्या आणि शरीर, वाक् व मन यांचें नियमन केलेल्या अर्जुनाला ती व्यासोक्त विद्या शिकविली व त्या ज्येष्ठ भ्रात्यानें कनिष्ठ भ्रात्याला जाण्याची आज्ञा दिली. तेव्हां धर्मराजाच्या आज्ञेनें इंद्रदर्शनाची इच्छा करणाऱ्या पार्थानें कवच चढविलें. गांडीव धनुष्य धारण केलें. अक्षय भाते पाठीवर बांधले. तलत्राण व गोधांगुलित्राण यथास्थानीं चढवून अग्नीचें हवन केलें. ब्राह्मणांना सुवर्ण दक्षिणा देऊन त्यांच्याकडून स्वस्तिवाचन करविलें व तो महाबाहु पार्थ धनुष्य धारण करून, दीर्घ निःश्वास सोडून आणि अंतरिक्षाकडे पाहून धृतराष्ट्रपुत्रांच्या वधासाठीं काम्यक वनांतून निघाला. तेव्हां उग्र गांडीव धनुष्य धारण करणाऱ्या कुंतीपुत्राला पाहून सिद्ध, ब्राह्मण व अंतरिक्षांत गुप्त असलेलीं भूतें "हे कौंतेया, तुझे सर्व मनोरथ सत्वर पूर्ण होवोत" असें बोललीं.

त्या कृष्णसख्याला जयाशीर्वाद देऊन ब्राह्मण म्हणाले—"हे धनंजया, तुला सत्वर सिद्धि प्राप्त होईल. तुझा निश्चयानें विजय होईल."

(३) हे पृथ्वीपते, सर्व लोकांचीं मनें आकर्षण करून तशा उग्र वेषानें काम्यक वनांतून निघालेल्या त्या अलौकिक वीराला कृष्णा म्हणाली—" हे महाबाहो, तूं उत्पन्न होतांच कुंतीमातेनें तुझ्याविषयीं जें जें कांहीं इच्छिलें असेल, तें तें सर्व तुला प्राप्त होवो. तूं ज्या इच्छेनें आज निघाला आहेस, ती तुझी इच्छा पूर्ण होवो. आम्हांपैकीं कोणालाहि पुनरपि या निर्दय क्षत्रियकुलांत जन्म न येवो.

ज्यांची केवल भैक्ष्यावर उपजीविका होते, त्या ब्राह्मणांना नमस्कार असो. हे वीरा, तो पापी दुर्योधन राजसभेंत मजकडे पाहून व उच्च स्वरानें हंसून मला 'गाय' असें म्हणाला, त्याचें मला परम दुःख होतें. त्याचप्रमाणें भर सभेंत त्या दुर्जनांनीं जें अयुक्त भाषण केलें, तेंहि माझ्या मनाला एकसारखें जाळीत आहे. तथापि हे वीरा, त्या सर्व दुःखाहून तुझ्या वियोगामुळें आज उपस्थित झालेलें हें दुःख मला अधिक असह्य वाटत आहे. या दुःखापुढें तें दुःख कांहींच नाहीं!

हे महाबाहो, तूं आम्हांला येथें सोडून गेलास म्हणजे तुझ्या या चारी भ्रात्यांना रात्रींच्या रात्री झोंप येणार नाहीं. मग त्या प्रजागरकालीं ते सर्व तुझ्या वीरकर्मांचें पुनः पुनः वर्णन करीत तो दुःखाचा काल कसा तरी घालवितील. तूं दीर्घ प्रवासांत गेल्यावर आम्हांला भोग, धन किंवा जीवितहि सुखावह होणार नाहीं. तुझ्या वियोगसमयीं आमची मति मूढ होईल. हे पार्था, आम्हां सर्वांचें सुख-दुःख, जीवित-मरण, राज्य व ऐश्वर्य इत्यादि सर्व तुजवर अवलंबून आहे.

हे कौंतेया, मी तुला जाण्याची अनुज्ञा देतें. तूं निर्विघ्नपणें इष्टस्थानास प्राप्त हो. हे निष्पापा, तूं बलवानांशीं विरुद्ध आचरण करूं नको. विजयासाठीं निघालेल्या तुला मार्गांत कोणत्याहि प्रकारचें विघ्न न येवो. धाता व विधाता यांस नमस्कार असो. तुझें कुशल असो. मार्गांत तुझ्या शरीराला कोणत्याहि प्रकारची पीडा न होवो. ऱ्ही, श्री, कीर्ति, द्युति, पुष्टि, उमा, लक्ष्मी व सरस्वती या देवता प्रवास करणाऱ्या तुझें रक्षण करोत. तूं ज्येष्ठांची पूजा करणारा आहेस. तूं ज्येष्ठ भ्रात्याचें वचन प्रमाण मानितोस. हे भरतश्रेष्ठा, तुझ्या स्वास्थ्यासाठीं मी वसु, रुद्र, आदित्य इत्यादि देवगणांस अनन्य शरण आहें. पृथ्वीवरील, अंतरिक्षांतील व देवलोकांतील जीं जीं भूतें तुझ्या कार्यांत विघ्न आणतील, त्या सर्वांचें देव निवारण करोत."

राजा, यशस्विनी कृष्णा आपल्या वीर पतीचें असें अभीष्ट चिंतन करून दुःखानें स्तब्ध राहिली. त्यानंतर तो मध्यम पांडव अर्जुन आपले भ्राते व धौम्य मुनि यांस प्रदक्षिणा घालून व सुंदर गांडीवधनुष्य धारण करून इंद्रकील पर्वताकडे जावयास निघाला. ऐंद्रयोगानें युक्त असलेला तो महाबलाढ्य पार्थ उग्र तापसवेष धारण करून हिमालयाकडे जावयास निघाला असतां त्याच्या मार्गांतील सर्व भूतें दूर पळून गेलीं. तो वीर इंद्रपुत्र योगयुक्त होऊन वायूप्रमाणें मनोवेगानें निघाला व एकाच दिवसांत पवित्र हिमालय पर्वतावर येऊन पोंचला. तपोधन ऋषि व देव त्या दिव्य पर्वताचें सतत सेवन करितात. त्या जितेंद्रिय वीरानें रात्रींहि प्रवास केला आणि हिमालय व गंधमादन पर्वतांतील दुगम प्रदेशांचें उल्लंघन केलें.

(४) याप्रमाणें अहोरात्र प्रवास करून तो दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं इंद्रकील पर्वतावर येऊन पोंचला व कांहीं वेळ तेथेंच उभा राहिला. इतक्यांत 'येथेंच थांब,' असे अंतरिक्षांतून आलेले शब्द त्याच्या कानीं पडले. ते ऐकून आश्चर्यचकित झालेला मध्यम पांडव इतस्ततः पाहूं लागला. तों एका वृक्षाखालीं ब्राह्मश्रीनें देदीप्यमान दिसणारा एक तपस्वी त्याच्या दृष्टीं पडला. तो अतिशय कृश झालेला असून त्याच्या जटा पिंगटवर्ण होत्या.

तो महातपस्वी इंद्रकील पर्वतावर स्थित असलेल्या धनंजयाकडे पाहून त्यास म्हणाला—"वत्सा, धनुष्य, कवच, बाण, खड्ग व तलत्राण यांस धारण करणारा व क्षत्रधर्माचें अनुवर्तन करणारा तूं कोण आहेस ? तूं युद्धाची तयारी करून येथें कां आलास ? बाबारे, येथें शस्त्रांचें कांहीं प्रयोजन नाहीं. ज्यांनीं हर्ष व क्रोध यांचा त्याग केलेला आहे, अशा तपस्वी शांत ब्राह्मणांचें हें निवासस्थान आहे. येथें धनुष्याचा कांहीं उपयोग नाहीं. या पुण्य प्रदेशीं संग्राम त्रिकालींहि होणें शक्य नाहीं. यास्तव वत्सा, हें आपलें धनुष्य फेंकून दे. हे वीरा, तूं आपलें धैर्य व तेज यांच्या योगानें परम गतीला प्राप्त झाला आहेस. दुसरा कोणताहि पुरुष अशा प्रकारें परम गतीला प्राप्त होत नाहीं."

याप्रमाणें त्या ब्राह्मणानें हंसत हंसत अर्जुनाला पुष्कळ हितोपदेश केला. पण तो निश्चयी कुंतीपुत्र स्वाभाविक धैर्यामुळें आपल्या संकल्पापासून ढळला नाहीं. तेव्हां प्रसन्न झालेला तो ब्राह्मण हंसतच त्यास पुनः म्हणाला—"हे शत्रुनाशका पार्था, तुझें कल्याण असो. मी इंद्र आहें, तूं मजपासून इष्ट वर मागून घे."

हें इष्ट वचन ऐकून शूर अर्जुन हात जोडून व नम्र होऊन सहस्राक्षास म्हणाला—" हे देवेंद्रा, माझी एकच इच्छा आहे. ती तूं पूर्ण कर. तुझ्यापाशीं असलेलीं सर्व अस्त्रें मिळावीं, असा माझा शुभ मनोरथ आहे."

अर्जुनाचें हें निश्चित वचन ऐकून प्रसन्न झालेला महेंद्र त्यास प्रसन्न चित्तानें म्हणाला—" बा धनंजया, येथें आलेल्या तुला अस्त्रें घेऊन काय करावयाचीं आहेत? तूं आतां परम गतीला प्राप्त झाला आहेस. यास्तव मजपासून तूं इष्ट भोग मागून घे. तुला हीं क्षुद्र अस्त्रें काय करावयाचीं आहेत?"

इंद्राचें हें प्रलोभन ऐकूनहि आपल्या निश्चयापासून न ढळणारा धनंजय त्यास पुनः म्हणाला—" हे देवेंद्रा, मी लोभानें किंवा कामवश होऊन देवत्वाची किंवा दिव्य सुखाचीहि इच्छा करणार नाहीं. मला देवांचें ऐश्वर्य नको. हे प्रभो, माझ्या प्रिय भ्रात्यांना घोर अरण्यांत सोडून, दुर्योधनादि शत्रूंचा सूड न उगवितां जर मी दिव्य सुखांत आसक्त झालों, तर सर्व लोकांमध्यें माझी दीर्घकाल अकीर्ति होईल. त्यापेक्षां मला मरण आलेलें पत्करेल."

अर्जुनाचें हें युक्तियुक्त वचन ऐकून अधिकच प्रसन्न झालेला वृत्रशत्रु इंद्र मधुरवाणीनें सान्त्वन करीत त्यास म्हणाला—" हे वीरा, तूं आपल्या अलौकिक सामर्थ्यानें शूलधर त्रिनेत्र महादेवाला जेव्हां पहाशील व त्याला प्रसन्न करून घेशील, तेव्हां मी तुला आपलीं सर्व दिव्य अस्त्रें देईन. यास्तव हे पुत्रा, तूं त्या परमेष्ठी देवाधिदेवाच्या दर्शनासाठीं यत्न कर. हे कौंतेया, त्याच्या दर्शनानें तूं परम सिद्धीला प्राप्त होऊन माझ्या स्वर्गलोकीं येशील."

राजन् इतकें बोलून शक्र गुप्त झाला व अर्जुनहि तेथेंच योगयुक्त होऊन राहिला. ३. ३. ३७.

येथें तिसरें अर्जुनाभिगमनपर्व समाप्त झालें.

---

# कैरातपर्व ४.



## अध्याय ३८ वा.

[ १ अर्जुनाच्या अस्त्रप्राप्तीविषयीं जनमेजयाचा प्रश्न. २ अर्जुनाचें तप. ३ तें पाहून ऋषींची भीति. ४ त्यास शंकराचें अभयदान. ]

( १ ) **जनमेजय**—हे ब्रह्मन्, महात्म्या पार्थाला अस्त्रप्राप्ति कशी झाली, तें सविस्तर ऐकण्याची माझी इच्छा आहे. तसेंच त्या पराक्रमी धनंजयानें त्या निर्मनुष्य वनामध्यें निर्भयपणें प्रवेश कसा केला ! तेथें त्या महाबाहूनें काय केलें व त्या कौंतेयानें देवराज भगवान् महेश्वराला कसें संतुष्ट केलें ?

हे भगवन्, तूं दिव्य आणि मानुष हीं दोन्ही कर्मे जाणतोस. पूर्वीं अजिंक्य अर्जुनाचा महादेवाबरोबर अंगावर रोमांच उभे करणारा जो अद्भुत संग्राम झाला, त्याचा वृत्तान्त ऐकून शूर पांडुपुत्रांनाहि ‘ या युद्धांत महावीर अर्जुनाचा नाश होतो कीं काय ’ म्हणून भय, तो लोकोत्तर वीर महादेवाचा प्रतियोद्धा झाला म्हणून साभिमान हर्ष आणि त्याला महेश्वराच्या प्रसादानें अलौकिक सामर्थ्य प्राप्त झालें, म्हणून मोठा विस्मयहि वाटला असेल ! त्यावेळीं त्या शूर नरव्याघ्रांचीं हृदयें कापूं लागलीं असतील ! शिवाय त्या धनुर्धरानें तेथें आणखींहि कांहीं महत्कृत्यें केलीं असतील. तीं सर्व मला कथन कर. त्या पराक्रमी वीराचें समग्र चरित्र मला सविस्तर सांग.

( २ ) **वैशंपायन**—हे पौरवश्रेष्ठा, त्या महात्म्याची दिव्य, अतिशय अद्भुत व अनुपम महत्कथा मी तुला सांगतों; ऐक. हे निष्पापा, पिनाकपाणि शंकर व धनुर्धर धनंजय या दोघांचा परस्परांशीं भिडून महासंग्राम कसा झाला, तो वृत्तान्त लक्षपूर्वक ऐक.

राजा, युधिष्ठिराच्या आज्ञेनें अमित पराक्रमी पृथापुत्र आपलें दिव्य गांडीव धनुष्य व सुवर्णाच्या मुठीचें खड्ग घेऊन सुरेश्वर इंद्र व देवाधिदेव महेश्वर यांच्या दर्शनेच्छेनें स्वकार्यसिद्धीसाठीं उत्तरदिशेंतील हिमालयाच्या शिखराकडे निघाला. तो सर्व लोकांमध्यें महारथ असलेला इंद्रपुत्र अर्जुन तपाचा दृढनिश्चय करून अति त्वरेनें कंटकयुक्त घोरवनांत एकटाच गेला.

तें वन नानाप्रकारचीं पुष्पें व फलें यांनीं युक्त, विविध पक्ष्यांनीं व असंख्य श्वापदांनीं व्याप्त व सिद्ध-चारणांनीं सेवित होतें. त्या निर्जन अरण्यांत अर्जुन गेला असतां अंतरिक्षांत शंखनाद व दुंदुभींचा ध्वनि झाला. भूमीवर पुष्पवृष्टि झाली. मेघांनीं सर्व आकाश आच्छादित केलें.

तो महावीर त्या महापर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या दुर्गम वनांचें उल्लंघन करून हिमालय पर्वताच्या पृष्ठभागीं जाऊन राहिला असतां अतिशय शोभला. तेथें पक्ष्यांच्या मंजुल ध्वनीनें गजबजलेले अनेक प्रफुल्ल वृक्ष आणि वैडूर्य रत्नाप्रमाणें निर्मल व मधुर जलानें युक्त असलेल्या विस्तीर्ण नद्या त्याच्या दृष्टीं पडल्या.

त्या नद्यांचे तीर हंस, कारंडव, सारस, कोकिल, क्रौंच आणि मयूर इत्यादि पक्ष्यांच्या मनोहर शब्दांनीं दुमदुमून गेलें होतें. तेथील रम्य अरण्य व पर्वतावरून वहाणाऱ्या नद्यांचें शीतल आणि निर्मल जल पाहून अर्जुनाचें मन प्रसन्न झालें. त्या पवित्र व रमणीय वनामध्यें तो संतुष्ट चित्तानें तपश्चर्या करूं लागला.

महात्म्या पार्थानें तृणाचें वस्त्र परिधान केलें आणि दंड व अजिन यांनीं भूषित होऊन, वृक्षावरून जीर्ण होऊन पडलेलें पर्ण भक्षण करून उग्र तप आरंभिलें. पहिल्या महिन्यांत तो दर तीन दिवसांनीं एक फळ भक्षण करूं लागला. दुसऱ्या महिन्यांत सहा दिवसांनीं, तिसऱ्या महिन्यांत पंधरा दिवसांनीं व चवथ्या महिन्यापासून तो महिन्यांतून एकदाच फलाशन करूं लागला. शेवटीं अशाच क्रमानें आपलें अनशनसामर्थ्य वाढविणारा तो महाबाहु पांडुनंदन वायुभक्षण करून राहूं लागला. तो हात वर करून एका पायाच्या आंगठ्यावर निराधार उभा राहिला. त्रिकाल स्नानानें त्या महात्म्याच्या जटा विद्युत् किंवा पीत कमल यांप्रमाणें शोभूं लागल्या.

( ३ ) पार्थाचें हें घोर तप पाहून त्या वनांतील महर्षि साशंक झाले व त्यांचा समुदाय या उग्र तपश्चर्येचा वृत्तांत कथन करण्याच्या इच्छेनें महादेवापाशीं आला. त्या ऋषिगणांनीं पिनाकपाणि महेश्वराला प्रणाम करून पार्थाचें हें अद्भुत कर्म निवेदन केलें.

ऋषि म्हणाले—हे देवाधिदेवा, हा महातेजस्वी पार्थ हिमालयाच्या शिखरावर बसून दुष्कर तपश्चरण करीत आहे. त्याच्या तेजानें सर्व दिशा जणुंकाय

धूमयुक्त व अंधुक झाल्या आहेत. अशा प्रकारचें उग्र तप आचरण्यांत त्याचा काय हेतु असावा, हें आम्हांला कळत नाहीं. त्याचें हें तपस्तेज आम्हांला अतिशय ताप देत आहे. यास्तव हे उमापते, त्याचें तूं सत्वर निवारण कर.

( ४ ) त्या मुनींचें हें वचन ऐकून भूतपति महेश्वर म्हणाला—हे विप्रश्रेष्ठहो, पार्थाविषयीं तुम्ही कोणत्याहि प्रकारें विषाद मानूं नका. तुम्ही जसे आलेत तसेच संतुष्ट चित्तानें सत्वर परत जा. या पराक्रमी पृथापुत्राचा मनःसंकल्प मी पूर्णपणें जाणतों. या धनुर्धराला स्वर्गाची इच्छा नाहीं; किंवा ऐश्वर्य, दीर्घायु इत्यादि सिद्धींचीहि अपेक्षा नाहीं. त्याचा मनोरथ मी आज पूर्ण करीन.

वैशंपायन—राजा, श्रीशंकराचें तें आश्वासनपर भाषण ऐकून ते सर्व सत्यवादी ऋषि संतुष्ट झाले आणि आल्या मार्गानें आपापल्या आश्रमास परत गेले. ३. ४. ३८.

---

## अध्याय ३९ वा.

[ १ किरात व अर्जुन यांचें युद्ध. २ अर्जुनाच्या पराक्रमानें शंकराचा संतोष. ]

( १ ) वैशंपायन—राजश्रेष्ठा, ते सर्व महात्मे तपस्वी परत गेले असतां सुवर्णवृक्षाप्रमाणें तेजस्वी असलेल्या सर्वपापहर्त्या महेश्वरानें किरातवेष धारण केला. त्या वेळीं तो भगवान् जणु काय दुसरा मेरुपर्वतच भासला. तो पिनाकपाणि श्रेष्ठ धनुष्य व सर्पोपम तीक्ष्ण बाण हातीं घेऊन जेव्हां पार्थावर वेगानें चाल करून जाऊं लागला तेव्हां मूर्तिमंत अग्नीप्रमाणेंच शोभला.

त्या महेश्वराबरोबर देवी उमाहि त्याला शोभण्यासारखा किरातीचा वेष व व्रत धारण करून निघाली. त्यांच्या मागोमाग नानावेषधारी हृष्ट भूतगणांचा समूह व हजारों स्त्रियाहि चालल्या. हे राजा, किरातवेषधारी शंकरानें त्या वनप्रदेशांत प्रवेश केला असतां तो अतिशय शोभला. त्या वेळीं तें वन निःशब्द झालें. फार काय पण पर्वतावरून वहाणारे जलप्रवाह व पक्ष्यांचा किलकिलाटहि शांत झाला.

जनमेजया, याप्रमाणें तो छद्मवेषधारी महादेव पार्थाच्या अगदीं समीप आला असतां ‘ मूक ’-नावांचा एक दानव वराहरूप धारण करून व अर्जुनावर रोख धरून वेगानें धांवून आला. हा भयंकर वराह जणुंकाय आपल्या

वधाच्या इच्छेनेंच धांवून येत आहे, हें पाहून पार्थानें आपलें श्रेष्ठ गांडीव धनुष्य व सर्पाकार विषारी शर हातीं घेऊन धनुष्य सज्ज केलें आणि त्याचा प्रचंड टणत्कार करीत म्हटलें—" हे अधमा, ज्या अर्थी मज निरुपद्रवी तापसाचा प्राण घेण्याची तूं इच्छा करितोस, त्या अर्थी मीच तुला प्रथम यमलोकीं पाठवितों."

असें बोलून धनंजय त्या वराहावर बाण सोडीत आहे, हें पाहून किरातरूपी शंकरानें त्याचें निवारण करीत म्हटलें—" हे तापसा, इंद्रकिलपर्वताप्रमाणें नीलवर्ण असलेला हा वराह माझी शिकार आहे. त्यावर प्रथम मीं नेम धरला, यास्तव तूं यावर बाण सोडूं नको."

परंतु किराताच्या या बोलण्याकडे दुर्लक्ष करून पार्थानें त्या वराहाला आपल्या बाणानें विद्ध केलें. त्याच क्षणीं किरातानेंहि त्या वराहावर अग्नीच्या ज्वालेसारखा प्रदीप्त व वज्रासारखा तीक्ष्ण बाण सोडिला. याप्रमाणें त्या दोघांनीं एकाच वेळीं सोडिलेल्या त्या दोन तीक्ष्ण शरांनीं त्या मूकराक्षसाच्या पर्वतप्राय दृढ गात्राचा भेद केल्यामुळें तो तत्काल गतप्राण होऊन पडला.

राजा, पर्वतावर विज पडली असतां किंवा वज्रप्रहार झाला असतां जसा प्रचंड ध्वनि होतो, त्याप्रमाणें त्या दोघां अलौकिक वीरांच्या शरांचा दैत्यशरीराशीं संयोग होतांच भयंकर नाद झाला आणि दीप्तमुख सर्पाप्रमाणें असलेल्या त्या दोन बाणांनीं विद्ध झालेला तो दानव आपलें पूर्वीचें भीषण राक्षसरूप धारण करून मरण पावला.

त्यानंतर स्त्रीसमुदायानें युक्त असलेल्या त्या सुवर्णासारख्या कांतिमान् किरातवेषधारी पुरुषाला पाहून तो कौंतेय संतुष्ट चित्तानें जणुंकाय हंसतच म्हणाला—"अहो महाराज, स्त्रियांसह या शून्य वनामध्यें भटकणारे आपण कोण आहांत? हे सुवर्णतुल्य कांति असलेल्या महात्म्या, या घोर अरण्यांत तुला भीति कशी वाटत नाहीं! मीं ज्याच्यावर नेम धरिला होता, त्या वराहाला तूं विद्ध कां केलेंस? येथें आलेल्या या राक्षसाचा मींच प्रथम पराभव केला आहे. यास्तव यदृच्छेनें असो किंवा माझा पराभव करण्यासाठीं असो, पण ज्या अर्थी तूं माझ्या लक्ष्याला वेध केला आहेस त्या अर्थी आज तूं माझ्या हातून जिवंत सुटणार नाहींस. या वेळीं तूं माझ्याशीं जें वर्तन केलेंस, तो खरोखर मृगयेचा धर्म नव्हे. यास्तव पर्वताचा आश्रय करून रहाणाऱ्या तुझें मी आज प्राणहरण करीन."

पांडवाचें हें भाषण ऐकून तो किरात उच्च स्वरानें हंसला आणि स्निग्ध वाणीनें सव्यसाची धनंजयाला म्हणाला—"हे वीरा, मला या वनाच्या सांनिध्याचें भय वाटेल, असें तूं समजूं नको. कारण वनांत वास करणाऱ्या आम्हांला हा प्रदेश संचार करण्यास योग्यच आहे. परंतु अशा या वनांतील दुष्कर वास तूं कां स्वीकारिलास ! हे तपोधना, आम्ही या विपुल श्वापदांनीं युक्त असलेल्या वनांत नेहमींच रहातों. परंतु अग्नीसारखा तेजस्वी असलेला तूं अतिशय सुकुमार आहेस. तूं सुखांत वाढलेला दिसतोस. तेव्हां या शून्य वनांत तूं एकटा कसा फिरत आहेस !"

अर्जुन—किराता, मी अग्नीसारखे तेजस्वी नाराच बाण व श्रेष्ठ गांडीव धनुष्य यांचा आश्रय करून या महा अरण्यांत जणुंकाय दुसऱ्या कार्तिकस्वामी-प्रमाणेंच रहात आहें आणि वराहरूप धारण करून माझा वध करण्यासाठीं आलेल्या या भयंकर राक्षसालाहि मींच गतप्राण केलें आहें.

किरात—हे धनुर्धरा, मींच प्रथम माझें धनुष्य सज्ज करून त्याच्यावर नेम धरिला होता आणि माझ्याच बाणानें विद्ध होऊन हा मरण पावला आहे. मींच त्याच्यावर प्रहार करून त्याला यमलोकीं पाठविलें आहे. असें असतां तूं मृगयाधर्माचें अतिक्रमण करून आपला दोष दुसऱ्यावर लादीत आहेस, हें योग्य नव्हे. हे मंदमते, तूं अतिशय दुरभिमानी दिसतोस. थांब, मी तुला आतां जिवंत सोडीत नाहीं. तुझ्यावर विजेसारखे प्रखर बाण सोडितों. तूंहि आपलें सर्व बल खर्च करून तीक्ष्ण बाणांनीं मजवर प्रहार कर.

किराताचें हें वचन ऐकून अर्जुनाला अनिवार्य क्रोध आला आणि त्यानें किरातावर बाणांचा वर्षाव केला. परंतु किरातानें संतुष्ट मनानें त्या सर्व बाणांचा स्वीकार करून 'किती हा सौम्य प्रहार ! काय हें मंद शरसंधान' असें पुनः पुनः म्हटलें आणि 'आतां तुझ्या मर्मभेदक नाराच बाणांचा प्रहार कर' असें म्हणून पार्थाला अधिकच चिडविलें.

त्याचे ते शब्द ऐकतांच अर्जुनानें त्याच्यावर नाराच शरांची वृष्टि सुरू केली. त्या वेळीं ते दोघेहि वीर क्षुब्ध होऊन परस्परांवर सर्पासारख्या बाणांचा प्रहार करूं लागले. शेवटीं किरातानें अर्जुनाच्या शरवृष्टीचा प्रसन्न मनानें स्वीकार केला. तो पिनाकपाणि अर्जुनाचा असह्य शरवर्षाव सहन करीत दोन घटका एखाद्या पर्वताप्रमाणें अचल उभा राहिला. परंतु तेवढ्या अवधींत त्याच्या शरीरावर एकहि क्षत पडलें नाहीं.

तेव्हां आपली बाणवृष्टि व्यर्थ होत असलेली पाहून धनंजय अतिशय विस्मित होऊन म्हणाला—“धन्य, धन्य! अरे हा पर्वतशिखराच्या आश्रयानें रहाणारा किरात अतिशय सुकुमार दिसत आहे. पण तो माझ्या गांडीव धनुष्यापासून सुटलेले बाण, यत्किंचित्‌हि विह्वल न होतां, सहन करीत आहे. तेव्हां हा कोण बरें असावा! हा साक्षात् रुद्र किंवा कोणी यक्ष, देव अथवा असुर असावा, असें मला वाटतें. या श्रेष्ठ पर्वतावर देवांचा समुदाय रहात असतो. परंतु मीं सोडलेल्या सहस्रावधि बाणांचा समूह सहन करण्यास एका पिनकपाणि रुद्रावांचून दुसरा कोणताहि देव समर्थ नाहीं. हा जर रुद्रावांचून अन्य कोणी देव असेल, तर मी याला तीक्ष्ण शरांनीं यमसदनीं पाठवीन.”

असें बोलून अर्जुनानें प्रसन्न मनानें मर्मभेदक नाराच बाणांचा सूर्यकिरणांसारखा सतत हजारों धारांनीं वर्षाव केला. परंतु भगवान् शूलपाणीनें शिलांचा वर्षाव सहन करणाऱ्या पर्वताप्रमाणें त्या शरांचा हृष्ट मनानें स्वीकार केला.

इतक्यांत पार्थाच्या भात्यांतील सर्व बाण संपले. आपल्या अक्षय्य भात्यांतील शरांचा क्षय झालेला पहातांच अर्जुन भयचकित झाला आणि पूर्वीं खांडव वनदाहाच्या वेळीं ज्यानें त्याला दोन अक्षय्य भाते दिले होते, त्या भगवान् अग्नीचें चिंतन करून म्हणाला—“अरेरे, माझे सर्व बाण संपले, आतां मी धनुष्याला काय जोडूं! सर्व बाणांना ग्रासणारा हा कोण बरें पुरुष असावा! असो; हत्तीला शूलाग्रानें जसें टोंचावें त्याप्रमाणें मी याला धनुष्याच्या अग्रानें टोंचून दंडधर यमाच्या लोकीं पाठवितों.”

असें बोलून महातेजस्वी पार्थानें धनुष्याच्या अग्राचा त्याच्यावर प्रहार केला. धनुष्याच्या दोरीचा फांस घालून त्याला ओढिलें आणि आपल्या वज्रासारख्या कठिण हातांनीं मुष्टिप्रहार केले. शेवटीं शत्रुदमन धनंजयानें धनुष्याच्या कोटीनेंच त्याच्याशीं युद्ध आरंभिलें. परंतु त्या पर्वतावर निवास करणाऱ्या किरातानें त्याचें तें धनुष्यच गिळून टाकिलें.

तेव्हां कौंतेय खड्ग घेऊन उभा राहिला व वेगानें किरातावर चालून गेला आणि त्यानें पर्वतापुढेंहि कुंठित न होणारें खड्ग उगारून आपल्या बाहुबलानें किराताच्या मस्तकावर प्रहार केला. परंतु त्या सर्वभक्षक रुद्राला यत्किंचित्‌हि क्षत न पडतां त्या खड्गाचेच तुकडे झाले.

तें पाहून अधिकच क्रुद्ध झालेल्या पांडुनंदनानें वृक्ष व शिला यांनीं युद्ध आरंभिलें. पण त्या प्रचंड देहधारी किरातरूपी भगवानानें त्याचेहि प्रहार सहन केले. त्या वेळीं तो क्रुद्ध फाल्गुन उष्ण श्वासोच्छ्वास टाकीत असल्यामुळें त्याच्या मुखांतून जणुं काय धूमच उत्पन्न होत आहेसें भासलें.

त्यानंतर कौंतेयानें त्या किरातरूपी रुद्रावर आपल्या वज्रासारख्या मुष्टींचे असह्य प्रहार केले. उलट किरातहि अर्जुनाच्या मर्मस्थानीं मुष्टिप्रहार करूं लागला. त्यामुळें त्याच्या प्रहारांचा 'चट चट' असा फार मोठा ध्वनि झाला.

याप्रमाणें त्या दोघांचें अंगावर रोमांच आणणारें तुमुल युद्ध दोन घटिका चाललें. नंतर इंद्र व वृत्रासुर यांच्या युद्धाप्रमाणें त्या दोघांचें बाहुयुद्ध सुरू झालें असतां पार्थानें किराताच्या छातीवर प्रहार केला. किरातानेंहि उलट अर्जुनाच्या हृदयावर आघात केला.

त्या दोघांच्या पुष्ट भुजा व दीर्घ वक्षःस्थलें, यांचा परस्पर संघर्ष झाल्यामुळें एकमेकांवर घांसलेल्या लाकडांपासून जशीं धूमयुक्त किटाळें निघावीं त्याप्रमाणें त्यांच्या सर्व गात्रांतून अग्नि प्रकट झाला. शेवटीं महादेवानें अर्जुनाला वक्षःस्थलाशीं घट्ट आवळून धरून आपल्या अलौकिक तेजानें निस्तेज केलें व त्याला क्रोधानें मोहित करून भूमीवर पाडिलें. देवाधिदेवाच्या भुजपाशानें पीडिलेला पार्थ जणुंकाय पिंडाकार होऊन भूमीवर पडला. याप्रमाणें सव्यसाची पार्थ मूर्छित होऊन दोन घटका निश्चेष्ट पडल्यावर सावध होऊन पुनः उठला. त्या वेळीं त्या पांडवाचें सर्व शरीर रक्तानें माखलें होतें. दारुण दुःखानें पीडित झालेला तो पृथापुत्र शरण जाण्यास योग्य अशा भगवान् पिनाकपाणीला शरण गेला. त्यानें मृत्तिकेचें स्थंडिल केलें व त्यामध्यें शंकराचें पुष्पादिकांनीं पूजन केलें. त्याच्या मस्तकावर मोठ्या भक्तीनें पुष्पमाला वाहिली. पण ती पुष्पमाला स्थंडिलस्थ शिवलिंगावर नसून किराताच्या मस्तकावर आहे, असें पाहून अर्जुन आश्चर्यचकित झाला व हा सामान्य किरात नसून साक्षात् भगवान् शंकर आहे, असें जाणून त्याला शरण गेला. तो महावीर प्रसन्न चित्तानें त्या रुद्राच्या पायां पडला.

(२) त्याची ती उत्कट भक्ति पाहून प्रसन्न झालेला रुद्र मेघासारख्या गंभीर वाणीनें विस्मित झालेल्या त्याला बोलला—हे फाल्गुना, तुझें शौर्य, धैर्य व अप्रतिम कर्म पाहून मी संतुष्ट झालों आहें. हे निष्पापा, तेज आणि वीर्य यांत तुझ्यासारखा दुसरा क्षत्रिय नाहीं. मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें. तूं

पूर्वऋषि आहेस, तुला मी दिव्यज्ञान देतों. तूं युद्धामध्यें सर्व शत्रूंना व देवांनाहि जिंकशील. मी तुला अप्रतिम अस्त्र देतों. तूं तें अस्त्र एका क्षणांत ग्रहण करण्यास समर्थ आहेस.

वैशंपायन—त्यानंतर त्या पराक्रमी धनंजयाला देवी उमेसह महातेजस्वी गिरीशाचें दर्शन झालें. त्या शूलपाणि महादेवाला पहातांच पार्थानें साष्टांग नमस्कार घालून शिवसहस्रनामस्तवनानें त्याला प्रसन्न केलें.

अर्जुन—हे कपर्दिन्, सर्वदेवेश, भगनेत्रनिपातन, देवदेव, महादेव, नीलग्रीव, जटाधर, तूं त्र्यंबक, विभु व सर्वांचें परम कारण आहेस. तूं देवांची गति असून तुझ्यापासूनच सर्व जगत् उत्पन्न झालें आहे. देव, असुर व मानव यांसह त्रिभुवनाला तूं अजिंक्य आहेस. तूं विष्णुरूप शिव आणि शिवरूप विष्णु आहेस. दक्षयज्ञाचा नाश करणाऱ्या तुज रुद्राला नमस्कार असो. हे ललाटाक्ष, शर्व, शूलपाणि, पिनाकधनुष्याचें रक्षण करणाऱ्या, मार्जालिन्, तुज सर्व भूतमहेश्वराला प्रसन्न करण्यासाठीं मी नमस्कार करितों. हे भगवन्, सर्व भूतमहेश्वरा, मजवर प्रसन्न हो. तूं गणांचा स्वामी, सर्व जगाचें कल्याण करणारा, सर्व लोकांच्या कारणाचेंहि कारण, प्रधान-पुरुषांहून अतीत व परम सूक्ष्म आहेस. अशा तुज हराला मी वंदन करितों. हे भगवन्, माझ्याकडून जें मर्यादेचें उल्लंघन झालें आहे त्याची मला क्षमा कर. तुझ्या दर्शनाच्या इच्छेनेंच मी या महापर्वतावर आलों आहें.

हे देवेशा, तुला हा महापर्वत अतिशय प्रिय आहे. हें तापसांचें श्रेष्ठ निवासस्थान आहे. हे ईश्वरा, सर्व लोकांनीं ज्याला वंदन केलें आहे, अशा तुला मी वंदन करितों. हे प्रभो, मीं तुझ्याशीं निर्दयपणें द्वंद्वयुद्ध केलें. खरोखर मी अज्ञ आहें. मी हें मोठें साहस केलें! तुला जर मीं पूर्वींच ओळखिलें असतें तर माझ्या हातून हा अपराध घडला नसता. यास्तव हे महेश्वरा, मज शरणागताला क्षमा कर.

जनमेजया, अर्जुनाचें हें मधुर वचन ऐकून महातेजस्वी वृषभध्वज हंसला व त्याचा सुंदर बाहु हातांत धरून व 'हे पांडुनंदना, मी तुला पूर्वींच क्षमा केली आहे' असें बोलून त्यानें त्याला दृढ आलिंगन दिलें आणि तो प्रसन्नात्मा उमापति सांत्वनपूर्वक त्याला असें वचन बोलला. ४. ३. ३९.

---

## अध्याय ४० वा.

[ १ पार्थाला शंकरापासून पाशुपताची व त्याच्या गांडीवादि सर्व शस्त्रास्त्रांची प्राप्ति. ]

( १ ) महादेव—हे धनुर्धरा, नारायणानें ज्याला साह्य केलें आहे, असा पूर्व जन्मींचा तूं ' नर ' आहेस. तूं पूर्वी बदरिकाश्रमीं असंख्य वर्षे उग्र तप आचरिलें आहेस. तुझ्या ठिकाणीं किंवा पुरुषोत्तम विष्णूच्या ठिकाणीं परम तेज रहातें. तुम्हीं दोघां पुरुषश्रेष्ठांनीं आपल्या तेजानें हें जगत् धारण केलें आहे. हे प्रभो, इंद्राच्या अभिषेकप्रसंगीं तूं आणि कृष्ण या दोघांनीं ज्यांचा टणत्कार मेघासारखा गंभीर आहे, अशीं श्रेष्ठ धनुष्यें हातीं घेऊन दानवांचें शासन केलेंत. तें हें गांडीव धनुष्य तुझ्या हातीं असणेंच उचित आहे. हे पुरुषश्रेष्ठा, मीं मायेचा आश्रय करून तें धनुष्य ग्रासलें होतें.

त्याचप्रमाणें हे दोन अक्षय्य भाते धारण करण्यास तूंच योग्य आहेस. हे कुरुनंदना, तुझें शरीर क्षतरहित होईल. तूं सत्यपराक्रमी आहेस. तुजवर मी प्रसन्न झालों आहें. यास्तव हे पार्था, तुला जो वर इष्ट असेल तो मजपासून मागून घे. हे वीरा, मनुष्यलोकांत किंवा स्वर्गांतहि तुझ्यासारखा अन्य पुरुष नाहीं. तूं सर्वक्षत्रियांत श्रेष्ठ आहेस.

अर्जुन—हे भगवन्, तूं जर प्रसन्न होऊन मला इष्ट वर देणार असशील तर हे प्रभो, मी दिव्य पाशुपत अस्त्राची इच्छा करितों. प्रलयकालीं सर्व जगाचा संहार करणारें जें भयंकर पराक्रमी ' ब्रह्मशिरस् '-नांवाचें दारुण अस्त्र तुजपाशीं आहे तें मला दे. हे महादेवा, तुझ्या प्रसादानें मला तें अस्त्र प्राप्त झालें असतां मी कर्ण, भीष्म, कृप व द्रोण यांना युद्धांत जिंकण्यास समर्थ होईन. त्याचप्रमाणें त्या अस्त्रप्रभावानें मी संग्रामांत दानव, राक्षस, भूत, पिशाच, गंधर्व व नाग यांसहि दग्ध करीन. हे वृषध्वजा, त्या अस्त्राचा प्रयोग करितांच हजारों शूल, उग्र स्वरूपाच्या गदा व सर्पांसारखे तीक्ष्ण बाण उत्पन्न होतात.

हे विभो, त्या अस्त्रानें मी भीष्म, द्रोण, कृप आणि नित्य कटु भाषण करणारा सूतपुत्र कर्ण यांच्याशीं युद्ध करीन. हे महेशा, हाच माझा मुख्य वर आहे. तुझ्या प्रसादानें मी अत्यंत समर्थ व कृतकृत्य होईन.

शंकर—हे मध्यम पांडवा, मला अतिशय प्रिय असलेलें पाशुपत अस्त्र मी तुला देतों. हे कौंतेया, तूं तें धारण करण्यास व त्याचा प्रयोग व उपसंहार करण्यास समर्थ आहेस. हे पार्था, हें श्रेष्ठ अस्त्र यम, यक्षराज कुबेर, वरुण, वायु किंवा महेंद्रहि जाणत नाहीं, मग मानवांना त्याची माहिती कोठून असणार ?

हे धनंजया, हें अस्त्र तूं कोणाहि मानवावर एकाएकीं सोडूं नको. कारण अल्प तेजस्वी मनुष्यावर याचा प्रयोग केल्यास तें सर्व जगाचा विनाश करील! संपूर्ण चराचर सृष्टीमध्यें या अस्त्राला अवध्य असें कांहींच नाहीं. या अस्त्राचा प्रयोग मनानें, वाणीनें किंवा धनुष्यानें करितां येतो.

वैशंपायन—राजा, महादेवाचें हें भाषण ऐकून पार्थ सत्वर शांतचित्त व शुचिर्भूत होऊन त्या विश्वेश्वरापाशीं आला व 'हे भगवन्, मला त्या अस्त्राच्या मंत्राचा उपदेश कर' असें म्हणाला. तेव्हां त्या गिरीशानें प्रयोग व उपसंहार यांसह तो मंत्र अर्जुनाला सांगितला. त्यावेळीं तें श्रेष्ठ अस्त्र मूर्तिमंत यमाप्रमाणेंच पार्थाच्या समीप आलें.

पार्थानें त्या अस्त्राचा मोठ्या प्रेमानें स्वीकार केला. त्या वेळीं पर्वत व वृक्ष यांसह पृथ्वी कांपूं लागली. तिच्या पाठीवरील सागर, पर्वत, वनप्रदेश, ग्राम, नगर व खाणी यांसह सर्व चराचर कंपित झालें. हजारों शंख, दुंदुभि व मोठे नगारे यांचा प्रचंड घोष झाला.

हे जनमेजया, पार्थानें ज्या वेळीं त्या घोर अस्त्राचा स्वीकार केला त्या वेळीं भूलोकीं अनेक उत्पात झाले व प्रत्यक्ष तें अस्त्रहि प्रदीप्त झालें.

जनमेजया, त्र्यंबकानें अमित तेजस्वी पार्थाला स्पर्श करितांच, त्याच्या देहांत जें कांहीं अशुभ होतें त्या सर्वाचा नाश झाला. त्यानंतर शंकरानें 'तूं आतां स्वर्गलोकीं जा' अशी अनुज्ञा दिली असतां पार्थानें शिरसावंदन करून हात जोडिले व त्या देवेश्वराकडे पाहिलें.

त्यावेळीं त्रिभुवनांत निवास करणाऱ्या त्या महामति उमापतीनें फाल्गुनाला त्याचें श्रेष्ठ गांडीव धनुष्य परत दिलें आणि शुभ्र तटांनीं शोभणारा, गुहांनीं युक्त आणि पक्षी व महर्षि यांचें निवासस्थान अशा हिमालय पर्वताला सोडून त्या गिरिश गंगाधरानें गिरिजेसह गगनांत गमन केलें. ३. ४. ४०.

## अध्याय ४१ वा.

[ १ अर्जुनाला यमधर्मादि लोकपालांपासून अस्त्रप्राप्ति. ]

( १ ) **वैशंपायन**—हे राजन्, याप्रमाणें अर्जुन पहात असतांच वृषभध्वज पिनाकि अस्त पावणाऱ्या सूर्याप्रमाणें अदृश्य झाला. तेव्हां पार्थाला परम विस्मय वाटला. तो मनांत म्हणाला—" खरोखर मीं धन्य आहें. मी आज साक्षात् शंकराला पाहिलें ! वरद त्र्यंबकानें मला हातानें स्पर्श केला व मला दर्शन दिलें, हा माझ्यावर त्याचा केवढा अनुग्रह झाला ! आज मी अत्यंत कृतार्थ झालों. मी आतां युद्धामध्यें सर्व शत्रूंना जिंकण्यास समर्थ होईन. आज माझा इष्ट हेतु पूर्ण झाला आहे, असें मी समजतों."

पार्थ मनांत असें चिंतन करीत आहे, तोंच जलेश्वर वरुण आपल्या वैडूर्यमण्यासारख्या नीलवर्ण कांतीनें सर्व दिशा प्रकाशित करीत जलचरांच्या गणासह तेथें आला त्याच्या बरोबर सर्प, नद, नदी, दैत्य, साध्य आणि देवता यांचा समूह होता.

त्याच्या मागोमाग धनेश्वर कुबेर अर्जुनाला पहाण्यासाठीं दिव्य विमानांतून तेथें प्राप्त झाला. त्याची कांति सुवर्णासारखी असून त्याचें अद्भुत स्वरूप अनुपम होतें. त्याच्या बरोबर विद्युल्लतेप्रमाणें चमकणाऱ्या यक्षांचा फार मोठा समुदाय होता.

त्याचप्रमाणें लोकांचा अंत करणारा प्रतापवान् साक्षात् यम तेथें विमानांतून प्रकट झाला. सर्व भूतांचा विनाश करणाऱ्या त्या अचिंत्यस्वरूपी वैवस्वत धर्मराजानें हातांत दंड धारण केला होता. गुह्यक, गंधर्व, सर्प व त्रैलोक्य यांस प्रकाशित करणारा तो प्रलयकालचा जणुंकाय दुसरा सूर्यच भासला.

त्या सर्व लोकपालांनीं हिमालयाच्या देदीप्यमान विचित्र शिखरावर जमून तप करणाऱ्या अर्जुनाला पाहिलें. त्यानंतर दोन घटकांनीं भगवान् इंद्र इंद्राणीसह ऐरावतावर बसून तेथें आला. त्याच्या बरोबर देवांचा समुदाय होता. त्या देवेंद्राच्या मस्तकावर शुभ्र छत्र धरिलेलें असल्यामुळें तो शुभ्र मेघामध्यें स्थित असलेल्या चंद्राप्रमाणें शोभला.

हे राजा, गंधर्व व तपोधन ऋषि यांच्याकडून स्तुति केला जाणारा पार्थ उदय पावणाऱ्या सूर्याप्रमाणें पर्वतशिखरावर उभा राहिला. तेव्हां बुद्धिमान्

धर्मज्ञ यम दक्षिण दिशेंत उभा राहून मेघासारख्या गंभीर वाणीनें बोलला—"हे अर्जुना, पहा, आम्ही सर्व लोकपाल येथें जमलों आहों. मी तुला दिव्य दृष्टि देतों, त्यायोगें तूं आम्हांला पहाण्यास समर्थ होशील.

हे धनंजया, तूं नारायणाचा सखा पूर्वर्षि महाबलाढ्य नर आहेस. ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें तूं मनुष्यत्वाला प्राप्त झाला आहेस. हे निष्पापा, वसूंच्या अंशांपासून उत्पन्न झालेला परम धर्मात्मा पितामह भीष्म महापराक्रमी आहे. पण तूं रणामध्यें त्याचाहि सहज वध करशील. भारद्वाजानें रक्षण केलेले अग्नी-सारखे तेजस्वी क्षत्रिय, मनुष्ययोनींत जन्म घेतलेले पराक्रमी दानव आणि वीर्यवान् निवातकवच यांचाहि तूं संहार करशील.

हे कुंतीपुत्रा, सर्व लोकांस प्रदीप्त करणाऱ्या माझ्या पित्याचा अंश महा प्रतापी कर्ण तुलाच वध्य आहे. हे फाल्गुना, हे सर्व देव, दानव आणि राक्षस यांचे अंश भूतलावर अवतरले आहेत, ते सर्व युद्धांत तुझ्या हातून मरण पावले असतां आपआपल्या कर्मांप्रमाणें श्रेष्ठगतीला प्राप्त होतील व या भूलोकीं तुझी अक्षय कीर्ति होईल. हे वीरा, तूं महासंग्रामांत साक्षात् महादेवाला संतुष्ट केलें आहेस. तुला विष्णूसह भूभार उतरावयाचा आहे. यास्तव तूं माझें हें अस्त्र व दंड यांचा स्वीकार कर. याचें निवारण कोणीहि करूं शकणार नाहीं. या अस्त्रानें तूं अतिशय मोठें कार्य करशील."

हे जनमेजया, त्या वेळीं पार्थानें प्रयोग व उपसंहार यांच्या मंत्रांसह त्या अस्त्राचा स्वीकार केला. त्याच्या मागून जलधरासारखा श्यामवर्ण वरुण पश्चिमदिशेंत स्थित होऊन म्हणाला—"हे पार्था, तूं प्रमुख क्षत्रिय असून क्षत्रिय-धर्म निश्चयानें पाळीत आहेस. हे पृथापुत्रा, माझ्याकडे पहा. मी जलेश्वर वरुण आहें. मीं तुला देत असलेल्या या वरुणपाशाचें निवारण कोणालाहि करितां येणार नाहीं. हे कौंतेया, तूं प्रयोग-संहारमंत्रांसह त्याचें ग्रहण कर.

पूर्वीं तारेसाठीं झालेल्या देवासुरसंग्रामामध्यें मीं या पाशांनीं हजारों महात्म्या दैत्यांना बांधून ठेविलें. यास्तव हे पराक्रमी अर्जुना, मी प्रसन्न होऊन देत असलेल्या या पाशांचा स्वीकार कर. या अस्त्रांतून साक्षात् अंतक यमहि मुक्त होऊं शकत नाहीं. तूं संग्रामांत जेव्हां या अस्त्राचा प्रयोग करीत संचार करशील, तेव्हां ही पृथ्वी निःक्षत्रिय होईल, यांत संशय नाहीं."

राजा, यम आणि वरुण यांनीं आपलीं दिव्य अस्त्रें अर्जुनाला दिलीं आहेत, असें पाहून कैलासावर रहाणाऱ्या धनाध्यक्ष कुबेरानें म्हटलें—"हे महाबलाढ्य अर्जुना, मीहि तुझ्यावर प्रसन्न झालों आहें. हे प्राज्ञा, तूं सनातन पूर्वदेव आहेस. तूं पूर्व कल्पामध्यें आमच्या कल्याणासाठीं आम्हांबरोबर सतत श्रांत झालास. मी तुला पाहून साक्षात् कृष्णदर्शनाप्रमाणेंच संतुष्ट झालों आहें. यास्तव मी तुला हें दिव्य अस्त्र देतों, त्याचें ग्रहण कर. हे महाबाहो, तूं दुर्जय देव-दानवांनाहि जिंकशील. मला प्रिय असलेलें हें 'अंतर्धान'-नांवाचें उत्तम अस्त्र घे. याच्या योगानें तूं धृतराष्ट्रपुत्रांचा नाश करण्यास समर्थ होशील.

हें माझें दिव्य अस्त्र तुझें धैर्य, तेज व प्रागल्भ्य यांची वृद्धि करील व शत्रूंना मूर्च्छित करून तुला विजय संपादन करून देईल. महात्म्या शंकरानें त्रिपुराचा जेव्हां नाश केला तेव्हां याचाच प्रयोग केला व त्यामुळें महा असुर दग्ध झाले. हे सत्यपराक्रमी पार्था, मी आज तुला हें श्रेष्ठ अस्त्र देत आहें. तूंच त्याला धारण करण्यास समर्थ आहेस, कारण तुझी योग्यता मेरूसारखी आहे."

कुबेराचें हें वचन ऐकून धनंजयानें त्या दिव्य अस्त्राचें विधिवत् ग्रहण केलें. त्यानंतर देवराज इंद्र पराक्रमी पांडुनंदनाचें मधुर वचनानें सांत्वन करीत मेघासारख्या गंभीर वाणीनें म्हणाला—" हे कुंतीसुता, तूं पुरातन ईश आहेस. तुला परासिद्धि प्राप्त झालेली असून तूं साक्षात् देवगतीला पोंचला आहेस. हे शत्रुमर्दना, तुला फार मोठें देवकार्य करावयाचें आहे. त्यासाठीं तुला स्वर्गांत आलें पाहिजे, यास्तव हे वीरा तूं सज्ज हो. तुझ्यासाठीं मातलि माझा रथ पृथ्वीवर घेऊन येईल. त्यावर आरूढ होऊन तूं देवलोकीं आलास म्हणजे मी तुला दिव्य अस्त्रें देईन. "

हे राजा, याप्रमाणें त्या सर्व लोकपालांना पर्वत शिखरावर एकत्र जमलेलें पाहून पार्थ विस्मित झाला. त्यानें तेथें आलेल्या सर्व लोकपालांचा जल, फलें व स्तवन यांच्या योगानें यथायोग्य सत्कार केला. त्यानंतर ते सर्व देव जसे आले होते तसे परत गेले आणि सर्वास्त्रप्राप्तीनें मनोरथ पूर्ण झाल्यामुळें संतुष्ट झालेला पार्थ स्वतःला कृतकृत्य मानूं लागला. ३. ४. ४१.

येथें चवथें कैरातपर्व समाप्त झालें.

---

# इंद्रलोकाभिगमनपर्व ५.



## अध्याय ४२ वा.

[ १ स्वर्गातून इंद्ररथाचें आगमन. २ त्यांतून पार्थाचें स्वर्गलोकीं गमन. ]

( १ ) वैशंपायन—हे राजेंद्रा, याप्रमाणें सर्व लोकपाल निघून गेले असतां शत्रूंचा नाश करणारा पार्थ देवेंद्राच्या रथाची वाट पाहूं लागला. तेव्हां बुद्धिमान् अर्जुनानें स्मरण करितांच मातलीनें युक्त असलेला महा तेजस्वी रथ आकाशाला प्रकाशित करीत व जणुंकाय मेघांचें विदारण करीत खालीं येत असलेला त्याला दिसला. तो देवेंद्राचा रथ आपल्या मेघगर्जनेसारख्या नादानें दाही दिशांना भरून सोडीत होता.

त्या रथावर ज्यांचें दर्शन उग्र आहे, अशा भयंकर गदा, तलवारी व शक्ति लटकत होत्या. ज्यांचा प्रभाव दिव्य आहे, असे प्रास, ज्यांवर दृष्टि ठरत नाहीं, अशा विजा, अशनि, चक्रयुक्त बंदुका, वेगानें वायु उत्पन्न करणारे वायुस्फोट, अशनि व ध्वनि यांनीं युक्त असलेले महामेघ, ज्यांचीं मुखें प्रज्वलित झालीं आहेत असे धिप्पाड व भयंकर नाग, हिमालयाच्या बर्फाच्छादित शिखराप्रमाणें दिसणारे पाषाणांचे ढीग इत्यादि युद्धसामग्री होती. त्या रथाला रेशमासारख्या पिंगट वर्णाचे व वायूसारखे वेगवान् हजारों अश्व जोडिले होते. ते अलौकिक मायामय रथाला इतक्या वेगानें वहात होते कीं त्यावर अर्जुनाची दृष्टिहि ठरेना. त्या महाभाग पांडवानें त्या श्रेष्ठ रथावर सुवर्णानें भूषविलेला 'वैजयंत' नांवाचा अतिशय तेजस्वी ध्वज पाहिला. त्या श्रेष्ठ रथावर तप्त सुवर्णासारख्या तेजस्वी भूषणांनीं विभूषित झालेल्या मातलीला पाहून हा कोणी देव असावा असें फाल्गुनाला वाटलें. तो असा तर्क करीत आहे, तोंच इंद्रसारथि मातलि नम्र होऊन त्याच्यापुढें आला व म्हणाला—

"हे शक्रात्मजा, इंद्र तुला भेटण्याची इच्छा करीत आहे. यास्तव तूं इंद्राच्या या श्रेष्ठ रथावर आरूढ हो. तुझा पिता शतक्रतु मला म्हणाला कीं, येथें आलेल्या कुंतीपुत्राला सर्व देव पाहोत. देव, ऋषि, गंधर्व व अप्सरा यांनीं परिवेष्टित झालेला व तुला पहाण्याची इच्छा करणारा तो इंद्र तुझी मार्गप्रतीक्षा करीत आहे. हे वीरा, देवेंद्राच्या आज्ञेनें तूं माझ्याबरोबर या लोकांतून देवलोकीं चल. तेथें अस्त्रप्राप्ति झाल्यानंतर तूं पुनः परत येशील."

अर्जुन—हे मातले, तूं अगोदर सत्वर जाऊन या श्रेष्ठ रथावर आरूढ हो. विपुल दक्षिणा देऊन मोठाले यज्ञ करणाऱ्या व राजसूय-अश्वमेधासारखे शेकडों ऋतु करणाऱ्या भाग्यवान् नृपालांसहि हा रथ दुर्लभ आहे. देवता किंवा दानव महत्तप आचरिल्यावांचून या उत्तम रथाला स्पर्श करण्यास किंवा पहाण्यासहि समर्थ होत नाहींत, मग ते त्यावर आरूढ कसे होणार! हे महाप्राज्ञा, तूं रथारूढ होऊन अश्वांना स्थिर केलेंस म्हणजे पुण्यात्मे जसे सन्मार्गाला अनुसरतात तसा मी रथारूढ होईन.

वैशंपायन—हे राजा, पार्थाचें हें वचन ऐकून शक्रसारथि मातलि रथारूढ झाला व रज्जु ओढून अश्वांचें नियमन करूं लागला. तेव्हां अर्जुन संतुष्ट मनानें गंगेंत स्नान करून शुचिर्भूत झाला व यथाविधि जप आणि पितरांचें तर्पण करून शैलराज मंदर पर्वताची स्तुति करूं लागला.

तो म्हणाला—हे अद्रिराज, तूं स्वर्गाची इच्छा करणारे पुण्यशील साधु व पुण्यकर्मे करणारे मुनि, यांचें सर्वदा आश्रयस्थान आहेस. हे शैला, तुझ्या प्रसादानें ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य क्लेशरहित होऊन स्वर्गलोकीं देवांबरोबर संचार करितात. तुझ्या पृष्ठभागीं अनेक पवित्र तीर्थे आहेत. सर्व मुनि तुझा आश्रय करितात. मी तुझ्या शिखरावर आजवर सुखानें राहिलों. आतां मी तुझा निरोप घेऊन जातों. तुझ्या शिखरावर असलेले अनेक लताकुंज, नद्या निर्झर, आणि पवित्र तीर्थे मीं पाहिलीं. त्याचप्रमाणें सुवासिक व रुचकर फळें मीं भक्षण केलीं. तुझ्या निर्झरांतून वहाणारें अमृतासारखें मधुर व निर्मल उदक मीं प्राशन केलें. हे प्रभो, पित्याच्या अंकावर लोळणाऱ्या बालकाप्रमाणें मीं तुझ्या पृष्ठभागावर क्रीडा केली. अप्सरागणांनीं व्याप्त असलेल्या आणि ब्रह्मघोषानें नादित झालेल्या तुझ्या या श्रेष्ठ शिखरावर मी सुखानें वास केला.

( २ ) हे राजा, शत्रूंचा संहार करणारा अर्जुन याप्रमाणें त्या शैल्यराजाचा निरोप घेऊन दिव्य रथावर जेव्हां आरूढ झाला. त्या वेळीं तो प्रकाशणाऱ्या सूर्याप्रमाणें शोभला.

अद्भुत कर्मे करणारा कुरुनंदन त्या श्रेष्ठ रथांत बसून मोठ्या संतोषानें अंतरिक्षांत जसा वर वर जाऊं लागला तसा तसा तो धर्माचरणी मानवांनाहि दिसेनासा झाला. पार्थानें त्या स्वर्गमार्गांत हजारों आश्चर्यकारक विमानें पाहिलीं.

राजा, तेथील लोक सूर्य, चंद्र किंवा अग्नि यांनीं प्रकाशित होत नसून ते स्वतःच्या पुण्यप्रभावानें स्वतःच प्रकाशतात. तेच आपल्याला पृथ्वीवरून नक्षत्र-

रूपानें प्रकाशत असलेले दिसतात. त्यांचीं शरीरें अतिशय मोठीं असूनहि दूर अंतरामुळें आपल्याला तीं या लोकीं दीपाप्रमाणें लहान भासतात.

त्या बुद्धिमान् अर्जुनानें तेथें आपापल्या स्थानीं स्वतःच्या दिप्तीनें प्रकाशित होणारे राजर्षि, सिद्ध, धारातीर्थी पडलेले वीर, तपानें स्वर्गलोकीं गेलेले तपस्वी, सूर्यासारखे तेजस्वी असलेले हजारों गंधर्व, त्याचप्रमाणें गुह्यक, ऋषि व अप्सरांचे गण, यांचे सूर्याप्रमाणें तेजस्वी लोक पाहिले व अत्यंत विस्मित होऊन त्याविषयीं मातलीला प्रश्न केला.

तेव्हां इंद्राचा सारथि त्याला प्रेमानें म्हणाला—" हे पार्था, हे सर्व पुण्यवान् प्राणी आपापल्या स्थानीं स्थित आहेत. हे प्रभो, त्यांनाच तूं भूतलावरून तारारूपानें पाहतोस "

त्यानंतर पार्थानें इंद्रलोकाच्या द्वारांत उभा असलेला विजयी ऐरावत पाहिला. त्याला कैलासाच्या शिखरांप्रमाणें चार शुभ्र दंत होते. शेवटीं त्या पांडुनंदनानें सिद्धमार्गाचें आक्रमण करून प्राचीन मांधात्याप्रमाणें त्या सर्व लोकांचेंहि उल्लंघन केलें. याप्रमाणें जातां जातां तो यशस्वी पांडुनंदन स्वर्गलोकीं जाऊन पोंचला व तेथें त्यानें इंद्राची अमरावती नगरी पाहिली. ३. ५. ४२.

---

## अध्याय ४३ वा.

[ १ पार्थाचा अमरावतींत प्रवेश व सत्कार. ]

(१) **वैशंपायन**—हे राजा, पार्थानें सिद्ध-चारणांनीं सेवन केलेली ती रम्य नगरी अवलोकन केली. ती सर्व ऋतूंत येणाऱ्या पुष्पांनीं व पवित्र वृक्षांनीं सुशोभित झाली होती. तेथील कुसुमांच्या मधुर सुवासानें सुगंधित झालेला मंद वायु सर्वत्र वहात होता. तेथें दिव्य अप्सरोगणांनीं सेवन केलेलें नंदनवनहि त्यानें पाहिलें. तेथील दिव्य कुसुमांनीं युक्त असलेले वृक्ष हालत असल्यामुळें जणुकाय ते आपल्याला बोलावीतच आहेत, असें त्याला वाटलें.

अशा प्रकारचा तो पुण्यवानांचा लोक तीव्र तप आचरिल्यावांचून दृष्टीं पडणें शक्य नाहीं. तो लोक अग्निहोत्र न करणारांस, युद्धांतून पराङ्मुख होणारांस, यज्ञ न करणारांस, वेदश्रुति वर्ज्य करणारांस, तीर्थांत स्नान न करणारांस व यज्ञ-दानांपासून बहिष्कृत केलेल्या पाप्यांस दिसणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें

यज्ञांचा विध्वंस करणारे, शूद्र, मद्यपान करणारे, गुरुपत्नीगमन करणारे, मांसाशन करणारे व इतर दुरात्मे यांस तो पुण्यलोक पहातां येणें शक्य नाहीं.

त्या महाबाहु अर्जुनानें श्रुतिमनोहर गीतानें नादित झालेलें तें दिव्य वन पहात शक्राच्या त्या प्रिय नगरींत प्रवेश केला. तेथें त्यानें असंख्य कामगामी देवविमानें स्थित असलेलीं व समीप येत असलेलीं पाहिलीं.

त्या वेळीं हृष्ट झालेले देव, सिद्ध, गंधर्व व परमर्षि यांनीं मंगल आशीर्वादांनीं, गंधर्व व अप्सरा यांजकडून स्तुति केल्या जाणाऱ्या व पवित्र सुगंधित वायूनें सेविलेल्या त्या पांडुपुत्राचा मोठा सत्कार केला. दिव्य वाद्यें वाजवून त्याची स्तुति केली. इतक्यांत तो पराक्रमी पांडव शंख व दुंदुभी यांनीं दुमदुमून गेलेल्या ' सुरवीथी '-नामक नक्षत्रमार्गास प्राप्त झाला.

तेव्हां इंद्राज्ञेनें सर्व बाजूंनीं स्तुति केला जाणारा तो कुरुनंदन पार्थ साध्य, दहा विश्वेदेव, एकुणपन्नास मरुत्, दोन अश्विनिकुमार, बारा आदित्य, आठ वसु, अकरा रुद्र त्याचप्रमाणें शुद्धचरित ब्रह्मर्षि, दिलीपप्रभृति अनेक राजर्षि, तुंबुरु, नारद हाहा-हूहू गंधर्व या सर्वांना भेटून देवराज शक्रापाशीं आला व त्या श्रेष्ठ रथांतून उतरून आपला पिता जो साक्षात् देवेंद्र त्याला भेटला.

त्या वेळीं त्या पाकशासन इंद्रावर सुंदर सुवर्णदंडानें युक्त असलेलें शुभ्र छत्र धरिलें होतें. दिव्य सुवासानें सुगंधित केलेल्या पंख्यानें त्याला वारा घालून विश्वावसुप्रभृति मुख्य गंधर्व स्तुति आणि वंदन यांच्यायोगें त्याची परिचर्या करीत होते. श्रेष्ठ द्विज ऋक्, यजुष्, आणि साम यांतील ऋचांनीं शक्राची स्तुति करीत होते.

तेव्हां पराक्रमी कौंतेयानें इंद्रापाशीं जाऊन त्याला शिरसा प्रणाम करितांच त्या सुरेंद्रानेंहि आपल्या पुष्ट बाहूंनीं त्याला जवळ घेऊन आलिंगन दिलें व आपल्या दोन्ही हातांनीं त्याला जवळ घेऊन देवर्षिगणानें सेवन केलेल्या पवित्र शक्रासनावर आपल्या संनिध बसविलें. नंतर त्या देवेंद्रानें पार्थाच्या मस्तकाचें अवघ्राण करून विनयानें नम्र झालेल्या त्या धनंजयाला आपल्या मांडीवर घेतलें.

याप्रमाणें सहस्रनेत्र इंद्राच्या आज्ञेनें पार्थ शक्रासनावर बसला असतां तो जणुं काय दुसरा इंद्रच भासला. त्यानंतर वृत्राचा वध करणाऱ्या सुरेंद्रानें आपल्या सुगंधयुक्त पवित्र हस्तानें अर्जुनाच्या शुभ मुखाला स्पर्श करून त्याचें

सांत्वन केलें. धनुष्याच्या प्रत्यंचेचे घट्टे पडून कठिण झालेल्या व सुवर्णाच्या स्तंभाप्रमाणें असलेल्या त्याच्या दोन्ही बाहूंना आपल्या वज्रचिह्नानें युक्त असलेल्या हातानें कुरवाळिलें आणि त्याच्या अंगावरून हात फिरविला.

कृष्ण चतुर्दशीच्या दिवशीं एका राशींत आलेले चंद्र-सूर्य आकाशाला जसे भूषवितात, त्याप्रमाणें एका आसनावर बसलेल्या त्या उभयतांनीं देवसभेला शोभविलें. तेथें सामगायनांत कुशल असलेल्या तुंबुरु-प्रभृति गंधर्वश्रेष्ठांनीं उत्कृष्ट गायन केलें व घृताची, मेनका, रंभा, पूर्वचित्ति, स्वयंप्रभा, उर्वशी, मिश्रकेशी, दंडगौरी, वरूथिनी, गोपाली, सहजन्या, प्रजागरा, चित्रसेना, चित्रलेखा, सहा, मधुरस्वरा, या व इतरहि असंख्य अप्सरांनीं नयनमनोहर नृत्य केलें. त्या सर्वहि लावण्यसंपन्न असून आपल्या विविध हावभावांनीं सिद्धांचेंहि चित्त आकर्षण करीत असत. ३. ५. ४३.

---

## अध्याय ४४ वा.

[ १ अर्जुनाचा स्वर्गलोकांतील वास व अस्त्रादिकांची प्राप्ति. ]

( १ ) वैशंपायन—राजा, याप्रमाणें शक्राच्या आज्ञेनें गंधर्वांसह त्या सर्व देवांनीं पार्थाचा पाद्यादिकांनीं उत्तमप्रकारें सत्कार केला व त्या राजपुत्राकडून पाद्य-आचमनीयांचा स्वीकार करवून त्याचा इंद्रभुवनांत प्रवेश करविला. याप्रमाणें सत्कार केला गेलेला तो पार्थ आपल्या पितृगृहीं राहिला आणि त्या मध्यम पांडवानें प्रयोग व उपसंहार यांसह महा-अस्त्रांचें शिक्षण घेतलें. त्याचप्रमाणें इंद्राच्या हातांतील त्याचें अतिशय प्रिय व शत्रूला दुःसह असलेलें वज्रास्त्र आणि मेघासारखी गर्जना करणारा अशनि यांचेंहि त्यानें ग्रहण केलें. त्या अशन्यस्त्राचा प्रयोग केला असतां त्या प्रदेशीं अकालीं मेघ उत्पन्न होतात व मयूर नृत्य करूं लागतात.

राजा, धर्मात्मा पार्थ इंद्राच्या आज्ञेवरून पांच वर्षें स्वर्गांतील ऐश्वर्य भोगीत सुखानें जरी राहिला होता तरी भ्रात्यांच्या स्मरणानें तो वारंवार उद्विग्न होत असे. म्हणून एकदा कृतास्त्र झालेल्या अर्जुनाला इंद्र म्हणाला—"हे कौंतेया, तूं चित्रसेन गंधर्वापासून गायन व नृत्य यांचें शिक्षण संपादन कर. तसेंच, मनुष्यलोकीं दुर्लभ असलेल्या देवलोकींच्या वादनाचेंहि ज्ञान तूं प्राप्त करून घे. त्यायोगें तुझें पुढें कल्याण होईल."

इतकें बोलून त्या पुरंदरानें पार्थाला आपला सखा जो चित्रसेन त्याच्या स्वाधीन केलें. त्याच्या सहवासांत पार्थ गीत, नित्य व वादन यांचें शिक्षण घेत सुखानें काल कंठीत होता; तरी द्यूतापासून उत्पन्न झालेल्या क्लेशांचें वारंवार स्मरण होत असल्यामुळें त्याच्या मनाला शांति प्राप्त झाली नाहीं. दुःशासन व सौबल शकुनि यांच्या वधाची इच्छा करणारा तो नेहमीं खिन्न होत असे.

तथापि चित्रसेनाशीं अतिशय स्नेह जडल्यामुळें नृत्य आणि वादन यांचें थोडें थोडें शिक्षण घेऊन अल्पकालांतच तो सर्व प्रकारच्या गायन-वादनांत प्रवीण झाला. परंतु माता कुंती व युधिष्ठिरादि भ्राते यांच्या वारंवार होणाऱ्या स्मरणामुळें त्याच्या मनाला इंद्रभुवनांतहि शांति मिळाली नाहीं. ३. ५. ४४.

---

## अध्याय ४५ वा.

[१ इंद्राच्या आज्ञेनें चित्रसेनाचें उर्वशीकडे गमन. २ पार्थाकडे जाण्याचा संकेत.]

(१) **वैशंपायन**—हे राजा जनमेजया, त्यानंतर पार्थाची दृष्टि उर्वशीकडे गेली आहे, असें पाहून देवेंद्र एकांतामध्यें चित्रसेनाला म्हणाला—"हे गंधर्वराज, मी तुला अप्सराश्रेष्ठ उर्वशीकडे पाठवीत आहें. तूं तिकडे जा आणि तिला धनंजयापाशीं जाऊन त्याच्या सेवेंत सादर होण्यास सांग. माझ्या आज्ञेनें हा पुरुषश्रेष्ठ अस्त्रविद्येंत जसा निष्णात झाला आहे, तसेंच तूं त्याला स्त्रीसमागमांतहि प्रवीण कर."

वासवाचे हे शब्द ऐकून 'ठीक आहे' असें बोलून व इंद्राची अनुज्ञा घेऊन तो गंधर्वराज त्या श्रेष्ठ उर्वशीपाशीं गेला. तिला पाहून व ओळखून तो अतिशय हृष्ट झाला. तिनें त्याचें सत्कारपूर्वक स्वागत करून सुखासनावर बसविलें असतां तो चित्ररथ स्मित करून तिला म्हणाला—"हे सुंदरि, स्वर्गाधिपति इंद्राच्या आज्ञेनें तुझ्या अनुग्रहाच्या इच्छेनें मी तुजकडे आलों आहें, हें लक्षांत असूं दे.

हे उर्वशि, महेंद्र व वरुण यांच्या उपमेस योग्य असलेला वीर अर्जुन तुला ठाऊकच आहे. तो पराक्रमी पार्थ श्री, शील, रूप, व्रत, दम इत्यादि सहज गुणांनीं युक्त आहे, अशी त्याची देव व मनुष्य यांत प्रसिद्धि आहे. तो अति तेजस्वी व शूर आहे. सामान्य पुरुषांपेक्षां याच्या ठिकाणीं गुरुशुश्रूषा व धारणाशक्ति आठपट अधिक आहे.

तो क्षमावान् व मत्सरशून्य आहे. त्यानें सांग चार वेद व उपनिषदें यांचें अध्ययन केलेलें आहे. तो ब्रह्मचर्य, अनालस्य, मातेच्या व पित्याच्या कुलापासून प्राप्त झालेले गुण व तारुण्य यांनीं संपन्न आहे. इंद्राप्रमाणें तो एकटाच सर्व त्रिभुवनाचें रक्षण करण्यास समर्थ आहे. तो आत्मश्लाघा कधीं करीत नाहीं. तो नेहमीं मान्यांचा सत्कार करितो. सूक्ष्म व सूक्ष्मतर धर्महि एखाद्या स्थूल पदार्थाप्रमाणें त्याला तत्काल ज्ञात होतात. तो प्रियभाषण करणारा वीर सुहृदांना विविध प्रकारच्या अन्न-पानांनीं तृप्त करीत असतो. तो सत्यप्रतिज्ञ पार्थ पूजार्ह, श्रेष्ठ वक्ता, स्वरूपवान् व अहंकाररहित आहे. तो भक्तांवर अनुकंपा करणारा धनंजय सुखद व म्हणूनच प्रेमास्पद आहे. तो सत्यप्रिय असून सर्व इष्ट गुणांनीं महेंद्र व वरुण त्यांच्या तोडीचा आहे. अशा त्या वीर अर्जुनाला स्वर्गातील अप्सरासंगाचा लाभ मिळावा म्हणून इंद्राच्या आज्ञेनें तो तुजपाशीं येईल. तेव्हां हे कल्याणि, तुझ्या कामनेनें आलेल्या त्या धनंजयाचा तूं मनोरथ पूर्ण कर."

(२) चित्रसेनाचें हें भाषण ऐकून त्या निष्पाप उर्वशीनें स्मित केलें व हा आपल्यावर फार मोठा अनुग्रहच आहे, असें मानून प्रेमानें त्याला म्हटलें—"हे गंधर्वराज, तूं अर्जुनाच्या गुणांचें जें अंशतः वर्णन केलेंस तें ऐकून पूर्वींच कामव्यथेनें व्याकुळ झालेली मी त्याला वरणार नाहीं, असें कसें होईल ! देवेंद्राची आज्ञा व तुझी इच्छा मला शिरसामान्य आहे. फाल्गुनाचें गुणवर्णन ऐकून मीं अतिशय कामविह्वल झालें आहें. यास्तव मीच स्वतः मोठ्या प्रेमानें पार्थापाशीं जाईन. तूं खुशाल परत जा." ३. ५. ४५.

---

## अध्याय ४६ वा.

[ १ उर्वशीचें पार्थभवनांत गमन. २ तिच्याशीं अर्जुनाचा संवाद. ३ उर्वशीनें त्यास दिलेला शाप. ४ इंद्रानें केलेलें अर्जुनाचें सांत्वन. ]

(१) वैशंपायन—राजा, याप्रमाणें चित्रसेन गंधर्वाला निरोप देऊन उर्वशीनें त्याला संतुष्ट केलें. त्यानंतर पार्थाच्या समागमासाठीं उत्सुक झालेल्या त्या अप्सरेनें स्नान केलें. मदनबाणांनीं पीडिलेल्या त्या शुचिस्मितेनें मनोहर अलंकार आणि प्रफुल्लित सुवासिक पुष्पमाला धारण केल्या व दिव्य आस्तरणांनीं सुशोभित केलेल्या

विस्तीर्ण शय्येवर ती देवस्त्री विक्षिप्त चित्तानें अर्जुनाचें चिंतन करीत बसली. ती महाभागा आपल्या संकल्पानेंच अर्जुनाला कल्पून मनांतल्या मनांत त्याला रमवूं लागली. सूर्यास्त होऊन निशा प्रवृत्त झाली. प्रदोषकाळींच चंद्रोदय झाला. तेव्हां ती सुंदरी आपल्या मंदिरांतून बाहेर पडून अर्जुनाच्या गृहाकडे निघाली. मार्गानें जात असतां ती अप्सरा आपल्या मृदु, दीर्घ व कुरळ्या केसांत गुंफलेल्या सुगंधी पुष्पांस वारंवार हातानें स्पर्श करूं लागली. अर्जुनाला उद्देशून ती नेत्रकटाक्ष फेकून स्वतःशींच बोलूं लागली. आपली सौम्य कांति व शशिवदन यांच्या योगानें ती जणुंकाय चंद्राशींच स्पर्धा करीत होती. दिव्य अंगराग व चंदनाची उटी यांच्या योगानें स्वभावतःच मनोहर असलेलें तिचें वक्षःस्थल अधिकच शोभलें व अर्जुनाच्या चिंतनानें स्फुरण पावूं लागलें.

प्रत्येक पावलाला तिचें ऊर्ध्व शरीर अवयवांच्या भारामुळें क्षुब्ध व नम्र होत असे. तिचा मध्यभाग उदरस्थ त्रिवलीनें फारच शोभत होता. पुष्ट व विस्तीर्ण नितंबप्रदेश अधोमुख पर्वतशिखराप्रमाणें भासत होता. पार्थाच्या समागमेच्छेनें तिचे सर्व अवयव क्षुब्ध झाले असून त्या वेळीं ती आपल्या अंगकांतीनें दिव्य ऋषींचेंहि मन क्षुब्ध करीत होती.

तिनें परिधान केलेलें शुभ्र वस्त्र, तिचा निर्दोष जघनप्रदेश, कमलासारखें रक्तवर्ण पादतल, अंगुलि, ऊरु, जंघा, अल्प प्रमाणांत केलेल्या मद्यप्राशनामुळें उत्पन्न झालेला थोडासा मद व विविध विलास यांच्या योगानें ती उर्वशी अधिकच प्रेक्षणीय झाली.

मार्गांत सिद्ध, चारण, गंधर्व त्या विलासिनीकडे पाहूं लागले. अनेक आश्चर्यांनीं युक्त असलेल्या स्वर्गांतहि ती भामिनी अतिशय दर्शनीय झाली. त्या वेळीं त्या उर्वशीनें अति विरल नीलवर्ण उत्तरीयानें आपला रम्य देह आच्छादित केला होता, त्यामुळें ती मेघाच्छादित चंद्रलेखेप्रमाणें भासली.

( २ ) हे पारिक्षिता, याप्रमाणें अनेक संकल्प करून पांडुपुत्र अर्जुनाच्या भवनाकडे निघालेली ती प्रसिद्ध अप्सरा मनोवेगानें किंवा वायुवेगानें एका क्षणांत त्याच्या द्वारापर्यंत येऊन पोंचली. द्वारपालांनीं अर्जुनाला ती आल्याचें निवेदन केलें. तें ऐकून धर्मज्ञ अर्जुन मनांत साशंक झाला व रात्रीं आपल्या मनोहर मंदिरांत आलेल्याहि तिचें स्वागत करण्यासाठीं तो बाहेर आला. पण त्या कामुकीचा वेष पाहून तो लज्जित झाला. त्या भामिनीकडे त्याला पहावेना.

तथापि त्या वीरानें मोठ्या धैर्यानें अभिवादन करून गुरूप्रमाणें तिचा सत्कार केला व तो पापभीरु पांडुपुत्र तिला म्हणाला—" हे श्रेष्ठ अप्सरे, मी तुला शिरसाष्टांग प्रणाम करितों. हे देवि, तुझी काय आज्ञा आहे ! हा तुझा दास तुझ्यापुढें उभा आहे."

राजा, पार्थाचें हें वचन ऐकून मदनवश झालेली उर्वशी देहभान विसरली व तिनें चित्ररथ गंधर्वाचें सर्व भाषण त्याला निवेदन केलें. उर्वशी म्हणाली— " हे नरोत्तमा, चित्रसेन गंधर्वानें मला काय सांगितलें तें मी तुला सविस्तर सांगतें, ऐक."

तूं जेव्हां या देवलोकीं आलास, तेव्हां देवेंद्राच्या सभेंत तुझ्या सत्कारार्थ परमोत्सव चालला असतां तेथें रुद्र, आदित्य, अश्विनिकुमार, वसु, महर्षि व श्रेष्ठ राजर्षि यांचे संघ, सिद्ध, चारण, यक्ष, महोरग इत्यादि सर्व आपापल्या योग्यतेप्रमाणें स्व-स्व-स्थानीं विराजमान झाले. गंधर्व दिव्य व मनोहर गायन करूं लागले, वादक दिव्य वाद्यें वाजवूं लागले व अप्सरा नृत्य करूं लागल्या. त्या वेळीं तूं मजकडे अनिमिष दृष्टीनें पहात होतास. माझ्या सारख्या अनेक अप्सरा नृत्य करीत असतांना तूं मजकडेच पहात आहेस, हें इंद्राच्या लक्षांत आलें.

त्यानंतर देवांचा तो महोत्सव समाप्त झाला. सर्व देव तुझ्या पित्याच्या आज्ञेनें आपापल्या भवनास निघून गेले. सर्व श्रेष्ठ अप्सराहि स्वस्थानीं गेल्या. हे शत्रुनाशका अर्जुना, तुझ्या पित्यानें स्वस्थानीं जाण्याची आज्ञा केली असतां इतर अप्सरांबरोबर मीहि स्वगृहीं गेलें. नंतर बऱ्याच दिवसांनीं चित्रसेन गंधर्व इंद्राच्या आज्ञेनें मजकडे आला व म्हणाला—" हे सुंदरि, मला देवेंद्रानें तुजकडे पाठविलें आहे. यास्तव हे वीरा, तूं देवेंद्राचें, माझें व आपलेंहि प्रिय कर. तूं रणांत इंद्राप्रमाणें शूर व सर्वदा उदार असलेल्या पार्थाची कामना कर."

धनंजया, देवेंद्राचें हें आज्ञावचन प्रमाण मानून त्याच्या अनुज्ञेनें मी तुजपाशीं आलें आहें. हे वीरा, तुझ्या गुणांनीं माझ्या चित्ताचें हरण केलें आहे. मी कामवश झालें आहें. फार दिवसांपासून मी तुझ्या समागमाची इच्छा करीत आहें. यास्तव तुझी सेवा करण्यासाठीं आलेल्या माझा मनोरथ तूं पूर्ण कर."

राजा जनमेजया, श्रेष्ठ उर्वशीचें असें अकल्पित भाषण ऐकून अर्जुन अतिशय लज्जित झाला. त्या स्वर्गलोकामध्यें निवास करणारा तो महात्मा दोन्ही हातांनीं

आपले कान झांकून त्या अप्सरेला म्हणाला—" हे भामिनि, मी असल्या दुष्कर्मामध्यें प्रवृत्त होण्यास योग्य आहें, असें समजून तूं जें मला बोलत आहेस. तें श्रवण करण्यासहि मी समर्थ नाहीं. असलें भाषण ऐकण्यापेक्षां माझें हें श्रवणेंद्रिय बधिर झालें तरी चालेल. हे सुभगे, खरोखर तूं मला गुरुपत्नीसमान आहेस. हे सुंदरि, मला जशी महाभागा कुंती किंवा इंद्राणी शची पूज्य आहे, तशीच तूंहि आहेस, यांत कांहीं शंका नाहीं. हे शुभे, त्या देवसभेमध्यें मी विशेषतः तुजकडेच जो पहात होतों, त्याचें सत्य कारण मी तुला सांगतों, ऐक. 'ही प्रसन्नमुखी उर्वशी माझ्या पौरववंशाची जननी आहे' या आशयानें प्रसन्न-चित्त होऊन मी तुजकडे आदरानें पहात होतों. यास्तव हे कल्याणि, तूं मज-विषयीं अशी विपरीत कल्पना करूं नको. तूं माझ्या वंशाची वृद्धि करणारी आहेस. त्यामुळें हे अप्सरे, तूं मला माझ्या गुरूहूनहि अधिक आदरणीय आहेस. माझा पिता पांडु, शांतनु, भरत, इत्यादि गुरूंहूनहि तूं गुरुतर आहेस."

हें ऐकून उर्वशी म्हणाली--हे शक्रनंदना, आम्ही देवलोकांतील सर्व अप्सरा निष्प्रतिबंध आहों. आम्ही कोणत्याहि पुरुषाच्या प्रतिबंधांत रहात नाहीं. आमच्याशीं समागम केल्यानें कोणाहि पुरुषाला दोष लागत नाहीं. यास्तव हे वीरा, तूं मला आपल्या गुरुस्थानीं मानूं नको. पुरुवंशांतील जे पुत्र-पौत्र तपः-सामर्थ्यानें देवलोकीं आले आहेत ते सर्व आमचें रंजन करितात व त्यांना त्यापासून कांहीं दोषहि लागत नाहीं. यास्तव हे मानदा, मदनानें संतप्त व आर्त होऊन मोठ्या भक्तीनें तुजसमीप आलेल्या माझा त्याग करूं नको. हे धनु-र्धरा, मजवर प्रसन्न हो व माझें सेवन कर.

अर्जुन—हे पूज्य उर्वशी, तूं माझें सत्य भाषण ऐक. मी जें बोलत आहें तें सर्व दिशा, विदिशा व सर्व देवताहि ऐकोत. हे निष्पापे, आज मला जशी कुंती, माद्री किंवा शची श्रेष्ठ वाटत आहे, तशीच माझ्या वंशाची जननी असलेली तूंहि मला पूज्य आहेस. हे अप्सरे, तुझ्या चरणांवर मस्तक ठेवून मी तुला शरण आलों आहें. यास्तव तूं आतां जा. तूं मला मातेप्रमाणें पूज्य असल्यामुळें पुत्राप्रमाणें माझें रक्षण करणेंच तुला उचित आहे.

( ३ ) वैशंपायन—राजा पारिक्षिता, पार्थानें असें सत्य व नम्र भाषण केलें असतांहि कामवश झालेल्या उर्वशीला अतिशय क्रोध आला. ती आपलें देहभान विसरली. तिचें अंग थरथर कापूं लागलें व त्या अबलेनें आपल्या भ्रुकुटि वक्र करून वीर धनंजयाला असा शाप दिला—

उर्वशी—हे मूढा, मी तुझ्या पित्याच्या अनुज्ञेनें स्वतः तुझ्या गृहीं चालून आलें असतां तूं ज्या अर्थी कामवश झालेल्या माझें अभिनंदन करीत नाहींस, त्या अर्थी तूं स्त्रीसमूहांत मानरहित नर्तक होऊन व 'अपुरुष' अशा संज्ञेस पात्र होऊन 'क्लीबा'-प्रमाणें संचार करशील.

राजा, त्या पापभीरु अर्जुनाला असा शाप देऊन उर्वशी मोठ्या त्वेषानें स्वगृहीं परत आली. त्या वेळीं तिचे दोन्ही ओंठ थरथर कांपत असून ती दीर्घ व उष्ण निःश्वास सोडीत होती. याप्रमाणें ती अप्सरा अकृतार्थ होऊन परत गेली असतां तिच्या शापवचनानें व्यथित झालेला वीर अर्जुनहि त्वरेनें चित्रसेन गंधर्वाकडे गेला व त्यानें रात्रीं घडलेलें उर्वशीचें सर्व वृत्त त्यास निवेदन केलें व तिनें क्रुद्ध होऊन दिलेला शापहि त्या आपल्या मित्राला पुनः पुनः सांगितला.

( ४ ) तेव्हां अर्जुनासारख्या वीराला असा शाप होणें ही त्याची फारच मोठी हानि आहे, हें जाणून चित्रसेनानेंहि देवराज इंद्राला तें सर्व इत्थंभूत वृत्त तत्काल निवेदन केलें. त्या वेळीं पुत्रवत्सल इंद्रानें त्या लोकोत्तर वीराला एकांतांत बोलावून व शुभवचनांनीं त्याचें सांत्वन करून मोठ्या संतोषानें त्यास म्हटलें—"वत्सा, तुझ्या सारख्या लोकोत्तर जितेंद्रिय पुत्रामुळें आज तुझी जननी पृथा सुपुत्रवती झाली आहे. हे महाबाहो, तूं आज आपल्या स्वाभाविक धैर्यानें मोठमोठ्या ऋषींनाहि जिंकलें आहेस.

हे मानदा, उर्वशीनें तुला जो शाप दिला आहे, तोहि योग्य प्रसंगीं तुझें मोठें कार्य साधील. तो तुला प्रतिकूल न होतां अनुकूलच होईल. द्रौपदीसह तुम्हां पांच भ्रात्यांना भूलोकीं तेराव्या वर्षीं एक वर्षभर अज्ञातवासांत रहावयाचें आहे. त्या वेळीं तूं या शापाचें फल भोगून त्याची निवृत्ति कर. त्या प्रसंगीं तूं नर्तकवेषानें व अपुरुषत्वानें एक वर्ष राहिलास म्हणजे तुझें पुरुषत्व तुला पुनः प्राप्त होईल."

राजा इंद्रानें त्या शत्रुनाशक अर्जुनाला असें सांगितलें असतां त्याला परम आह्लाद झाला. इंद्राच्या अनुग्रहानें उर्वशीचा प्रतिकूल शापहि अनुकूल झालेला पाहून त्या शापाचाहि त्यानें फारसा विचार केला नाहीं. त्यानंतर तो पांडुपुत्र धनंजय स्वर्गभवनांत यशस्वी चित्रसेनगंधर्वासह रममाण झाला.

वीर कौंतेयाचें हें अलौकिक चरित्र जो श्रवण करील त्याचें मन पापकर्मामध्यें कधींहि रत होणार नाहीं. देवेंद्रपुत्र जिष्णूचें हें दुष्कर पवित्र चरित्र ऐकून

भूलोकांतील नरेंद्र मद, दंभ, आसक्ति इत्यादि दोषांनीं रहित होतात व मरणोत्तर देवलोकीं जाऊन अनेकप्रकारचीं सुखें अनुभवितात. ३. ५. ४६

---

## अध्याय ४७ वा.

[ १ लोमशाचें स्वर्गलोकीं आगमन. २ त्यास अर्जुनाचें माहात्म्यकथन. ३ त्याच्याबरोबर युधिष्ठिराला पाठविलेला संदेश. ]

**वैशंपायन**—हे भारता, सुप्रसिद्ध लोमश महर्षि भिन्न भिन्न लोकांतून भ्रमण करीत असतां एकदा इंद्राच्या दर्शनेच्छेनें स्वर्गलोकीं गेला. त्या महामुनीनें देवराजाचें मोठ्या आदरानें दर्शन घेतलें. त्यास नमस्कार केला व वासवाच्या अर्ध्यासनावर बसलेल्या पांडवालाहि त्यानें पाहिलें. इंद्रानें त्या महर्षीला श्रेष्ठ आसनावर बसावयास सांगितलें असतां महर्षींकडून सत्कार केला जाणारा तो द्विजश्रेष्ठ इंद्रानें दिलेल्या पवित्र आसनावर बसला व इंद्राच्या आसनावर बसलेल्या पार्थाला पाहून ' हा पृथापुत्र क्षत्रिय असतांना इंद्रासनावर बसण्यास समर्थ कसा झाला ! याचें असें कोणतें सुकृत आहे, यानें असे कोणते लोक जिंकिले आहेत कीं, ज्यामुळें याला हें सर्व देवांना पूज्य असलेलें श्रेष्ठ स्थान प्राप्त झालें !' असा विचार त्याच्या मनांत आला.

( २ ) तेव्हां त्याचा आशय जाणून शचीपति इंद्र त्यास हंसत म्हणाला— " ब्रह्मर्षे, तुझ्या मनांत जो विकल्प आला आहे त्याचें समाधान मी तुला सांगतों, ऐक. हा सामान्य मर्त्य असून आपल्या पूर्व मिश्रकर्मामुळें मनुष्यत्वाला प्राप्त झालेला नाहीं. हा महाबाहु अर्जुन कुंतीच्या ठिकाणीं झालेला माझा पुत्र आहे. या वेळीं हा कांहीं कारणानें दिव्य अस्त्रें संपादन करण्याकरितां येथें आला आहे. हे महर्षे, तूं या पुराण ऋषिश्रेष्ठाला ओळखीत नाहींस. यास्तव हे ब्राह्मणा, हा कोण आहे व मनुष्यलोकीं कां अवतीर्ण झाला आहे तें मी तुला सांगतों.

महर्षे, नर व नारायण या नांवांनीं प्रसिद्ध असलेले जे दोन पुराण ऋषिश्रेष्ठ तेच हे हृषीकेश व धनंजय आहेत. नर-नारायण ऋषि त्रिभुवनांत प्रख्यात आहेत. तेच या वेळीं पवित्र पृथ्वीवर देवकार्यासाठीं अवतीर्ण झाले आहेत.

देव किंवा महात्मे ऋषि यांना जें ' बद्री ' या नांवानें प्रसिद्ध असलेलें आश्रमपद कधीं दिसणेंहि शक्य नाहीं तेंच त्या विष्णूचें व जिष्णूचें पूर्वी निवास-

स्थान होतें. त्या पवित्र आश्रमपदापासूनच सिद्ध व चारण यांनीं सेवन केलेली गंगा प्रवृत्त झाली आहे. हे ब्रह्मर्षे, ते दोघे अति तेजस्वी नर-नारायण माझ्या प्रार्थनेला मान देऊन भूलोकीं उत्पन्न झाले आहेत. हे दोघे पराक्रमी कृष्ण कृष्णेला निमित्त करून भूमीचा भार उतरतील.

'निवातकवच' या नांवानें प्रसिद्ध असलेले कांहीं उन्मत्त असुर वरदानानें मोहित होऊन आम्हां देवांचा नित्य द्वेष करितात. बल व दर्प यांनीं युक्त असलेले ते असुर आम्हां सुरांचा नाश करण्याचा यत्न करीत आहेत. ते देवांची मुळींच भीति बाळगीत नाहींत. कारण ब्रह्मदेवानें त्यांना तसाच वर दिलेला आहे. पाताळांत रहाणारे ते क्रूर दनुज महाबलाढ्य आहेत. सर्व देवसमूहहि त्यांच्याशीं युद्ध करण्यास समर्थ नाहीं.

हे लोमशा, भूलोकीं उत्पन्न झालेला जो श्रीमान् विष्णु तोच मधुसूदन हरि आहे. हाच भगवान् प्राचीन कपिल देव होय. हा देव नित्य अजित आहे. पूर्वीं या महात्म्यानें कपिलदेवाच्या रूपानें रसातळाला खणणाऱ्या सगरात्मजांना केवल आपल्या दृष्टिक्षेपानें जाळून टाकिलें. आतांहि तो भगवान् कृष्ण व हा पार्थ हे दोघे मिळून आमचें फार मोठें कार्य करणार आहेत.

भगवान् विष्णु केवल दृष्टिपातानेंच सर्व निवातकवचांना त्यांच्या अनुगांसह जाळून टाकण्यास समर्थ आहे. पण या अल्प कार्यासाठीं त्याच मधुसूदनाला पुनः विनंति करणें योग्य नाहीं. कारण तो कपिलमूर्ति देव फार मोठा तेजोराशि आहे. त्याला अशा क्षुद्र कार्यासाठीं क्षुब्ध केल्यास तो सर्व जगत् जाळून टाकील.

हा पार्थ त्या सर्व निवातकवचांचा नाश करण्यास समर्थ आहे. हा शूर पृथापुत्र समरांगणांत त्या देवशत्रूंचा नाश करून पुनरपि मनुष्यलोकीं जाईल. यास्तव हे द्विजेंद्रा, तूं माझ्या आज्ञेनें आतां अगोदर भूलोकीं जा व काम्यक-वनांत या वीरासाठीं उत्कंठित होऊन राहिलेल्या युधिष्ठिराला भेट आणि त्या सत्यप्रतिज्ञ धर्मात्म्याला माझ्या आज्ञेनें असें सांग—

(३) "हे वीरा, तूं अर्जुनासाठीं यत्किंचित्‌हि सचिंत होऊं नको. सर्व दिव्य अस्त्रांनीं संपन्न झालेला हा तुझा वीर भ्राता लौकरच परत येईल. अप्रतिम बाहुवीर्य व दिव्य अस्त्रें संपादन केल्यावांचून युद्धामध्यें भीष्म-द्रोणादिकांना जिंकतां येणार नाहीं. पण या महापराक्रमी अर्जुनानें आमच्या सर्व

अस्त्रांचें ग्रहण केलें आहे व तो महात्मा दिव्य नृत्य, वादित्र व गीत यांमध्येंहि निष्णात झाला आहे. देवांना असाध्य असलेलें फार मोठें देवकार्य करून हा लवकरच तुला येऊन भेटेल. तोंवर हे राजा, तूंहि आपल्या सर्व भ्रात्यांसह पवित्र तीर्थांचें दर्शन घे. भूलोकांतील पवित्र तीर्थांमध्यें स्नान करून तूं निष्पाप हो. म्हणजे तुझा सर्व मनःसंताप शांत होईल. तूं निष्पाप व सुखी होशील आणि हे राजेंद्रा, दीर्घकाल भूलोकींचें राज्य भोगशील.

हे द्विजश्रेष्ठा, तूं तपोबलानें युक्त आहेस, यास्तव तो धर्मपुत्र युधिष्ठिर भूलोकीं तीर्थाटन करीत असतां तूं त्याचें रक्षण कर. पर्वतांतील दुर्गम प्रदेश व विषम देश यांमध्यें भयंकर राक्षस रहातात व ते पांडवांसारख्या पुण्यात्म्यांना सतत पीडा देतात; यास्तव तूं त्यांच्यापासून द्रौपदीसह त्या पांडुपुत्रांचें रक्षण कर."

राजा, महेंद्रानें लोमशाला अशी आज्ञा केली असतां शुद्धचित्त अर्जुनहि त्या महर्षीस सद्गदित कंठानें म्हणाला—" हे महर्षे, आपण त्या पांडुनंदनाचें रक्षण करा व तो प्रतापी राजा आपल्याकडून सुरक्षित राहून तीर्थाटन करील व विविध दानें देईल असें करा."

राजा जनमेजया, तेव्हां तो महात्मा तपस्वी लोमश 'ठीक आहे' असें अर्जुनाला सत्यवचन बोलून भूलोकांतील काम्यक वनाकडे जावयास निघाला आणि त्या पवित्र वनांत येऊन पोंचल्यावर अनेक तापस व तीन भ्राते यांनीं परिवेष्टित असलेल्या सपत्नीक कुंतीपुत्र युधिष्ठिराला भेटला. ३. ५. ४७.

---

## अध्याय ४८ वा.

[ १ धृतराष्ट्राचा संजयाला इंद्रलोकस्थ अर्जुनाच्या पराक्रमाविषयीं प्रश्न.
२ अर्जुनाची प्रशंसा. ]

( १ ) **जनमेजय**—हे विप्रश्रेष्ठा, अमित तेजस्वी पार्थाचें हें अतिशय अद्भुत कर्म ऐकून महाप्राज्ञ धृतराष्ट्र काय म्हणाला ?

**वैशंपायन**—हे राजेंद्रा, पार्थ इंद्रलोकीं गेल्याची वार्ता ऋषिश्रेष्ठ कृष्ण-द्वैपायनाच्या मुखानें ऐकून अंबिकापुत्र धृतराष्ट्रानें संजयाला असा प्रश्न केला.

**धृतराष्ट्र**—हे सारथे, बुद्धिमान् पार्थाचें सर्व अलौकिक कृत्य मीं जरी ऐकिलें आहे, तरी तें तुझ्याकडून पुनः सविस्तर ऐकावें अशी माझी इच्छा आहे. माझा दुर्बुद्धि पुत्र मंदमति असून पापनिश्चयी आहे. ग्राम्य धर्मांत आसक्त असलेला तो

दुरात्मा सर्व पृथ्वीचा घात करील आणि जो महात्मा विनोदादि स्वच्छंद प्रसंगींहि सत्य भाषणच करितो व अर्जुनासारखा वीर ज्याचा योद्धा आहे, त्या युधिष्ठिराला त्रैलोक्यहि प्राप्त होईल, यांत संशय नाहीं.

( २ ) महा पराक्रमी पार्थ शिलेवर घांसून पाजळलेल्या तीक्ष्ण धारेच्या नाराच व कर्णिक बाणांचा वर्षाव करीत असतां जरारहित मृत्युहि त्याच्यापुढें उभा रहाण्यास धजणार नाहीं, मग दुसरा कोण समर्थ होणार !

हे संजया, दुराधर्ष पांडवांशीं युद्ध करण्याचा प्रसंग ज्यांच्यापुढें येऊन ठेपला आहे, ते माझे सर्व दुरात्मे पुत्र खरोखर मृत्यूच्या वश झाले आहेत. गांडीव धनुष्य धारण करणाऱ्या अर्जुनावर समरांत चाल करून जाणारा एखादा तरी रथी आमच्या पक्षांत आहे काय, याचा मी रात्रं-दिवस विचार करीत असूनहि मला अद्यापि त्याच्या तोडीचा एकहि धनुर्धर दिसत नाहीं.

द्रोण व कर्ण युद्धाला निघाले असतां भीष्महि समरांगणांत जाईल व त्यामुळें या लोकीं असंख्य वीरांचा नाश होईल, पण तेवढ्यानें आमचा विजय होईल, असें मला वाटत नाहीं. कारण कर्ण दयाळु व प्रमादशील आहे. द्रोणाचार्य गुरु वृद्ध आहे आणि पार्थ क्रोधी, बलवान्, उद्योगी व दृढपराक्रमी आहे. सर्व पांडव अस्त्रवेत्ते, शूर, महायशस्वी व अजिंक्य असून सार्वभौमत्वाची इच्छा करणारे आहेत. यास्तव त्यांचें तुमुल युद्ध होईल. त्यांत कोणत्याच पक्षाचा जय संभवत नाहीं. खरोखर फाल्गुनाच्या किंवा या वीरांच्या नाशानेंच हा संग्राम शांत होईल, त्यावांचून होणार नाहीं. परंतु अर्जुनाला जिंकणारा किंवा त्याचा वध करणारा या लोकीं कोणीहि विद्यमान नाहीं. शिवाय माझ्या पुत्रांवरील त्याचा क्रोध शांत होणार कसा ?

देवेंद्रासारख्या वीर धनंजयानें खांडव वनांत अग्नीला तृप्त केलें व राजसूय महायज्ञांत सर्व भूपालांना जिंकिलें. संजया, पर्वताच्या मस्तकावर पडलेलें वज्र पर्वताचा कांहीं तरी अवशेष ठेवितें, पण अर्जुनानें सोडलेला बाण शत्रूचा निःशेष नाश करितो.

ज्याप्रमाणें सूर्याचे किरण सर्व चराचर सृष्टीला तप्त करितात, त्याप्रमाणें पार्थाच्या हातांतून सुटलेले शर माझ्या पुत्रांना ताप देतील. रणांगणांत त्या सव्यसाचीच्या रथाचा ध्वनि ऐकून भयभीत झालेली सर्व भारती सेना इतस्ततः भटकूं लागेल, किंवा समरामध्यें त्यांच्या वधार्थ उद्युक्त झालेला पार्थ जेव्हां

त्यांच्यावर बाणवृष्टि करील त्या वेळीं तो विधात्यानें निर्माण केलेला साक्षात् अंतकच भासेल आणि असें झालें असतां त्याला जिंकणें अशक्यच होईल. ३. ५. ४८.

---

## अध्याय ४९ वा.

[ १ संजय व धृतराष्ट्र यांचा पुढील अनर्थाविषयीं चिंतायुक्त संवाद. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, तूं दुर्योधनाविषयीं जें म्हटलेंस तें सर्व सत्य आहे. हे राजन्, महाबलाढ्य पांडव आपल्या धर्मपत्नी कृष्णेला अशा निंद्य प्रकारें सभेंत नेलेलें पाहून अतिशय क्रोधाविष्ट झाले आहेत. त्याचप्रमाणें दुःशासन व कर्ण यांचीं तीं दारुण, कर्णकटु व कुत्सित वचनें ऐकून पांडव अतिशय संतप्त झाले आहेत, यांत संशय नाहीं. हे महाराज, मीं असेंहि ऐकिलें आहे कीं, पार्थानें अकरा रुद्रांचें रूप धारण करणाऱ्या महेश्वरास संग्रामांत आपल्या धनुर्विद्येनें प्रसन्न करून त्याचा मोठा अनुग्रह संपादन केला आहे.

हे प्रभो, पार्थाच्या सामर्थ्याची परीक्षा पहाण्यासाठीं साक्षात् भगवान् शंकरानें किरातरूप धारण करून त्याच्याशीं युद्ध केलें. त्याचप्रमाणें तेथें सर्व लोकपालांनींहि अस्त्रप्राप्तीसाठीं तपश्चर्या करणाऱ्या अजिंक्य अर्जुनाला दर्शन दिलें. खरोखर या लोकीं फाल्गुनावांचून इतर कोणीहि प्रसिद्ध लोकपालांना साक्षात् पाहण्यास समर्थ नाहीं.

हे राजन्, पंचभूतें, सूर्य, चंद्र व पुरुष अशीं रूपें धारण करणाऱ्या अष्टमूर्ति शंकरालाहि ज्याचा वध करतां आला नाहीं, त्या धनुर्धराला युद्धांत जिंकण्यास कोण समर्थ आहे ! सभेंत द्रौपदीची अमर्यादा केल्यामुळें कोपलेले पांडव अंगावर रोमांच आणणारें घोर युद्ध करतील.

हे राजा, दुर्योधनानें सभेमध्यें आपल्या दोन्ही मांड्या द्रौपदीला दाखविल्या असतां ज्याचे ओंठ स्फुरण पावत आहेत असा भीमसेन असें अर्थपूर्ण वचन बोलला—" हे पातक्या, तेरा वर्षें पूर्ण होतांच कपटद्यूतानें आम्हांला जिंकणाऱ्या तुझ्या दोन्ही मांड्यांचा मी भयंकर वेगवान् गदेनें भेद करीन. "

हे महाराज, ते सर्व पांडुपुत्र प्रहार करणारांत श्रेष्ठ, अमित तेजस्वी, सर्वास्त्रवेत्ते , विद्वान् आणि देवांनाहि दुर्जय आहेत. भार्येच्या अवमानानें क्रुद्ध झालेले ते पार्थ समरांगणांत तुझ्या पुत्रांचा अंत करतील.

**धृतराष्ट्र**—हे सूता, कर्णाच्या कठोर वचनालाच काय दोष द्यावयाचा आहे ! ज्या वेळीं कृष्णेला तशा निंद्य प्रकारें सभेंत नेलें, त्या वेळींच माझ्या मंदबुद्धि पुत्रांनीं वैराला पुरेसें कारण करून ठेविलें. अजुनहि ज्यांचा ज्येष्ठ भ्राता नीतीमध्यें स्थित नाहीं, असे माझे मूढमति पुत्र मी चक्षुर्हीन असल्यामुळें मला कांहीं करतां येत नाहीं असें पाहून माझें सांगणें मुळींच ऐकत नाहींत. कर्णसौबलादि त्यांचे मूर्ख सचिव त्या दुर्बुद्धि दुर्योधनाचे दोष अधिकच वाढवीत आहेत.

हे संजया, अमित तेजस्वी पार्थानें सहज सोडलेले बाणहि जर माझ्या पुत्रांना दग्ध करितील, तर मग क्रोधसंतप्त झालेल्या त्याच्या बाणांविषयीं काय सांगावें ! धनंजयाच्या हातांतून व गांडीवासारख्या श्रेष्ठ धनुष्यापासून सुटलेले दिव्य मंत्रास्त्रयुक्त बाण देवांचाहि नाश करतील. ज्याचा मंत्री, रक्षक व सुहृद् त्रैलोक्यनाथ जनार्दन आहे, त्या अर्जुनाला काय अजिंक्य आहे !

हे सारथे, अर्जुनानें महादेवाशीं बाहुयुद्ध केल्याची जी वार्ता आहे, तीच खरोखर आश्चर्यकारक आहे. त्याचप्रमाणें अग्नीच्या साह्यार्थ खांडव वनामध्यें पूर्वी दामोदर व धनंजय यांनीं साक्षात् देवेंद्राबरोबर जें युद्ध केलें तेंहि अति अद्भुत होय. यास्तव हे संजया, सात्वत कृष्ण व पांडव क्रुद्ध झाले असतां सौबल व इतर अमात्यादिक यांसह माझे पुत्र युद्धांत नाश पावतील यांत संशय नाहीं. ३.५.४९.

---

## अध्याय ५० वा.

[ १ पांडवांच्या वनवृत्तीचें संक्षिप्त वर्णन. ]

( १ ) **जनमेजय**—हे विप्रश्रेष्ठा, वीर पांडवांना वनवासाला पाठवून मग असा शोक करण्यांत काय अर्थ आहे ! महारथ पांडुपुत्रांना कोपविणाऱ्या मंदबुद्धि दुर्योधन-पुत्राची त्यानें प्रथमच उपेक्षा कां केली ? असो; तें राहूं दे. मला आतां त्या राजपुत्रांचाच अधिक वृत्तान्त सांग. ते पांडुनंदन वनामध्यें कोणतें भोजन करीत होते ! वनांत पेरल्यावांचून उगवणाऱ्या वऱ्या, नीवार इत्यादि वन्य धान्यांवर ते आपला निर्वाह करीत होते, कीं नांगरून उत्पन्न केलेले गहूं, तांदुळ इत्यादि ग्राम्य धान्यांवर ?

**वैशंपायन**—हे राजन्, तुझे ते श्रेष्ठ प्रपितामह वन्य धान्य व विषलिप्त नसलेल्या शुद्ध बाणांनीं मारलेल्या हरिणांचें मांस, यांवर आपली उपजीविका

करीत असत. ते मोठालीं आयुधें धारण करणारे शूर नरव्याघ्र वनांत रहात असतांना ब्राह्मणांना प्रथम भोजन देत असत. हे प्रभो, ते पांडव जेव्हां वनवासाला निघाले तेव्हां अग्निहोत्री, परिव्राजक, स्नातक व आत्मज्ञानी असे सर्व मिळून दहा हजार महात्मे त्यांच्या मागोमाग वनांत गेले. महात्मा युधिष्ठिर त्या सर्वांचें पोषण करीत असे. भ्रात्यांनीं प्रत्यहीं आणलेलें विविध भक्ष्य तो प्रथम ब्राह्मणांना निवेदन करीत असे. त्याच्या सहवासांत असलेला एकहि मानव निस्तेज, व्याधिग्रस्त, कृश, दुर्बल, दीन किंवा भयभीत झालेला दिसत नसे. त्या कौरवश्रेष्ठ धर्मराजानें आपल्या भ्रात्यांचें पुत्राप्रमाणें व ज्ञातींचें भ्रात्यांप्रमाणें पालन केलें.

यशस्विनी द्रौपदी सर्व द्विज व प्रिय पति यांस मातेप्रमाणें भोजन देऊन अवशिष्ट राहिलेलें अन्न स्वतः भक्षण करीत असे. प्रत्यहीं राजा युधिष्ठिर पूर्व दिशेस, भीमसेन दक्षिण दिशेस व नकुल-सहदेव अनुक्रमें पश्चिम व उत्तर दिशेस मृगयेसाठीं जाऊन मांसाकरितां मृगांचा वध करीत असत. याप्रमाणें अर्जुनाविषयीं अतिशय उत्कंठित होऊन स्वाध्याय, जप व होम करणाऱ्या त्या वीरांचीं पांच वर्षें काम्यक वनांत मोठ्या कष्टानें निघून गेलीं. ३. ५. ५०.

---

## अध्याय ५१ वा.

[ १ धृतराष्ट्राचा पश्चात्ताप व संजयाशीं संवाद. ]

(१) **वैशंपायन**—राजा, पांडवांचें तें अलौकिक व अद्भुत चरित्र ऐकून चिंता आणि शोक यांनीं व्याकुळ व खिन्न झालेला तो अंबिकासुत धृतराष्ट्र दीर्घ व उष्ण श्वास टाकून संजयाला हांक मारून म्हणाला—"हे सूता, द्यूतामुळें झालेल्या या घोर अन्यायाच्या अहोरात्र विचारानें माझ्या चित्ताला एक क्षणभरहि शांति मिळत नाहीं. त्या पांची भ्रात्यांचें परस्परांवर अलौकिक प्रेम आहे. त्यांचें वीर्य शत्रूंना असह्य असून ते पराकाष्ठेचें शौर्य, धैर्य व संतोष यांनीं युक्त आहेत. युद्धांत अजिंक्य असलेले महाभाग देवपुत्र नकुल-सहदेव इंद्रासारखे कांतिमान् आहेत. ते दृढ आयुधें धारण करणारे भ्राते दूर अंतरावरील लक्ष्याचाहि वेध करितात. त्यांनीं युद्धाचा दृढ निश्चय केला आहे. ते दोघे शीघ्र हस्तानें शरसंधान करणारे, अतिशय क्रोधी, स्थिरचित्त व वेगवान् असलेले माद्रीपुत्र भीमार्जुनास पुढें करून जेव्हां संग्रामांत उभे रहातील तेव्हां ते सिंहासारख्या पराक्रमी अश्विनिकुमारांसारखेच शत्रूला दुःसह होतील. हे संजया, युद्धामध्यें अप्रति-

रथ असलेल्या त्या दोघां देवपुत्रांपुढें माझ्या सैन्याचा निःशेष नाश होणार, असेंच मला दिसत आहे. ते दोघे असहिष्णु माद्रीसुत द्रौपदीला दिलेल्या क्लेशांची कधींहि क्षमा करणार नाहींत.

त्याचप्रमाणें हे सूतनंदना, मोठालीं धनुष्यें धारण करणारे वृष्णिवीर व अतिशय बलाढ्य पंचाल यांनीं ज्यांना साह्य केलें आहे आणि सत्यप्रतिज्ञ वासुदेवानें ज्यांचें रक्षण केलें आहे ते पार्थ युद्धामध्यें माझ्या पुत्रांच्या सैन्याचा नाश करतील. राम व कृष्ण यांनीं ज्यांना प्रेरणा केली आहे अशा वृष्णिवीरांचा वेग युद्धामध्यें सहन करणें शक्य नाहीं. संग्रामांत त्या सर्व वृष्णिवीरांसह, त्यांच्या मध्यभागीं उभा राहून, त्या सर्वांमध्यें मोठें धनुष्य धारण करणारा भयंकर पराक्रमी भीम आपली प्रचंड गदा घेऊन संचार करील. भीमाची ती भयंकर गदा भूमीवर ठेविली असतां पृथ्वीचा भेद करून पाताळांत प्रवेश करील या भीतीनें ती अंतरिक्षांत शिंक्याप्रमाणें टांगलेल्या जाळ्यांत ठेवलेली असते. त्याचप्रमाणें भीमाच्या गदेचा वेग व धनंजयाच्या गांडीव धनुष्याचा टणत्कार सहन करण्यास सर्व नृपाल समर्थ होणार नाहींत.

संजया, खरोखर त्या वेळीं दुर्योधनाच्या वश झालेल्या मीं माझ्या सुहृदांच्या ज्या हितवचनांकडे दुर्लक्ष केलें त्या स्मरणीय वचनांचें मला स्मरण होईल.

संजय—हे राजन्, तूं समर्थ असूनहि केवल मोहामुळें पुत्रांचें वेळींच निवारण केलें नाहींस, त्यांची उपेक्षा केलीस, हा फार मोठा प्रमाद घडला आहे. हे राजा, पांडवांना द्यूतांत जिंकल्याचें वृत्त कांनीं पडतांच मधुसूदन अच्युत मोठ्या त्वरेनें काम्यक वनांत गेला व पांडुपुत्रांना भेटला.

त्याचप्रमाणें धृष्टद्युम्नादि द्रुपदाचे पुत्र, विराट, धृष्टकेतु, महारथ केकयराजपुत्र, हेहि सर्व त्या कौंतेयांच्या भेटीला गेले होते. तेथें त्या पराजित झालेल्या पार्थांना पाहून त्यांनीं जीं भाषणें केलीं तीं सर्व हेरांनीं मला कळविलीं व मींहि तीं तुला सांगितलींच आहेत.

हे महाराज, त्या वनामध्यें माधवानें पांडवांची भेट घेऊन त्यांस धीर दिला असतां युधिष्ठिरानें त्याला अर्जुनाचें सारथ्य करण्याविषयीं विनंति केली. तेव्हां हरीनेंहि 'ठीक' आहे असें म्हणून तें मान्य केलें. पण त्या वेळीं वनामध्यें कृष्णाजिनें परिधान करून रहाणाऱ्या पार्थांना पाहून क्रुद्ध झालेला श्रीकृष्ण युधिष्ठिराला म्हणाला—"हे धर्मराजा, इंद्रप्रस्थामध्यें तुझ्या ऐश्वर्याची जेव्हां

समृद्धि झाली व तूं राजसूय यज्ञ केलास त्या वेळीं ज्याचें अन्यत्र नुस्तें दर्शन होणेंहि दुर्लभ आहे, असे नृपश्रेष्ठ मीं तेथें जमलेले पाहिले. पांडुपुत्रांच्या शस्त्र-तेजाला भ्यालेले अंग, वंग, पौंड्र, उंड्र, चौल, द्रविड, आंध्र, समुद्रतीरावरील प्रांत, सिंहल, बर्बर, म्लेच्छ व इतर प्रदेश यांचे अधिपति आणि लंकानिवासी, समुद्रापर्यंतचे पश्चिमेकडील शेंकडों राष्ट्राधिपति, पह्लव, दरद, किरात, यवन, शक, हार, हूण, चीन, तुषार, सैंधव, जागुड, रामठ, मुंड, स्त्रीराज्य, तंगण, केकय, मालव, काश्मीर, इत्यादि देशांचे नृपाल तुझ्या यज्ञामध्यें वाढपी झालेले मीं पाहिले आहेत.

अशा प्रकारच्या तुमच्या समृद्ध संपत्तीनें आतां प्रतिपक्षाकडे गमन केलें. त्यामुळें ती जरी चंचल व नीचानुसारिणी झाली आहे, तरी मी तिचें हरण करणाऱ्या शत्रूंच्या जीविताचें हरण करून तिला परत आणीन. हे युधिष्ठिरा, बलराम, भीम, अर्जुन, नकुल, सहदेव, अक्रूर, गद, सांब, प्रद्युम्न, शूरसेन, वीर धृष्टद्युम्न व शिशुपालपुत्र यांस घेऊन मी युद्धाला जाईन आणि संग्रामांत दुर्योधन, कर्ण, दुःशासन, शकुनि व अन्य जे कोणी विरुद्ध बाजूनें युद्धाला उभे राहतील, त्या सर्वांचा तत्काल वध करीन. राजा, त्यानंतर तूं धृतराष्ट्र-पुत्रांच्या हातांतून परत मिळविलेल्या राज्यैश्वर्यास प्राप्त होऊन हस्तिनापुरांत भ्रात्यांसह सुखानें रहा आणि पृथ्वीचें राज्य कर."

राजा धृतराष्ट्रा, त्या सर्व वीरांच्या समूहांत मधुसूदनानें असें म्हटलें असतां युधिष्ठिर धृष्टद्युम्नादि शूरांच्या समक्ष श्रीकृष्णाला म्हणाला—"हे जनार्दना, तुझें हें सत्यवचन मला संमत आहे. परंतु हे केशवा, तूं माझ्या शत्रूंचा त्यांच्या अनुयायांसह तेरा वर्षांनंतर वध करून मला सत्यप्रतिज्ञ कर. कारण मी राज-सभेमध्यें प्रतिज्ञापूर्वक वनवास स्वीकारिलेला आहे."

धर्मराजाचें हें भाषण ऐकून धृष्टद्युम्नप्रभृति सभासदांनीं समयोचित व मधुर वचनानें केशवाचा क्रोध शांत केला व त्याच्या समक्षच सरल मनाच्या पांचा-लीला म्हटलें—"हे देवि, तुझ्या क्रोधामुळें दुर्योधन प्राणाला मुकेल, हें आम्ही प्रतिज्ञेनें सांगत आहों. यास्तव तूं खिन्न होऊं नकोस. हे कृष्णे, द्यूतांत जिंक-ल्यावर जे नीच तुजकडे पाहून हंसले, त्यांचें मांस लांडगे व गृध्र खातील.

त्याचप्रमाणें ज्यांनीं तुला सभेंत ओढून नेली त्यांचीं तुटलेलीं मस्तकें पशु-पक्षी ओढून नेतील व त्यांचें रक्त प्राशन करतील. त्यांचे भूमीवर तुटून पडलेले

अवयव हिंस्र प्राणी ओढून नेत आहेत, असें तुझ्या दृष्टीस पडेल. त्या सभेंत ते दुष्ट कौरव तुला क्लेश देत असतां ज्यांनीं स्वस्थ बसून मुकाट्यानें तें पाहिलें, त्या सर्वांचा शिरश्छेद होऊन त्यांतून वहात असलेलें रक्त भूमि प्राशन करील.

हे भरतश्रेष्ठा, ज्यांनीं अशा प्रकारचीं अनेक भाषणें केलीं ते सर्वहि वीर तेजस्वी, शूर व शौर्यादिसूचक सामुद्रिक लक्षणांनीं युक्त आहेत. या सर्व पराक्रमी वीरांना धर्मराजानें युद्धाच्या कामीं नियुक्त केलें आहे. ते सर्व महारथ तेरा वर्षें पूर्ण होतांच वासुदेवाला पुढें करून संग्रामांत उभे रहातील.

बलराम, श्रीकृष्ण, प्रद्युम्न, सांब, युयुधान, चौघे पांडुपुत्र, केकयराजपुत्र, द्रुपदाचे पुत्र व मत्स्यराज विराट हे सर्वहि अजिंक्य व लोकैकवीर आहेत. हे सर्व वीर खवळलेल्या सिंहाप्रमाणें क्रुद्ध होऊन आपले अनुयायी व सैन्य यांसह समरांगणावर आले असतां त्यांच्यापुढें कोणता जीवितार्थी मनुष्य उभा राहील !

धृतराष्ट्र—हे संजया, द्यूताच्या प्रसंगीं विदुरानें मला म्हटलेंच होतें कीं, हे नरेंद्रा, तूं जर पांडवांना अशा कपट द्यूतानें जिंकशील तर कौरवांचा अंतकाल समीप आलाच म्हणून समज. या द्यूतामुळें महाभय उत्पन्न होईल व रक्ताचे पाट वहातील.

सूता, त्या दीर्घदर्शी विदुराचें तें वचनच सत्य होणार, असें मला वाटतें. पांडवांचा वनवास व अज्ञातवास संपला म्हणजे विदुराच्या म्हणण्याप्रमाणें युद्ध होणार, यांत मुळींच संशय नाहीं. ३. ५. ५१.

येथें पांचवें इंद्रलोकाभिगमनपर्व समाप्त झालें.

---

## नलोपाख्यानपर्व ६.



### अध्याय ५२ वा.

[ १ धर्मराज-भीम संवाद. २ बृहदश्व ऋषीचें आगमन. ३ संक्षिप्त नलोपाख्यान. ]

( १ ) जनमेजय—हे विप्रश्रेष्ठा, महात्मा अर्जुन अस्त्रसंपादन करण्यासाठीं इंद्रलोकीं गेला असतां युधिष्ठिरप्रभृति पांडवांनीं काय केलें ?

वैशंपायन—हे राजा, पार्थ इंद्रलोकीं गेल्यावर ते भरतश्रेष्ठ पांडव पांचालीसह काम्यक वनामध्यें रहात असतां एकदा धनंजयाचा वियोग व राज्यभ्रंश यांमुळें दुःखार्त झालेले ते चौघे भ्राते कृष्णेसह पवित्र व हिरव्या तृणावर एकांतांत बसले होते. ते सर्वहि अर्जुनाची आठवण झाल्यामुळें खिन्न होऊन अश्रु ढाळीत होते. त्यांचा कंठ सद्गदित झाला होता. ते अतिशय दुःखी होऊन पार्थाच्या वियोगानें जणुंकाय शोकसागरांत बुडाले होते.

अशा स्थितींत ते सर्व बसले असतां महाबाहु भीमसेन युधिष्ठिराला म्हणाला—" हे महाराज, तुझ्या आज्ञेनें भरतश्रेष्ठ धनंजय गेला आहे. त्याच्या बलावर आम्ही पांडुपुत्र आपले प्राण धारण करीत आहों. तो आमचा पराक्रमी भ्राता नाश पावला असतां पुत्रांसह पांचाल, सात्यकि, वासुदेव व त्याचप्रमाणें आम्ही, यांचाहि विनाश होईल, यांत संशय नाहीं. तो धर्मात्मा पार्थ अनेक क्लेशांचा विचारहि न करतां तुझ्या आज्ञेवरून घोर तपश्चर्या करावयास गेला आहे. याहून अधिक कष्टकर दुसरें काय असणार ?

हे धर्मराजा, त्या महात्म्याच्या बाहुबलावर आम्ही 'परक्यांच्या हातीं गेलेली ही पृथ्वी जिंकून घेतलीच आहे, ' असें समजतों. त्या पराक्रमी धनुर्धराचा प्रभाव जाणूनच, मीं सभेमध्यें धृतराष्ट्रपुत्रांना सौबलासह परलोकीं पाठविलें नाहीं. आम्ही इतके बलाढ्य असतांहि केवळ तुझ्यासाठीं सगळा क्रोध गिळून बसलों आहों. वासुदेवानें संरक्षण केलेले आम्ही त्याच्याच साह्यानें कर्णप्रभृति शत्रूचा वध करून स्वबाहुबलानें जिंकलेल्या सर्व पृथ्वीचें राज्य करूं, अशी आम्हांला आशा आहे. आम्ही पुरुषार्थयुक्त असूनहि तुझ्या या द्यूतदोषामुळें असे दुर्बल होऊन बसलों आहों आणि मूर्ख दुर्योधनादिक मांडलिकांनीं दिलेल्या धनावर बलवत्तर होऊन बसले आहेत.

हे महाराज, क्षत्रियधर्म तूं जाणतच आहेस. वनाचा आश्रय करणें हा क्षात्रधर्म नव्हे. राज्यच त्यांचा परम धर्म आहे, असें ज्ञाते म्हणतात. यास्तव क्षात्रधर्म जाणणारा तूं आपल्या धर्ममार्गापासून च्युत होऊं नकोस. हे राजन्, जनार्दनाला आणून व पार्थाला तपोवनांतून परतवून मी बारा वर्षें पूर्ण होण्यापूर्वीच धृतराष्ट्रपुत्रांचा वध करीन. सैन्याचा व्यूह रचून उभ्या राहिलेल्या कौरवांना मी मोठ्या वेगानें परलोकीं पाठवीन. दुर्योधन, कर्ण, शकुनि इतर सर्व धार्त्तराष्ट्र किंवा अन्य जे कोणी माझ्याशीं प्रतियुद्ध करावयास येतील त्यांचा मी संहार करीन.

याप्रमाणें मी त्या कौरवांचा नाश केल्यावर मग हे महाराज, तूं पुनः वनांत येऊन आपली वनवासाची प्रतिज्ञा पुरी कर. असें केलें असतां तुला दोष लागणार नाहीं आणि त्यांतूनहि जर कांहीं अल्प दोष असलाच तर आपण अनेक यज्ञ करून तें सर्व पाप धुवून टाकूं व निष्पाप होऊन स्वर्गलोकीं जाऊं. पण आमचा राजा एखाद्या बालाप्रमाणें हट्टी व दीर्घसूत्री जर नसेल तरच हें सर्व घडून येईल! कपटाचा कपटाचरणानेंच नाश करावा, अशी राजनीति आहे. कपट करणाराचा कपटानें वध केला असतां पाप लागत नाहीं.

त्याचप्रमाणें हे राजेंद्रा, धर्मशास्त्रामध्यें धर्मज्ञांनीं संकटप्रसंगीं एक अहोरात्र संवत्सराप्रमाणेंच मानावा असें म्हटलें आहे. याला वेदवचनहि प्रमाण आहे. धर्मशास्त्रांत तीस कृच्छ्रांनीं एक ‘ अब्द ’ होतें, असें सांगितलें आहे. युधिष्ठिरा, तुला जर वेद प्रमाण असतील तर तुझ्या प्रतिज्ञेचा तेरा वर्षांचा काल तेरा दिवसांनींच निवृत्त झाला आहे, असें मानण्यांत कांहीं दोष नाहीं. हे राजा, त्या दुर्योधनानें जोंवर सर्व पृथ्वीला वश करून घेतलें नाहीं व सर्व राजे त्याला अनुकूल झाले नाहींत, तोंवरच सर्व परिवारासह त्याचा नाश करतां येणें शक्य आहे. राजेंद्रा, तुझ्या द्यूतप्रियतेमुळें प्रायः आम्ही सर्व या अज्ञातवासांत येऊन पडलों आहों. जेथून त्या दुरात्म्या दुर्योधनाचे हेर आम्हांला शोधून काढणार नाहींत, असा एकहि प्रदेश मला तर दिसत नाहीं आणि एकदा त्यांनीं आम्हांला अज्ञातवासांत ओळखलें कीं पुनः तो नराधम आम्हांला कपटानें वनवासाला पाठवील. परंतु कदाचित् आम्ही जर अज्ञातवासांतून पार पडलोंच तर तो पातकी तुला पुनः द्यूताचें आह्वान करील.

यावर तूं कदाचित् म्हणशील कीं, त्यानें जरी आह्वान केलें तरी मी जाणार नाहीं, तर हे महाराज, असें घडणें शक्यच नाहीं. कारण तूं एकदा पराजित होऊनहि पुनः अनुद्यूताला प्रवृत्त झालासच कीं नाहीं! तसेंच आतांहि करशील! व पुनः द्यूत खेळून सर्व ऐश्वर्य गमावशील आणि अक्षविद्येंत प्रवीण असलेला

---

१ ‘ विश्वसृजां सहस्रसंवत्सरम् ’ या श्रुति वचनांत ‘ संवत्सर ’ हा शब्द दिनपर आहे, कारण तो दिनपर न मानल्यास ‘ शतायुर्वै पुरुषः ’ या श्रुतीशीं विरोध येईल. शिवाय भूलोकीं पुरुषाचें सहस्रवर्षें आयुष्य कोठें उपलब्धहि नाहीं.

२ ‘द्वादशवार्षिक प्रायश्चित्त’ तीस प्राजापत्य कृच्छ्रांनीं अल्पकालांतच साध्य होतें.

तूं अशा प्रकारें कर्तव्यमूढ होऊन पुनः वनांत येऊन रहाशील. पण हे महाराजा, आम्हांला जन्मभर असे कृपण बनवूं नको. वेदधर्मांचा पूर्णपणें विचार कर. ' कपटबुद्धि पुरुषाचा कपटानेंच वध करावा ' हा वेदानें केलेला निर्णय आहे.

हे राजा, तूं जर अनुज्ञा देशील तर वायु ज्याचा सारथि आहे, असा अग्नि तृणावर फेंकला असतां तो जसा तें दग्ध करितो, तसा मी त्या मंदबुद्धि दुर्योधनाचा तत्काल नाश करीन. यास्तव हे धर्मराजा, मला आज्ञा दे."

वैशंपायन—जनमेजया, भीमसेन असें बोलला असतां धर्मराज युधिष्ठिरानें त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें व त्याचें सांत्वन करीत म्हटलें—" हे महाबाहो, तूं दुर्योधनाचा प्राण घेशील यांत मुळींच संशय नाहीं. परंतु अजून ती वेळ आलेली नाहीं. तेरा वर्षें पूर्ण झाल्यावर गांडीव धनुष्य धारण करणाऱ्या धनंजयाच्या साह्यानें तूं त्याचा निःसंशय वध करशील. बा वृकोदरा, ' तो काल आतांच प्राप्त झाला आहे ' हें तुझें म्हणणें मला संमत नाहीं. मी असत्य बोलण्यास समर्थ नाहीं. माझ्या ठिकाणीं अनृत कधींहि वास करीत नाहीं. हे बलाढ्य कौंतेया, पापाचरणी दुर्योधनाचा त्याच्या अनुयायांसह कपटावांचूनहि वध करण्यास तूं समर्थ आहेस.

( २ ) धर्मराज युधिष्ठिर असें बोलत आहे, इतक्यांत तेथें महाभाग बृहदश्व महर्षि अकस्मात् आला. त्या धर्माचरणी ऋषीला पाहून महात्म्या युधिष्ठिरानें मधुपर्कपूर्वक त्याची यथाशास्त्र पूजा केली. नंतर तो विप्रश्रेष्ठ आसनावर विश्रांति घेत बसला आहे, असें पाहून त्याच्या समीपच बसलेल्या युधिष्ठिरानें त्याला उद्देशून असें दीन वचन बोलण्यास आरंभ केला.

" हे भगवन्, अक्षविद्येंत निपुण असलेल्या त्या कपटपटु द्यूतकारांनीं त्या विद्येंत अनभिज्ञ असलेल्या मला द्यूताला आह्वान करून माझें धन व राज्य हिरावून घेतलें. प्राणाहूनहि प्रिय असलेल्या माझ्या भार्येला त्यांनीं सभेंत ओढून नेलें व अनुद्यूतानें मला पुनः जिंकून या दारुण वनवासाला पाठविलें. मी अजिनें पांघरून या घोर अरण्यांत परम दुःखानें काल कंठीत आहें. अक्षद्यूत चाललें असतां कौरवांचीं कर्णकठोर भाषणें व आमच्या सुहृदांचीं आर्त वचनें ऐकून माझें हृदय अतिशय व्यथित झालें आहे. सुहृदांचीं व शत्रूंचीं तीं वचनें माझ्या मनांत दृढमूल होऊन राहिलीं आहेत. प्रतिरात्रीं मला त्यांचें स्मरण होतें व त्यांच्याच विचारांत सर्व रात्र निघून जाते.

ज्या गांडीव धनुष्य धारण करणाऱ्या धनंजयाच्या ठिकाणीं आम्ही आपले प्राण ठेविले आहेत, त्या महात्म्यावांचून आम्ही जणुंकाय, मृतप्राय होऊन राहिलों आहों. त्या बीभत्सूला कृतास्त्र होऊन परत आलेला मी कधीं बरें पाहीन? तो माझा भ्राता प्रियवादी, उदार, दयाळु व उत्साही आहे. हे ब्रह्मन्, माझ्यासारखा भाग्यहीन राजा या पृथ्वीवर या पूर्वी कोणी तरी झाला असेल का? हे मुने, खरोखर माझ्याहून अधिक दुःखी मनुष्य तूं पूर्वी कोठें पाहिलाहि नसशील व ऐकलाहि नसशील!"

बृहदश्व—हे धर्मराजा, 'माझ्यासारखा भाग्यहीन पुरुष कोठेंहि नसेल' असें जें तूं म्हणत आहेस, तें खरें नव्हे. हे राजा, तुझ्याहूनहि अधिक हतभागी पुरुष या जगांत होऊन गेले आहेत. त्यांतील एका राजाची कथा ऐकण्याची जर तुझी इच्छा असेल तर हे अनघा, मी तुला सांगतों.

वैशंपायन—पारिक्षिता, त्या ऋषीचें हें वचन ऐकून धर्मराज म्हणाला—"हे भगवन्, ती कथा अवश्य सांग. माझ्यासारख्या कष्टकर अवस्थेला प्राप्त झालेल्या त्या भूपतीचा वृत्तांत ऐकण्याची माझी उत्कट इच्छा आहे."

(३) बृहदश्व—हे पृथ्वीपते, तुझ्याहूनहि दुःखिततर असलेल्या त्या राजाची कथा भ्रात्यांसह सावधान चित्तानें ऐक. निषध-देशामध्यें 'वीरसेन'-नांवाचा एक प्रसिद्ध राजा होऊन गेला. त्याला 'नल'-नांवाचा एक धर्मार्थवेत्ता पुत्र होता. त्याला 'पुष्कर'-नांवाच्या एका नृपालानें कपटद्यूतांत जिंकिलें. तेव्हां तो अत्यंत दुःखार्त होऊन भार्येसह वनवासाला निघून गेला. तेथें त्याच्या-पाशीं रथ, दास, भ्राते, किंवा बांधव यांतील कोणीही नव्हतें आणि त्याच्या वनवासाचा कालहि नियत नव्हता.

हे युधिष्ठिरा, तूं तर देवतुल्य वीर भ्रात्यांनीं युक्त असून ब्रह्मदेवासारख्या श्रेष्ठ द्विजांनीं परिवेष्टित आहेस. शिवाय तुझा वनवासाचा कालहि मर्यादित आहे. तेरा वर्षांनीं तुझ्या दुःखाचा काल समाप्त होईल. यास्तव तूं असा शोक करूं नकोस.

युधिष्ठिर—हे वक्त्यांतील श्रेष्ठ महर्षे, महात्म्या नलराजाचें समग्र आख्यान ऐकण्याची माझी इच्छा आहे, यास्तव तें सविस्तर कथन कर. ३. ६. ५२.

---

## अध्याय ५३ वा.

[ १ सविस्तर नलोपाख्यानाचा उपक्रम. २ नल-दमयंतींनीं ऐकलेली परस्परांची प्रशंसा. ३ दिव्य हंसाचें दौत्य. ]

( १ ) बृहदश्व—हे धर्मराजा, पूर्वी 'नल'-नामक एक बलाढ्य राजा होऊन गेला. तो वीरसेनपुत्र रूपवान्, सर्वगुणसंपन्न आणि अश्वकोविद होता. देवपति इंद्राप्रमाणें तो नृपति आपल्या आदित्यतुल्य तेजानें सर्व भूपालांना प्रकाशित करीत असे. तो निषधाधिपति शूर, वेदवेत्ता, सत्यवादी व ब्राह्मणभक्त असून द्यूतप्रिय होता. त्याच्या पदरीं अनेक अक्षौहिणी सैन्य होतें. तो जितेंद्रिय व उदार असल्यामुळें श्रेष्ठ स्त्रिया त्याला वरण्यास उत्सुक असत. तो प्रजेचें रक्षण करणारा धनुर्धर नल जणुंकाय साक्षात् मनुच भासत असे.

त्याचप्रमाणें, हे नरेंद्रा, 'विदर्भ'-देशाचा 'भीमक-'राजाहि शूर, महापराक्रमी व सर्व गुणांनीं युक्त होता. परंतु त्याला संतति नसल्यामुळें तो अपत्याची इच्छा करीत होता. त्यानें संततीसाठीं अनेक यत्न केले, परंतु ते सर्व व्यर्थ झाले. अशा स्थितींत एकदा 'दमन'-नामक एक ब्रह्मर्षि भीमक-राजाकडे आला. तेव्हां अपत्याची कामना करणाऱ्या त्या धर्मवेत्त्या राजानें आपल्या महिषीसह त्या विप्राचा यथायोग्य सत्कार करून त्याला संतुष्ट केलें.

त्यावेळीं प्रसन्न झालेल्या त्या दमन-महर्षीनें 'राजन्, तुला महा यशस्वी तीन पुत्र व एक कीर्तिमती कन्या होईल' असा भार्येसह त्या नृपालास वर दिला.

धर्मराजा, त्या ब्रह्मर्षीच्या वचनाप्रमाणें अल्पकालांतच त्या भीमक-राजाला 'दमयंती'–नांवाची एक कन्या व दम, दान्त आणि दमन असे तीन पुत्र झाले. ते सर्वहि अतिशय तेजस्वी, सर्वगुणसंपन्न व भयंकर पराक्रमी होते.

( २ ) राजकन्या दमयंती रूपानें, गुणानें, तेजानें व कांतीनें अप्रतिम असल्यामुळें लोकांमध्यें तिची अतिशय प्रसिद्धि झाली. पुढें ती यौवनसंपन्न झाली असतां शंभर दासी व शंभर सख्या यांनीं परिवेष्टित झालेल्या शचीप्रमाणें शोभूं लागली.

त्या सख्यांच्या परिवारामध्यें सर्वाभरणभूषित दमयंती विद्युल्लतेसारखी चमकत असे. त्या लावण्यवती कमलाक्षीचे नेत्र साक्षात् लक्ष्मीप्रमाणेंच भासत असत. तिच्या सारखी अलौकिक रूपवती स्त्री देव, यक्ष, मानव, किंवा अन्य

कोणत्याहि जातीमध्यें कधीं कोणीं पाहिली नव्हती व ऐकलीहि नव्हती. ती सुहासिनी बाला देवांच्याहि चित्ताला प्रसन्न करीत असे.

हे भरतश्रेष्ठा, नलराजाहि या भूलोकीं अप्रतिम स्वरूपवान् होता. तो जणुं-काय मूर्तिमंत मदनच आहे कीं काय असा भास होत असे. त्यामुळें भीमक-राजकन्येच्या परिवारांतील स्त्रिया मोठ्या कौतुकानें तिजपाशीं नलराजाचें वारं-वार वर्णन करीत आणि नलराजाचा परिवार त्याजपाशीं दमयंतीच्या रूपाची प्रशंसा करीत असे.

याप्रमाणें परस्परांचें गुणवर्णन सतत कानीं पडल्यामुळें त्या उभयतांच्या अंतःकरणांत परस्परांविषयीं गुप्त प्रेम उत्पन्न झालें व त्यांचा तो अनुराग उत्त-रोत्तर वाढूं लागला. अशा प्रकारें मनांतील कामना वाढत चालली असतां एकदा नलराजा हृदयस्थ विकार असह्य झाल्यामुळें अंतःपुराच्या समीप अस-लेल्या उपवनांत एकांत स्थळीं जाऊन बसला.

(३) तेथें सोनेरी पंख असलेले हंस त्याच्या दृष्टीं पडले. तेव्हां त्या वीरानें वनांत फिरणाऱ्या त्या हंसांतील एका हंसास युक्तीनें धरिलें. त्या वेळीं तो पक्षी त्याला मानुषवाणीनें म्हणाला—" हे राजन्, मला मारूं नको, मी तुझें प्रिय करीन. हे नैषधा, मी दमयंतीजवळ तुझी अशी प्रशंसा करीन कीं, ती ऐक-ल्यावर ती राजकन्या तुझ्यावांचून अन्य पुरुषाला कधीं वरणारच नाहीं. "

हंसाचें हें भाषण ऐकून नलानें त्याला सोडून दिलें. तेव्हां ते सर्व हंस तेथून उडाले व विदर्भदेशांत गेले. भीमकाच्या नगरींत जाऊन पोंचल्यावर ते पक्षी दमयंतीच्या समीप जाऊन उतरले व तिच्या दृष्टीं पडले.

त्या हंसांचें अद्भुत स्वरूप पाहून राजकन्येस परम संतोष झाला व ती आपल्या सख्यांसह त्यांना धरण्याचा यत्न करूं लागली. परंतु ते पक्षी तेथून उडाले व त्या प्रमदावनांत इतस्ततः पळूं लागले. तेव्हां त्या सर्व कन्या त्यांतील एकेका हंसाच्या मागें धावूं लागल्या. त्यांपैकीं दमयंती ज्या हंसाच्या समीप गेली होती, तो तिला मानुषवाणीनें म्हणाला—" हे राजकन्ये, 'नल' या नांवाचा निषध-देशाचा एक राजा आहे. तो अश्विनिकुमारांसारखा रूपवान् आहे. त्याच्यासारखें अप्रतिम रूप या मनुष्यलोकीं कोठेंहि दिसणार नाहीं. तो जणुं काय मूर्तिमान् मदनच अवतरला आहे. यास्तव हे वरवर्णिनि, तूं जर त्याची भार्या होशील, तर तुझ्या जन्माचें व रूपाचें सार्थक्य होईल. आम्हीं

अनेक देव, गंधर्व, मनुष्य, नाग व राक्षस पाहिले आहेत, परंतु असें अप्रतिम रूप पूर्वी कोठेंहि पाहिलें नाहीं. हे दमयंति, तूंहि केवल स्त्रीरत्न आहेस आणि ' नल ' पुरुषांमध्यें श्रेष्ठ आहे. यास्तव अशा विशिष्ट लावण्यानें युक्त असलेल्या तुझा तशाच रूप-गुणसंपन्न वराशीं संयोग होणें योग्य होय. "

युधिष्ठिरा, त्या हंसाचें हें भाषण ऐकून दमयंती त्याला म्हणाली—हे हंसा, तूं नलराजालाहि असेंच जाऊन सांग.

तें ऐकून हंसानें दमयंतीला ' ठीक आहे ' असें म्हटलें व उड्डाण करून, निषध-देशास जाऊन नलराजाला सर्व वृत्तान्त निवेदन केला. ३. ६. ५३.

---

## अध्याय ५४ वा.

[ १ दमयंतीची कामावस्था. २ विदर्भराजाचा स्वयंवरसंकेत. ३ त्यासाठीं विदर्भराजनगरींत राजांचें व लोकपालांचें आगमन. ४ लोकपालांची नलाला साह्य करण्याविषयीं विनंति. ]

( १ ) बृहदश्व—हे भारता, इकडे दमयंतीनें हंसाचें तें वचन ऐकल्यापासून तिचें चित्त अस्वस्थ झालें. ती नलाच्या चिंतनानें विह्वल झाली. त्यामुळें ती दिवसेंदिवस दीन, निस्तेज व कृश दिसूं लागली. ती वेड्यासारखी वर दृष्टि करून दीर्घ निश्वास टाकीत असे. हृद्रोगामुळें ती पांढरी फटफटीत झाली. शय्या, आसन इत्यादि कोणत्याच सुखोपभोगांत तिचें मन रमेनासें झालें. रात्रीं व दिवसा तिची झोंप नाहींशी झाली. ती अहर्निश ' हाय, हाय ' म्हणून एकसारखी तळमळत व रडत असे.

तिची ही व्याकुलावस्था पाहून तिच्या सखीजनानें तिची मनोव्यथा ओळखली आणि दमयंतीची मानसिक अस्वस्थता व शरीराची क्षीणता विदर्भाधिपतीला निवेदन केली.

( २ ) दमयंतीच्या सखीजनाच्या मुखानें हा वृत्तान्त ऐकून नरेश्वर भीमक ' माझी कन्या अलीकडे अशी अस्वस्थ कां बरें दिसत आहे ? ' असें म्हणून तिच्या विषयींच्या आपल्या महत्कार्याचा विचार करूं लागला. तेव्हां ' आपली ही दुहिता यौवनारूढ झाली आहे. यास्तव आतां तिचा स्वयंवर करणें हेंच आपलें मुख्य कर्तव्य होय ' असें त्याच्या लक्षांत आलें व त्या पृथ्वीपतीनें ' हा स्वयंवर पहाण्यास सर्व वीरांनीं यावें ' असें सर्व नृपालांना निमंत्रण पाठविलें.

(३) तेव्हां हे प्रभो, त्या अतुलपराक्रमी विदर्भराजाच्या आज्ञेनें सर्व भूपति तेथें जमले. त्यांनीं गज, अश्व, रथ यांच्या घोषानें सर्व पृथ्वी दुमदुमून सोडली. ते सर्वहि भूमिपाल विचित्र माला, मूल्यवान् वस्त्रें व अलंकार धारण करून विपुल सैन्यासह प्राप्त झाले असतां महाबाहु भीमकराजानें त्या सर्व महात्म्या नृपतींचा यथायोग्य सत्कार केला व राजाकडून योग्य सन्मान केले गेलेले ते सर्व नरश्रेष्ठ तेथें राहिले.

राजा युधिष्ठिरा, याच वेळीं महाबुद्धिमान् व महाव्रती देवर्षि नारद व पर्वत फिरत फिरत इंद्रलोकीं गेले. तेथें देवराजानें त्या महात्म्यांचें पूजन केल्यावर ते उभयतां सुखासनावर बसले. इंद्रानें त्यांचें कुशल विचारिलें व 'पृथ्वीवर सर्वत्र आरोग्य आहेना?' असा प्रश्न केला.

नारद—हे विभो, आम्हां दोघांचें क्षेम आहे आणि भूलोकींचें सर्व नृपालहि सर्वप्रकारें कुशल आहेत.

बृहदश्व—राजा, नारदाचें हें भाषण ऐकून इंद्र म्हणाला—"हे देवर्षे, जे धर्मज्ञ पृथ्वीपाल युद्धामध्यें आपल्या जीविताचा त्याग करून शत्रूपासून पराङ्मुख न होतां समरांगणांत शस्त्रानें मरण पावून या लोकास प्राप्त होतात त्यांना मजप्रमाणेंच हा अक्षय लोक मिळतो. मजप्रमाणेंच त्यांच्याहि सर्व इच्छा परिपूर्ण होतात. पण ते शूर क्षत्रिय सांप्रत कोठें आहेत? अलीकडे मला प्रिय असलेले अतिथि नृपाल येथें आलेले दिसत नाहींत!"

इंद्राचें हें भाषण ऐकून नारद म्हणाला—हे मघवन्, तुला सध्यां ते भूपति कां दिसत नाहींत, त्याचें कारण सांगतों, ऐक. भूलोकीं विदर्भराजाची 'दमयंती'-नामक कन्या प्रसिद्ध आहे. तिनें आपल्या लावण्यानें पृथ्वीतलावरील सर्व सुंदर स्त्रियांचा पराभव केला आहे. त्या रूपवती राजकन्येचा लवकरच स्वयंवर होणार आहे. तेथें सर्व राजे व राजपुत्र गेले आहेत. सर्व भूपालांना भूलोकीं रत्नाप्रमाणें असलेल्या त्या अलौकिक राजकन्येच्या प्राप्तीची उत्कट इच्छा आहे.

राजा, नारद हा वृत्तांत सांगत आहे, तोंच अग्नीसह सर्व लोकपाल इंद्रापाशीं आले व त्यांनीं नारदाचें तें महत्त्वाचें वचन ऐकून संतुष्ट चित्तानें 'आपणहि सर्व तेथें जाऊं या' असें म्हटलें.

हे महाराज, त्यानंतर ते सर्व देव जेथें ते राजे गेले होते, त्या विदर्भदेशांत आपापले गण व वाहनें यांसह गेले.

( ४ ) हे धर्मराजा, ‘ सर्व राजे दमयंतीच्या स्वयंवरासाठीं विदर्भनगरींत एकत्र जमले आहेत, असें ऐकून त्या नृपतनयेची इच्छा करणारा नलराजाहि तेथें जावयास निघाला. त्याच वेळीं सर्व लोकपाल अंतरिक्षांतून चालले होते. त्यांना मार्गामध्यें साक्षात् मदनासारखा रूपवान् नलराजा दिसला. तो सूर्याप्रमाणें तेजस्वी व अतिशय रूपसंपन्न निषधाधिपति दृष्टीं पडतांच त्याच्या स्वरूपानें चकित झालेले लोकपाल दमयंतीच्या प्राप्तीविषयीं निराश झाले.

युधिष्ठिरा, नंतर आपलीं आकाशस्थ विमानें थांबवून ते लोकपाल भूतलावर आले व नलराजाला म्हणाले—“ हे निषध-राजेंद्रा नला, तूं सत्यव्रत आहेस. यास्तव हे नरश्रेष्ठा, तूं आमचा दूत होऊन आम्हांला साह्य कर. ” ३. ५. ५४.

---

## अध्याय ५५ वा.

[ १ नलाचें दौत्य. २ त्याचा दमयंतीच्या अंतःपुरांत प्रवेश. ३ दमयंतीला देवसंदेशकथन ]

( १ ) बृहदश्व—हे भरतश्रेष्ठा, नलराजानें त्यांचें तें प्रार्थनावचन ऐकून तत्काल ‘ मी तुम्हांला साह्य करीन ’ अशी प्रतिज्ञा केली व हात जोडून—‘ हे प्रभो, मीं दूत व्हावें अशी इच्छा करणारे आपण कोण व मी तुमचें कोणतें कार्य करूं, तें मला सांगा’ असें म्हटलें.

निषधराजाचा हा प्रश्न ऐकून इंद्र म्हणाला—“ हे नला, आम्ही सर्व लोकपाल देव असून दमयंतीसाठीं येथें आलों आहों. हे पार्थिवा, मी इंद्र आहें, हा अग्नि, तसाच हा वरुण आणि मानवांच्या देहाचा अंत करणारा हा यम आहे. आतां तूं दमयंतीकडे जा आणि ‘ आम्ही आलों आहों ’ असें तिला निवेदन कर. ”

दमयंतीला म्हणावें—“ हे भामिनि, इंद्रादि लोकपाल तुझा स्वयंवर पहाण्यासाठीं येत आहेत. शक्र, अग्नि, वरुण व यम या सर्वांना तुझ्या प्राप्तीची इच्छा आहे. यास्तव त्यांतील कोणा तरी एकाला तूं वरावेंस, अशी त्यांची इच्छा आहे. ”

शक्र असें बोलला असतां नल हात जोडून त्यास म्हणाला—हे देवेंद्रा, तुम्ही ज्या कार्यासाठीं जात आहां त्याचसाठीं मीहि निघालों आहें. यास्तव तुम्ही मला या कार्यासाठीं पाठवूं नका. ज्या स्त्रीविषयीं आपल्या हृदयांत

कामना उत्पन्न झाली आहे, त्या स्त्रीनें अन्य पुरुषाला वरावें असा प्रयत्न कोणता बरें पुरुष करील ! तुम्हांप्रमाणें मीहि दमयंतीच्या प्राप्तीची इच्छा करीत आहें, यास्तव मला क्षमा करा.

देव—हे नैषधा, प्रथम आम्हांला 'करीन' असें आश्वासन देऊन आतां तूं हें कार्य कां बरें करीत नाहींस ? जा, विलंब लावूं नको.

बृहदश्व—देव असें बोलले असतां नल त्यांस पुनः म्हणाला—"हे सुरेश्वर-हो, राजकन्येचें मंदिर चोहोंकडून सुरक्षित असेल, तेथें माझा प्रवेश कसा होऊं शकेल !"

तें ऐकून शक्र म्हणाला—हे नराधिपा, मी तुला अदृश्य होण्याची शक्ति देतों, तिच्या योगानें तुझा तेथें प्रवेश होईल.

(२) त्यावर 'ठीक आहे' असें बोलून नल दमयंतीच्या निवासस्थलीं गेला. तेथें त्यानें सखीजनांनीं परिवेष्टित असलेली दमयंती पाहिली. ती राज-कुमारी अतिशय सुकुमार असून तिचे सर्व अवयव रेंखलेले व प्रमाणबद्ध होते. तिचा बांधा सुदृढ व मुखकांति शशिप्रभेहूनहि उज्ज्वल होती.

अशा त्या सुहासिनी नृपकन्येला पाहून नलाचा कामविकार वृद्धिंगत झाला. तथापि आपल्या प्रतिज्ञेला स्मरून त्यानें आपली हृदयव्यथा आंवरून धरिली.

इकडे नलराजा दृष्टीं पडतांच त्या श्रेष्ठ स्त्रिया भ्रांत झाल्या आणि आश्चर्यानें उठून उभ्या राहिल्या. चकित झालेल्या त्यांनीं त्या राजाची मोठ्या हृष्ट चित्तानें प्रशंसा केली. त्यांनीं त्या नृपतीशीं जरी भाषण केलें नाहीं, तरी त्याचा मनानें सत्कार केला. 'काय हें स्वरूप! कोण हें तेज! या महात्म्याचें केवढें हें धैर्य ! हा कोणी देव आहे कीं, यक्ष आहे कीं, गंधर्व आहे !' असें त्या मनांत म्हणूं लागल्या. पण त्या त्याच्याशीं एक अक्षरहि बोलण्यास समर्थ झाल्या नाहींत. कारण त्या पुण्यवान् नृपतीच्या तेजानें दिपून गेलेल्या त्या सर्व श्रेष्ठ स्त्रिया लज्जेनें अधोमुख होऊन उभ्या राहिल्या. त्यांची ही स्थिति पाहून नलराजानें किंचित् स्मित केलें. तेव्हां मधुर भाषण करणारी सुहास्यमुखी दमयंती विस्मित होऊन वीर नलाला म्हणाली—" हे अनघा, तूं कोण आहेस? एखाद्या देवाप्रमाणें तूं येथें प्राप्त होऊन माझी हृदयव्यथा वाढवीत आहेस. यास्तव हे वीरा, तूं येथें कसा आलास, हें जाणण्याची माझी इच्छा आहे. हें माझें मंदिर राजाज्ञेनें उत्तम प्रकारें सुरक्षित आहे व माझा पिता अपराध्याला उग्र

शासन करीत असतो. येथें कोणाचाहि प्रवेश होऊं शकत नाहीं, असें असतां तूं कोणाच्याहि दृष्टीं न पडतां येथवर कसा येऊं शकलास?"

(३) दमयंतीचा हा प्रश्न ऐकून नल म्हणाला—हे कल्याणि, मी नल आहें, लोकपाल देवांचा निरोप घेऊन त्यांचा दूत म्हणून मी येथें आलों आहें. इंद्र, अग्नि, वरुण व यम हे चौघे लोकपाल तुझ्या प्राप्तीची इच्छा करीत आहेत. यास्तव हे शोभने, त्यांच्यापैकीं कोणातरी एकाला तूं वरावेंस, हें सांगण्यासाठीं त्यांनीं मला पाठविलें आहे. त्यांच्याच प्रभावानें मी येथें अदृश्यरूपानें प्रवेश करण्यास समर्थ झालों. मी तुझ्या या मंदिरांत येत असतां मला कोणी पाहूं शकलें नाहीं. त्यामुळें द्वारपालांनींहि माझें निवारण केलें नाहीं. त्या देवेश्वरांनीं मला याच कार्यासाठीं पाठविलें आहे. त्यांचा निरोप मीं तुला कळविला. तो ऐकून आतां तुला जसें योग्य वाटेल तसें कर. ३. ६. ५५.

---

## अध्याय ५६ वा.

[ १ दमयंतीचा नलालाच वरण्याचा निश्चय. २ नलानें लोकपालांना त्याचें केलेलें निवेदन. ]

(१) बृहदश्व म्हणाला—राजा युधिष्ठिरा, नलाचें हें भाषण ऐकून दमयंती त्या लोकपालांना नमस्कार करून नलाला स्मितपूर्वक म्हणाली—"हे राजन्, माझ्याशीं विवाह करण्यासाठीं मी तुझें कोणतें प्रिय करूं, तें सांग. माझ्या सर्व संपत्तीसह मी तुला आत्मसमर्पण करीत आहें. यावर विश्वास ठेव आणि माझ्याशीं विवाह कर.

हे वीरा, हंसाचें तें वचन माझ्या अंतःकरणाचा दाह करीत आहे. हे नृपाला, तुझ्यासाठींच मीं या सर्व भूपतींना येथें जमविलें आहे. यास्तव हे मानदा, तुजवर अनुरक्त असलेल्या माझा तूं जर स्वीकार न करशील तर तुझ्यासाठीं मी विष, अग्नि, जल किंवा गळफांस यांचा आश्रय करीन."

ती विदर्भ राजकन्या असें बोलली असतां, नल म्हणाला—"हे दमयंति, लोकपाल तुझ्या प्राप्तीसाठीं उत्सुक झाले असतां तूं मज मानवाची इच्छा कशी करितेस? त्या महात्म्या लोकपालांच्या चरणधूलीचीहि योग्यता मजमध्यें नाहीं. यास्तव हे शुभे, तुझें मन त्यांच्या ठिकाणींच आसक्त होऊं दे. कारण देवांचें अप्रिय करणारा मानव मृत्यूला प्राप्त होत असतो. म्हणून हे सुलोचने,

त्या देवश्रेष्ठांना वर व माझें रक्षण कर. त्या देवांना प्राप्त होऊन मूल्यवान् वस्त्रें, विचित्र पुष्पमाला व दिव्य भूषणें यांचा उपभोग घे.

हे राजकन्ये, जो या समग्र पृथ्वीचा उपसंहार करून तिला ग्रासून टाकितो, त्या देवेश्वर अग्नीला कोणती बरें स्त्री वरणार नाहीं ? ज्याच्या दंडभयानें सर्व प्राणिमात्र धर्मालाच अनुसरतात, त्या यमाला कोणती स्त्री पति म्हणून स्वीकारणार नाहीं ? किंवा दैत्य व दानव यांचा संहार करणाऱ्या महेंद्राशीं विवाहबद्ध होण्यास कोणती स्त्री तयार होणार नाहीं ? लोकपाल वरुणाला तूं निःशंकपणें वरावेंस, असें मला वाटतें. मज सुहृदाचें हें वचन ऐक."

नैषधाचें हें भाषण ऐकून दमयंतीचे नेत्र दुःखाश्रूंनीं भरून आले. ती सद्गदित वाणीनें म्हणाली—"हे पृथ्वीपते, मी सर्व देवांना वंदन करून तुलाच भर्ता म्हणून वरीन. ही माझी सत्यप्रतिज्ञा मी तुला सांगतें."

तेव्हां थरथरां कांपत हात जोडून उभ्या राहिलेल्या त्या विदर्भराजकन्येला नल म्हणाला—"हे कल्याणि, मी देवांचा दूत म्हणून आलों आहें, हें लक्षांत घेऊन त्याप्रमाणें वाग. हे शुभे, मी दुसऱ्याचें, विशेषतः देवतांचें कार्य करण्याची प्रतिज्ञा करून आलों असतां त्यांत स्वार्थ कसा साधूं ! त्यांतूनहि हा जर धर्म असेल व त्यांत माझा स्वार्थ साधत असेल तर मी तें अवश्य करीन. यास्तव हे भद्रे, असा कांहीं तरी उपाय सांग."

नलाचें हें भाषण ऐकून दमयंती बाष्पाकुल मंद वाणीनें त्या राजाला म्हणाली—"हे नरेश्वरा, मला एक निरुपद्रवी उपाय सुचला आहे. त्यायोगें तुलाहि दोष लागणार नाहीं. हे राजन्, जेथें माझा स्वयंवर होणार आहे, त्या मंडपांत त्या देवश्रेष्ठांबरोबर तूंहि ये. त्या वेळीं त्या लोकपालांसमक्ष मी तुला वरीन. म्हणजे त्यांत तुझ्याकडे कोणत्याच प्रकारें दोष येणार नाहीं."

राजा युधिष्ठिरा, दमयंतीचें हें भाषण ऐकल्यावर नलराजा जेथें ते लोकपाल जमले होते, तेथें पुनः परत आला. त्या नरश्रेष्ठाला येत असलेलें पाहून ते सर्व महेश्वर त्याच्या समीप आले व त्याला सर्व वृत्तान्त विचारूं लागले. ते म्हणाले—"हे राजा, तूं ती शुचिस्मिता दमयंती पाहिलीस काय ? ती राजनंदिनी काय बोलली, तें सर्व आम्हांला सांग."

(२) नल—हे सुरोत्तमहो, तुमच्या आज्ञेप्रमाणें मी दमयंतीच्या मंदिरांत गेलों. तेथील राजद्वारप्रवेश दंडधारण करणाऱ्या वृद्ध द्वारपालांनीं परिवेष्टित

होता. तुमच्या सामर्थ्यामुळें फक्त राजकुमारी खेरीज इतर कोणीहि पुरुष मला पाहूं शकला नाहीं. मीं दमयंतीच्या सख्यांना पाहिलें व त्याहि मला पाहून विस्मित झाल्या. मी दमयंतीला तुमचा संदेश सांगितला असतां ' तिनें मलाच वरण्याचा संकल्प केला आहे ' असें तुम्हांला स्पष्ट कळविण्यास सांगितलें. ती बाला म्हणाली—" त्या सर्व देवेश्वरांसहित तूंहि स्वयंवरास ये, म्हणजे त्यांच्या समक्ष मी तुलाच माळ घालीन. म्हणजे तुला कोणत्याच प्रकारचा दोष लागणार नाहीं. "

हे विबुधेश्वरहो, याप्रमाणें तेथें जो वृत्तान्त घडला, तो मीं तुम्हांला सविस्तर कथन केला आहे. ३. ६. ५६.

---

## अध्याय ५७ वा.

[ १. स्वयंवरमंडपांत दमयंतीनें देवांच्या अनुग्रहानें केलेला नलाचा पतित्वानें स्वीकार. २. अग्न्यादि लोकपालांनीं दिलेले वर. ३. नलाचा सुखविहार. ]

( १ ) बृहदश्व—राजा युधिष्ठिरा, त्यानंतर शुभ काल व पुण्य मुहूर्त प्राप्त झाला असतां भीमराजानें सर्व महीपालांना स्वयंवरमंडपांत बोलाविलें. त्याचें तें निमंत्रण ऐकून दमयंतीची इच्छा करणारे ते सर्व भूपाल कामपीडित होऊन मोठ्या त्वरेनें तेथें जमा झाले.

हे भारता, सिंह जसे पर्वतावर चढतात, तसे ते सर्व नृपति स्वयंवरमंडपांतील उंच सिंहासनांवर आरूढ झाले. तो मंडप सुवर्णाच्या सुंदर स्तंभांनीं व अनेक प्रवेशद्वारांनीं सुशोभित केला होता. त्या भव्य मंडपांत ते सर्व पुष्पमाला व विचित्र रत्नमय कुंडलें धारण करणारे नरेश्वर विविध आसनांवर बसले असतां ती सभा नागांनीं व्यापिलेल्या भोगावतीप्रमाणें, किंवा व्याघ्रांनीं व्याप्त झालेल्या गिरिगुहेप्रमाणें शोभली.

त्या सभेंत बसलेल्या पुरुषव्याघ्रांचे पुष्ट व परिघासारखे बाहू आकार आणि वर्ण यांच्या योगानें पांच फणा असलेल्या नागांप्रमाणें भासत होते. त्या सर्व नृपालांचे केंस, नासिका, नेत्र व भुंवया मनोहर असल्यामुळें नक्षत्रांनीं शोभणाऱ्या आकाशाप्रमाणें त्यांचीं मुखें शोभत होतीं.

हे भारता, त्यानंतर कमलवदना दमयंती आपल्या मुखकांतीनें त्या नृपालांचे नेत्र दिपवीत व त्यांच्या चित्तांचें हरण करीत स्वयंवरमंडपांत आली. त्या वेळीं

त्या नरेश्वरांची दृष्टि त्या नृपतनयेच्या ज्या ज्या अवयवाकडे गेली, तेथेंच ती खिळून बसली. त्यानंतर तेथें जमलेल्या भूपालांचीं नांवें सांगितलीं जात असतां त्या भीमकबालेनें समान आकृतीचे पांच पुरुष तेथें बसलेले पाहिले.

त्या सर्वांचा सारखा वर्ण व आकार पाहून दमयंती संशयांत पडली व ती त्यांतील खऱ्या नलाला ओळखूं शकली नाहीं. त्या पांचांपैकीं ज्याच्याकडे ती पाहूं लागे, तो तिला नलासारखाच दिसे. तेव्हां त्यांना पाहून ती सचिंत झाली व मनांत म्हणाली—"मी देवांना कशी ओळखूं व मला नलराजाचें ज्ञान कसें होईल!"

याप्रमाणें अतिशय खिन्न झालेली ती दमयंती विचार करीत असतां तिला पूर्वीं ऐकलेल्या देवचिह्नांचें स्मरण झालें व ती पुनः विचार करूं लागली—"मीं पूर्वीं वृद्धांच्या तोंडून देवांचीं जीं लक्षणें ऐकलीं आहेत, त्यांतील एकहि भूलोकीं अवतीर्ण झालेल्या या देवांच्या ठिकाणीं दिसत नाहीं. यास्तव आतां त्या देवांनाच शरण जाणें उचित होय" असा निश्चय करून ती वाणीनें व मनानें त्या लोकपालांना नमस्कार करून हात जोडून थरथरां कांपत असें वचन बोलली—

"हंसाचें वचन ऐकून ज्या अर्थीं मीं निषधाधिपाला वरिलें आहे, त्या अर्थीं त्या सत्याच्या बलावर हे लोकपाल आपलें स्वरूप प्रकट करोत व मला नल दाखवोत. मीं मनानें किंवा वाणीनेंहि नलावांचून अन्य पुरुषाची इच्छा केली नाहीं, त्या सत्याच्या बलावर हे देव प्रकट होवोत.

दैवानेंच निषधराजाला माझा भर्ता नियत केलें आहे, त्या सत्यानेंच हे देव आपलें स्वरूप व्यक्त करोत. मीं जें नलराजाच्या प्राप्तीसाठीं व्रत आरंभिलें आहे, त्या सत्यबलावर हे देव मला आपलें रूप दाखवोत. ज्यायोगें पुण्यश्लोक नलराजाला मी ओळखूं शकेन असें आपलें स्वरूप हे लोकपाल महेश्वर प्रकट करोत."

राजा, दमयंतीचा तो करुणास्पद विलाप ऐकून व तिचा परम निश्चय, नलावरील योग्य अनुराग, मनाची शुद्धि, आणि नैषधावरील भक्ति व प्रेम पाहून देवांनीं आपलें खरें रूप प्रकट केलें आणि नलाला ओळखण्याचें सामर्थ्य तिला दिलें.

त्या वेळीं हे पांडुपुत्रा, दमयंतीनें ते चौघेहि लोकपाल देवांच्या लक्षणांनीं युक्त असलेले पाहिले. त्या सुरेंद्रांच्या अंगाला घाम नव्हता, त्यांचे नेत्र निमि-

षोन्मेषरहित होते. त्यांचें अंग धूलीनें मलिन झालें नव्हतें. ते अंतरालीं स्थित होते आणि त्यांच्या गळ्यांतील पुष्पमाला प्रफुल्लित होत्या.

परंतु नलाची स्थिति याच्या उलट होती. तो नरेंद्र छायेनें युक्त होता, त्याच्या गळ्यांतील पुष्पमाला कोमेजली होती. त्याच्या अंगाला घाम येत होता. त्याचे नेत्र निमिषोन्मेष करीत असून तो भूमीवर बसला होता.

याप्रमाणें त्या देवांना आणि नलाला पाहून त्या वैदर्भराजकन्येनें धर्मतः नैषधाला वरिलें. त्या कमलपत्राक्षीनें लज्जेनें आपल्या पदराचें अग्र हातांत धरिलें आणि त्या नराधिपाच्या गळ्यांत परम शोभिवंत असलेली पुष्पमाला घातली. त्या मनोरम राजपुत्रीनें नलाला 'भर्ता' म्हणून वरतांच इतर सर्व भूपालांच्या तोंडून हाहाकाराचे उद्गार सहज निघूं लागले.

त्यावेळीं तो स्वयंवर पाहून विस्मित झालेल्या देवांनीं व महर्षींनीं 'धन्य, धन्य' असे आनंदोद्गार काढून नलराजाची प्रशंसा केली.

हे नृपश्रेष्ठा, अशाप्रकारें दमयंतीनें कंठांत पुष्पमाला घालून नलाला वरिलें असतां संतुष्ट झालेल्या त्या वीरसेनसुतानें श्रेष्ठ नृपतनयेला असें आश्वासन दिलें. तो पृथ्वीपाल नल म्हणाला—"हे कल्याणि, ज्या अर्थी सर्व लोकपालांच्या समक्ष तूं मज मानवाला वरून मजवरील भक्ति व्यक्त केलीस, त्या अर्थी मी तुझ्या वचनांत सदैव तत्पर राहीन. हे शुचिस्मिते, जोंवर माझ्या देहांत प्राण आहेत, तोंवर मी सर्वस्वी तुझ्या अधीन असेन, हें मी तुला सत्य सांगत आहें."

( २ ) नलराजाचें हें आश्वासन ऐकून दमयंतीनें हात जोडून त्याचें अभिनंदन केलें. नंतर तीं उभयतां परस्परांकडे प्रेमानें अवलोकन करून अग्निप्रभृति लोकपालांना मनानें शरण गेलीं. तेव्हां भीमकनंदिनीनें नैषधाला वरलेलें पाहून महाबलाढ्य लोकपाल हृष्ट झाले व त्या सर्वांनीं मिळून नलराजाला आठ वर दिले.

संतुष्ट झालेल्या शक्रानें नलाला 'यज्ञामध्यें मी तुला प्रत्यक्ष दर्शन देईन व तुला उत्तम शुभ गति प्राप्त होईल' असे दोन वर दिले.

अग्नीनें 'तूं जेथें इच्छा करशील त्या स्थलीं मी आविर्भूत होईन व तुला माझ्यासारख्या तेजस्वी लोकाची प्राप्ति होईल' असे दोन वर दिले.

यमानें 'कसलेंहि कदन्न असलें तरी तें तुझ्या हातांत विशिष्ट रस आणि स्वाद यांनीं युक्त होईल व तुला परमगति प्राप्त होईल' असे आणि वरुणानें

'नैषधानें मनांत आणतांच निर्जल प्रदेशींहि जलाचा प्रादुर्भाव व उत्तम सुगंधयुक्त पुष्पमालेची प्राप्ति' हे वर त्याला दिले.

याप्रमाणें प्रत्येक लोकपालानें त्याला दोन दोन वर दिले व स्वर्गलोकीं प्रयाण केलें. त्याचप्रमाणें तेथें जमलेले सर्व नृपतीहि दमयंतीच्या स्वयंवरानें विस्मित व आनंदित होऊन आपापल्या देशीं परत गेले.

ते सर्व भूपाल परत गेले असतां संतुष्ट झालेल्या भीमराजानें नल व दमयंती यांचा यथाविधि विवाह करविला. त्यानंतर तो नरश्रेष्ठ कांहीं काल तेथें राहिला व विदर्भाधिपतीनें अनुज्ञा दिली असतां स्वदेशीं परत आला.

( ३ ) हे राजन्, अशा प्रकारें तो पुण्यश्लोक नृपति श्रेष्ठ स्त्रीरत्न मिळवून शचीसह शोभणाऱ्या इंद्राप्रमाणें सुखोपभोग घेऊं लागला.

सूर्याप्रमाणें तेजस्वी असलेला तो वीर मोठ्या हृष्ट चित्तानें प्रजेचें रंजन करून धर्मानें परिपालन करीत होता. नहुषपुत्र ययातीप्रमाणें त्या नृपश्रेष्ठानें अश्वमेध व दुसरेहि अनेक विपुल दक्षिणायुक्त यज्ञ केले. त्या अमरतुल्य नलराजानें दमयंतीसह अनेक वनें आणि उपवनें यांत विहार केला.

त्यानंतर महात्मा नल व साध्वी दमयंती या दांपत्याला 'इंद्रसेन'-नामक पुत्र व 'इंद्रसेना'-नांवाची कन्या झाली.

राजा, अशाप्रकारें त्या पृथ्वीपति नलानें यज्ञ व विहार करीत धनानें परिपूर्ण असलेल्या वसुधेचें रक्षण केलें. ३. ६. ५७.

---

## अध्याय ५८ वा.

[ १ दमयंतीच्या स्वयंवराविषयीं देवांचा कलीशीं संवाद. २ कलीचा नलाला राज्यभ्रष्ट करण्याचा संकेत. ]

बृहदश्व—राजा, दमयंतीनें नलाशीं विवाह केला असतां महाबलाढ्य लोकपाल परत जाण्यास निघाले. तेव्हां त्यांना मार्गांत कलीसह द्वापर भेटला.

---

१ पूर्वाध्यायांत देवांपासून ज्याला वर मिळाले आहेत व जो रूप, औदार्य इत्यादि गुणांनीं युक्त आहे, अशा नलाला दमयंतीच्या प्राप्तीनें झालेल्या सुखाचें वर्णन करून, आतां या अध्यायांत बृहदश्वमुनि त्यालाच दुर्व्यसनामुळें प्राप्त झालेल्या आपत्तीचें वर्णन करण्यास आरंभ करीत आहे.

त्यांस पाहून बल व वृत्र यांचा वध करणारा इंद्र म्हणाला—" हे कले, द्वापरासह तूं आज कोठें चालला आहेस ? "

त्यावर कलि म्हणाला—आम्ही दमयंतीच्या स्वयंवरास चाललों आहों. माझें मन दमयंतीवर गेलें आहे. मी तिला वरणार आहें.

कलीचें हें भाषण ऐकून इंद्र हंसून म्हणाला—अरे, दमयंतीचा स्वयंवर झाला सुद्धां ! त्या राजकन्येनें आमच्या समक्ष नलराजाला वरिलें.

इंद्राचे हे शब्द ऐकतांच कलि अत्यंत क्रुद्ध झाला आणि सर्व देवांना संबोधून म्हणाला—"हे देवहो, ज्या अर्थी त्या दमयंतीनें देवांना सोडून मनुष्याला वरिलें आहे त्या अर्थी ती विपुल दंडाला पात्र आहे."

कलि असें बोलला असतां इंद्रादि लोकपाल त्यास म्हणाले—आमच्या अनुमतीनेंच दमयंतीनें नलाला वरिलें. अरे, नलासारख्या सर्वगुणसंपन्न नृपाची इच्छा कोणती स्त्री करणार नाहीं ! तो निषधाधिपतिहि धर्मवेत्ता व सदाचरणी आहे. त्यानें इतिहास-पुराणांसह चारी वेदांचें अध्ययन केलें आहे. त्याच्या राजमंदिरांत यज्ञामध्यें सर्व देव धर्मतः तृप्त होतात. तो हिंसा न करणारा, सत्यवादी व दृढव्रत धारण करणारा आहे. त्याच्या ठिकाणीं नित्य उत्साह, यथार्थ भाषण, धृति, ज्ञान, स्वधर्मनिष्ठा, शौच, शम आणि दम हे सर्व सद्गुण सर्वदा स्थित आहेत. तो लोकपालतुल्य असलेला पुरुषव्याघ्र कितीहि विघ्नें आलीं तरी आपल्या या स्वभावापासून कधींहि च्युत होत नाहीं. हे कले, अशा श्रेष्ठ गुणांनीं युक्त असलेल्या नलाला जो शाप देण्याची इच्छा करील, तो मूढ स्वतःलाच शाप देऊन आपलाच घात करील किंवा घोर नरकांत बुडेल.

( २ ) राजा, कलि व द्वापर यांस असें सांगून ते देवश्रेष्ठ स्वर्गलोकीं निघून गेले. नंतर कलि द्वापरास म्हणाला—" हे द्वापरा, मी हा क्रोध सहन करण्यास समर्थ नाहीं. मी नलाच्या देहांत प्रवेश करून त्याला राज्यभ्रष्ट करीन, म्हणजे तो दमयंतीसह सुखानुभव घेऊं शकणार नाहीं. यास्तव तूं द्यूतांतील फाशांत प्रवेश करून मला साह्य कर. " ५. ६. ५८.

## अध्याय ५९ वा.

[ १ कलीचा नलशरीरांत प्रवेश. २ त्याच्या भ्रात्याला द्यूताचें प्रोत्साहन. ३ पुष्कराचें नलाशीं द्यूत. ४ राजाचा पराभव. ]

( १ ) बृहदश्व—हे पांडुपुत्रा, याप्रमाणें कलि द्वापराशीं संकेत करून जेथें नलराजा होता तेथें गेला आणि त्या निषधेश्वराचें छिद्र शोधीत दीर्घकाल राहिला. परंतु बारा वर्षेपर्यंत त्याला नलामध्यें यत्किंचित्‌हि दोष आढळला नाहीं. पुढें एकदा नलराजानें देहधर्मानंतर पाय धुवून शुचिर्भूत न होतांच संध्या केली. एवढें छिद्र दिसतांच कलीनें तत्काल त्या धर्मनिष्ठ राजाच्या देहांत प्रवेश केला.

( २ ) याप्रमाणें नलाच्या शरीरांत आविष्ट होऊन कलि अन्य रूपानें पुष्करापाशीं गेला व नलाच्या त्या भ्रात्याला म्हणाला—" हे पुष्करा, तूं नलराजाशीं द्यूत खेळ, मी तुला साह्य करीन. माझ्या साह्यानें तूं त्या राजाला द्यूतांत निःसंशय जिंकशील आणि त्याचें समृद्ध राज्य व सर्व निषधदेश यांस प्राप्त होशील."

राजन्, कलीच्या अशा प्रोत्साहनानें लोभग्रस्त पुष्कर नलाकडे यावयास निघाला व कलीहि श्रेष्ठ फांसा होऊन पुष्कराच्या हातीं आला.

त्यानंतर पुष्कर नलापाशीं येऊन 'हे भ्रात्या, या श्रेष्ठ अक्षानें माझ्याशीं द्यूत खेळ' असें पुनः पुनः आह्वान करूं लागला. तेव्हां तो उदारात्मा नल त्याचें तें आह्वान नाकारण्यास समर्थ झाला नाहीं. त्या क्षत्रधर्मनिष्ठ राजानें दमयंतीच्या समक्ष द्यूताचें आह्वान स्वीकारिलें.

( ३ ) युधिष्ठिरा, त्यांचें द्यूत सुरू झालें असतां नलराजानें त्यांत सुवर्ण, अश्व, रथादि वहानें, मूल्यवान् वस्त्रें इत्यादि अनेक वस्तु पणाला लाविल्या. परंतु कलीनें ज्याच्या शरीरांत प्रवेश केला आहे अशा नलाचा त्या द्यूतांत पराभव झाला. तो महात्मा पुण्यश्लोक त्या वेळीं द्यूतमदानें मत्त झाला होता. त्यामुळें त्याच्या सुहृदांतील कोणीहि त्याचें निवारण करूं शकला नाहीं.

हे भारता, नलराजा द्यूतमग्न झाल्याचें ऐकून मंत्र्यांसह सर्व प्रजाजन राजाला भेटून, त्याचें निवारण करण्यासाठीं आतुर होऊन राजभवनापाशीं आले व नलाचा सारथि दमयंतीला हें वृत्त निवेदन करावयास गेला. तो म्हणाला—" हे देवि, हे सर्व नागरिक राजद्वारीं येऊन उभे राहिले आहेत. यास्तव ते आल्याची वार्ता महाराजांस कळीव. ते सर्व प्रजाजन धर्मार्थदर्शी राजाचें या महत्संकटापासून निवारण करण्यासाठीं येथें जमले आहेत."

सूताचें हें वचन ऐकून दमयंती शोकानें मोहित झाली. दुःखार्त झालेल्या त्या राज्ञीनें सद्गदित वाणीनें राजाला म्हटलें—" हे राजन्, मंत्र्यासह तुझे सर्व राजनिष्ठ नागरिक तुला भेटण्यासाठीं दारांत येऊन उभे राहिले आहेत. यास्तव त्यांना एकवार दर्शन दे. "

पण राजानें तिच्या भाषणाकडे लक्ष दिलें नाहीं ! साध्वी दमयंती पुनः पुनः तेंच वाक्य उच्चारून विलापहि करूं लागली. पण कलीनें मोहित केलेला तो राजा तिच्याशीं एक अक्षरहि बोलला नाहीं. तें पाहून त्याचे सर्व मंत्री व नगरवासी जन ' हर, हर, या राजाचा सर्वथा नाश झाला' असें म्हणत लज्जित व दुःखार्त होऊन आपापल्या घरीं परत गेले.

( ४ ) राजा युधिष्ठिरा, याप्रमाणें नल व पुष्कर यांचें तें द्यूत अनेक महिने चाललें होतें. त्यांत शेवटीं पुण्यश्लोक नलराजा जिंकिला गेला. ३. ६. ५९.

---

## अध्याय ६० वा.

[ १ नलाची द्यूतासक्ति व उत्तरोत्तर पराभव. २ दमयंतीच्या हितवचनाकडे दुर्लक्ष. ३ राजापत्यांना कुंडिनपुरास पाठविणें. ]

( १ ) बृहदश्व—पांडुपुत्रा, द्यूतासक्तीनें विवेकहीन झालेल्या पुण्यश्लोक नलराजाला पाहून जिची विवेकबुद्धि जागृत आहे, अशी दमयंती शोकाकुल झाली. त्या भीमराजाच्या कन्येनें राजाच्या फार मोठ्या कर्तव्याचा विचार केला. त्या नृपतीचें प्रिय करण्याची इच्छा करणाऱ्या त्या राज्ञीला नलाचें सर्वस्वहरण होत आहे, हें पाहून भावी संकटाची कल्पना आली.

तिनें आपल्या विश्वासु धात्रीला हांक मारिली. ती चतुर परिचारिका मधुर भाषण करणारी, सर्वार्थकुशल व दमयंतीच्या हितामध्यें सदैव तत्पर असे. तिला दमयंती म्हणाली—" हे बृहत्सेने, अमात्यांकडे जा व त्यांस ' नलराजानें तुम्हांला बोलिवलें आहे ' अशी राजाज्ञा कथन कर आणि येथें घेऊन ये. राजानें या द्यूतांत आपलें धन हरवलें किती व अवशिष्ट राहिलें किती तेंहि त्यांना सांग. "

( २ ) राजन्, ती आज्ञा ऐकून सर्व मंत्री ' खरोखर आज आमचें भाग्यच उघडलें ' असें म्हणत राजभवनापाशीं पुनः आले. सर्व अमात्य तेथें जमले

असतां दमयंतीनें तें वृत्त राजाला पुनः कळविलें. परंतु त्यानें तिच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. आपला पति आपल्या भाषणाकडे दुर्लक्ष करीत आहे व त्याचें यत्किंचित्‌हि अभिनंदन करीत नाहीं, असें पाहून लज्जित झालेली दमयंती पुनः आपल्या अंतःपुरांत परत गेली. द्यूतामध्यें फांसे नलाच्या विरुद्ध पडत असून त्याचें सर्वस्व नष्ट होत आहे, हें ऐकून त्या राजनंदिनीनें पुनः आपल्या धात्रीला हांक मारिली आणि 'हे बृहत्सेने, नलाच्या वार्ष्णेय सारथ्याकडे जा व नलाज्ञेनें त्याला बोलावून आण, फार मोठें कार्य उपस्थित झालें आहे' असें म्हटलें.

तेव्हां बृहत्सेनेनें दमयंतीची ती आज्ञा ऐकून हितेच्छु पुरुषांकडून वार्ष्णेयाला बोलावून आणिलें. तेव्हां त्या देशकालज्ञ साध्वीनें वार्ष्णेयाला सद्गदित वाणीनें म्हटलें—" हे सारथे, तुझ्याशीं नलराजा किती सौजन्यानें वागत असे, हें तुला ठाऊकच आहे. यास्तव आतां त्या महात्म्यावर संकट ओढवलें असतां त्याला साह्य करणें हें तुझें कर्तव्य आहे.

( ३ ) हे सूता, पुष्कराकडून हा राजा जसा जसा जिंकला जात आहे, तसें तसें त्याचें द्यूतावरील प्रेम अधिक वाढत चाललें आहे. त्याचप्रमाणें पुष्कराचे फांसे त्याला अनुकूल व नलाला प्रतिकूल पडत असलेले दिसत आहेत. हा मोहित झालेला राजा सुहृदांचें हितवचन ऐकत नाहीं व माझेंहि सांगणें मनावर घेत नाहीं. परंतु खरोखर माझ्या भाषणाकडे दुर्लक्ष करणें हा महात्म्या नैषधाचा दोष नव्हे, तर तो द्यूतजन्य मोहाचा परिणाम आहे.

यास्तव हे सारथे, मी तुला शरण आलें आहें. तूं माझें एक कार्य कर. माझें मन साशंक होत आहे. कदाचित् द्यूताच्या नादानें या राजाचा नाशहि होईल. यास्तव नलराजाचे मनोवेगानें जाणारे आवडते अश्व रथाला जोडून माझ्या या कुमार-कुमारीला माझ्या पित्याच्या कुंडिननगरीस घेऊन जा. तेथें त्यांना माझ्या आप्तांच्या स्वाधीन करून रथ व अश्व तेथेंच ठेव आणि तुला योग्य वाटल्यास तूंहि तेथेंच रहा किंवा अन्य कोठें जा. "

दमयंतीचें हें भाषण ऐकून नलाचा सारथि वार्ष्णेय मुख्य अमात्यांकडे गेला व त्यानें त्यांस दमयंतीची सर्व योजना निःशेष कथन केली. तेव्हां हे राजन्, त्या अमात्यांनीं विचारपूर्वक निश्चय करून त्यास आपली अनुमति दिली असतां त्या सारथ्यानें नलाच्या रथावर स्वतः आरूढ होऊन त्या दोन अपत्यांसहि त्यांत

बसविलें व तो राजपुत्र आणि राजकन्या यांना विदर्भदेशीं घेऊन गेला. तेथें इंद्रसेन व इंद्रसेना यांना भीमराजाच्या स्वाधीन करून व भैमीच्या आज्ञेप्रमाणें नलाचा तो श्रेष्ठ रथ आणि अश्व तेथेंच ठेवून तो विदर्भाधिपतीचा निरोप घेऊन निघाला.

राजा, तो सारथि नलराजाची ती दुःस्थिति मनांत आणून अतिशय शोकाकुल झाला व वेतनावर काम करण्याची इच्छा करणारा तो देशाटन करीत चालला असतां अयोध्यानगरीस येऊन पोंचला. तेथें दुःखार्त झालेला तो सूत ऋतुपर्ण राजापाशीं राहिला व वेतन घेऊन त्या नृपतीचें सारथ्य करूं लागला. ३. ६. ६०.

---

## अध्याय ६१ वा.

[ १ नलाच्या सर्वस्वाचा अपहार. २ दमयंतीसह नगरत्याग. ३ कलीनें पक्षिरूपानें केलेला वस्त्रापहार. ४ नलाचा शोक व दमयंतीशीं संवाद. ]

( १ ) बृहदश्व—राजा, वार्ष्णेय निघून गेला असतां इकडे पुष्करानें द्यूत खेळणाऱ्या पुण्यश्लोक नलाचें राज्य व सर्व धन द्यूतांत जिंकून घेतलें. अशा रीतीनें सर्व राज्य हरण केल्यानंतर पुष्कर त्याला हंसून म्हणाला—“ हे नला, पुनः द्यूतास आरंभ कर. परंतु अगोदर तूं पणाला काय लावणार आहेस, तें सांग. कारण मीं तुझें सर्व ऐश्वर्य जिंकून घेतलें आहे. आतां फक्त दमयंती तेवढी तुजपाशीं शिल्लक राहिली आहे. तुझी जर इच्छा असली तर तिला पणाला लाव. ”

( २ ) पुष्कराचें हें निंद्य वचन ऐकून पुण्यश्लोक नलाचें हृदय क्रोधानें विदीर्ण झालें. त्यानें पुष्कराला कांहींहि उत्तर दिलें नाहीं. त्या अतिशय क्रोधसंतप्त झालेल्या राजानें पुष्कराकडे पाहून आपल्या अंगावरील सर्व मूल्यवान् वस्त्रें व भूषणें काढून टाकून दिलीं व सुहृदांचा खेद वाढविणारा तो नल आपल्या विपुल वैभवाचा त्याग करून उत्तरीय वस्त्रहि न घेतां केवळ एका वस्त्रानें बाहेर पडला. त्यावेळीं दमयंतीहि एकच वस्त्र परिधान करून त्याच्या मागोमाग निघाली. नंतर तो महायशस्वी नल तिच्यासह तीन रात्री नगराबाहेर राहिला.

तेव्हां हे महाराज, पुष्करानें 'जो कोणी नलाशीं सहानुभूतीनें वागेल व त्याला साह्य करील त्याचा माझ्या आज्ञेनें वध केला जाईल' अशी सर्वत्र घोषणा केली. ती ऐकून सर्व नागरिकांनीं पुष्कराची आज्ञा व त्याचा दीर्घद्वेष यांच्या भीतीनें नलाचा सन्मान केला नाहीं. अशाप्रकारें सत्कारास योग्य असलेल्याहि नलाचा कोणीं सत्कार न केल्यामुळें तो नगराबाहेर केवल जल-पान करून तीन दिवस राहिला. नंतर क्षुधेनें पीडित झालेला तो फल-मूलांवर उपजीविका करूं लागला. दमयंतीहि त्यालाच अनुसरली.

( ३ ) याप्रमाणें क्षुत्पीडित झालेला नल पुष्कळ दिवस नगराबाहेर राहिला असतां एकदा त्याला सोनेरी पंखांनीं युक्त असलेले पक्षी दिसले. त्यांस पाहून बलाढ्य निषधाधिपतीनें 'आज आपल्याला हें चांगलें भक्ष्य सांपडलें आहे, या पक्ष्यांच्या सुवर्ण पंखांवर मला द्रव्यहि मिळवितां येईल;' असा विचार करून आपल्या परिधानीय वस्त्राचा पदर त्या पक्ष्यांवर टाकिला व त्यांत त्यांस धरण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या दुर्दैवी राजानें आपलें वस्त्र त्यांच्यावर टाकतांच ते सर्व खग त्या वस्त्रासह अंतरिक्षांत उडून गेले व जातां जातां भूमीवर अधोमुख, दीन व वस्त्ररहित होऊन वेड्याप्रमाणें उभ्या राहिलेल्या नलाला अंतरिक्षांतून संबोधून म्हणाले—"हे दुर्बुद्धे, तुझें वस्त्र हरण करण्याची इच्छा करणारे आम्ही फांसे आहोंत. तूं एक तरी वस्त्र बरोबर नेत आहेस, हें सहन न होऊन त्याचा अपहार करण्यासाठीं आम्ही आलों आहों."

( ४ ) युधिष्ठिरा, तेव्हां पक्षिरूपानें आपल्या समीप येऊन वस्त्रापहार करणाऱ्या फांशांकडे व स्वतःच्या वस्त्ररहित स्थितीकडे अवलोकन करून उदार-चरित नल दमयंतीला म्हणाला—"हे भीरु, ज्यांच्या कोपामुळें मी ऐश्वर्यापासून च्युत झालों, क्षुधेनें पीडित होऊन अतिशय कष्टानें प्राण धारण केले आणि ज्यांच्यामुळेंच निषधदेशांतील प्रजाजनांनीं माझा सत्कार केला नाहीं, तेच हे फांसे पक्ष्यांचें रूप धारण करून माझें वस्त्रहि हरण करीत आहेत! त्यांच्या प्रभावानेंच मी दुःखार्त व विवेकहीन झालों आहें. मला अतिशय विषाद वाटत आहे. हे शुभे, मी तुझा भर्ता तुला हितवचन सांगत आहें, तें ऐक. हे पहा, अवंती आणि ऋक्षवान् पर्वत, यांचें उल्लंघन करून दक्षिण दिशेकडे अनेक मार्ग जात आहेत. हा महाशैल विंध्याद्रि, ही समुद्राला मिळणारी पयोष्णी, व हे विपुल फल-मूलांनीं युक्त असलेले महर्षींचे आश्रम आहेत.

हा मार्ग विदर्भदेशाकडे व तो कोसल देशाकडे जातो. यांच्या पलीकडे हा दक्षिणापथ देश आहे."

हे भारता, दुखार्त झालेला नल दमयंतीला उद्देशून असें बोलला असतां अधिकच दुःखाकुल झालेली दमयंती सद्गदित कंठानें व करुण वाणीनें त्यास म्हणाली—"हे राजन्, आपल्या या संकल्पाचा पुनः पुनः विचार करूं लागलें म्हणजे माझ्या हृदयाचा थरकांप होतो व माझीं गात्रें व्याकुल होतात. हे महाराज, शत्रूनें आपलें राज्य, द्रव्य व वस्त्रहि हरण करून घेतलें आहे. आपण क्षुधेनें व्याकुळ व श्रांत झालां आहां, अशा स्थितींत आपणांस या निर्जन वनांत सोडून मी कशी बरें जाऊं! त्यापेक्षां मी जर आपल्याबरोबर असलें तर श्रांत व क्षुधार्त झालेल्या आपला श्रमपरिहार करीन. हे नरेश्वरा, सर्व दुःखांवर भार्येसारखें दुसरें कोणतेंहि श्रेष्ठ औषध नाहीं, असें वैद्यराजांचें मत आहे, हें मी आपल्याला सत्य सांगतें."

नल—हे दमयंति, तूं म्हणतेस तें सत्य आहे. खरोखर, दुःखार्त झालेल्या पुरुषाला भार्येसारखें दुसरें औषध नाहीं, किंवा संकटांत भार्येसारखा मित्र नाहीं. मी तुझा त्याग करीत नाहीं. हे भीरु, तूं व्यर्थ साशंक कां होतेस! हे साध्वि, मी प्रसंगीं माझ्या जीवाचा त्याग करीन, पण तुझा त्याग करणार नाहीं.

दमयंती—हे महाराज, माझा त्याग करण्याची जर तुझी इच्छा नाहीं, तर मग मला विदर्भदेशाचा मार्ग कां दाखवीत आहेस! हे नृपते, तूं माझा त्याग करण्यास समर्थ नाहींस, हें मी जाणतें; परंतु कलीनें तुझें मन कलुषित केल्यामुळें तूं माझाहि त्याग करशील! हे देवतुल्य महाराजा, त्यासाठींच तूं मला वारंवार कुंडिनपुराचा मार्ग दाखवीत आहेस व माझा शोक वाढवीत आहेस. हे नरश्रेष्ठा, मीं माझ्या पितृगृहीं जावें अशी जर तुझी इच्छा असेल, तर आपण उभयतां विदर्भदेशीं जाऊं या. तेथें विदर्भराज तुझा बहुमान करील. परंतु, हे राजन्, त्यानें जरी तुझा सत्कार केला तरी, श्वशुरगृहीं रहाणें निंद्य मानलें जात असल्यामुळें तुला तेथें रहाण्यांत सुख वाटणार नाहीं, हें मी पूर्णपणें जाणतें. ३. ६. ६१.

---

१ न च भार्यासमं किंचिद्विद्यते भिषजां मतम्।
औषधं सर्व दुःखेषु सत्यमेतद्ब्रवीमि ते ॥

## अध्याय ६२ वा.

[ १ नलदमयंतीचा वनांतील एका पर्णशालेंत वास. २ नलाचें भार्येला तेथेंच सोडून गमन. ]

(१) नल—हे दमयंति, कुंडिनपुराचें राज्य जसें तुझ्या पित्याचें आहे, तसेंच तें माझेंहि आहे, यांत संशय नाहीं. परंतु अशा विपन्नावस्थेंत मी तेथें कदापि जाणार नाहीं. ज्या मीं समृद्ध स्थितींत असतांना तेथें जाऊन तुझा हर्ष द्विगुणित केला, तोच ऐश्वर्यहीन झालेला मी आतां तेथें जाऊन तुझें दुःख कसें बरें वाढवूं ?

बृहद्श्व—राजा युधिष्ठिरा, असें बोलून त्या धर्मात्म्या नलानें अर्धे वस्त्र परिधान केलेल्या दमयंतीचें पुनः पुनः सांत्वन केलें. त्यानंतर तीं उभयतां एकच वस्त्र परिधान करून इतस्ततः भटकत फिरत असतां क्षुधा व तृषा यांनीं व्याकुळ होऊन एका पर्णशालेपाशीं आलीं. त्या शाळेंत प्रवेश करून तो निषधाधिप नल वैदर्भीसह भूमीवर बसला. त्यावेळीं त्याजपाशीं तृणासनहि नसल्यामुळें त्याचें शरीर धूलीनें मलीन झालें होतें. वस्त्रहीन झालेल्या त्यानें दमयंतीच्या अर्ध्या वस्त्रानें स्वतःचें शरीर आच्छादिलें होतें. अशा स्थितींत श्रांत झालेल्या त्यानें दमयंतीसह तेथें भूमीवरच शयन केलें. सुकुमारी राजनंदिनी दमयंती एकाएकीं अशा संकटांत सांपडल्याकारणानें अतिशय थकून गेली होती. त्यामुळें ग्लानि येऊन तिला तत्काल गाढ झोंप लागली.

परंतु हे पृथ्वीपते, साध्वी दमयंती जरी निद्रावश झाली तरी, शोकानें व्याकुलचित्त झालेल्या नलराजाला मात्र पूर्वीप्रमाणें स्वस्थ झोंप आली नाहीं. राज्याचा अपहार, सुहृज्जनांचा सर्वप्रकारें त्याग, वनवास, वस्त्रापहार आणि कलीनें दिलेले असह्य क्लेश या सर्व गोष्टींच्या स्मरणानें तो चिंताक्रान्त झाला व असा विचार करूं लागला—

'मीं असें केलें तर काय होईल व न केलें तर काय होईल ? मला मरण श्रेयस्कर आहे किंवा भार्येचा त्याग करणें हितावह होईल ! ही माझ्यावर अनुरक्त असल्यामुळें माझ्यासाठीं दुःख भोगीत आहे. मी जर हिला सोडून गेलों तर ही साध्वी कदाचित् आपल्या आप्तांकडे निघून जाईल. खरोखर मला अनुसरल्यामुळेंच ही या दुःखाला प्राप्त झाली आहे, यांत संशय नाहीं. मीं हिचा त्याग केला तर कदाचित् हिचे क्लेश दूर होतील व ही सुखी होईल.'

असा निश्चय करून व पुनः पुनः विचार करून त्या नराधिपानें दमयंतीचा त्याग करणेंच हितावह आहे, असें मनाशीं ठरविलें.

' ही साध्वी महा पतिव्रता आहे. ही यशस्विनी केवल मन्निष्ठ आहे. हिचें तेज पाहून मार्गामध्यें हिला कोणीहि अडवूं शकणार नाहीं. ' अशी नलाच्या मनाची पूर्ण खात्री असल्यामुळें त्यानें साध्वी पत्नीच्या त्यागाचा निश्चय दृढ केला. किंबहुना दुष्ट कलीनेंच त्याच्या मनांत दमयंतीच्या त्यागाची प्रेरणा केली. त्यावेळीं आपण वस्त्ररहित असून तिच्याच अर्ध्या वस्त्रानें स्वतःचा देह झांकून घेतला आहे, ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली; व त्या राजानें तिचें अर्धें वस्त्र कापून घेण्याचा निश्चय केला.

( २ ) पण 'ही साध्वी जागी न होतां मला हिचें वस्त्र कसें बरें फाडतां येईल ! ' असा विचार करीत नलराजा त्या झोंपडींत अंगावरील वस्त्र टाकून फिरूं लागला. तों त्याला अकस्मात् कोशांतून बाहेर काढलेलें एक तीक्ष्ण धारेचें खड्ग सांपडलें. तें घेऊन नलानें अर्धें वस्त्र कापलें व त्यानें आपलें शरीर आच्छादित केलें आणि गाढ झोंपीं गेलेल्या विदर्भराजनंदिनीला तेथेंच सोडून तो तेथून पळत सुटला.

परंतु हे भारता, तो साधु थोडें अंतर चालून गेला असतां त्याचें चित्त डळमळलें व तो तत्काल परत फिरला. महात्मा निषधाधिप पुनः त्या शून्य पर्णशालेंत परत आला व स्वस्थ निजलेल्या दमयंतीकडे पाहून असा विलाप करूं लागला. तो म्हणाला—" अरे अरे, जी माझी प्रिय पत्नी पूर्वीं वायु किंवा आदित्य यांच्याहि दृष्टी पडणें शक्य नव्हतें, तीच ही माझी सम्राज्ञी या पर्ण-शालेंत एखाद्या अनाथ स्त्रीप्रमाणें भूमीवर पडून शयन करीत आहे. हें फाड-लेलें अर्धें वस्त्र नेसून गाढ निद्रासुख अनुभवीत असलेली ही सुंदरी जेव्हां जागी होईल तेव्हां व्याघ्रादि हिंस्र पशूंनीं व्यापिलेल्या या घोर वनांत माझ्या-वांचून ती एकटी कशी हिंडेल ! हे महाभागे, तूं धर्माचरणानें युक्त आहेस, आदित्य, इंद्र, रुद्र, मरुद्गण व अश्विनिकुमार तुझें रक्षण करोत."

असें बोलून कलीनें विवेकहीन केलेला तो नल त्या अप्रतिम रूपवती भार्येला तेथेंच सोडून निघाला; पण त्याला पुढें जाववेना. म्हणून राजा नल कांहीं अंतरावर जाऊन पुनः परतला. त्यावेळीं त्या निष्पाप राजाला एकीकडे कलि आकर्षण करीत होता व दुसरीकडे दमयंतीचें प्रेम ओढीत होतें. त्यामुळें

त्या दुःखित राजाचें चित्त द्विधा झालें. झोंके घेणाऱ्या झोंपाळ्याप्रमाणें तो राजा वारंवार दूर जाई व पुनः त्या पर्णशालेकडे परत येई. शेवटीं कलीच्या प्रभावानें सर्वथा मूढ झालेला तो नल निद्रित भार्येला तेथेंच सोडून घोर वनांत शिरला व अनेकप्रकारें विलाप करूं लागला. युधिष्ठिरा, याप्रमाणें तो हतबुद्ध झालेला नृपति विवेकशून्य बनला व प्रिय दमयंतीला त्या निर्जन वनामध्यें टाकून दुःखित मनानें तेथून निघून गेला. ३. ६. ६२.

---

## अध्याय ६३ वा.

[ १ एकाकिनी दमयंतीचा विलाप. २ अजगरानें केलेलें तिचें ग्रहण. ३ मृगव्याधानें केलेली तिची मुक्तता. ४ तिच्या शापानें कामी व्याधाचा नाश. ]

( १ ) बृहदश्व—हे युधिष्ठिरा, पूर्वोक्त प्रकारें नल निघून गेला असतां साध्वी दमयंती जागी झाली. बराच वेळ गाढ झोंप लागल्यामुळें तिच्या श्रमांचा व श्रमजन्य ग्लानीचा परिहार झाला. पण आपला प्रिय पति जवळ नाहीं व आपल्या अंगावरील वस्त्र फाडलें आहे, असें पाहून ती भयभीत झाली. नलराजाहि तिला कोठें दिसेना. त्यामुळें शोकार्त व भयग्रस्त झालेली ती भैमी ' हे महाराज निषधराज, आपण कोठें आहां !' असें म्हणून मोठमोठ्यानें हांका मारून उच्च स्वरानें आक्रोश करूं लागली.

" हे नाथ, हे महाराज, हे स्वामिन्, माझा त्याग कां करतां ! अरे अरे, माझा घात झाला. माझा नाश झाला. या निर्जन वनांत मी अगदीं घाबरून गेलें आहें. हे महाराज, आपण धर्मज्ञ व सत्यप्रतिज्ञ आहां. स्वयंवरप्रसंगीं ' मी तुझा कदापि त्याग करणार नाहीं,' अशीं आपण सत्यप्रतिज्ञा करून आतां मला या घोर वनांत सोडून कसे बरें निघून गेलां ! आपल्याला सर्वथा अनुसरणाऱ्या या दक्ष भार्येला सोडून आपण कोठें गेलां ?

हे नरेश्वरा, पूर्वीं लोकपालांसमक्ष आपण जी प्रतिज्ञा केली ती सत्य करणेंच उचित आहे. ज्या अर्थीं त्याग केल्यावरहि ही आपली प्रियपत्नी क्षणभरहि जिवंत राहिली आहे, त्या अर्थीं मानवांना अकालीं मृत्यु विहित नाहीं हेंच स्पष्ट दिसतें.

हे नरश्रेष्ठा, आतांपर्यंत झाली एवढी थट्टा पुरे झाली. मी अतिशय भ्यालें आहें, यावेळीं मला दर्शन द्या. आपण जिकडे तिकडे दिसल्याचा मला भास होत आहे, आपण मला एकटीलाच सोडून कसे जाल! येथेंच एखाद्या झुडपाच्या आड लपून राहिलां असाल! मग मला उत्तर कां बरें देत नाहीं! हे नृपाला, अशा प्रकारें विलाप करणाऱ्या व भयानें व्याकुल झालेल्या मला धीर कां देत नाहीं. माझ्या या दुःखाचें निवारण कां करीत नाहीं. माझी अशाप्रकारें उपेक्षा करणें ही आपली केवढी निष्ठुरता आहे. हे प्रभो, मी माझ्या स्वतःसाठीं शोक करीत नाहीं. आपल्यासाठीं मला दुःख होत आहे. हे राजन्, क्षुधा, तृषा व श्रम यांनीं व्याकुल झालेले आपण सायंकालीं जेव्हां एखाद्या वृक्षाखालीं बसाल तेव्हां मजवांचून आपली काय स्थिति होईल!

याप्रमाणें विलाप करीत तीव्र शोकानें आर्त झालेली ती दमयंती दुःखानें जणुं काय दग्ध झाल्याप्रमाणेंच रडत रडत इतस्ततः धावूं लागली. शोकविह्वल होऊन ती टिटवीप्रमाणें आक्रोश करीत वारंवार विलाप करूं लागली.

( २ ) इतक्यांत क्षुधाक्रांत झालेल्या एका प्रचंड अजगरानें जवळून चाल-लेल्या दमयंतीस अकस्मात् धरिलें. पण त्यावेळीं अजगरानें ग्रासलेली व शोक संतप्त झालेली ती वैदर्भी नलासाठीं जितकी शोकविह्वल झाली होती तितकी स्वतःसाठीं झाली नाहीं.

ती म्हणाली—हे नाथ, या निर्जन वनामध्यें अनाथाप्रमाणें फिरणाऱ्या मला अजगरानें ग्रासलें असतां आपण धांवून कां येत नाहीं! हे प्रभो, माझी आठवण झाल्यावर आपण जिवंत कसे रहाल? मला या घोर वनांत सोडून आपण कसे निघून गेलांत? आपण जेव्हां या पापापासून मुक्त व्हाल व आपली विवेकबुद्धि जागृत होईल, तेव्हां माझ्या या त्यागाचा पश्चाताप होईल. हे निष्पाप राजा, श्रांत, क्षुधार्त व म्लान झालेल्या आपल्या श्रमाचा परिहार कोण करील!

( ३ ) राजा जनमेजया, ती भीमकन्या दमयंती याप्रमाणें त्या घोर वनांत उच्च स्वरानें आक्रोश करीत असतां तिचा करुण स्वर ऐकून वनांत संचार कर-णारा एक मृगव्याध वेगानें धांवला आणि एका प्रचंड अजगरानें ग्रासलेल्या त्या सुंदरीला पाहून त्याच्या जबड्यांतून तिला सोडविण्याच्या इच्छेनें मोठ्या

वेगानें हातांत तीक्ष्ण शस्त्र घेऊन आला. त्या शूरानें अजगराचें मुख फाडून व त्या दुष्ट प्राण्याचा वध करून दमयंतीला सोडविलें.

त्यानंतर त्या व्याधानें दमयंतीचें मलीन झालेलें शरीर धुवून व तिला आश्वासन देऊन आहारार्थ वन्यफलें आणून दिलीं. तेव्हां तीं वन्यफलें भक्षण करून व जलपान करून ती साध्वी शांत झाली.

नंतर तो व्याध तिला म्हणाला—हे कमलनयने, तूं कोणाची कोण व या घोर वनांत कशी आलीस ? तुला या घोर अजगरानें अकस्मात् कसें धरिलें ? तूं या संकटांत कशी पडलीस ?

व्याधाचे हे प्रश्न ऐकून साध्वी दमयंतीनें आपला सर्व वृत्तान्त त्यास निवेदन केला. तेव्हां अर्धेंच वस्त्र परिधान केलेल्या व त्यामुळें जिचे मनोहर अवयव अस्पष्ट दिसत आहेत अशा त्या सुकुमार राजपत्नीचें मधुर भाषण ऐकून तो मूढ व्याध कामवश झाला व तिच्याशीं मृदु भाषण करूं लागला.

( ४ ) कामार्त झालेल्या त्यानें तिचें सान्त्वन केलें व तिनें आपल्याला अनुकूल व्हावें या आशयानें तिच्याशीं मधुर कामुक वचन बोलण्यास आरंभ केला. तें पाहून त्या साध्वीनें त्याचा दुष्ट आशय जाणला व ती भामिनी अतिशय क्रुद्ध झाली. ती नलाची साध्वी भार्या दीपशिखेप्रमाणें प्रज्वलित दिसूं लागली. तथापि त्या कामातुर व्याधानें तिला दुष्ट भावानें स्पर्श करण्याचा विचार केला.

पण प्रदीप्त अग्निशिखेप्रमाणें असलेल्या तिला स्पर्श करण्यासाठीं तो मूढ तिच्या समीप गेला असतां पति व राज्य यांच्या वियोगानें दुःखार्त झालेल्या दमयंतीनें हा मूर्ख आतां सान्त्व वचनास पात्र नाहीं, असें जाणून क्रोधानें त्यास शाप दिला.

दमयंती म्हणाली—मीं नैषधराजाहून अन्यपुरुषाचें कधीं मनानेंहि जर चिंतन केलें नसेल, तर हा क्षुद्र मृगव्याध तत्काल मृत होऊन भूमीवर पडो.

राजा, त्या तेजस्विनी पतिव्रतेच्या मुखांतून हे शब्द बाहेर पडतांच तो दुर्बुद्धि व्याध अग्नीनें दग्ध झालेल्या वृक्षाप्रमाणें मृत होऊन भूमीवर पडला. ३. ६. ६३.

## अध्याय ६४ वा.

[ १ दमयंतीचा घोर अरण्यांत संचार व विलाप. २ तिचें तापसाश्रमांत गमन, तापसांनीं दिलेलें आश्वासन. ३ नदीतीरावरील जनसमूहांत प्रवेश. ]

( १ ) बृहदश्व—हे युधिष्ठिरा, याप्रमाणें त्या व्याधाला केवल शापवाणीनेंच गतप्राण करून ती साध्वी दमयंती त्या घोर वनांतून एकटीच निघाली. त्या निर्जन अरण्यांत रानकिटकांचा 'किर्रर'-ध्वनि सर्वत्र ऐकूं येत होता. तें वन सिंह, हत्ती, व्याघ्र, महिष, रुरुसंज्ञक मृग आणि इतरहि पशु व पक्षी यांनीं युक्त होतें. तेथें म्लेच्छ व तस्कर रहात असत. तें वन शाल, वेळु, अश्वत्थ इत्यादि प्रचंड वृक्षांनीं व्यापिलें होतें. त्या विविध वृक्षांनीं व्यापिलेल्या वनांत सूर्यकिरणांचाहि निर्विघ्नपणें प्रवेश होऊं शकत नसे. त्या घोर अरण्यांत ठिकठिकाणीं मोठमोठे पर्वतहि विविध धातूंनीं मंडित झालेले असून त्यांवर लतांचीं दाट जाळीं पसरलीं होतीं. त्या ठिकाणीं आश्चर्यकारक खोल दऱ्या, नद्या, सरोवरें व अनेक कूपहि होते.

तेथें विविध मृग, पक्षी, भयंकर पिशाच, सर्प, राक्षस, तडाग, पर्वतशिखरें, क्षुद्र नद्या व जलप्रवाहादि तिच्या दृष्टीं पडले. रानरेडे, वराह व अस्वलें यांचे कळपहि तिला आढळले. ती साध्वी तेज, यश, अंगकांति व उच्च स्थिति यांनीं युक्त होऊन एकटीच नलाला शोधीत चालली. त्या घोर अरण्यांतहि ती राजकन्या भैमी कोणाला भ्याली नाहीं. पतिवियोगानें पीडित झालेली ती राज्ञी देहभान विसरली. तिनें त्या दारुण अरण्यांत इतस्ततः फिरून पतीचा पुष्कळ शोध केला. पण तिला प्रिय पति कोठेंच आढळला नाहीं. त्यामुळें ती शोकानें विह्वल झाली व शेवटीं एका शिलातलावर बसून विलाप करूं लागली.

दमयंती म्हणाली—हे महाबाहो निषधराज, हे वीरा, मला आज या निर्जन वनांत सोडून तूं कोठें गेलास! विपुल दक्षिणायुक्त अश्वमेधादि क्रतु करून तूं माझ्याशीं असें कपटाचरण कसें करितोस! हे नरश्रेष्ठा, तूं मजसमक्ष जें शुभवचन बोललास त्याची आठवण कर. आकाशांतून संचार करणाऱ्या हंसांनीं मजपाशीं येऊन जो निरोप सांगितला त्याचा विचार कर.

हे नरश्रेष्ठा, अंगें, उपांगें व व्याख्यानादि इतर विस्तार यांसह उत्तम प्रकारें अध्ययन केलेले चार वेद एकीकडे व सत्य दुसरीकडे घालून जर त्यांची तुलना केली तर सत्यच अधिक ठरतें. यास्तव हे शत्रुघ्ना, तूं सत्याचें पालन कर. हे

वीर नला, तूं मला पूर्वी जीं अनेक वचनें दिलींस, त्यांतील माझा त्याग न करण्याचें एक वचन तरी सत्य कर. या घोर अरण्यामध्यें मी तुला मोठमोठ्यानें हांका मारीत आहें. पण तूं मला उत्तर कां देत नाहींस ! हा भीषणाकार शार्दुल माझ्या चित्ताला अतिशय पीडा देत आहे. क्षुधेनें व्याकुल झालेला हा मृगराज मला भक्षण करण्याची इच्छा आहे. यास्तव त्यांच्यापासून माझें रक्षण कर.

'दमयंति, तुजवांचून मला कोणतीहि अन्य स्त्री प्रिय नाहीं,' असें तूं नेहमीं म्हणत असस. हे सत्यप्रिय राजा, ती आपली वाणी सत्य कर. मी या वेळीं निराधार झाल्यामुळें उन्मत्त होऊन विलाप करीत आहें, मी तुझी इष्ट भार्या आहें व तूंहि मला अतिशय प्रिय आहेस. असें असतां तूं मज प्रिय पत्नीशीं भाषण कां करीत नाहींस ! हे प्रभो, या वेळीं कळपांतून चुकलेल्या हरिणीप्रमाणें माझी दशा झाली आहे. मी दीन, कृश, मलिन, निस्तेज व अर्धेंच वस्त्र परिधान करून या निर्जन वनांत एखाद्या अनाथ स्त्रीप्रमाणें एकटीच विलाप करीत आहें. असें असतां तूं माझ्या हांकेला उत्तर कां देत नाहींस !

हे महाराज, या अरण्यांत असहाय असलेल्या मला आपल्या गंभीर स्वरानें धीर कां देत नाहींस ? कुल व शील यांनीं संपन्न व सर्वांगसुंदर असलेल्या नरोत्तमा, तूं या पर्वतावरहि मला कोठें दिसत नाहींस. सिंह व व्याघ्र यांनीं व्यापिलेल्या या घोर वनामध्येंहि तुझा कोठें थांग लागत नाहीं. तूं कोठें तरी शयन करीत असशील, कोठें तरी बसलेला असशील, एखाद्या वृक्षाखालीं उभा असशील किंवा माझी नजर चुकवून कोठें तरी जात असशील म्हणून मीं पुष्कळ शोध केला, पण तूं मला कोठेंच आढळत नाहींस. त्यामुळें हे वीरा, तूं माझा शोक क्षणोक्षणीं वाढवीत आहेस. आतां मी कोणाला विचारूं ? 'या अरण्यांत नलराजाला तुम्हीं पाहिलें काय ?' असें मी कोणापुढें जाऊन बोलूं ! शत्रुसैन्याचा नाश करणाऱ्या ज्या महात्म्या नलराजाला तूं शोधीत आहेस, तो हा पहा.' अशी कोणाची तरी अमृततुल्य मधुर वाणी आज माझ्या कानीं पडेल का ? पण या दमयंतीचें एवढें भाग्य कोठचें !

हा उग्र अरण्यराज शार्दुल माझ्या समोरून येत आहे. त्याच्या चार तीक्ष्ण दाढा व विशाल हनुवटी मला स्पष्ट दिसत आहे. यास्तव मी आतां निःशंकपणें त्याच्या पुढें जातें !

राजा युधिष्ठिरा, असें बोलून ती साध्वी त्या सिंहापुढें गेली व त्यास म्हणाली—"हे मृगराज, तूं या अरण्याचा स्वामी आहेस. तूं सर्व पशूंचा राजा आहेस. मीहि विदर्भराजाची कन्या व निषधाधिपति नलाची महिषी दमयंती आहें, असें तूं समज. मी शोकानें व्याकुल होऊन एकटीच या तुझ्या अरण्यांत माझ्या प्रिय पतीचा शोध करीत आहें. यास्तव हे मृगेंद्रा, तूं जर नलराजाला या निबिड अरण्यांत कोठें पाहिलें असशील तर मला सत्वर सांग. किंवा हे वनपते, तूं जर नल कोठें आहे, हें सांगत नसशील तर मला भक्षण करून तरी या दुःखांतून सोडीव.

पण या अरण्यांतील हा माझा विलाप ऐकूनहि हा मृगराज माझ्या मनाचें समाधान करीत नाहीं. बरें, मी आतां मधुर जलानें युक्त असलेल्या या महानदीला शरण जातें. ती मजप्रमाणेंच स्त्री असल्यामुळें तिला माझा कळवळा येईल. अथवा या सजातीय नदीपेक्षां हा विजातीय पर्वतराजच मला नलाचा शोध लावून देईल. हा स्वभावतःच पवित्र असून अनेक उंच शिखरांनीं युक्त आहे. हा गिरींद्र अनेक रंगांच्या मनोहर शिखरांनीं विराजमान होत असून गैरिकादि नानाविध धातूंनीं व्याप्त आहे. हा महा पर्वत प्रचंड शिलांनीं भूषित झाला आहे. या महारण्याचा हा जणुं काय उंच उभारलेला केतूच आहे.

सिंहादि-हरिणान्त हिंस्र व अहिंस्र विविध पशु, विचित्र शब्द करणारे अनेक जातींचे पक्षी, पलाश, अशोक, बकुल, इत्यादि फल-पुष्पांनीं विराजमान होणारे वृक्ष आणि निरनिराळया दिशांनीं वहाणाऱ्या नद्या यांनीं युक्त असलेल्या या गिरिराजाला शरण जाऊन मी त्यालाच राजाची वार्ता विचारितें.

हे पूज्य पर्वतश्रेष्ठा, तुझें दर्शन अद्भुत असून तूं त्रैलोक्यांत प्रसिद्ध आहेस. तूं शरण आलेल्या अनेक जीवांना आश्रय देतोस. तूं अनेक प्रकारच्या कल्याणांनीं युक्त आहेस. यास्तव हे भूधरा, मी तुला नमस्कार करितें. मी तुला शरण आलें आहें. मी राजकन्या, राजस्नुषा व राजभार्या आहें. मी विदर्भराजाची कन्या असून मला 'दमयंती' म्हणतात. माझ्या महारथ पित्याचें नांव 'भीम' असें असून तो भूपाल चातुर्वर्ण्याचा रक्षक आहे. त्यानें विपुल दक्षिणा देऊन राजसूय, अश्वमेध इत्यादि अनेक यज्ञ केले. तो सदाचारसंपन्न राजा सर्वांगसुंदर, ब्राह्मणभक्त, सत्यप्रतिज्ञ, गुणांमध्यें दोषदृष्टि न ठेवणारा, शीलवान्, वीर्यवान्, श्रीमान्, धर्मज्ञ, शुचि व शूर आहे.

हे भगवन्, तुला शरण आलेली मी तुझी कन्या आहें, असें समज. माझ्या पित्याप्रमाणेंच माझा श्वशुरहि विख्यात असून तो निषधदेशामध्यें दीर्घकाल राज्य करीत होता. त्या नरश्रेष्ठाचा वीर, श्रीमान् व सत्यपराक्रमी पुत्र पितृक्रमानें प्राप्त झालेलें निषधांचें राज्य करूं लागला. 'पुण्यश्लोक' या नांवानें प्रसिद्ध असलेल्या त्याचें खरें नांव 'नल' असें आहे. तोहि पित्याप्रमाणेंच श्यामसुंदर, विजयी, ब्राह्मणप्रिय, वेदवेत्ता, महावक्ता, अग्निहोत्री व सोमपान करणारा आहे. तो सतत पुण्याचरण करितो. याग व दान यांचें त्याला जणुं-काय व्यसनच लागलें आहे. तसाच तो महायोद्धा व शास्ता आहे.

तुला शरण आलेली ही अबला त्या नलराजाची श्रेष्ठ भार्या आहे. मी आपल्या ऐश्वर्यापासून च्युत होऊन या प्रसंगीं पतिविहीन झालें आहें. हे शैल-राज, मी अनाथ असून महा संकटांत सांपडलें आहें. माझ्या ऐश्वर्यहीन पतीनें या घोर वनांत माझा त्याग केला. त्याला शोधण्यासाठीं मी या अरण्यांत इतस्ततः भटकत आहें. त्या माझ्या प्रिय पतीला तूं आपल्या शेंकडों उंच शिखरांनीं या वनांत कोठें पाहिलें आहेस काय ?

माझा प्रिय भर्ता जरी या वेळीं ऐश्वर्यहीन झालेला असला, तरी तो सहज ओळखतां येण्यासारखा आहे. कारण तो माझा यशस्वी पति मोठा वीर, धीर, गजेंद्रासारखा पराक्रमी, आजानुबाहु व मोठा बुद्धिमान् आहे. त्या मिथिलाधिप-तीला तूं कोठें पाहिलें आहेस काय ?

हे पर्वतश्रेष्ठा, भर्तृवियोगानें विह्वल होऊन विलाप करीत असलेल्या मज अनाथ अबलेला तूं आपल्या गंभीर वाणीनें धीर कां देत नाहींस ! मी तुझ्या कन्येसारखी आहें. माझी तुला दया नाहीं का येत !

हे वीर भूपाला, हे धर्मज्ञा, हे सत्यप्रतिज्ञ महीपाला, तूं जर या वनांत असशील, तर मला सत्वर दर्शन दे.

'हे दमयंति' अशी त्या महात्म्या राजाची हांक मी कधीं ऐकेन ! त्या नैषधाधिपाची घनगंभीर, स्निग्ध व अमृततुल्य वाणी माझ्या कानीं केव्हां पडेल ! हे धर्मवत्सल नृपते, आपल्या वेदतुल्य सत्य वचनानें मला आश्वा-सन दे."

(२) त्या गिरिश्रेष्ठाला असें बोलून ती राजनंदिनी दमयंती पुढें उत्तर दिशेकडे चालली. तीन अहोरात्र चालल्यानंतर त्या श्रेष्ठ राजकन्येनें तापसांनीं

युक्त असलेलें एक रम्य वन पाहिलें. त्या दिव्य वनांत वसिष्ठ, भृगु व अत्रि यांच्यासारखे तेजस्वी, नियतव्रत, नियताहार व दमादिकांनीं युक्त असे तापस रहात होते. त्यांच्यापैकीं कांहीं केवल जलप्राशन करणारे, तर कोणी वायु भक्षण करणारे होते. ते सर्वहि तापस जितेंद्रिय, महाभाग, स्वर्गमार्ग पहाण्याची इच्छा करणारे आणि वल्कलें व अजिनें परिधान करणारे होते.

राजन्, त्या घोर वनांत अशा प्रकारच्या तापसांनीं व्यापिलेलें एक आश्रम-मंडल तिच्या दृष्टीं पडलें. तो आश्रम अनेक मृगयूथांनीं युक्त होता. त्याला पाहून सर्वांगसुंदर दमयंतीला धीर आला. त्या तपस्विनी नलपत्नीनें त्यांच्या आश्रमांत जाऊन त्या सर्व तपोवृद्ध मुनींना नमस्कार केला व ती विनयानें उभी राहिली.

तेव्हां त्या सर्व तपोधनांनीं ' तुझें स्वागत असो ' असें म्हणून त्या स्त्रीरत्नाचा यथाविधि सत्कार केला व तिला म्हटलें—" हे वत्से, बैस. आम्हीं तुझें कोणतें कार्य करावें तें सांग. "

त्या तापसांचा हा प्रश्न ऐकून महाभागा दमयंती म्हणाली—हे भगवन्, स्वधर्माचरण करणाऱ्या आपलें सर्वांचें कुशल आहे ना ? आपलें तप, अग्नि, मृग व पक्षी हीं सर्व सुरक्षित आहेत ना ?

तापस म्हणाले—हे भद्रे, आमचें सर्वप्रकारें कुशल आहे. परंतु तूं कोण आहेस व कोणत्या इच्छेनें येथें आली आहेस ! तुझें हें अप्रतिम रूप पाहून आम्हांस विस्मय वाटत आहे. आम्ही तुला आश्वासन देतों, तूं शोक करूं नकोस. हे देवि, तूं या अरण्याची, पर्वताची किंवा नद्यांची देवता तर नव्हेस ! हे कल्याणि, आम्हांला काय असेल तें सत्य सांग.

तेव्हां त्या ऋषींना दमयंती म्हणाली—हे मुनिजनहो, मी या अरण्याची, पर्वताची किंवा नदीचीहि देवता नाहीं. तर मी केवल एक संकटग्रस्त मानुषी आहें. हे तपोधनहो, मी तुम्हांला माझा सविस्तर वृत्तान्त सांगतें, तो ऐका. विदर्भ-देशाचा ' भीम '-नामक प्रसिद्ध राजा आहे. त्याची मी कन्या आणि निषधाधिपति महा यशस्वी नलराजाची धर्मपत्नी आहें. हे द्विजहो, माझा भर्ता महापराक्रमी, अजिंक्य, देवतार्चनपरायण व ब्राह्मणांचा कनवाळु आहे. तो सत्य-प्रतिज्ञ धर्मज्ञ, बुद्धिमान् व महा बलाढ्य असून निषधवंशाचें रक्षण करणारा

आहे. तो नलराजा वेद-वेदांगपरायण, यज्ञ करणारा, ब्राह्मणभक्त असून इंद्राप्रमाणें कांतिमान् आहे.

सूर्यचंद्रासारखा तेजस्वी असलेला माझा प्रिय पति युद्धामध्यें शत्रूंचा संहार करणारा आहे. कांहीं क्षुद्रचित्त हीन पुरुषांनीं त्या सत्यधर्मपरायण भूपालाला द्यूताचें आह्वान केलें व त्या कुटिल द्यूतकारांनीं त्याचें सर्व राज्य व ऐश्वर्य हरण केलें. ते कपटी द्यूतकार द्यूत खेळण्यांत फार कुशल होते. त्या राजश्रेष्ठाची मी ‘ दमयंती ’-नांवाची प्रख्यात भार्या आहें. पतीच्या दर्शनासाठीं उत्सुक होऊन मी विविध वनें, पर्वत, नद्या, सरोवरें व महारण्यें यांतून त्या शूर व कृतास्त्र पतीचा शोध करीत भटकत आहें. पण मला त्या महात्म्याचा कोठेंच शोध लागत नाहीं. या दुर्गम प्रदेशांतून संचार करितांना मला फार क्लेश होतात.

पूज्य महर्षिहो, तो निषध-देशाचा राजा तुमच्या या तपोवनांत आला आहे काय ? त्याच्यासाठींच मी या घोर अरण्यांत आलें आहें. सिंह-व्याघ्रादि हिंस्र प्राण्यांनीं व्यापिलेल्या या महारण्यांत फिरत असतांना मला फार भीति वाटते. आणखी कांहीं दिवस तो नलराज जर मला दिसला नाहीं तर मी योगबलानें देहत्याग करून मुक्त होईन. म्हणजे मला आत्महत्येचा दोष लागणार नाहीं. त्या पुरुषश्रेष्ठावांचून जिवंत राहण्यांत काय अर्थ आहे ! पतिवियोगाचें दुःख भोगणारी मी आतां जिवंत कशी राहूं ! ”

युधिष्ठिरा, याप्रमाणें त्या अरण्यांत विलाप करणाऱ्या एकाकिनी भीमकन्या दमयंतीला ते ब्रह्मज्ञ तापस म्हणाले, “ हे कल्याणि, लवकरच तुझा भाग्योदय होईल. हे शुभे, तूं अशी अधीर होऊं नको. आम्ही आपल्या तपःसामर्थ्यानें ‘ नैषध नल तुला लवकरच भेटेल. ’ असें पहात आहों. निषधांचा अधिपति नलराजा, मोठा धार्मिक आहे. त्या धर्मबलानेंच तो सर्व पापांपासून मुक्त होईल, सर्व रत्नांनीं परिपूर्ण असलेलें तेंच आपलें श्रेष्ठ राज्य व रम्य राजधानी शत्रूपासून परत मिळवील आणि भूलोकाचें शासन करील. शत्रूंना ताप देणारा व सुहृदांचा मनस्ताप घालविणारा कुलीन नलराजा तुला लवकरच भेटेल. ”

राजा, नलाच्या त्या प्रिय पत्नीला असें बोलून सर्व तापस, अग्निहोत्र व आश्रम यांसह तेथेंच गुप्त झाले. तेव्हां तें महदाश्चर्य पाहून विस्मित झालेली

दमयंती म्हणाली—"मीं हें स्वप्न पाहिलें कीं काय? हा काय चमत्कार झाला! ते सर्व तापस व तें आश्रममंडल गेलें कोठें! जिचें जल अतिशय रम्य आहे व जिच्यामध्यें अनेक जलचर पक्षी विहार करीत आहेत, अशी ती रम्य नदी एकाएकीं कोठें गुप्त झाली? मनोहर फळें व पुष्पें यांनीं सुशोभित झालेले ते असंख्य वृक्ष कोठें आहेत!"

याप्रमाणें दीर्घकाल विचार करून ती भीमकन्या पतिशोकानें दीन व निस्तेज झाली. त्यानंतर ती भामिनी तेथून दुसरीकडे गेली. तेथें तिला एक प्रचंड अशोक-वृक्ष दिसला, त्याला पाहून ती साध्वी सद्गदित कंठानें विलाप करूं लागली. तिचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. तो वृक्ष पुष्पें व पल्लव यांनीं सभोंवार व्याप्त झाला असून त्यावरील पक्ष्यांच्या शब्दांनीं नादित झाला होता.

त्या वृक्षाजवळ जाऊन दमयंती म्हणाली—अहो, या वनांतील हा श्रीमान् वृक्ष फल-पुष्पादिरूप अलंकारांनीं युक्त झाल्यामुळें एखाद्या मनोहर पर्वतश्रेष्ठा-सारखा दिसत आहे. हे प्रियदर्शना अशोका, तूं आपल्या नांवाप्रमाणें मला सत्वर शोकरहित कर. तूं शोक, भय व पीडा यांनीं रहित असलेल्या, शत्रुनाशक व 'नल'-संज्ञक, दमयंतीच्या प्रिय पतीला पाहिलें आहेस का?

तो माझा प्रिय भर्ता निषधाधिपति अर्धें वस्त्र परिधान करूनच कोठें तरी भटकत आहे. तो अतिशय सुकुमार असून त्याची त्वचा कोमल आहे. तो वीर संकटांत सांपडल्यामुळें या अरण्यांत आला आहे. यास्तव हे वृक्षा, मी तुजपासून शोकरहित होऊनच स्वस्थानीं जाईन असें कर. माझ्या शोकाचा नाश करून तूं आपलें 'अशोक' हें नांव सार्थ कर.

युधिष्ठिरा, याप्रमाणें आर्त झालेली भैमी एखाद्या उन्मत्ताप्रमाणें विलाप करीत त्या अशोक वृक्षापासूनहि निघाली व त्याहूनहि दारुणतर प्रदेशास जाऊन पोंचली.

पतीचा शोध करीत जाणाऱ्या त्या साध्वीनें मार्गांत अनेक पर्वत, नद्या, वृक्ष, पशु, पक्षी, व अद्भुत दऱ्या पाहिल्या. याप्रमाणें संचार करितां करितां ती फार दूर जाऊन पोंचली. तेव्हां एका विस्तीर्ण नदीच्या उत्तर तीरावर प्रचंड जनसमूह तिच्या दृष्टीं पडला. तो हत्ती, अश्व व रथ यांनीं युक्त असून ती नदीहि अतिशय विस्तीर्ण होती. तिचें जल शीतल होतें. तिच्या पात्रांत अनेक डोह होते. तिचे दोन्ही तीर वेतांनीं व्याप्त होते. क्रौंच, कुरर, चक्रवाक इत्यादि

पक्ष्यांच्या ध्वनींनीं ती गजबजलेली होती. तिच्या पात्रांत कांसव, सुसरी व विविध मत्स्य संचार करीत होते. ती महानदी विपुल द्वीपांनीं सुशोभित झाली होती.

( ३ ) हे पांडुनंदना, त्या नदीच्या तीरावरील तो प्रचंड जनसमूह पाहून यशस्विनी दमयंती त्याच्या समीप गेली व उन्मत्ताप्रमाणें दिसणारी, अर्धेंच वस्त्र परिधान केलेली, ती कृश व शोकार्त राजपत्नी त्या जनसमूहांत शिरली. त्यावेळीं तिचे केंस अस्ताव्यस्त पसरले होते. त्यामुळें एखाद्या पिशाचीप्रमाणें दिसणाऱ्या तिला पाहून कांहीं लोक भिऊन पळूं लागले, कांहीं सचिंत झाले, कित्येक ओरडूं लागले व कोणी तिच्याकडे पाहून हंसूं लागले. कांहीं अविचारी लोकांनीं तिच्या ठिकाणीं दोषदृष्टि ठेविली व कांहीं विचारी लोक तिच्यावर दया करून 'हे कल्याणि, तूं कोणाची कोण? या वनांत तूं कोणाचा शोध करीत आहेस? तुला पाहूनच आम्हांला भीति वाटते. तूं मानुषीच आहेस ना? खरें सांग. किंवा या पर्वताची, वनाची अथवा दिशांची देवता आहेस; कीं कोणी यक्षी किंवा राक्षसी आहेस! अथवा श्रेष्ठ प्रतीची मनुष्य स्त्री आहेस?' असें विचारूं लागले.

दुसरे कित्येक म्हणाले—हे शुभे, आम्ही तुला शरण आलों आहों. आमचें सर्व प्रकारें हित कर. हे निष्पापे, आमचें रक्षण कर. हा आमचा समूह सुखरूपपणें येथून सत्वर निघून जाईल असें कर, म्हणजे आमचें कल्याण होईल.

त्या समुदायांतील श्रेष्ठ लोकांनीं दमयंतीला असे प्रश्न केले असतां पतीच्या अदर्शनानें दुःखी झालेली ती साध्वी गार्हिवरून त्या सर्वांसमक्ष आपला वृत्तान्त सांगूं लागली.

दमयंती—हे श्रेष्ठहो, मी मानुषी राजकन्या, राजस्नुषा व राजभार्या आहें. मी विदर्भराजाची कन्या व निषधाधिपाची पत्नी आहें. मी माझ्या पतीचा शोध करीत आहें. तुम्हीं त्या भूपालाला कोठें पाहिलें असेल तर सत्वर मला सांगा.

तें ऐकून त्या प्रचंड जनसमूहाचा स्वामी 'शुचि'-नामक सार्थवाह मधुर वाणीनें त्या पतिव्रतेला म्हणाला—"हे साध्वि, मी या सर्व जनसमूहाचा नेता सार्थवाह आहें. हे यशस्विनि, या अरण्यांत 'नल'-नांवाचा मनुष्य आम्हांला कोठें आढळला नाहीं. हें सर्व अरण्य हत्ती, व्याघ्र, सिंह इत्यादि

क्रूर पशूंनीं व्यापलेलें असून त्यांत एकहि मनुष्य रहाणें शक्य नाहीं. आम्हीं तुजवांचून दुसऱ्या कोणाहि मनुष्यास येथें पाहिलें नाहीं. आम्हांवर यक्षराज मणिभद्र सर्वथा प्रसन्न होवो.

तेव्हां ती साध्वी तो सार्थवाह व इतर वैश्य यांस म्हणाली—हा तुमचा समूह कोणीकडे चालला आहे, तें कृपाकरून मला सांगा.

राजपत्नीचें हें दीन वचन ऐकून दयालु सार्थवाह तिला म्हणाला—हे भद्रे, आमचा हा सार्थ—समूह व्यापारासाठीं सत्यप्रतिज्ञ चेदिराज सुबाहूच्या देशास जात आहे. ३-६-६४.

---

## अध्याय ६५ वा.

[ १ दमयंतीचा सार्थासह सरोवरावर वास. २ वनगजांनीं केलेला सार्थाचा नाश. ३ दमयंतीचा विलाप व ब्राह्मणांसह सुबाहूच्या नगरास गमन. ४ राजमातेचा आश्रय. ]

( १ ) बृहदश्व—राजा युधिष्ठिरा, सार्थवाहाचें तें वचन ऐकून पतिदर्शनासाठीं उत्सुक झालेली ती राजपत्नी त्या सार्थासह पुढें जावयास निघाली. तिच्यासह प्रवास करणारा तो जनसमूह कांहीं दिवसांनंतर एका घोर अरण्यांतील फार मोठ्या तडागापाशीं आला. त्या विस्तीर्ण सरोवराचें नांव 'पद्मसौगंधिक' असें होतें. त्या रम्य सरोवराच्या आसपास तृण, काष्ठें, विविध पुष्पें व फळें यांची समृद्धि होती. अनेक जलचर प्राणी त्या सरोवराचें नित्य सेवन करीत असत. त्यांतील जल निर्मल, मधुर, शीतल व आह्लादकारक होतें.

( २ ) त्या प्रवाशी वैश्यांनीं आपलीं वहानें श्रांत झालीं आहेत, असें पाहून कांहीं काल तेथें विश्रांति घेण्याचा निश्चय केला व सार्थवाहाची अनुज्ञा घेऊन त्यांनीं त्या रम्य सरोवराच्या तीरावर तळ दिला. त्या सरोवराच्या पश्चिम तीरावर ते सर्व सुखानें राहिले. पण मध्यरात्रीच्या समयीं सर्व दिशा शांत व शब्दरहित झाल्या असतां आणि हा श्रांत झालेला जनसमूह गाढ निद्रित झाला असतां जंगली हत्तींचा एक प्रचंड कळप जलप्राशनार्थ त्या सरोवरावर आला. गंडस्थलांतून वहाणाऱ्या मदस्रावानें गिरिनदीचें जल मलिन करणाऱ्या त्या गजयूथानें सौगंधिक सरोवराच्या पश्चिम तीरावरील त्या सार्थास व त्यांतील गजसमूहास पाहिलें.

ते ग्रामगज दृष्टी पडतांच सर्व वनगज क्षुब्ध झाले व त्यांस मारण्याच्या इच्छेनें वेगानें त्यांवर धावून गेले. त्यांचा तो वेग त्या सार्थाला व त्यांतील गजादि सर्व प्राण्यांना असह्य झाला. पर्वत शिखरावरून तुटून पडलेल्या प्रचंड पाषाणांचा वेग वृक्षांना जसा असह्य होतो व त्यांच्या योगानें सर्व मार्ग रुद्ध होतात, त्याप्रमाणें धांवून येणाऱ्या त्या वनगजांच्या वेगानें मार्गांतील वृक्ष छिन्न-भिन्न होऊन भूमीवर पडले व त्यामुळें सर्व मार्ग बंद झाले.

तो मदोन्मत्त गजांचा कळप त्या जनसमूहांत शिरला व त्यानें एकाएकीं त्यांतील गाढ झोंपीं गेलेल्या जीवांचें मर्दन करण्यास आरंभ केला. त्यामुळें जिकडे तिकडे हाहाकार उडाला. 'या संकटांतून आपल्याला कोणी सोडवील का?' अशा आशेनें सर्व लोक इतस्ततः धावूं लागले व निद्रेनें ग्रासलेले कित्येक तसेच भूमीवर पडून राहिले. त्या मदोन्मत्त वनगजांनीं कित्येकांना दातांनीं, सोंडांनीं व पायांनीं जर्जर केलें. त्या समूहांतील अनेक उंट व अश्व त्यांच्या पायांखालीं चिरडून मेले.

पायांनींच संचार करणारे लोक भीतीनें धांवत असतां परस्परांच्या आघातांनीं भूमीवर निश्चेष्ट होऊन पडले. सर्व लोक घोर आक्रोश करूं लागले. कित्येक भीतीनें वृक्षांवर चढले, पण ते त्या वनगजांच्या आघातांनीं वृक्षांसह प्राण-संकटांत पडले.

राजा युधिष्ठिरा, याप्रमाणें दैववशात् अनेक वनगजांनीं आक्रमिलेला तो सार्थ भयंकर संकटांत पडून त्यांतील अनेक जीव प्राणांस मुकले. त्यावेळीं अंगावर रोमांच उभे करणारा प्रचंड आक्रोश सर्वत्र पसरला. 'अहो, हा भयंकर अग्नि भडकला आहे. धांवा, धांवा, आमचें कोणी तरी रक्षण करा. पहातां काय! अग्नीमध्यें या रत्नराशीचा नाश होत आहे; हीं रत्नें अग्नीच्या मुखांतून बाहेर काढा. हें सर्वांचें सामान्य धन आहे. आतां त्याचा कोणी एकच धनी राहिला नाहीं.' इत्यादि उच्च स्वरानें आक्रोश करणारे लोक इतस्ततः पळूं लागले.

राजा, सार्थांतील अनेक लोकांचा असा नाश होत असतां दमयंती जागी झाली व मदोन्मत्त हत्तींची ती दुर्लीला पाहून मनांत अतिशय घाबरली. हत्तींच्या पायांखालीं सांपडून होत असलेला तो अदृष्टपूर्व लोकसंहार पाहून ती सुकुमारी राजपत्नी भयभीत झाली, दुःखानें दीर्घ निःश्वास टाकून, उठून उभी राहिली आणि जीव घेऊन पळत असलेल्या इतर लोकां-

बरोबर तीहि पळूं लागली. तेव्हां त्या सार्थांतून जे कांहीं लोक अक्षत शरीरानें जिवंत बाहेर पडले होते; ते आपसांत असें भाषण करूं लागले—

"आमच्या कोणत्या दुष्कर्मांचें हें फल आहे, तें कांहीं कळत नाहीं. खरोखर आम्हीं महायशस्वी मणिभद्राचें, यक्षाधिप कुबेराचें व विघ्नहर्त्या गणपतीचें पूर्वीच पूजन केलें नाहीं, त्या अपराधाचें हें फल असेल. कदाचित् विपरीत ग्रह व शकुन यांचाहि हा परिणाम असूं शकेल !"

राजा, आपल्या ज्ञातीचे लोक व विपुल धन यांचा नाश झाल्यामुळें दीन झालेले कांहीं तरुण म्हणाले—" अहो, आपल्या या सार्थामध्यें ही जी उन्मत्त स्त्री नुक्तीच आली आहे, तिनेंच ही भयंकर माया उत्पन्न केली असावी, असें आम्हांला वाटतें. ही जरी मनुष्यस्त्री दिसत असली तरी ती यक्षी, राक्षसी किंवा कोणी भयंकर पिशाची असावी, यांत कांहीं संशय नाहीं. तिचेंच हें सर्व पाप ओढवलें आहे. आमच्या या सार्थाचा नाश करणारी व आम्हांला असें भयंकर दुःख देणारी ती पापिणी जर आमच्या दृष्टीं पडेल, तर आम्ही तिच्या अंगावर ढेंकळें, दगड, धूळ, गवत व लांकडें फेंकून व ठोसे मारून त्या कृत्येला मारून टाकूं. आमच्या एवढ्या मोठ्या समूहाचा नाश करणाऱ्या तिला जिवंत सोडणार नाहीं. "

( ३ ) युधिष्ठिरा, त्यांचें हें घोर वचन ऐकून दमयंती भयभीत झाली. ती अनाथ राज्ञी मनांतल्या मनांत अतिशय खिन्न व लज्जित झाली आणि आपल्या जीविताचें रक्षण करण्यासाठीं घोर अरण्यांत पळून गेली. कदाचित् आपल्याच पूर्व पापामुळें या सार्थाचा असा विध्वंस झाला असेल, असें वाटल्यामुळें ती साध्वी निर्जन अरण्यांत असा विलाप करूं लागली—

" खरोखर माझें दैव मला फारच प्रतिकूल झालें आहे. त्यामुळें कोठेंच स्वास्थ्य मिळत नाहीं. एकामागून एक अनेक संकटें ओढवत आहेत. पण हें माझ्या कोणत्या पूर्वकर्मांचें फल असावें बरें ! या जन्मांत मीं शरीरानें, मनानें किंवा वाणीनें अल्पहि अशुभ आचरिलें आहे, असें मला आठवत नाहीं. तस्मात् हें जन्मांतरांतील घोर पापच फलद्रूप झालें आहे, असें मानिल्यावांचून गति नाहीं. पूर्वकर्मांमुळेंच मी या अकल्पित आपत्तीस अकस्मात् प्राप्त झालें. माझ्या प्रिय पतीच्या राज्याचा अपहार, स्वजनांच्या हातूनच पराभव, भर्तृवियोग, प्राणापेक्षांहि प्रिय असलेल्या दोन अपत्यांची ताटातूट, ही अनाथावस्था व हा घोर

अरण्यांतील वास अशी ही संकटपरंपरा अहमहमिकेनें माझ्या पाठीस लागली आहे, आतां काय उपाय योजावा ! या आपत्समुद्रांतून मी कशी पार पडेन !"

युधिष्ठिरा, ती असहाय दमयंती त्या निर्जन वनांत असा आक्रोश करीत राहिली.

इकडे पिसाळलेल्या हत्तींच्या कदनांतून मोठ्या कष्टानें जिवंत सुटलेले लोक दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्या सौगंधिक सरोवराच्या पश्चिम तीरावरून निघाले. तेव्हां ते सर्व व्यापारी प्रवासी हत्तींच्या पायांखालीं चिरडून गतप्राण झालेल्या आपल्या भ्रातृ-पुत्रांच्या वियोगानें शोकविह्वल होऊन दुसऱ्या सुरक्षित स्थलीं जावयास निघाले असतां त्यांचे क्लेश पाहून हळहळणारी राजपत्नी दमयंती मोठ्या कळवळ्यानें पुनः असा विलाप करूं लागली—

" हर हर, मीं पूर्वी काय बरें पाप केलें असेल ! या लोकांप्रमाणें मलाहि माझ्या दुर्दैवाचेंच हें फल आहे, असें वाटतें; कारण या निर्जन वनांत मीं ज्या जनसमूहाचा आश्रय केला, त्याचा गजयूथानें अकस्मात् नाश केला. यावरून माझें दुर्दैव अद्यापि संपलें नाहीं, मला याहूनहि अधिक दुःख अजून भोगावयाचें आहे असेंच दिसतें. खरोखर 'मरणकाल ओढवल्यावांचून कोणताहि प्राणी मरत नाहीं,' असें जें वृद्धांचें वचन आहे, तें अगदीं खरें आहे. कारण गेल्या रात्रीं हस्तियूथानें अनेक निरपराध स्त्रिया, पुरुष व पशु यांना तुडवून यमसदनीं पाठविलें. पण त्यांतील एकाहि मत्त गजानें मजकडे पाहिलें सुद्धां नाहीं.

खरोखर, दैवावांचून मनुष्याला कोणतेंहि सुख किंवा दुःख प्राप्त होत नाहीं. मीं आपल्या बाल्यावस्थेंतहि बुद्धिपुरस्सर कोणतेंच अकार्य केलें नाहीं, असें असतांना हें महद्दुःख मला कां बरें प्राप्त व्हावें ! माझ्या स्वयंवराच्या वेळीं इंद्रादि लोकपाल आले होते. पण मी नलासाठीं त्या लोकपालांचाहि निषेध केला. त्यांच्या कोपामुळेंच तर मला हा पतिवियोग प्राप्त झाला नसेल ना ?"

हे पांडवा, ती पतिव्रता दमयंती असा करुण विलाप करून त्या समूहांतील स्वभावतःच दयालु असलेल्या ब्राह्मणांस शरण गेली व शरदतूंतील चंद्रलेखेप्रमाणें शोभणारी ती भामिनी त्यांच्याच बरोबर पुढें जावयास निघाली. अल्पावकाशांतच एके दिवशीं सायंकाळीं ती सुबाहूच्या राजधानीस येऊन पोंचली. पण अर्धेंच वस्त्र परिधान केलेली, कृश, दीन, मुक्तकेशी, अस्नात व त्यामुळेंच उन्मत्ताप्रमाणें दिसणारी ती दुःखी राजपत्नी राजमार्गानें जात असतां तिला

पाहून नगरवासी जन तिच्या मागें लागले. तथापि त्यांच्या त्या बालिश लीलांकडे लक्ष न देतां ती राजमंदिरासमीप गेली. नगरांतील आबाल-वृद्धांचा तो घोळका तिच्याबरोबर होताच.

त्याच वेळीं राजमंदिराच्या गच्चीवर फिरत असलेल्या राजमातेची दृष्टि या अबलेकडे गेली. तिला त्या अनाथ स्त्रीची करुणा आली व तिनें तत्काल आपल्या मुख्य दासीला हांक मारून म्हटलें—"हे दासि, सत्वर जा आणि या दुःखित शरणार्थिनी बालेला मजपाशीं घेऊन ये. कारण नगरांतील हा प्राकृत जनसमूह या दीन अबलेला विनाकारण त्रास देत आहे. तिच्या चर्येवरून ही कोणी सामान्य स्त्री असेल असें वाटत नाहीं. तिचें हें अलौकिक रूप आपल्या या राजगृहाला भूषवीत आहे. ही कल्याणी उन्मत्ताचा वेष धारण करून जरी इकडे येत आहे, तरी ही कमलाक्षी साक्षात् श्रीच असावी, असें मला वाटतें. यास्तव तूं जा व सत्वर तिला येथें घेऊन ये."

राजमातेची ही आज्ञा ऐकून ती प्रगल्भ दासी त्वरेनें दुःखित दमयंतीपाशीं आली व त्या जनसमूहाचें निवारण करून तिला राजमंदिरांत घेऊन गेली.

(४) त्या भीमकन्येला पाहून राजमाता विस्मित झाली व तिला म्हणाली—"हे कल्याणि, तूं कोण आहेस ? तूं जरी दुःखमग्न झाली आहेस, तरी तुझें अलौकिक तेज नष्ट झालेलें नाहीं. अभ्रांतील विद्युल्लतेप्रमाणें तूं आपल्या अंगकांतीनें चमकत आहेस. भूषणरहित असलेल्याहि तुझें रूप मला अलौकिक दिसतें. त्यावरून तूं मनुष्यस्त्री नसून कोणी देवता किंवा गंधर्वी असावीस, असें मला वाटतें. तूं असहाय असूनहि या हीन जनसमूहास भीत नाहींस ! तुझें सामर्थ्य विलक्षण दिसतें. यास्तव तूं कोणाची कोण हें मला खरें सांग."

हे कुरुश्रेष्ठा, राजमातेचें हें भाषण ऐकून भैमी तिला म्हणाली—"मी भर्तृपरायण असलेली एक मानुषी आहें, असें तूं समज. अंतःपुरांत संचार करणारी मी एक कुलीन दासी आहें. मला जेथें राहवेंसें वाटतें तेथें मी राहतें. मी फल-मूलांवांचून अन्य आहार करीत नाहीं. एकटीच फिरत असतें व जेथें संध्याकाळ होईल, तेथेंच आपलें घर समजून निवास करितें. माझा भर्ता अनेक गुणसंपन्न व मला सर्वथा अनुकूल आहे. मीहि त्या वीराला छायेप्रमाणें अनुसरणारी त्याची अनन्य भक्ता आहें. हे साध्वि, दैववशात् त्याच्यावर द्यूतजन्य महत्संकट ओढवल्यामुळें त्या वीराला सर्व ऐश्वर्यांचा त्याग करून एका

वस्त्रानें वनवास भोगावा लागला. द्यूतांतील पराभवामुळें विह्वल होऊन उन्मत्ताप्रमाणें वनांत संचार करणाऱ्या त्या वीराला आश्वासन देण्यासाठीं मीहि त्याच्या मागोमाग वनांत गेलें.

एकदां क्षुधेनें व्याकुळ झालेल्या त्या वीरानें कांहीं कारणानें आपलें तें एक वस्त्रहि घालविलें. मजपाशींहि त्यावेळीं परिधान केलेलें एकच वस्त्र होतें. त्याच्याच एका पदरानें आपलें अंग आच्छादून तो पुढें चालला व मी त्याच्या मागून चाललें.

हे राजमाते, याप्रमाणें आम्हीं अनेक रात्री झोंपेवांचून घालविल्या. एकदा मला गाढ झोंप लागली असतां तो माझा प्रिय पति अर्धें वस्त्र फाडून व निजलेल्या मला एकटीलाच तेथें सोडून कोठें निघून गेला. त्या सत्यप्रतिज्ञ वीरानें निरपराध असलेल्या माझा जरी अशा रीतीनें त्याग केला, तरी त्या घोर अरण्यांत मी त्याचा शोध करीत इतस्ततः फिरूं लागलें.

हे राज्ञि, माझ्या त्या देवतुल्य प्रिय पतीपासून वियुक्त झालेली मी संतप्त चित्तानें अहोरात्र त्या वनांत हिंडत होतें. पण मला माझ्या पतीचा कोठेंच शोध लागला नाहीं. त्यामुळें माझ्या मनाला फार क्लेश होत आहेत.

हे साध्वि, त्या पुरुषश्रेष्ठाचा शोध करीत असतां मजवर अनेक संकटें आलीं. तथापि त्यांस न जुमानितां मी आज येथें येऊन पोंचलें आहें.

राजा, अश्रुपूर्ण नेत्रांनीं असा विलाप करणाऱ्या त्या भैमीला दयालु राजमाता आर्त स्वरानें म्हणाली—" हे कल्याणि, तुझी ही करुण कथा ऐकून माझें मन अतिशय विह्वल होत आहे. वत्से, तूं मजपाशीं रहा. माझे सर्वत्र संचार करणारे हेर तुझ्या भर्त्याचा शोध लावितील, किंवा इतस्ततः भटकणारा तो स्वतःच येथें येईल. तूं चिंता करूं नको. भद्रे, तुझा पति तुला येथेंच भेटेल."

युधिष्ठिरा, राजमातेचें हें वचन ऐकून दमयंती तिला म्हणाली—" हे वीरमाते, माझें कांहीं व्रत आहे, त्याचें जर पालन होत असेल तर मी तुझ्याकडे राहूं शकेन. 'मी उच्छिष्ट अन्न भक्षण करणार नाहीं. कोणाचे पाय धुणार नाहीं. अन्य पुरुषाशीं कधीं भाषण करणार नाहीं. कोणीं दुर्बुद्धि पुरुषानें माझा अभिलाष धरल्यास त्या मूढाला तूं दंड करावास.' हेंच माझें व्रत आहे. शिवाय देशोदेशींचे जे विद्वान् ब्राह्मण तुझ्याकडे येतील त्यांना मी आपल्या भर्त्याच्या शोधासाठीं प्रश्न करीन. त्याला तुझी अनुज्ञा असावी. हें जर तुला

मान्य असेल तर मी तुजपाशीं मोठ्या संतोषानें राहीन. पण तुझा आशय जर याच्या उलट असेल तर मात्र मला येथें वास्तव्य करतां येणार नाहीं."

राजा, त्या पतिव्रतेचें हें वचन ऐकून राजमातेला परम संतोष झाला. ती म्हणाली—"हे वत्से, तुझें हें अशाप्रकारचें व्रत ऐकून मला परम समाधान वाटत आहे. मी तुझे सर्व नियम अक्षरशः पाळीन. तूं येथें सुखानें रहा." राजन्, भैमीला असें बोलून ती राजमाता आपल्या कन्येला म्हणाली—"सुनंदे, ही देवरूपिणी अबला तुझी सैरंध्री आहे, असें जाण. ही तुझ्याच वयाची आहे. त्यामुळें ती तुझी सखी होण्यास सर्वथा योग्य आहे. तिच्या सहवासांत तूं मोठ्या आनंदांत रहा. तिच्या साहचर्यानें तुझ्या मनाला यत्किंचित्‌हि उद्वेग वाटणार नाहीं."

मातेची ही आज्ञा ऐकून सुनंदेला परम संतोष झाला व दमयंतीला बरोबर घेऊन ती आपल्या सख्यांसह स्वगृहीं परत आली. त्या राजकन्येच्या मंदिरांत दमयंतीचा मोठा सत्कार झाला. तिला सर्व विहित उपभोग प्राप्त झाल्यामुळें ती अखिन्न मनानें तेथें राहूं लागली. ३. ६. ६५.

---

## अध्याय ६६ वा.

[ १ नलानें कर्कोटकाचें दावानलांतून केलेलें रक्षण.
२ कर्कोटकाचा नलाला दंश आणि वर. ]

(१) बृहदश्व—राजा युधिष्ठिरा, इकडे पुण्यश्लोक नल दमयंतीला सोडून जो निघाला, तो एका दावानल भडकलेल्या घोर वनांत शिरला. तेथें त्या वणव्यांतून 'हे पुण्यश्लोक नला धांव' असा कोणीं उच्च स्वरानें उच्चारिलेला शब्द वारंवार त्याच्या कानीं आला.

त्या वेळीं नलराजानें 'भिऊं नको' असें म्हणून त्या दावानलांत प्रवेश केला. तेथें वेटाळें करून निजलेला एक नागराज त्याच्या दृष्टीं पडला. त्या कांपणाऱ्या नागानें नलराजाला पहातांच हात जोडून म्हटलें—"हे राजन्, मी कर्कोटक नाग आहें. एकदा मीं महा तपस्वी नारदमहर्षीला फसविलें. तेव्हां क्रुद्ध झालेल्या त्यानें 'हे नीचा, नलराजा येईपर्यंत तूं येथेंच अचल होऊन रहा. तो राजा जेव्हां तुला या जागेवरून उचलून नेईल, तेव्हां तूं माझ्या शापापासून मुक्त होशील.' असा मला शाप दिला. हे नरेश्वरा, त्याच्या या शापामुळें

मी येथून एक पाऊलभरहि हालण्यास समर्थ नाहीं. यास्तव तूं मला येथून उचलून पलीकडे ने. मी तुला तुझ्या हिताचा उपाय सांगेन व तुझा सखा होईन. हे राजा, माझ्यासारखा अन्य नाग नाहीं. मी आपलें शरीर अगदीं हलकें करितों. आतां मला सत्वर येथून उचलून ने."

( २ ) असें बोलून तो नागेंद्र तत्काल अंगुष्ठमात्र आकाराचा झाला. तेव्हां नलानें त्याला अग्निरहित प्रदेशांत नेऊन ठेविलें. याप्रमाणें नलराजानें दावानलांतून सोडवून सुरक्षित स्थळीं आणिलें असतां तो कर्कोटक नाग पुनः म्हणाला—" हे नैषधा, आतां तूं एकेक पाऊल मोजीत पुढें चल, म्हणजे हे वीरा, मी तुझें परम कल्याण करीन."

तेव्हां नलानें एकेक पाऊल मोजण्यास आरंभ केला व त्यानें 'दश' ही संख्या उच्चारतांच त्या कर्कोटकानें त्याला तत्क्षणीं दंश केला. त्याबरोबर नलराजाच्या स्वरूपांत विलक्षण बदल झाला.

नाग आज्ञेवांचून केव्हांहि दंश करीत नाहीं, म्हणून त्यानें राजाला 'दश' म्ह० दंश कर, असे शब्द उच्चारण्यास सांगितलें. परंतु त्याचा हा आशय न जाणणारा नलराज आपलें विकृत स्वरूप पाहून अतिशय विस्मित झाला. त्याच वेळीं आपलें मूळस्वरूप धारण करणाऱ्या त्या नागाला पाहूनहि तो चकित झाला.

तेव्हां कर्कोटक नलाचें सान्त्वन करीत त्याला म्हणाला—" हे नृपश्रेष्ठा, तुला लोकांनीं ओळखूं नये म्हणून मीं तुझ्या स्वरूपांत बदल केला आहे. हे राजा, ज्या दुष्ट कलीनें तुला अशा घोर संकटांत टाकिलें आहे, तो तुझ्याच शरीरांत वास करीत आहे; त्यामुळें माझ्या या भयंकर विषानें त्याला तुझ्या शरीरांत असह्य यातना होतील. जोंवर तो तुला सोडणार नाहीं, तोंवर विषपूर्ण शरीरावयवांनीं युक्त असलेल्या तुझ्या शरीरांत तो अतिशय क्लेश भोगील.

हे जनेश्वरा, असले क्लेश भोगण्यास सर्वथा अयोग्य व निरपराध असलेल्या तुला ज्या कलीनें क्रोधानें व असूयेनें अशा संकटांत पाडिलें, त्याच्यापासून मीं

१ यावरून जो ज्या शरीरांत प्रवेश करितो, त्या शरीरानें सुख-दुःख भोगितो हें सिद्ध होतें व पिशाचसंचारादि प्रसंगीं तसा अनुभवहि येतो. दमयंतीनें पूर्वी दिलेल्या शापाचें फल कलि नलशरीरांत असेपर्यंत भोगील हेंहि यावरून उघड होतें.

तुझें रक्षण केलें आहे. हे नरश्रेष्ठा, माझ्या प्रसादानें व्याघ्रादि हिंस्र प्राणी, शत्रु व ब्रह्मवेत्ते यांच्यापासून तुला भय प्राप्त होणार नाहीं. हे राजा, तुला माझ्या विषाचीहि पीडा होणार नाहीं. संग्रामामध्यें तुला सतत जय मिळेल.

हे नृपते, तूं आतां येथून ऋतुपर्ण राजाकडे जा व मी 'बाहुक'-नांवाचा सूत आहें, असें त्याला सांग. अक्षविद्येंत निपुण असलेला तो राजा आपल्या रम्य अयोध्या-नगरीमध्यें सुखानें वास करीत आहे. तो इक्ष्वाकुकुलोत्पन्न श्रीमान् राजा तुजपासून 'अश्वहृदय'-नामक विद्या घेऊन तुला 'अक्षहृदय'-नांवाची द्यूतांत जय मिळवून देणारी विद्या देईल व तो तुझा मित्र होईल.

हे राजा, तुला ज्यावेळीं अक्षविद्या प्राप्त होईल त्यावेळीं तुझें कल्याण होईल. तुझी प्रिय भार्या, दोन अपत्यें व राज्य या सर्वांची तुला प्राप्ति होईल. यास्तव तूं आतां आपलें गतवैभव व प्रियवियोग यांसाठीं शोक करूं नको. थोड्याच कालांत तूं आपल्या पूर्ववैभवाला पुनः प्राप्त होशील, हें मी तुला सत्य सत्य सांगत आहें. हे नराधिपा, ज्या वेळीं तुला आपलें पूर्वस्वरूप पहाण्याची इच्छा होईल, त्यावेळीं तूं माझें स्मरण करून हें वस्त्र परिधान कर. म्हणजे तुला तुझें मूळ स्वरूप प्राप्त होईल." युधिष्ठिरा, इतकें बोलून कर्कोटकानें त्याला दोन दिव्य वस्त्रें दिलीं व आपल्या वचनावर पूर्ण विश्वास ठेवावयास सांगून तो नागराज तेथेंच अंतर्धान पावला. ३. ६. ६६.

---

## अध्याय ६७ वा.

[ १ नलाला ऋतुपर्णाचा आश्रय. २ त्याचा दमयंतीविषयीं विलाप. ]

(१) बृहदश्व—युधिष्ठिरा, वर सांगितल्याप्रमाणें हितोपदेश करून नाग अंतर्धान पावला असतां नलराजा ऋतुपर्णाच्या अयोध्या-नगरीस जावयास निघाला. तो दहाव्या दिवशीं त्या रम्य नगरीस येऊन पोंचला. तो राजापाशीं जाऊन "मी बाहुक आहें. या पृथ्वीवर अश्वविद्येंत माझी बरोबरी करणारा अन्य पुरुष नाहीं. सूक्ष्म कर्तव्याचा विचार करण्यासहि मी समर्थ आहें. मी उत्कृष्ट पाकसिद्धि करण्यांतहि कुशल आहें. हे राजा, या लोकीं प्रसिद्ध असलेलीं सर्व शिल्पें मी जाणतों. तशींच सर्व दुष्कर कर्में करण्याचाहि मी यत्न करीन. यास्तव हे नृपते, मला आश्रय देऊन माझें पोषण कर." असें म्हणाला.

तें ऐकून ऋतुपर्ण म्हणाला—बाहुका, तुझें कल्याण असो. तूं येथें रहा व वेळोवेळीं माझीं हीं सर्व कार्यें कर. 'माझीं वहानें शीघ्र गमन करणारीं असावीं' अशी माझी तीव्र इच्छा आहे. यास्तव तूं अगोदर माझ्या अश्वांना उत्तम शिक्षण दे. म्हणजे माझे अश्व शीघ्र गमन करूं लागतील. तूं माझा अश्वाध्यक्ष हो. मी तुला दशसहस्र सुवर्ण मासिक वेतन देईन. वार्ष्णेय व जीवल हे दोघे नित्य तुझ्या समीप रहातील. त्यांच्या सहवासांत तुझा काल सुखानें जाईल. यास्तव हे बाहुका, तूं मजपाशीं खुशाल रहा.

युधिष्ठिरा, ऋतुपर्णानें असें सांगितलें असतां नल त्या अयोध्या-नगरींत वार्ष्णेय व जीवल यांसह मोठ्या सत्कारानें राहूं लागला. तो प्रच्छन्न नैषध वैदर्भी दमयंतीचें चिंतन करीत मोठ्या कष्टानें दिवस घालवीत असे व प्रति दिवशीं सायंकाळीं नियमानें हा श्लोक म्हणत असे—

१ क्क नु सा क्षुत्पिपासार्ता श्रांता शेते तपस्विनी ।
स्मरंती तस्य मंदस्य कं वा साऽद्योपतिष्ठति ॥

राजा, बाहुक रोज रात्रीं न विसरतां हा श्लोक म्हणत असतो, असें पाहून एकदा जीवल त्यास म्हणाला—"बाहुका, तूं नित्य कोणत्या स्त्रीला उद्देशून शोक करीत असतोस, हें जाणण्याची माझी इच्छा आहे. हे आयुष्मन्, जिच्या-साठीं तूं इतका शोकाकुल होत आहेस ती कोणाची स्त्री ?"

( २ ) जीवलाचा हा प्रश्न ऐकून नलराजा त्यास म्हणाला—मित्रा, एका मंदबुद्धि पुरुषाची एक मान्य स्त्री होती. तो पुरुष वस्तुतः सत्यप्रतिज्ञ असूनहि दुर्दैवामुळें आपल्या प्रतिज्ञेपासून ढळला व कांहीं कारणानें तिच्यापासून वियुक्त झाला. पण साध्वी भार्येचा त्याग करून निघालेल्या त्या मंदात्म्याला असह्य दुःख भोगावें लागलें. तो मिथ्याप्रतिज्ञ मूढ अहोरात्र शोकाग्नीनें दग्ध होत वनोपवनांतून भटकूं लागला. त्याला रात्रीं त्या साध्वीचें स्मरण होतें व तो दुःखानें हा श्लोक म्हणत असतो. तो मूढबुद्धि पुरुष सर्व पृथ्वीवर भटकून आतां एका स्थानीं स्थिर झाला आहे, पण त्याला अनुचित असलेल्या कार्यांवर

१ अर्थ—क्षुधा व तृषा यांनीं आर्त व श्रांत झालेली ती बिचारी त्या मूढाचें दुःखानें स्मरण करीत कोठें बरें शयन करीत असेल व आपल्या जीवनासाठीं तिनें कोणाचा बरें आश्रय केला असेल !

कशी तरी उपजीविका करावी लागत आहे. तथापि त्याला त्या साध्वीचें पुनः पुनः स्मरण होतें व त्यामुळें तो अधिकच दुःखी होतो.

ती पतिव्रता घोर वनांतहि त्याला अनुसरली, पण त्या पाप्यानें तशा निर्जन अरण्यांत तिचा त्याग केला. ती सुकुमारी अशा अवस्थेंत जिवंत राहणेंहि अशक्य आहे. कारण तिला वनांतील दुर्गम मार्ग माहीत नाहींत व ती अशी दुःखद अवस्था भोगण्यास योग्यहि नाहीं. क्षुधा व तृषा यांनीं पीडिलेली ती कोमलांगी श्वापदांनीं व्यापिलेल्या त्या घोर वनांत अद्यापि जिवंत राहिली असेल अशी कल्पनाहि करवत नाहीं. हे श्रेष्ठा, त्या अभागी मतिमंदानें त्या साध्वीचा असा छल केला.

पांडवा, याप्रमाणें दमयंतीचें वारंवार स्मरण करणारा तो नैषध ऋतुपर्ण-राजाच्या मंदिरांत छद्मवेषानें राहूं लागला. ३. ६. ६७.

---

## अध्याय ६८ वा.

[ १ नल-दमयंतीच्या शोधासाठीं विदर्भ-देशांतून ब्राह्मणांचें प्रेषण. २ सुबाहूच्या नगरींत सुदेव ब्राह्मणानें लाविलेला दमयंतीचा शोध. ]

( १ ) बृहदश्व—हे पांडवश्रेष्ठा, नलाचें राज्य जाऊन भार्येसह तो दास्याला प्राप्त झाला असतां वैदर्भराज भीमानें त्याचा शोध लावण्यासाठीं ब्राह्मणांना दश-दिशांस पाठविलें. त्यांना विपुल धन देऊन तो म्हणाला—" हे विप्रहो, तुम्ही नलराजाचा व माझ्या दमयंती कन्येचा शोध लावा. तुम्हांपैकीं जो कोणी त्या नैषधाचा शोध लावील, त्याला मी एक सहस्र गायी देईन व जो कोणी त्या उभयतांना येथें आणील, त्याला [1]अग्रहार व नगरासारखा मोठा ग्राम देईन. कदाचित् त्यांना येथें आणणें जरी शक्य नसलें तरी ' तीं उभयतां कोठें आहेत ' एवढा जरी कोणीं शोध लाविला, तरी मी त्याला एक सहस्र गोधन देईन."

हे कुंतीपुत्रा, भीमराजानें असें सांगितलें असतां हृष्ट झालेले ते सर्व ब्राह्मण दश-दिशांकडे गेले आणि प्रत्येक नगर व राष्ट्र यांमध्यें भार्येसह

---

१ अग्र म्ह० ब्राह्मणभोजन. त्यासाठीं राजधनांतून जें क्षेत्रादि वित्त तोडून दिलें जातें, त्याला ' अग्रहार ' असें म्हणतात.

नैषधाचा शोध करूं लागले. पण त्यांतील कोणालाहि नल किंवा भीम-कन्या यांतील एकाचाहि शोध लागला नाहीं. तेव्हां त्यांतीलच 'सुदेव-' नांवाचा एक ब्राह्मण त्या उभयतांचा शोध करीत सुबाहूच्या रम्य चेदिनगरीस आला. त्यानें राजाच्या पुण्याहवाचनप्रसंगीं सुनंदेसह राजगृहांत स्थित असलेल्या वैदर्भीला पाहिलें. पण त्यावेळीं धूमानें व्यापिलेल्या अग्निज्वालेप्रमाणें तिचें स्वरूप पूर्वीप्रमाणें अप्रतिम दिसत नव्हतें. तें मेघाच्छादित चंद्राप्रमाणें मंद, मलिन व कृश झालें होतें. तथापि अनेक चिह्नांवरून 'ही दमयंतीच असावी' असा त्या ब्राह्मणानें निश्चय केला.

( २ ) तो सुदेव म्हणाला—मी या राजनंदिनीला पूर्वीं जसें पाहिलें होतें, तशीच ती आजहि दिसत आहे. साक्षात् लक्ष्मीप्रमाणें लोकोत्तर कांतीनें युक्त असलेल्या या बालेला पाहून मी आज धन्य झालों आहें. ही सर्वांगसुंदरी ग्रीष्म ऋतूंतील नदीप्रमाणें पतिशोकानें जरी कृश व दीन झाली आहे, तरी आपल्या लोकोत्तर कांतीनें सर्व दिशांना प्रकाशित करीत आहे. कामदेवाच्या रतीप्रमाणें तिचे नेत्र कमलासारखे सुंदर व विस्तीर्ण आहेत. पूर्ण चंद्राच्या प्रभेप्रमाणें ही सर्व लोकांना प्रिय आहे. दैवदोषामुळें विदर्भ सरोवरांतून उपटून काढलेल्या पंकलिप्त मृणालीप्रमाणें ती दिसत आहे. राहुग्रस्त चंद्रानें लिप्त असलेल्या पौर्णिमेसारखी ती निस्तेज झाली आहे.

अरे अरे, ही राजकन्या, हत्तीनें व्याकुळ केलेल्या कमलिनीप्रमाणें शोभत आहे. ही नलभार्या शोकाग्नीनें दग्ध झाल्यामुळें ग्रीष्म ऋतूंतील सूर्यतापानें कोमेजलेल्या मृणालिनीप्रमाणें भासत आहे. अलौकिक रूप आणि औदार्यादि गुण यांनीं युक्त असलेली ही भूषणार्ह दमयंती यावेळीं भूषणरहित झाल्यामुळें नीलमेघानें आच्छादिलेल्या नूतन चंद्रलेखेप्रमाणें पहाणाराच्या मनाला खेद देत आहे.

प्रिय व इष्ट भोग आणि बंधुजन यांनीं हीन झालेली ही साध्वी आपल्या प्रिय पतीच्या दर्शनेच्छेनें दीन झालेल्या देहाला धारण करीत आहे. खरोखर भार्येला इतर सर्व भूषणांपेक्षां पति हेंच श्रेष्ठ भूषण आहे.[1] ही दमयंती पतीशीं वियुक्त झाल्यामुळें आपल्या अंगकांतीनें शोभत असूनहि वस्तुतः शोभत नाहीं.

---

१ भर्ता नाम परं नार्या भूषणं भूषणैर्विना ॥

**अर्थ**—भर्ता हें स्त्रीचें भूषणावांचूनच श्रेष्ठ भूषण आहे.

नलराजाहि हिच्याशीं वियुक्त होऊन जर अद्यापि स्वदेहाचें धारण करीत असेल व शोकानें त्याचें हृदय विदीर्ण झालें नसेल, तर तो एक अत्यंत दुष्कर कर्मच करीत आहे, असें मी समजेन. सुखार्ह असलेल्या या सुंदरीला अशा दुःखावस्थेंत पाहून माझें हृदयहि व्याकुल होत आहे.

ही शुभ राजकन्या या असह्य दुःखांतून केव्हां व कशी बरें पार पडेल ! रोहिणीचा चंद्राशीं जसा समागम व्हावा त्याप्रमाणें ही साध्वी नलराजाशीं संयुक्त होऊन केव्हां बरें सुखी होईल ! खरोखर हिचा पुनर्लाभ झाल्यानें नैषध राजा परम संतुष्ट होईल; स्वराज्यापासून भ्रष्ट झालेल्या त्या राजाला पृथ्वीचा पुनः लाभ झाला असतां तो अधिकच प्रसन्न होईल.

समान शील, वय व कुल यांनीं युक्त असलेली ही वैदर्भी नलराजालाच योग्य आहे व तो निषदाधिपति हिला अनुरूप आहे. यास्तव पतिदर्शनाविषयीं अतिशय उत्सुक झालेल्या या नलभार्येचें समाधान करणें मला उचित आहे. अलौकिक वीर्य व गुण यांनीं युक्त असलेल्या त्या निषधाधिपतीच्या या पूर्ण चंद्रमुखी भार्येचें मी आतां सांत्वन करितों. जिनें यापूर्वी दुःखाचा कधींच अनुभव घेतलेला नाहीं, अशा या दुःखार्त व चिंतामग्न साध्वीला अंशतः तरी सुखी करणें हें माझें परम कर्तव्य आहे.

आणि हे पांडवश्रेष्ठा, असा विचार करून अनेक कारणें व लक्षणें यांवरून त्या दमयंतीला ओळखून तो ब्राह्मण तिच्या समीप गेला व म्हणाला—"हे वैदर्भि, मी तुझ्या भ्रात्याचा प्रिय सखा सुदेव ब्राह्मण आहें. भीमराजाच्या आज्ञेवरून मी तुला शोधण्यासाठीं येथें आलों आहें. हे राज्ञि, तुझा पिता, माता, भ्राते व तुझीं दोन अपत्यें कुशल आहेत. तुझ्यासाठीं तुझा सर्व बंधुवर्ग जणुं काय प्राणरहित झाला आहे. हे भामिनि, तुझा व त्या पुण्यश्लोक राजाचा शोध करण्यासाठीं शेकडों ब्राह्मण पृथ्वीभर फिरत आहेत."

युधिष्ठिरा, त्या सुदेव ब्राह्मणाला ओळखून दमयंतीनें आपल्या सर्व बांधवांचें क्रमानें कुशल विचारिलें व शोकानें व्याकुळ झालेली ती विदर्भराजकन्या आपल्या भ्रात्याला इष्ट असलेल्या सुदेव ब्राह्मणाला एकाएकीं पाहून रडूं लागली.

तेव्हां ती साध्वी एकांतांत सुदेव ब्राह्मणाशीं बोलत आहे व अतिशय रडत आहे, असें पाहून तिच्या शोकानें व्याकुल झालेली सुनंदा आपल्या मातेपाशीं गेली व म्हणाली—" माते, सैरंध्रीला आज एक ब्राह्मण येऊन भेटला व

तेव्हांपासून ती सारखी रडत आहे. तो विद्वान् ब्राह्मण तिचें सांत्वन करीत आहे. तुझी इच्छा असेल तर त्याचें कारण समजून घे."

तें ऐकून चेदिपति सुबाहूची माता राजाच्या अंतःपुरांतून निघाली व जेथें ती बाला ब्राह्मणाशीं बोलत बसली होती तेथें गेली. तेथें जाऊन तिनें सुदेव ब्राह्मणाला आपल्यापाशीं बोलाविलें व त्याला विचारिलें—"हे विप्रश्रेष्ठा, ही भामिनी कोणाची भार्या ! हिच्या पित्याचें नांव काय ? ही मृगनयना आपल्या माता-पित्यांपासून व भर्त्यापासून वियुक्त कशी झाली ! ही या ठिकाणीं अशा स्थितींत आहे, हें तुला कसें कळलें ! हे ब्राह्मणा, देवकन्येप्रमाणें असलेल्या या साध्वीचा सर्व वृत्तान्त तुझ्या तोंडून ऐकण्याची माझी इच्छा आहे."

हे धर्मराज, राजमातेचा हा प्रश्न ऐकून द्विजश्रेष्ठ सुदेव सुखासनावर बसून दमयंतीचें सविस्तर वृत्त कथन करूं लागला. ३. ६. ६८.

---

## अध्याय ६९ वा.

[ १ सुदेव ब्राह्मणानें सुबाहु राजमातेला सांगितलेला दमयंतीचा वृत्तान्त. २ दमयंतीचें विदर्भदेशीं गमन. ३ नलाच्या शोधासाठीं ब्राह्मणांचें प्रेषण. ]

( १ ) सुदेव—हे राजमाते, विदर्भदेशाचा धर्मात्मा व तेजस्वी भीमनामक राजा प्रसिद्ध आहे. 'दमयंती'-नांवानें प्रसिद्ध असलेली ही कल्याणी त्याची कन्या आहे. निषधदेशाचा वीरसेनपुत्र नलराजाहि प्रसिद्ध आहे. त्या बुद्धिमान् पुण्यश्लोक राजाची ही अभिषिक्त राज्ञी आहे. नलाच्या पुष्करभ्रात्यानें त्याला द्यूतांत जिंकलें व त्याचें राज्य हरण केलें, तेव्हां तो भूपाल दमयंतीसह कोठें निघून गेला. त्याचा कोणालाहि थांग लागेना. म्हणून, भीमराजाच्या आज्ञेनें माझ्यासारखे अनेक ब्राह्मण त्याचा शोध करण्यासाठीं फिरत आहेत.

सुदैवानें मला ही राजकन्या आज तुझ्या पुत्राच्या राजमंदिरांत दिसली. हिच्यासारखी रूपवती मानुषी या लोकीं नाहीं. तिच्या दोन भुंवयांमध्यें हा सहज रक्तवर्ण तिळ आहे. त्यावरून मीं या सुकुमारीला ओळखलें. या वेळीं तो अभ्रांतील चंद्राप्रमाणें मलानें जरी आच्छादित झाला आहे, तरी विधात्यानें हिचें ऐश्वर्य प्रकट करण्यासाठींच तिच्या ठिकाणीं तें चिह्न उत्पन्न केलें आहे.

प्रतिपदेनें कलुशित झालेली चंद्रकोर जशी फारशी शोभत नाहीं, त्याचप्रमाणें तिचा हा तिळ विशेष प्रकारें खुलून दिसत नाहीं. मलानें आच्छादित झालेलें हिचें स्वरूपहि पूर्वीसारखें दिसत नाहीं. सर्व संस्कारशून्य असलेलें तें स्वाभाविक स्वरूप असंस्कृत सुवर्णासारखेंच या वेळीं झालें आहे. तथापि भस्माच्छादित अग्नीला त्याच्या उष्म्यावरून जसें जाणावें, तसें मीं हिचा हा शरीराकार व तिलक यांवरून या भीमकन्येला ओळखिलें.

बृहद्श्व—राजा, सुदेवाचें हें वचन ऐकून सुनंदेनें दमयंतीचें मुख आपल्या हातानें स्वच्छ धुतलें, त्याबरोबर दमयंतीच्या भ्रूमध्यभागीं असलेल्या तिलकावरील मलहि धुवून गेला व तिचें तें सहज चिह्न तिच्या ललाटाला शोभवूं लागलें.

हे राजन्, निरभ्र आकाशांतील चंद्र जसा शोभावा, तसें त्या राज्ञीचें मुख त्या वेळीं शोभलें. दमयंतीचें तें सहज चिह्न अवलोकन करून व तिला ओळखून सुनंदा व राजमाता या दोघींनीं तिला घट्ट आलिंगन दिलें व कांहीं वेळ त्या तिघींनीं दुःखाश्रु ढाळिले.

तो दुःखावेग कमी झाल्यावर राजमाता दमयंतीला हलकेंच म्हणाली—"हे वत्से, तूं माझ्या भगिनीची कन्या आहेस. या तुझ्या तिलकावरून मीं तुला ओळखिलें. हे कन्ये, मी व तुझी माता अशा दोघीजणी दाशार्णाधिपति महात्म्या सुदाम-राजाच्या कन्या आहोंत. माझ्या महात्म्या पित्यानें माझी ती भगिनी भीमराजाला दिली व माझें वीरबाहूला समर्पण केलें.

दशार्णदेशांत माझ्या पितृगृहीं जन्मलेल्या तुला मीं बालपणीं पाहिलें आहे. हे भामिनि, माझें घर तुला तुझ्या पितृगृहासारखेंच आहे आणि हें जसें माझें ऐश्वर्य आहे, तसेंच तें तुझेंहि आहे. तरी तूं आतां येथें सुखानें रहा.

( २ ) राजा, राजमातेचें हें वचन ऐकून दमयंतीला समाधान वाटलें व आपल्या मातृभगिनीला वंदन करून ती म्हणाली—"हे पूज्ये, 'मी कोण' हें तुला माहित नसतांनाहि मी तुझ्या घरीं मोठ्या सुखानें राहिलें. तूं माझें चांगल्याप्रकारें रक्षण केलेंस व मला उचित अशा अन्न-पानादि भोग्य वस्तूहि दिल्यास. आतां यापुढील माझा येथील निवास अधिक सुखकर होईल, यांत कांहीं संशय नाहीं. पण हे मातृभगिनि, मी आपल्या माता-पितरांना व माझ्या दोन अर्भकांना सोडून फार दिवस दूर राहिलें आहें. माझीं तीं प्रिय अपत्यें

माझ्या पितृगृहींच रहात आहेत. कारण ज्या वेळीं आम्हांवर ही आपत्ति आली त्या वेळींच मीं त्यांना मातृगृहीं पोंचविलें. तीं माझीं दोन अपत्यें मातृ-पितृहीन झाल्यामुळें मोठ्या दुःखानें दिवस कंठीत असतील. यास्तव मी आतां सत्वर विदर्भदेशीं जाण्याची इच्छा करितें. मला तूं संतोषानें अनुज्ञा दे. माझें कांहीं प्रिय करण्याची जर तुझी इच्छा असेल तर मला पितृगृहीं पोंचविण्यासाठीं एक वाहन दे."

युधिष्ठिरा, त्या साध्वीचें हें दीन वचन ऐकून तिची मातृभगिनी 'ठीक आहे' असें म्हणाली व तिनें आपल्या सुबाहु पुत्राच्या संमतीनें तिच्याबरोबर अन्न-वस्त्र, इतर सामग्री व विपुल सैन्य देऊन मोठ्या हर्षानें तिला मेण्यांत बसवून तिची पितृगृहीं रवानगी केली.

त्यानंतर हे कुंतीपुत्रा, ती राज्ञी दमयंती अल्पावकाशांतच विदर्भनगरींत जाऊन पोंचली. तिला पाहून परम संतुष्ट झालेल्या तिच्या सर्व आप्तजनांनीं तिचें मोठ्या प्रेमानें स्वागत केलें. यशस्विनी दमयंतीलाहि आपले सर्व बांधव दोन्ही अल्पवयस्क अपत्यें, माता, पिता व सर्व सखीजन कुशल असलेला पाहून अतिशय आल्हाद झाला व तिनें हृष्ट चित्तानें देवता आणि ब्राह्मण यांचें यथाविधि पूजन केलें.

हे पांडवा, त्या वेळीं विदर्भराजानें आपली कन्या कुशल असलेली पाहून मोठ्या प्रेमानें सुदेव ब्राह्मणाला एक सहस्र गायी, ग्राम आणि विपुल धन अर्पण करून त्याचा सत्कार केला.

त्यानंतर, दमयंती एक रात्र पितृगृहीं राहून व विश्रांति घेऊन आपल्या मातेला म्हणाली—"हे माते, मीं जिवंत रहावें अशी जर तुझी इच्छा असेल तर नरवीर नलराजाला सत्वर येथें आणीव. ही मी तुला माझ्या मनांतील सत्य गोष्ट सांगतें."

दमयंतीचें हें वचन ऐकून ती राजपत्नी अतिशय दुःखी झाली. तिचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. कंठ दाटून आला. त्यामुळें ती आपल्या प्रिय कन्येला कांहींच बोलूं शकली नाहीं. आपल्या स्वामिनीची ही अवस्था पाहून राजाचें सर्व अंतःपुर दुःखी होऊन अतिशय आक्रोश करूं लागलें.

नंतर भीमराजाला त्याची राज्ञी म्हणाली—महाराज, ही आपली दमयंती भर्त्यासाठीं फार शोक करीत आहे. सर्व मर्यादा व लज्जा सोडून तिनें स्वतः

आपल्या मुखानें 'मीं जिवंत रहावें अशी जर तुझी इच्छा असेल तर पुण्यश्लोक नलराजाला शोधण्यासाठीं तुझे भृत्य भगीरथ यत्न करोत.' असें मला सांगितलें आहे. यास्तव हे प्रभो, आपल्या कन्येचा हा मनोरथ आपण पूर्ण करा.

(३) युधिष्ठिरा, पत्नीचें हें वचन ऐकून भीमराजानें आपल्या अंकित असलेल्या ब्राह्मणांना 'विप्रहो, तुम्ही नलराजाचा शोध लावण्याचा दीर्घ यत्न करा' अशी आज्ञा करून त्यांस दश-दिशांस पाठविलें. तेव्हां ते सर्व ब्राह्मण राजाज्ञेनें दमयंतीकडे आले व 'आम्ही नलराजाचा शोध करावयास निघालों आहों' असें म्हणाले.

तें ऐकून दमयंती विनयानें त्यांस म्हणाली—विप्रहो, तुम्ही सर्व राष्ट्रांमध्यें जाऊन निरनिराळ्या जनसमूहामध्यें पुनः पुनः असें वचन बोला—

'अरे प्रिय कितवा, माझें अर्धें वस्त्र फाडून व निजलेल्या मज अनुरक्त प्रियेला घोर अरण्यांत सोडून तूं कोठें निघून गेलास! तूं वनामध्यें तिला जसें पाहिलेंस तशीच ती अद्यापि तुझी मार्गप्रतीक्षा करीत आहे. वस्त्रार्धानें आच्छादित झालेली ती अबला शोकानें अत्यंत संतप्त झाली आहे. ती बिचारी सारखी विलाप करीत आहे. यास्तव हे वीरा, तिजवर अनुग्रह कर व तिला प्रत्युत्तर दे.'

हे द्विजहो, प्रथम याप्रमाणें बोलून तो दयालु राजा मजवर कृपा करील; अशाप्रकारें तुम्ही त्याला आणखीहि असें सांगा—

'हे वीरा, वायूकडून क्षुब्ध केला जाणारा हा अग्नि वनाला जाळीत आहे आणि पतीनें साध्वी भार्येचें सर्वदा पोषण व रक्षण करावें अशी धर्ममर्यादा आहे. पण तूं धर्मज्ञ असतांना आपल्या दोन्ही कर्तव्यांपासून च्युत कसा होतोस! तूं मोठा प्रख्यात, ज्ञानी, कुलीन व दयालु असतांना माझ्या मंदभाग्यामुळें असा निर्दय कसा बनलास! माझ्या दुर्दैवाचाच हा परिणाम आहे, यांत संशय नाहीं. यास्तव हे नरश्रेष्ठा, मजवर दया कर. दया करणें हा श्रेष्ठ धर्म आहे, असें मीं तुझ्याच मुखानें ऐकलें आहे."

---

१ दमयंतीच्या शोकाग्नीला हा कालवायु प्रतिदिवशीं वाढवीत आहे. तो तिच्या शरीरवनाला जाळून टाकील. अशा अवस्थेंत साध्वी भार्येचें अन्न, प्रिय वचन इत्यादिकांनीं पोषण करणें आणि चोर व हिंस्र प्राणी यांच्यापासून रक्षण करणें हा पतीचा धर्म आहे. हा दमयंतीचा गूढ आशय कवीनें रूपकानें साधिला आहे.

पूज्य ब्राह्मणहो, असें बोलणाऱ्या तुम्हांला जर कोणीं कांहीं उत्तर दिलें तर तो पुरुष कोण आहे, कोठें राहतो, काय करतो, इत्यादि त्याचा सर्व वृत्तान्त समजून घ्या. तुमचें हें वचन ऐकून जो कोणी कांहीं बोलेल, त्याचें तें वचन लक्षांत ठेवून मला अक्षरशः येऊन सांगा. पण 'माझ्या आज्ञेनें तुम्ही असें बोलत आहां,' हें त्याला कळूं देऊं नका. कोणीकडून तो महात्मा येथें येईल असा यत्न तुम्ही सावधान चित्तानें करा. तो पुरुष मोठा समृद्ध असो, निर्धन असो किंवा असमर्थ असो. त्याचा आशय काय आहे, हें तुम्ही समजून घ्या.

युधिष्ठिरा, दमयंतीनें असें सांगितलें असतां ते सर्व ब्राह्मण त्यावेळीं दुर्धर संकटांत पडलेल्या नलराजाचा शोध लावण्यासाठीं दश-दिशांकडे निघून गेले. त्यांनीं सर्व नगरें, राष्ट्रें, ग्राम, घोष, (गौळीवाडे) व मुनींचे आश्रम यांतून संचार करून नलराजाचा पुष्कळ शोध केला. दमयंतीनें सांगितलेलें वचन ते प्रत्येक जनसमूहांत जाऊन वारंवार ऐकवीत असत. पण त्यांना तेथें कोणींच कांहीं उत्तर दिलें नाहीं. त्यामुळें त्यांतील कोणा एकालाहि नलराजाचा शोध लागला नाहीं. ३. ६. ६९.

---

## अध्याय ७० वा.

[ १ पर्णाद ब्राह्मणाचा अयोध्येंतील बाहुकाशीं संवाद. २ त्यानें दमयंतीला कथन केलेला बाहुकाचा वृत्तान्त. ३ सुदेवानें ऋतुपर्णास सांगितलेली दमयंतीच्या पुनःस्वयंवराची वार्ता. ]

( १ ) बृहदश्व—हे पांडुपुत्रा, याप्रमाणें नलाचा शोध करीत करीत 'पर्णाद'-नांवाचा एक ब्राह्मण वैदर्भ नगरांत येऊन भैमीला असें वचन बोलला—"हे दमयंति, नलराजाचा शोध करीत मी अयोध्या नगरींत प्रवेश करून ऋतुपर्ण राजापाशीं गेलों व तेथें तूं सांगितलेलें वचन उच्चारिलें, परंतु मी पुनः पुनः बोलत असलेलें तें वचन ऐकूनहि ऋतुपर्णराजा किंवा त्याचे सभासद एक शब्दहि बोलले नाहींत.

( २ ) त्यानंतर राजाची अनुज्ञा घेऊन मी निघालों असतां त्या नराधिपाचा 'बाहुक'-नामक सारथि मला एकांतांत घेऊन गेला. तो नरेंद्राचा सूत विरूप असून त्याचे दोन्ही बाहु आंखुड आहेत. परंतु तो शीघ्रगतीनें वाहनें नेण्यांत अत्यंत निपुण व पाकसिद्धि करण्यांत अतिशय प्रवीण आहे, असें मीं ऐकिलें.

त्या बाहुकानें प्रथम दीर्घ निश्वास सोडून पुनः पुनः रोदन केलें. थोड्या वेळांत किंचित् शांत झाल्यावर मला कुशल प्रश्न विचारिले व नंतर म्हटलें— " हे विप्रश्रेष्ठा, ज्या कुलस्त्रिया विपत्कालींहि आपलें संरक्षण करितात, त्या स्वतःच स्वतःचा उद्धार करून स्वर्ग जिंकितात, यांत संशय नाहीं. त्याचप्रमाणें पतीनें त्याग केला असतांहि त्या त्याच्यावर केव्हांहि क्रुद्ध होत नाहींत. उलट त्या श्रेष्ठ स्त्रिया आपल्या जीवितावर सदाचरणाचें कवच चढवून प्राणरक्षण करितात.

यास्तव ऐश्वर्यभ्रष्ट व संकटग्रस्त झालेल्या त्या मूढ पतीनें जरी तिचा त्याग केला असला, तरी त्या साध्वीनें त्याच्यावर क्रुद्ध होणें योग्य नव्हे. त्या बिकट प्रसंगीं तो आपला उदरनिर्वाह करण्यासहि समर्थ नव्हता. त्यानें परिधान केलेलें एक वस्त्रहि पक्ष्यांनीं हिरावून नेलें होतें. त्यामुळें तो मनःसंतापानें जणुं काय जळत होता. अशा स्थितींत त्या साध्वीनें त्याच्यावर रुष्ट होणें, उचित नाहीं.

त्यानें तिचा बहुमान केलेला असो किंवा अपमान केलेला असो, तो तिचा पति त्यावेळीं राज्यभ्रष्ट, ऐश्वर्यहीन, क्षुधापीडित व संकटग्रस्त होता. यास्तव त्या पतिव्रतेनें त्याच्यावर कोप करूं नये. "

हे राजकन्ये, त्या बाहुकाचें हें भाषण ऐकून मी मोठ्या त्वरेनें येथें आलों आहें. हें वृत्त ऐकून तुला पुढें जें कर्तव्य असेल त्याची तूं योजना कर. कारण ती करण्यास तूं स्वतःच समर्थ आहेस. तसेंच, हा सर्व वृत्तान्त राजालाहि निवेदन कर.

राजा युधिष्ठिरा, पर्णाद-ब्राह्मणाचें हें भाषण ऐकून दमयंतीचे नेत्र दुःखाश्रूंनीं भरून आले. ती एकांतांत जाऊन मातेला म्हणाली—"हे माते, मी करीत असलेला संकेत माझ्या पित्याला कळूं देऊं नको. मी तुझ्या समक्षच सुदेव ब्राह्मणाला पुढील सर्व योजना सांगून त्याला या कार्यांत नियुक्त करितें. तुला जर माझें प्रिय करण्याची इच्छा असेल, तर ही गोष्ट भीमनृपतीच्या कानीं जाऊं देऊं नको. सुदेवानें ज्याप्रमाणें मला आपल्या आप्त-बांधवांत आणून सोडिलें, त्याचप्रमाणें नलराजाला आणण्याचें शुभ कार्य करण्यास तोच ब्राह्मणश्रेष्ठ सत्वर अयोध्या-नगरींत जावो. "

याप्रमाणें मातेला सांगून त्या उदार दमयंतीनें द्विजश्रेष्ठ पर्णादानें विश्रांति घेतल्यानंतर विपुल धन देऊन त्याचा यथाविधि सत्कार केला आणि म्हटलें—

'हे विप्रर्षे, नलराजा परत आल्यावर मी तुला आणखीहि द्रव्य देईन. अन्य कोणालाहि करितां येणार नाहीं, असें तूं माझें फार मोठें कार्य केलें आहेस. तुझ्या या प्रयत्नानेंच मला माझ्या प्रिय पतीचें दर्शन होईल."

दमयंतीचें हें वचन ऐकून तो 'पर्णाद'-ब्राह्मण तिला मंगल आशीर्वादानें आश्वासन देऊन अतिशय हृष्ट व कृतार्थ होऊन स्वगृहीं निघून गेला.

राजा युधिष्ठिरा, त्यानंतर दमयंतीनें सुदेवब्राह्मणाला पुनः बोलाविलें आणि दुःख-शोकानें व्याकुल झालेल्या त्या साध्वीनें आपल्या जननीसमक्ष त्यास म्हटलें—"हे श्रेष्ठा, तूं वायुगतीनें सत्वर अयोध्या-नगरांत राहणाऱ्या ऋतुपर्ण-राजापाशीं जा व त्याला सांग कीं, भीमकन्या दमयंती स्वयंवरांत पुनः दुसरा पति वरणार आहे. त्यासाठीं सर्व देशांतील राजे व राजपुत्र कुंडिनपुरास चालले आहेत. तिचा स्वयंवर उद्यां होईल. आजचा एकच दिवस मध्यें आहे. हे श्रेष्ठा, तुला एका दिवसांत तेथें पोंचतां येणें जर शक्य असेल तर सत्वर नीघ. उद्यां सूर्योदय होतांच ती दुसरा पति वरील. पुण्यश्लोक नलराजा जिवंत आहे किंवा नाहीं याचा संशयच आहे."

( ३ ) राजा, दमयंतीचें. हें भाषण ऐकून तो सुदेव ब्राह्मण मोठ्या त्वरेनें अयोध्या-नगरीस गेला व त्यानें ऋतुपर्ण-राजाला दमयंतीचा संकेत कळविला. ३. ६. ७०.

---

## अध्याय ७१ वा.

[१ ऋतुपर्णाची स्वयंवरार्थ गमन करण्याची इच्छा. २ तें वृत्त ऐकून बाहुकाचा खेद. ३ त्याचें राजासह विदर्भदेशाकडे प्रयाण. ४ बाहुकाचें सारथ्य पाहून वार्ष्णेयाचे तर्क व राजासह संतोष. ]

( १ ) बृहदश्व—राजा युधिष्ठिरा, त्या वेळीं ऋतुपर्णराजा सुदेवाचें तें वचन ऐकून बाहुकाचें सांत्वन करीत त्यास मधुर वाणीनें म्हणाला—"हे अश्वज्ञ बाहुका, एका दिवसांत विदर्भदेशीं जाऊन पोंचणें जर शक्य असेल तर दमयंतीच्या स्वयंवराला जाण्याची माझी इच्छा आहे."

( २ ) हे कुंतीपुत्रा, राजाचें हें भाषण ऐकतांच नलाचें मन दुःखानें विदीर्ण झालें व तो महात्मा मनांत विचार करूं लागला—"हायरे दैवा, दुःखानें मोहित झालेली दमयंती असे शब्द कधीं उच्चारील तरी काय? ती साध्वी

असें विपरीत वर्तन करील काय? अथवा माझा शोध लावण्यासाठीं तर त्या दूरदर्शी तपस्विनीनें हा उत्कृष्ट उपाय योजिला नसेलना!

खरोखर मीं मूढानें अतिशय नीचपणानें तिची वंचना केली. पण त्या माझ्या दारुण दोषाबद्दल ती पतिव्रता अन्य पति वरून असें अमार्गाचरण कधीं करणार नाहीं. तथापि स्त्रीस्वभाव चंचल असतो, मीहि तिचा अक्षम्य अपराध केला आहे. शिवाय दीर्घवियोगामुळें तिचें मजवरील प्रेमहि नष्ट झालें असेल. परंतु हें जरी सत्य मानलें, तरी ती देवी असें करील हें संभवत नाहीं.

मला तर असें वाटतें कीं, माझ्या विरहदुःखानें शोकग्रस्त झालेली ती वैदर्भी अतिशय निराश झाली असेल. ती असा विचारहि कधीं मनांत आणणार नाहीं. शिवाय ती माझी प्रिय कांता अपत्यांनीं युक्त असल्यामुळें असा प्रकार संभवत नाहीं. असो. तेथें गेल्यावर मला यांतील सत्यासत्यतेचा निश्चय करतां येईल, यास्तव मी माझ्या कार्यासाठींच ऋतुपर्णाची इच्छा पूर्ण करितों."

(३) राजा, मनांत असा निश्चय करून तो दीन झालेला बाहुक हात जोडून नराधिप ऋतुपर्णाला म्हणाला—"हे नृपाला, तुझा विचार मला मान्य आहे. मी तुला एका दिवसांत विदर्भदेशांत नेऊं शकेन."

हे कुरुश्रेष्ठा, त्यानंतर बाहुकानें राजाज्ञेनें अश्वशालेंत जाऊन अश्वांची परीक्षा केली. तो बाहुक पुनः पुनः विचार करून शीघ्रगामी उत्तम अश्वांची निवड करीत असतां ऋतुपर्ण राजा निघण्याची त्वरा करूं लागला. तेव्हां बाहुकानें शीघ्र गमन करणारे, कृश व मार्गांचें आक्रमण करण्यास समर्थ असे सुलक्षणी अश्व निवडून काढिले.

ते अश्व तेजस्वी, बलवान्, जातिवंत, व सुशील होते. त्यांच्यामध्यें एकहि दुर्लक्षण नव्हतें. त्यांची नासिका उंच असून हनुवटी मोठी होती. त्यांच्या अंगावर दहा भोंवरे असून सिंधदेशांत उत्पन्न झालेले ते जातिवंत अश्व वायूसारखे वेगवान् होते.

तथापि ते कृश असलेले पाहून ऋतुपर्णराजा किंचित् क्रुद्ध होऊन बाहुकास म्हणाला—"हे सूता, तूं हें काय मनांत आणिलें आहेस? आम्हांला असें फसविणें तुला योग्य नाहीं. ज्याचें बल म्ह० भारसहिष्णुता व प्राण म्ह० वेगवत्ता हीं दोन्ही अल्प आहेत, असे हे अश्व मला कसे वाहून नेणार? अशा अश्वांच्या साह्यानें आपल्याला फार मोठ्या मार्गाचें आक्रमण कसें करितां येईल?"

बाहुक म्हणाला—हे राजन्, या दोन्ही अश्वांच्या ललाटावर एक, मस्तकावर दोन, दोन्ही कुशी व त्यांचा समीप भाग यांवर दोन दोन, छातीवर पुढें दोन व मागें दोन आणि पृष्ठभागीं एक असे एकंदर बारा भोंवरे आहेत. त्यामुळें हे अश्व तुला विदर्भदेशांत इष्टकालीं नेण्यास समर्थ आहेत. तथापि तुला जर हे अश्व असमर्थ वाटत असतील तर दुसरे कोणते जोडूं ते सांग, म्हणजे मी त्यांची योजना करितों.

सारथ्याचें हें वचन ऐकून ऋतुपर्ण म्हणाला—"तूंच अश्वांचें सामर्थ्य जाणणारा व अश्वविद्येंत कुशल आहेस. यास्तव तुला जे अश्व समर्थ वाटत असतील तेच सत्वर जोड."

तेव्हां अश्वज्ञ नलानें ते सुलक्षणांनीं युक्त असलेले चार जातिवंत व वेगवान् अश्व रथाला जोडिले व दमयंतीच्या प्राप्तीसाठीं अधीर झालेला ऋतुपर्ण राजा त्या सज्ज केलेल्या रथावर आरूढ झाला. त्याबरोबर ते श्रेष्ठ अश्व गुडघे टेंकून भूमीवर बसले. तेव्हां श्रीमान् नलराजानें त्यांच्या अंगावरून हात फिरवून त्यांचें सांत्वन केलें. नलाचा हस्तस्पर्श होतांच ते चारी अश्व तेज व बल यांनीं युक्त झाले. तेव्हां त्या वीरानें रज्जु ओढून त्यांना वर उठविलें व वार्ष्णेय सूताला समीप बसवून तो मोठ्या वेगानें निघाला.

( ४ ) बाहुकानें यथाविधि प्रेरणा करितांच ते उत्तम अश्व रथस्थ राजाला मोहित करीत, वायुवेगानें जणु काय आकाशांतूनच उड्डाण करीत चालले. आपल्या रथाचे अश्व वायुवेगानें मार्ग आक्रमीत आहेत असें पाहून श्रीमान् अयोध्यापति अतिशय विस्मित झाला. रथाचा घोष ऐकून व बाहुकानें केलेलें त्यांचें नियमन पाहून वार्ष्णेय सारथी त्याच्या अश्वज्ञतेविषयीं असा विचार करूं लागला—

"हा इंद्राचा सारथि मातलि तर नव्हे ना! कारण या बाहुकाच्या ठिकाणीं देवसारथ्याचें श्रेष्ठ लक्षण दिसत आहे. अथवा हा पुरुष अश्वशास्त्रप्रणेता शालिहोत्र आचार्य तर नसेल! अश्वांची जाति व सामर्थ्य जाणणारा तो मुनि कांहीं कारणानें अशा या रम्य मानुष शरीरास प्राप्त झाला असेल! कीं हा शत्रुनाशक उदार नलराजाच येथें आला आहे! कारण नलाला अवगत असलेली विद्या हा बाहुकहि जाणत आहे. बाहुकाचें व नलाचें ज्ञान मला एकसारखेंच दिसतें. शिवाय वयानेंहि हा नलाएवढाच दिसतो.

अथवा हा महावीर्यवान् नल नसून. त्याची विद्या जाणणारा दुसरा कोणी महात्मा असेल. किंवा कदाचित् नलहि असूं शकेल. कारण पुष्कळ महात्मे दैववशात् असें वेशांतर करून या भूलोकीं संचार करीत असतात.

आतां याचें स्वरूप नलासारखें नाहीं. नलराजापेक्षां हा ठेंगु आहे. तथापि हा नल नाहीं, असें मात्र मला वाटत नाहीं. वयाचें प्रमाण सारखेंच आहे. स्वरूपांत मात्र फरक पडला आहे. यास्तव हा बाहुक सर्वगुणसंपन्न नलराजाच असावा, असें मला वाटतें."

राजा, ऋतुपर्णाच्या त्या वार्ष्णेय-सारथ्यानें पुण्य-श्लोक नलराजाचें अश्वविद्येंतील कौशल्य पाहून मनांत असा पुष्कळ विचार केला. ऋतुपर्ण राजेंद्रानेंहि बाहुकाची ती अश्वविद्या पाहून आनंद व्यक्त केला आणि तो वार्ष्णेय सारथ्यासह प्रसन्न झाला.

नलराजाच्या चित्ताचें ऐकाग्र्य, उत्साह, अश्वांचें नियमन व श्रेष्ठ यत्न हीं सर्व साक्षात् पाहून ऋतुपर्णाला परम संतोष वाटला. ३. ६. ७१.

---

## अध्याय ७२ वा.

[१ ऋतुपर्णराजासह नलाचें कुंडिनपुराकडे वेगानें गमन. २ राजाचें गणनाचातुर्य. ३ मार्गांत त्या उभयतांचें परस्परांस विद्यादान. ४ नलशरीरांतून कलीचें निर्गमन. ]

( १ ) बृहद्श्व—राजा, आकाशचर सिद्ध अंतरिक्षांतून जसा संचार करितो, त्याप्रमाणें नलराजा नद्या, पर्वत, वनें व सरोवरें यांचें उल्लंघन करीत वेगानें विदर्भदेशाकडे चालला. ऋतुपर्णाचा रथ वायुवेगानें चालला असतां त्या राजानें आपलें उत्तरीय वस्त्र रथांतून खालीं पडलेलें पाहिलें. तेव्हां तो उदार राजा नलाला मोठ्या स्वरेनें म्हणाला—" बाहुका, रथ क्षणभर थांबीव. या वेगवान् अश्वांना आवरून धर. या वार्ष्णेयाला माझें खालीं पडलेलें उत्तरीय वस्त्र घेऊन येऊं दे."

तें ऐकून नल म्हणाला—हे राजन्, तुझें वस्त्र आतां फार मागें राहिलें. आपण एक योजन म्ह० चार कोस पुढें आलों आहोंत. यास्तव आतां वार्ष्णेयाला तें वस्त्र आणतां येणें शक्य नाहीं.

नल असें बोलत आहे, तोंच ऋतुपर्ण राजाला त्या वनांत मार्गामध्यें एक बेहड्याचा फलयुक्त वृक्ष दिसला. त्याला पाहतांच राजा बाहुकाला सत्वर म्हणाला—“ हे सूता, वस्तूची गणना करण्यांत मी किती समर्थ आहें, तें तूंहि पहा. सर्वांनाच सर्व विद्या अवगत नसतात. या भूलोकीं सर्वज्ञ कोणीच नाहीं. कोणत्याहि पुरुषामध्यें ज्ञानाची पराकाष्ठा केव्हांहि दिसून येत नाहीं.

( २ ) हे बाहुका, या वृक्षावर जीं पानें व फळें आहेत, तीं खालीं पडलेल्या या पानांहून व फळांहून शंभर संख्येनें अधिक आहेत. त्याचप्रमाणें या दोन शाखांवर पांच कोटि पानें आहेत. तुला खरें वाटत नसेल तर तूं या दोन शाखांवरील पानें मोजून पहा. तशीच दुसऱ्या शाखांच्या पानांची गणना करूनहि तूं आपली खात्री करून घे. या दोन शाखांवर दोन हजार पंचाण्णव फळें आहेत.”

ऋतुपर्ण राजाचें हें भाषण ऐकून बाहुकानें रथ थांबवून म्हटलें—हे राजा, जणुकाय मला या शाखांवरील पानांची व फलांची गणना करतां येणार नाहीं, असें समजूनच तूं बोलत आहेस. पण तेवढ्यानें माझी खात्री होत नाहीं. मी आतां या वृक्षाच्या शाखा तोडून तुझ्या समक्ष मोजूनच पहातों. एकदा खात्री करून घेतली, म्हणजे माझ्या मनांत संशय रहाणार नाहीं. मी आतां तुझ्या समक्षच हा वृक्ष तोडून त्याचीं पानें व फळें मोजून पहातों. तोंवर वार्ष्णेयाला अश्वाचे रश्मी धरूं दे.

तेव्हां विदर्भनगरीस जाण्याविषयीं अतिशय उत्सुक झालेला राजा त्याला म्हणाला—“ हे बाहुका, या वेळीं कालक्षेप करणें योग्य नव्हे. तूं पुनः केव्हां-तरी आपली खात्री करून घे. आतां आपण अगोदर कुंडिनपुरास जाऊं या.”

पण बाहुकाला राजाच्या विद्येचें कौतुक वाटत असल्यामुळें तो म्हणाला— “ हे राजन्, घटकाभर धीर धर. तेवढ्या वेळांत मी पानें व फळें मोजतों. किंवा तुला त्वरा असेल तर तूं वार्ष्णेयाला घेऊन जा. विदर्भदेशाचा हा मार्ग तुला सुखावह होवो.”

हे पांडुनंदना, बाहुकाची ही स्पष्टोक्ति ऐकून ऋतुपर्ण म्हणाला—“ बाहुका, या पृथ्वीतलावर तुझ्यासारखा दुसरा सारथि नाहीं. हे अश्वकोविदा, तुझ्याच बळावर मी विदर्भदेशास जाण्याची इच्छा करीत आहें. मी तुला शरण आलों आहें. माझ्या कार्यांत असें विघ्न आणूं नको. सूर्यास्त होण्यापूर्वी जर तूं मला विदर्भदेशास नेऊन पोंचविलेंस तर मी तुझे सर्व मनोरथ पूर्ण करीन.”

तेव्हां बाहुक त्यास म्हणाला—या बेहड्याच्या शाखांवरील पानें व फळें मोजून मी तुला विदर्भ देशांत घेऊन जाईन, तूं स्वस्थ रहा. चिंता करूं नको. तेव्हां ऋतुपर्णराजानें मोठ्या अनिच्छेनें म्हटलें—" ठीक आहे, तूं या शाखेचीं पानें व फळें मोजून पहा. पण मी या शाखेचा जेवढा भाग दाखवीन, त्यांतील पानें व फळें मोजून तूं आपली खात्री करून घे व हे अश्वज्ञा, तूं तेवढ्यानेंच प्रसन्न हो."

राजाची अशी अनुज्ञा मिळतांच बाहुक सत्वर रथांतून खालीं उतरला. त्यानें त्या वृक्षाची एक शाखा तोडिली व तिच्यावरील पानें आणि फळें मोजून पाहिलीं. तेव्हां त्यांची संख्या राजाच्या सांगण्याप्रमाणेंच भरली. तें पाहून तो आश्चर्यचकित झाला व म्हणाला—" राजा, तुझें अद्भुत सामर्थ्य माझ्या प्रत्ययास आलें. तुझ्यापासून ही विद्या मला प्राप्त व्हावी, अशी माझी इच्छा आहे."

त्यावेळीं विदर्भनगरीस जाण्याविषयीं उत्सुक असलेला ऋतुपर्ण त्यास म्हणाला—" हे सूता, मी जसा वस्तूंची गणना करण्यांत निपुण आहें, तसाच अक्षहृदयज्ञहि आहें, असें तूं समज. अक्षाभिमानिनी देवतेला वश करून घेण्याची विद्याहि मला अवगत आहे. त्या विद्येच्या योगानें द्यूतामध्यें फांसे अनुकूल होतात. त्याचप्रमाणें फलें, पुष्पें, धान्य इत्यादिकांच्या राशींची लांबी-रुंदी पाहूनच एका क्षणांत त्यांची संख्या सांगतां येते. या दोन विद्या मजपाशीं आहेत."

( ३ ) तें ऐकून बाहुक त्यास म्हणाला—हे राजा, तुजपाशीं असलेली अक्ष-विद्या मला दे व तूं मजपासून अश्वहृदयाचें ग्रहण कर.

बाहुकाचें हें वचन ऐकून व कार्याचें महत्त्व जाणून अश्वज्ञानाच्या लोभानें ऋतुपर्ण राजा त्यास म्हणाला—" बाहुका, मी तुला श्रेष्ठ अक्षविद्या देतों, तिचें तूं ग्रहण कर व तुझी अश्वविद्या या वेळीं माझी ठेव म्हणून तुजपाशींच असूं दे."

( ४ ) इतकें बोलून ऋतुपर्णानें नलाला अक्षविद्या दिली. त्याबरोबर त्या अक्षहृदयज्ञ नलाच्या शरीरांतून कलि बाहेर पडला. त्यावेळीं तो दुष्ट कलि कर्कोटकाचें तीक्ष्ण विष ओकीत होता.

नलाच्या शरीरांतून बाहेर पडतांच कलीला दमयंतीनें दिलेल्या शापाचा वेगहि शांत झाला. तो मूढ कलि दीर्घकाल नल-शरीरांत राहून दमयंतीच्या

शापानें व कर्कोटकाच्या विषानें सतत क्लेश भोगीत होता व त्यानें राजालाहि दीर्घकाल दुःख दिलें.

युधिष्ठिरा, याप्रमाणें शाप व विष यांपासून मुक्त झालेला कलि नलापुढें स्वरूपानें प्रकट झाला. त्याला पहातांच नैषध नल क्रुद्ध होऊन शाप देऊं लागला.

तेव्हां भीतीनें थरथर कांपणारा कलि हात जोडून त्यास म्हणाला—"हे भूपाला, आपला क्रोध आवरून धर. मी तुला परम कीर्ति देतों. तूं जेव्हां भार्येचा त्याग केलास तेव्हां भर्तृवियोगानें दुःखित व क्रुद्ध झालेल्या त्या इंद्रसेनजननीनें मला शाप दिला. त्यामुळें व कर्कोटक नागाच्या विषानें मी तुझ्या शरीरांत राहून आजपर्यंत क्लेश भोगिले. सर्पाच्या तीव्र विषानें तर माझ्या अंगाचा अहर्निश दाह होत होता. हे राजा, मी तुला शरण आलों आहें. माझें वचन श्रवण कर. या लोकीं जे कोणी मोठ्या श्रद्धेनें तुझें नामस्मरण करतील त्यांना मजपासून केव्हांहि भय प्राप्त होणार नाहीं.

राजा, भयानें विह्वल होऊन शरण आलेल्या मला जर तूं शाप न देशील, तर कलियुगामध्येंहि तुझें स्मरण करणारांना कलिदोष लागणार नाहीं."

कलीनें दीन होऊन अशी प्रार्थना केली असतां उदार नैषधराजानें आपल्या कोपाचें नियमन केलें व भयभीत झालेल्या कलीनें तत्काल त्या बेहड्याचा वृक्षांत प्रवेश केला.

पण नलराजाशीं संभाषण करीत असलेल्या कलीला ऋतुपर्णराजानें किंवा त्याच्या सारथ्यानें पाहिलें नाहीं. त्यानंतर शत्रुनाशक नैषधराजा शोकरहित झाला. त्याच्या शरीरांतील कलि निघून गेला असतां हृष्ट व आपल्या स्वाभाविक तेजानें युक्त झालेला तो वीर पुनः रथारूढ झाला व वेगवान् अश्वांच्या योगानें कुंडिनपुराकडे चालला.

त्या दिवसापासून कलीनें ज्याचा आश्रय केला आहे असा बिभीतक-वृक्षहि अप्रशस्त झाला. राजा, अगोदरच पक्ष्यांप्रमाणें वेगानें धांवत असलेल्या अश्वांना तो वीरसेनपुत्र नल हृष्ट चित्तानें पुनः पुनः प्रेरणा करूं लागला. त्यामुळें ऋतुपर्ण राजा अल्पावधींतच विदर्भदेशीं येऊन पोंचला.

नल त्या बिभीतक-वृक्षापासून दूर निघून गेला असतां कलिहि त्यांतून निघून स्वगृहीं परत गेला. कलीनें दिलेले क्लेश निवृत्त झाल्यामुळें पुण्यश्लोक

नल प्रसन्नचित्त झाला. त्याचें सर्व पूर्व माहात्म्य त्यास पुनः प्राप्त झालें. केवल त्याचें पूर्वस्वरूप मात्र अद्यापि अभिव्यक्त झालें नव्हतें. ३. ६. ७२.

---

## अध्याय ७३ वा.

[ १ ऋतुपर्णाचें विदर्भनगरींत आगमन. २ त्याचा रथनिर्घोष ऐकून दमयंतीचे अनेक विचारतरंग. ३ भीम व ऋतुपर्ण यांची भेट. ४ दमयंतीचें नलाच्या शोधार्थ दासीप्रेषण. ]

( १ ) बृहद्श्व—राजा, त्यानंतर सायंकाळीं राजपुरुषांनीं भीमराजापाशीं येऊन अयोध्येचा सत्य पराक्रमी ऋतुपर्ण राजा आपल्या नगरीस प्राप्त झाला आहे, असें निवेदन केलें. तेव्हां 'त्या राजाला आपल्या राजमंदिरांत मोठ्या आदरानें घेऊन या,' अशी राजाज्ञा होतांच राजभृत्यांनीं त्यास राजगृहीं चलण्याची प्रार्थना केली.

तेव्हां नलसारथि ऋतुपर्ण राजा आपल्या रथघोषानें कुंडिनपुराच्या सर्व दिशा व विदिशा यांस नादित करीत त्या नगरींत शिरला. नलाच्या दोन अपत्यांस वाहून आणणारे नलाचे अश्व तेथेंच होते. त्यांनीं तो रथनिर्घोष ऐकला व ते पूर्वीं नल सन्निध असतांना जसे हृष्ट होत, तसेच अत्यंत संतुष्ट झाले.

वर्षाकालीं गर्जना करणाऱ्या मेघाच्या गंभीर ध्वनीप्रमाणें नलाच्या रथाचा तो अपूर्व घोष दमयंतीच्या कानीं पडला. तेव्हां ती साध्वी आश्चर्यचकित झाली. पूर्वीं नलराजानें अश्वांचें ग्रहण केलें असतां त्याच्या रथाचा घोष जसा ऐकूं येत असे, तसाच हा रथघोष मी आज ऐकत आहें, असें तिला वाटलें.

प्रासादावरील मोर, गजशालेंतील हत्ती व अश्वशालेंतील घोडे यांनींहि तो रथघोष ऐकिला आणि मेघनाद ऐकिल्याप्रमाणें उत्सुक झालेले ते सर्व प्राणी ऊर्ध्वमुख होऊन स्वतः विविध ध्वनि करूं लागले.

( २ ) दमयंती—ज्या अर्थीं सर्व पृथ्वीला व्यापणारा हा रथनिर्घोष माझ्या चित्ताला आल्हाद देत आहे, त्या अर्थीं हा नलराजाच आला आहे. मी आज असंख्य गुणांनीं युक्त असलेल्या त्या वीर राजाला जर न पाहीन, त्याचें तें चंद्रासारखें आल्हादकारक मुख जर माझ्या दृष्टीं न पडेल तर खरोखर मी आपला नाश करून घेईन. मी आज त्या वीराच्या आलिंगनास प्राप्त होऊन सुखावह स्पर्शाचा अनुभव न घेईन तर मी जिवंत राहणार नाहीं.

मेघासारख्या गंभीर ध्वनीनें भाषण करणारा तो नैषध जर मला आज न भेटेल, तर मी प्रदीप्त अग्नींत प्रवेश करीन. मत्त गज व सिंह यांच्यासारखा पराक्रमी नलराज आज जर न येईल, तर मी प्राणत्याग करीन, यांत मुळींच संशय नाहीं.

त्या पुण्यश्लोकानें कधीं अनृत भाषण केलें आहे किंवा कोणाला अपकार केला आहे, किंवा थट्टेनें केलेल्या प्रतिज्ञेचेंहि कधीं उल्लंघन केलें आहे, असें मला आठवत नाहीं. तो राजा समर्थ, क्षमावान्, वीर, दाता व इतर सर्व राजांहून श्रेष्ठ आहे. तो माझा प्रिय पति नैषधाधिप परस्त्रियांशीं क्लीबासारखें वर्तन करितो. त्याच्या या व अशाच दुसऱ्याहि अलौकिक गुणांचें स्मरण करणाऱ्या व अहर्निश तत्परायण झालेल्या माझें हें हृदय शोकानें विदीर्ण होत आहे.

हे भारता, असा विलाप करणारी ती साध्वी जणुं काय देहभान विसरली व त्या पुण्यश्लोकाला पहाण्याच्या इच्छेनें आपल्या मंदिराच्या गच्चीवर चढली. तों राजमंदिराच्या मध्यकक्षेमध्यें येऊन उभा राहिलेला तो रथ तिच्या दृष्टीं पडला आणि वार्ष्णेय व बाहुक यांसह त्यांत बसलेल्या ऋतुपर्ण राजासहि तिनें पाहिलें.

त्यानंतर वार्ष्णेय व बाहुक त्या रथावरून खालीं उतरले. त्यांनीं चारी अश्व सोडून रथाला योग्यस्थानीं ठेविलें. ऋतुपर्ण राजाहि रथांतून खालीं उतरला व पराक्रमी भीमराजाला भेटावयास गेला.

( ३ ) तेव्हां विदर्भाधिपतीनें त्या अयोध्याधिपाचें मोठ्या आदरानें स्वागत केलें. त्याचा मोठा सत्कार केला. पण कुंडिनपुरामध्यें आलेल्या त्या अयोध्याधिपाला तेथें स्वयंवराचें कांहींच चिह्न दिसेना. नगरांत प्रवेश करते वेळीं त्यानें वारंवार सर्वत्र सूक्ष्म निरीक्षण केलें. पण त्याला कोठेंहि समारंभाचें लक्षण आढळलें नाहीं. किंबहुना विदर्भ-राजाची भेट झाल्यावर त्याच्या बोलण्यांतहि स्वयंवराचें नांवदेखील निघालें नाहीं.

भीमराजालाहि स्त्रियांचा हा गुप्त संकेत ठाऊक नसल्यामुळें तोहि विस्मित झाला आणि त्या महाराजानें अकस्मात् आलेल्या ऋतुपर्णाला ‘ हे राजा, तुझें स्वागत असो, तूं अकस्मात् कोणत्या उद्देशानें येथें आला आहेस ! ’ असें विचारिलें. हा नृपति आपल्या कन्येसाठीं आला असेल, अशी त्याची कल्पनाहि होणें शक्य नव्हतें.

सत्यपराक्रमी ऋतुपर्ण-राजास तेथें एकहि राजा किंवा राजपुत्र आलेला दिसला नाहीं. त्याचप्रमाणें स्वयंवराचें नांवहि त्याच्या कानीं पडलें नाहीं. किंवा ब्राह्मणांचा समुदायहि दृष्टीं पडला नाहीं. त्यावरून त्या बुद्धिमान् कोसलाधिपानें 'आपण ऐकलेली स्वयंवर वार्ता सत्य नाहीं' असा मनांत निश्चय करून भीमराजाला म्हटलें—"हे भूपते, मी आपली भेट घेऊन आपल्याला अभिवादन करण्यासाठीं सहज आलों आहें."

ऋतुपर्णाचें हें उत्तर ऐकून भीमराजानें स्मित केलें व 'हा राजा शंभर योजनांहूनहि अधिक दूरचा प्रवास करून कां बरें आला असावा!' असा आपल्याशींच विचार करूं लागला.

'अनेक ग्रामांचें उल्लंघन करून केवल आपल्याला वंदन करण्यासाठीं हा राजा येथें आला असेल, हें संभवत नाहीं. हा आपल्या येण्याचें जें क्षुल्लक कारण सांगत आहे, तें खरें नव्हे. तरी कांहीं चिंता नाहीं. याच्या येण्याचा खरा उद्देश मला मागाहून कळेलच' असा मनांत विचार करून भीमराजानें ऋतुपर्णास बहुमानपूर्वक निरोप दिला व 'हे नृपाला, तूं प्रवासाच्या श्रमानें श्रांत झाला आहेस. यास्तव आतां विश्रांति घे' असें पुनः पुनः म्हटलें.

याप्रमाणें विदर्भराजानें प्रेमपूर्वक सत्कार केल्यामुळें हृष्ट झालेला ऋतुपर्ण राजसेवकांनीं दाखविलेल्या मंदिरांत विश्रांति घेण्यासाठीं गेला. त्याच्या मागोमाग त्याचे सेवकहि गेले.

हे राजन्, इकडे वार्ष्णेयासह ऋतुपर्णराजा रथांतून उतरून गेला असतां बाहुकानें आपला रथ रथशालेंत नेला. तेथें त्यानें अश्वांना सोडून व यथाशास्त्र उपचार करून त्यांचे श्रमपरिहार केले आणि तो स्वतः रथांत येऊन बसला.

(४) तिकडे शोकार्त दमयंतीहि ऋतुपर्ण राजा, सूतपुत्र वार्ष्णेय व तशा विकृतावस्थेंत असलेला बाहुक यांस पाहून मनांत म्हणाली—"ऋतुपर्णराजाबरोबर नैषध नल तर आलेला कोठें दिसत नाहीं. मग मी नलाच्या रथघोषासारखा जो प्रचंड ध्वनि ऐकला तो कोणाच्या रथाचा? कदाचित् नलाचा पूर्वसारथि जो वार्ष्णेय त्यानें नलापासून अश्वविद्या संपादन केली असेल! त्यामुळें नलाच्या रथध्वनीसारखा त्यानें चालविलेल्या या रथाचा प्रचंड निर्घोष मला ऐकूं आला!! किंवा ज्या अर्थीं या रथाचा ध्वनि नलाच्या रथासारखाच ऐकूं येत आहे, त्या अर्थीं ऋतुपर्णराजाहि नलाप्रमाणेंच अश्वविद्या जाणत असेल!!!"

युधिष्ठिरा, असा पुष्कळ विचार करूत दमयंतीनें आपली एक चतुर दासी नलाचा शोध करण्यासाठीं बाहुकाकडे पाठविली. ३. ६. ७३.

---

## अध्याय ७४ वा.

[ १ दमयंतीची केशिनीस बाहुकाचा वृत्तान्त समजून घेण्याची आज्ञा. २ बाहुक व केशिनी यांचा संवाद. ]

( १ ) **दमयंती**—हे केशिनि, हा जो आखुड बाहूंचा कुरूप सारथि ऋतुपर्णराजाच्या रथावर बसला आहे, त्याच्याजवळ जा व हा कोण आहे, हें तूं समजून घे.

तूं नम्रपणें त्याच्या समीप जाऊन मधुर शब्दांनीं त्याचें कुशल विचार व हे भद्रे, त्या अद्भुत पुरुषापासून त्याचा खरा वृत्तांत ऐकून घे. कारण पर्णाद-ब्राह्मणानें अयोध्यानगरींत त्याच्या प्रश्नाला उत्तर देणाऱ्या पुरुषाचें जसें वर्णन केलें, तसाच हा दिसत आहे. शिवाय हा येथें आल्यापासून माझ्या मनाला परम आह्लाद वाटत आहे व माझें अंतःकरण निश्चिंत झालें आहे. त्यावरून हा नलराजाच असावा असें मला वारंवार वाटतें.

त्यानें आपला वृत्तांत सांगितला म्हणजे तूं पर्णादाचें वचन त्याला कथन कर व त्यावर तो काय बोलतो, तें लक्षपूर्वक ऐकून घे.

तेव्हां दमयंतीची ती आज्ञा ऐकून केशिनी नम्रपणें बाहुकापाशीं गेली व त्याच्याशीं भाषण करूं लागली. दमयंतीहि गच्चीवरून त्यांच्याकडे पहात उभी राहिली.

( २ ) **केशिनी**—हे नरश्रेष्ठा, तुझें स्वागत असो. कुशल आहे ना ? हे वीरा, दमयंतीचें हें वचन तूं लक्ष देऊन ऐक. तुम्ही अयोध्येहून कधीं निघालां व येथें कां आलां ! तें मला सत्य सांग. कारण ती साध्वी दमयंती तुमचा वृत्तान्त माझ्या तोंडून ऐकण्याची इच्छा करीत आहे.

**बाहुक**—हे भद्रे, महात्म्या कोशलराजानें एका ब्राह्मणाच्या मुखानें ‘ उद्यां दमयंतीचा द्वितीय स्वयंवर व्हावयाचा आहे ’ असें ऐकलें. तें ऐकतांच तो ऋतुपर्णराजा एका दिवसांत शंभर योजनें चालणाऱ्या व वायुतुल्य वेगवान् चार अश्व जोडलेल्या रथांत बसून आजच येथें यावयास निघाला. मी त्याचा सारथि आहें.

केशिनी—हे शूरा, तुमच्या बरोबर आलेला हा तिसरा मनुष्य कोण आहे? तो कोठून आला? तूं कोणाचा कोण आहेस आणि हें सारथ्य कर्म तुला कसें प्राप्त झालें?

बाहुक—हे कल्याणि, आमच्याबरोबर आलेला तो पुरुष वार्ष्णेय-नामक नलसारथि आहे. तो पुण्यश्लोकराजा वनांत निघून गेला असतां वार्ष्णेय ऋतुपर्णाच्या आश्रयाला राहिला. मींहि अश्वविद्याकुशल असून सारथ्यकर्मांत प्रावीण्य मिळविलें आहे. शिवाय मी पाकसिद्धि करण्यांतहि निष्णात आहें. ऋतुपर्णराजानें स्वतःचें सारथ्य व पाकसिद्धि या दोन कार्यांकडे माझी योजना केली आहे.

केशिनी—हे बाहुका, नलराजा कोठें गेला आहे हें वार्ष्णेयाला माहित आहे काय! पण त्याला जरी ठाऊक असलें तरी तो तें तुला कशाला सांगेल!

बाहुक—सदाचरणी नलाच्या अपत्यांस येथेंच ठेवून वार्ष्णेय इष्ट प्रदेशीं निघून गेला. त्यामुळें त्याला नैषधाची कांहींच माहिती नाहीं. हे यशस्विनि, या लोकीं अन्य कोणाहि पुरुषाला नलाची वार्ता अवगत नाहीं. कारण नैषधराजाचें पूर्व स्वरूप नष्ट झालें असून तो गुप्तपणें कोठें तरी हिंडत आहे. नलाची वार्ता एकट्या नलालाच ठाऊक आहे, किंवा त्याच्याशीं एकरूप असलेल्या त्याच्या भार्येला माहित आहे. त्या उभयतांवांचून अन्य कोणीहि नलाला ओळखीत नाहीं. कारण तो नैषध आपलें कोणतेंच लक्षण इतरांस सांगत नसतो.

केशिनी—हे श्रेष्ठा, जो ब्राह्मण 'हे कितवा०' इत्यादि पूर्वोक्त (अ. ६९ पृ. १४५.) स्त्रीवाक्यें जनसमूहांत पुनः पुनः सांगत प्रथम अयोध्येंत गेला होता, त्याला तूं कोणतें प्रतिवचन दिलेंस तें मला सांग. हे महामते, वैदर्भी तेंच वाक्य पुनः ऐकण्याची इच्छा करीत आहे.

बृहदश्व—हे कुरुनंदना, केशिनीनें नलाला असें सांगितलें असतां त्याचें हृदय शोकाकुल झालें व नेत्र अश्रूंनीं भरून आले. पण त्या सहिष्णु राजानें आपल्या दुःखाचें नियमन करून सद्गदित कंठानें 'हे विप्रश्रेष्ठा, ज्या कुलस्त्रिया विपत्कालींहि आपलें संरक्षण करितात, त्या स्वतःच स्वतःचा उद्धार करून स्वर्ग जिंकतात०' इत्यादि पूर्वोक्त (अ. ७०. पृ. १४७.) प्रत्युत्तराचाच अनुवाद केला.

पण तो अतिशय खिन्न झालेला राजा पूर्वोक्त वचनाचा अनुवाद करीत असतां त्याचा कंठ दाटून आला. तो आपल्या अश्रूंचें नियमन करूं शकला नाहीं. त्यामुळें शेवटीं ढळढळां रडूं लागला.

तें पाहून केशिनी दमयंतीकडे परत आली व तिनें त्याचा सर्व वृत्तान्त व त्याची ती दुःखावस्था तिला निवेदन केली. ३. ६. ७४.

---

## अध्याय ७५ वा.

[ १ केशीनीच्या द्वारा दमयंतीनें केलेलें बाहुकाचें परीक्षण. ]

( १ ) बृहदश्व—राजा, दासीनें सांगितलेला तो वृत्तान्त ऐकून अतिशय शोकविह्वल झालेली दमयंती 'हा नलच असावा' या शंकेनें केशिनीला म्हणाली—"हे केशिनि, तूं पुनः जा आणि बाहुकाची परीक्षा कर. तेथें कांहीं एक न बोलतां स्वस्थ उभी रहा व त्याच्या सर्व हालचालींचें सूक्ष्म निरीक्षण कर. तो जें कांहीं कार्य करील तें लक्षपूर्वक अवलोकन करून त्यांतील त्याचा आशयहि ओळख.

हे दासि, तो बाहुक तुजपाशीं अग्नि मागूं लागेल, पण तूं तो तत्काल देऊं नको. तसेंच तो जलहि मागेल. तेंहि तूं लगेच देऊं नको. कालक्षेप कर व तो काय करतो तें मला येऊन सांग. तूं त्या सारथ्याचीं लौकिक व अलौकिक चिह्नें पूर्वींच पाहिलीं आहेस. तशींच दुसरींहि जीं लक्षणें पहाशील तींहि मला कथन कर."

दमयंतीची ही आज्ञा ऐकून केशिनी पुनः बाहुकाकडे गेली आणि त्या अश्वहृदयज्ञ बाहुकाचीं सर्व चिह्नें पाहून परत आली व तिनें सर्व वृत्तान्त दमयंतीला निवेदन केला. तिनें बाहुकामध्यें श्रेष्ठ प्रतीच्या मानवाचीं सर्व चिह्नें पाहिलीं.

ती म्हणाली—हे राजकन्ये, हा बाहुक फार पवित्र आहे, याचा आचार अतिशय शुद्ध आहे, याच्यासारखा पुरुष मीं या पूर्वीं कधींहि पाहिला नव्हता. एखाद्या लहान द्वारापाशीं आल्यावरहि तो वांकत नाहीं. तर तें द्वारच उंच होतें व तो त्यांतून सुखानें प्रवेश करितो. हा जवळ आला असतां भूमीचा संकुचित प्रदेशहि विस्तीर्ण होतो.



बाहुकरूपी नलराजाची त्याच्या अपत्यांशीं भेट. [ पृष्ठ १६०

भीमराजान ऋतुपर्णाच्या भोजनासाठीं त्याच्याकडे विविध भक्ष्य पदार्थ व पशूंचें विपुल मांस पाठविलें. तें धुवून स्वच्छ करण्यासाठीं तेथें जलरहित अनेक कलश ठेविले होते. पण नलानें त्यांकडे पहातांच ते जलपूर्ण झाले. तेव्हां राजाकडून आलेलें सर्व साहित्य स्वच्छ करून व तें पात्रांत घालून त्यानें चुलीवर ठेविलें आणि हातांत थोडेंसें तृण घेऊन तें सूर्याच्या समोर धरिलें. त्याबरोबर एकाएकीं अग्नि प्रज्वलित झाला. तें पाहून मला फारच विस्मय वाटला.

हे राजनंदिनि, मीं तेथें आणखींहि एक आश्चर्य पाहिलें. त्यानें अग्नीला स्पर्श जरी केला, तरी तो अग्नि त्याला जाळीत नाहीं. त्याच्या इच्छेप्रमाणें उदक त्याच्या समीप येतें. हे दमयंति, मीं यांहूनहि एक विलक्षण आश्चर्य पाहिलें, तेंहि तुला सांगतें ऐक.

त्या बाहुकानें उपवनांतील ताजीं पुष्पें आपल्या हातांत घेऊन तीं चुरगळलीं व भूमीवर फेंकून दिलीं. पण तीं पूर्वींपेक्षांहि अधिक टवटवीत व अधिक सुगंधयुक्त झालीं. हे स्वामिनि, यावरून भूमि, आप, तेज व वायु हीं चारी भूतें त्याला अनुकूल आहेत असें दिसतें. अशीं हीं अद्भुत चिह्नं पाहून तीं तुला सांगण्यासाठीं मी सत्वर येथें आलें.

राजा युधिष्ठिरा, केशिनीनें सांगितलेला पुण्यश्लोकाचा हा वृत्तांत ऐकून त्याचें स्वयंपाकादि कर्म व भूतजयादि चेष्टा यांवरून दमयंती ‘ हा नलराजाच आहे ’ असें समजली. तथापि त्याची कुरूपता पाहून आपल्या भर्त्याविषयीं तिला पुनः संशय आला.

म्हणून त्या साध्वीनें केशिनीला पुनः हांक मारून सद्गदित व मधुर स्वरानें म्हटलें—“ हे केशिनि, तूं आणखीं एकदा बाहुकाकडे जा व त्याचें स्वयंपाका-कडे लक्ष नाहीं असें पाहून त्यानें शिजवून ठेविलेल्या मांसांतील थोडेंसें मांस घेऊन ये.”

तें ऐकून केशिनी पुनः बाहुकाकडे गेली व तो दुसऱ्याच कार्यांत व्यग्र आहे, असें पाहून स्वयंपाक-घरांत शिजवून ठेवलेल्या मांसांतील ऊन ऊन मांस घेऊन ती सत्वर परत आली व दमयंतीचें प्रिय करणाऱ्या त्या दासीनें तें तिच्या हातीं दिलें.

नलानें सिद्ध केलेल्या मांसाची चव दमयंतीच्या चांगल्याच परिचयाची होती. तिनें पूर्वीं अनेकदा त्याचा आस्वाद घेतला होता. त्यामुळें तें मांस भक्षण करतांच ‘ हा ऋतुपर्णाचा सारथि नलराजाच आहे. ’ असें जाणून ती राजकुमारी अतिशय दुःखी झाली व मोठ्यानें आक्रोश करूं लागली. ती अतिशय विकल

झाली. तथापि त्या साध्वीनें थोडें धैर्य धरून मुखप्रक्षालन केलें व केशिनी-बरोबर आपल्या दोन्ही अपत्यांस बाहुकाकडे पाठविलें.

तेव्हां त्या वीरानें भ्रात्यासह आलेल्या इंद्रसेनेला ओळखलें व तो सत्वर त्यांच्यापाशीं गेला. त्यानें त्यांना आलिंगन देऊन आपल्या अंकावर बसविलें. देवकुमारांसारख्या त्या अपत्यांना पाहून बाहुकाचें अंतःकरण दुःखाकुल झालें व तो उच्च स्वरानें रोदन करूं लागला.

परंतु आपली ही शोकाकुल अवस्था केशिनीच्या लक्षांत येईल हें जाणून त्यानें तत्काल त्या बालकांना आपल्या मांडीवरून खालीं उतरवून केशिनीला म्हटलें—" हे भद्रे, हीं दोन अपत्यें माझ्या बालकांसारखींच आहेत. त्यामुळें यांना पहातांच मला माझ्या पुत्रांचें स्मरण होऊन नेत्र दुःखाश्रूंनीं भरून आले. आतां तूं यांना घेऊन परत जा व पुनः मजकडे येऊं नको. कारण तूं वारंवार मजकडे येत आहेस, असें पाहून लोक भलतीच शका घेतील व आम्ही तर परदेशी आहों. यास्तव हे भद्रे, तूं सत्वर येथून जा." ३. ६. ७५.

---

## अध्याय ७६ वा.

[ १ अनेक कारणांनीं बाहुक नलच आहे, अस समजून दमयंतीनें मातेच्या द्वारा भीमराजापाशीं त्याला भेटण्याविषयीं मागितलेली अनुज्ञा. २ नल व दमयंती यांचा संवाद. ३ दमयंतीचें प्रतिज्ञापूर्वक निर्दोषत्व. ४ त्या पति-पत्नींचा समागम. ]

( १ ) बृहदश्व—हे पांडवा, पुण्यश्लोक नलाचा तो सर्व चित्तविकार पाहून केशिनी दमयंतीकडे परत आली व तिनें तो सर्व वृत्तान्त तिला निवेदन केला. तेव्हां दुःखानें आर्त झालेल्या दमयंतीनें नलाच्या प्रत्यक्ष दर्शनाच्या इच्छेनें केशिनीला आपल्या जननीकडे पाठविलें. ती भीमपत्नी आल्यावर दमयंती तिला म्हणाली—" हे माते, ऋतुपर्ण-राजाबरोबर आलेला हा बाहुक-सारथि नलराजाच असावा, अशा शंकेनें मी त्याची अनेक प्रकारें परीक्षा केली. त्यावरून हा निषधाधिप नलच आहे अशी माझी खात्री झाली आहे. तथापि त्याच्या या कुरूपतेविषयीं मला अद्यापि संशय आहे व त्याच्या निवृत्तीसाठीं मला स्वतःच त्याला भेटलें पाहिजे. यास्तव तुम्हां सर्वांसमक्ष किंवा तुमच्या परोक्ष त्याला तरी येथें येऊं द्या, किंवा मला तरी तेथें जाण्याची अनुज्ञा द्या. तूं माझ्या पित्याच्या संमतीनें काय करावयाचें तें ठरीव व मला सांग."

वैदर्भीचें हें भाषण ऐकून तिची जननी भीमराजाकडे गेली व तिनें आपल्या कन्येचा आशय त्याला निवेदन केला. तेव्हां राजानेंहि बाहुकाला दमयंतीच्या मंदिरांत आणण्याची अनुज्ञा दिली.

( २ ) याप्रमाण पिता व माता यांनीं अनुज्ञा दिली असतां, त्या साध्वीनें नलाला आपल्या मंदिरांत आणविलें. तेथें त्या दीन दमयंतीला अकस्मात् पाहून राजा दुःख व शोक यांनीं व्याकुल झाला. त्याचें सर्व अंग अश्रूंनीं भिजून गेलें. राजाची ही दीन दशा पाहून दमयंतीचें हृदय शोकानें विदीर्ण झालें.

त्यावेळीं तिनें काषायवस्त्र परिधान केलें होतें. तिच्या केसांच्या जटा झाल्या असून तिचें अंगहि मलिन झालें होतें. तथापि हे महाराज, ती साध्वी मोठ्या धैर्यानें बाहुकास म्हणाली—" हे बाहुका, ज्यानें घोर अरण्यांत शयन करीत असलेल्या आपल्या निरपराध प्रिय भार्येचा त्याग केला आहे, असा धर्मज्ञ पुरुष तूं कोठें पाहिला आहेस का ? निर्जन अरण्यांत श्रांत झाल्यामुळें गाढ झोंपीं गेलेल्या आपल्या धर्मपत्नीला तेथेंच सोडून पुण्यश्लोक नलराजावांचून दुसरा कोण बरें निघून जाईल ! निद्रावश झालेल्या मला अरण्यांत सोडून जो निघून गेला त्या महिपतीचा मीं बाल्यापासून कोणता बरें अपराध केला होता ! मीं पूर्वीं साक्षात् देवांचाहि त्याग करून ज्याला वरिलें, ज्याच्याशीं मी सर्वदा अनुकूल वागत असें, ज्याच्या सहवासाची मला तीव्र इच्छा आहे व ज्याच्यापासून मला दोन अपत्येंहि झालीं त्या सत्यप्रतिज्ञ राजानें माझा त्याग कसा केला ?

देव, ब्राह्मण व अग्नि यांच्यासमोर माझें पाणिग्रहण करून त्यानें 'धर्मे च अर्थे च कामे च नातिचरामि' अशी जी सत्यप्रतिज्ञा केली, ती मिथ्या कशी झाली !"

हे कुंतीपुत्रा, दमयंती बोलत असतांना तिच्या दोन्ही नेत्रांतून एकसारख्या अश्रुधारा वहात होत्या. त्या मृगनयनेच्या आरक्त नेत्रांतून वहात असलेला तो अश्रुप्रवाह पाहून नलराजाचें मन द्रवलें.

शोकाकुल झालेल्या तिला तो पुण्यश्लोक राजा म्हणाला—हे भीरु, माझें राज्य जें नष्ट झालें व मीं जो तुझा त्याग केला, तें सर्व मीं स्वतः केलेलें नसून कलीनें मजकडून करविलें. हे दमयंति, तूं वनामध्यें दुःखित होऊन माझ्यासाठीं अहोरात्र शोक करीत असतांना त्या धर्मसंकटप्रसंगीं कलीला

पूर्वी जो शाप दिला होतास त्याच्या प्रभावानें सतत दग्ध होणारा तो कलि माझ्या शरीरांत आजपर्यंत राहिला होता. अग्नीमध्यें स्थापिलेल्या अग्नीप्रमाणेंच तुझ्या शापानें सतत दग्ध होणाऱ्या त्या कलीला मीं आपल्या धर्म्य निश्चयानें व तपानें जिंकिलें आहे.

हे शुभे, आतां आपल्या या सर्व दुःखाचा अंत होईल. तो दुष्ट कलि आतां माझ्या शरीराला सोडून निघून गेला आहे व त्यानंतर मी केवळ तुझ्यासाठींच येथें आलों आहें. ऋतुपर्णराजाला येथें घेऊन येण्यांत माझें दुसरें कांहींच प्रयोजन नाहीं.

( ३ ) पण हे दमयंति, आपल्या भर्त्यावर अनुरक्त असलेली तुजवांचून दुसरी कोणती बरें स्त्री अन्य पतीला वरील ! भीमराजाच्या आज्ञेनें त्याचे दूत 'भीमकन्या अन्य पतीला वरणार आहे, स्वैर वर्तन करणारी ती आपल्याला अनुरूप अशा अन्य पतीला स्वेच्छेनें वरणार आहे' असा घोष करीत पृथ्वीभर फिरत आहेत. ही वार्ता ऐकूनच हा ऋतुपर्ण राजाहि येथें आला आहे.

नलाचें हें शोकयुक्त वचन ऐकून दमयंती भयभीत झाली. तिची देहयष्टि थरथर कांपू लागली व ती हात जोडून म्हणाली—"प्रभो, मी या दोषानें दूषित झालें आहें, असें आपण मनांतहि आणूं नये. मीं पूर्वी साक्षात् देवांना सोडून आपल्याला जें वरलें तें यासाठींच कीं काय ?

वस्तुतः माझींच वाक्यें गाथारूपानें गाणारे ब्राह्मण आपणांस शोधण्यासाठीं दश-दिशांमध्यें गेले होते. त्यांतील 'पर्णाद'-नांवाच्या एका विद्वान् ब्राह्मणानें कोसलदेशांतील ऋतुपर्ण राजाच्या मंदिरांत आपल्याला पाहिलें. त्या ब्राह्मणानें मीं सांगितलेली गाथा तेथें म्हटली व आपणहि त्याला अनुरूप उत्तर दिलें. तें ऐकून हे नैषधा, मीं आपल्या आगमनासाठींच हा उपाय योजिला. हे नराधिपा, अश्वांच्या वहानांतून एका दिवसांत शंभर योजनें गमन करण्यास तुजवांचून दुसरा कोणताहि पुरुष समर्थ नाहीं, हें मी पूर्णपणें जाणतें. मीं कधींहि मनानें सुद्धां असदाचरण केलेलें नाहीं. हें तुझ्या चरणद्वयांना स्पर्श करून प्रतिज्ञेवर सांगतें.

हा भूतसाक्षी वायु या लोकीं सतत संचार करीत आहे. मीं जर मनानेंहि कधीं कांहीं पाप केलें असेल, तर तो अनिल माझ्या प्राणांचा नाश करो. त्याचप्रमाणें हा तीक्ष्ण किरणांनीं युक्त असलेला सूर्य सर्वदा या भवनाला

प्रकाशित करीत अंतरिक्षांतून सदा संचार करीत असतो. मीं मनानेंहि जर कधीं व्यभिचार केला असेल, तर तो माझ्या जीविताचें हरण करो. हा चंद्रमा सर्व प्राण्यांच्या चित्ताची अभिमानिनी देवता आहे. तो साक्षीप्रमाणें सर्व भूतांच्या अंतःकरणांत संचार करीत असतो. मीं जर कांहीं पापाचरण केलें असेल तर तो याच क्षणीं माझें आयुष्य क्षीण करो.

या तीन देवता सर्व त्रैलोक्याला धारण करितात. तेव्हां मी जें बोलत आहें, तें सत्य आहे किंवा नाहीं तें त्याच सांगोत व मी जर असत्य भाषण करीत असेन तर त्या माझा त्याग करोत."

युधिष्ठिरा, दमयंतीनें अशी सत्य प्रतिज्ञा केली असतां वायु अंतरिक्षांतून म्हणाला—"हे नला, या साध्वीनें यत्किंचित्‌हि पाप केलें नाहीं, हें मी तुला सत्य सांगतों. हे राजन्, दमयंतीचा विपुल शीलनिधि सुरक्षित आहे. आम्ही आज तीन वर्षें तिचे साक्षी व रक्षक आहों. या पतिव्रतेनें तुजसाठींच हा अनुपम उपाय योजिला. कारण तुजवांचून दुसरा कोणताहि पुरुष एका दिवसांत शंभर योजनें रथ नेण्यास समर्थ नाहीं. हे भूपाला, भैमीला तूं व तुला भैमीच अनुरूप आहे, यास्तव तूं या साध्वीविषयीं मनांत कांहीं एक शंका न आणतां तिचा स्वीकार कर."

हे पांडुपुत्रा, वायु असें बोलत असतां अंतरिक्षांतून पुष्पवृष्टि झाली, देव दुंदुभि वाजूं लागल्या व सुखावह वायु वाहूं लागला.

(४) हा सर्व चमत्कार पाहून नलराजा दमयंतीविषयीं निःशंक झाला. त्यानें त्या साध्वीला आपल्या जवळ घेतलें आणि आपल्या मूळ स्वरूपाच्या प्राप्तीसाठीं कर्कोटक नागराजाचें स्मरण करून त्यानें दिलेलें वस्त्र परिधान केलें. त्याबरोबर त्याला त्याचें मूळ स्वरूप प्राप्त झालें.

तेव्हां आपल्या भर्त्याला मूळ स्वरूपांत पाहून निष्पाप भीमकन्या पुण्यश्लोक नलाला आलिंगन देऊन उच्चस्वरानें रोदन करूं लागली. त्या वेळीं पूर्वीप्रमाणें शोभणाऱ्या नलराजानेंहि आपल्या प्रिय पत्नीला व अपत्यांना आलिंगन देऊन त्यांचें अभिनंदन केलें.

नंतर ती शुभानना प्रिय पतीच्या वक्षःस्थलावर मस्तक ठेवून दुःखानें निश्वास टाकूं लागली. दमयंतीनें पतिविरहामुळें अभ्यंगस्नानादि वर्ज केलें होतें. त्यायोगें तिची अंगकांति मलीन झाली होती. अशा त्या दुःखाकुल झालेल्या

आपल्या राज्ञीला आलिंगून तो नराधिपहि बराच वेळ शोकाकुल होऊन स्तब्ध राहिला.

त्यानंतर हे पांडवा, वैदर्भीच्या जननीनें हा नल-दमयंतीचा सर्व सविस्तर वृत्तान्त मोठ्या संतोषानें भीमराजाच्या कानीं घातला. त्यावेळीं तो महाराज म्हणाला—"उद्यां प्रभातीं नलानें स्नान-संध्या-वंदनादि आह्निक उरकल्या-नंतर दमयंतीसह मी मोठ्या प्रेमानें त्यास भेटेन. आतां त्या उभयतांना विश्रांति घेऊं दे." तेव्हां नल व दमयंती या उभयतांनीं परस्परांस वनांतील सर्व वृत्तान्त सांगत ती रात्र मोठ्या आनंदांत घालविली. याप्रमाणें परस्परांच्या सुखाची इच्छा करणारीं तीं दोघें हृष्टचित्तानें भीमराजाच्या मंदिरांत राहिलीं.

हे धर्मराजा, अशाप्रकारें चवथ्या वर्षीं प्रिय पत्नीची भेट झाल्यामुळें नल-राजा कृतार्थ होऊन परम संतुष्ट झाला. अर्धेंच तृण उगवलेली भूमि जशी जलप्राप्तीनें शोभूं लागते, तशी नलाच्या दर्शनानें दमयंती प्रसन्न झाली.

पतीच्या भेटीनें तिचे क्लेश दूर झाले. तिचा मनःसंताप शांत झाला. तिचें अंतःकरण आनंदानें भरून आलें आणि सर्व कामना पूर्ण झालेली ती भैमी उदय पावलेल्या चंद्राच्या योगानें शोभणाऱ्या रजनीप्रमाणें अतिशय शोभली. ३. ६. ७६.

---

## अध्याय ७७ वा.

[ १ भीमराजानें नलाचा केलेला सत्कार. २ विदर्भनगरींतील आनंदोत्सव. ३ ऋतुपर्ण राजानें केलेलें नलाचें अभिनंदन व स्वनगरीं गमन.]

( १ ) बृहदश्व—हे पांडुतनया, याप्रमाणें नलानें ती रात्र दमयंतीसह मोठ्या आनंदांत घालविली आणि दुसऱ्या दिवशीं प्रभातकालीं तो नैषधराज उत्तम अलंकारांनीं भूषित होऊन वैदर्भीसह भीमराजाच्या दर्शनास गेला. त्या वेळीं नलराजानें श्वशुरास प्रथम नम्रपणें नमस्कार केला, त्याच्या मागून सुलक्षणी दमयंतीनें पित्याला वंदन केलें.

तेव्हां भीमराजानें मोठ्या प्रेमानें नलाला पुत्राप्रमाणें जवळ घेतलें. तेथें असलेल्या पतिव्रता दमयंतीसह त्याचा यथाविधि सत्कार करून त्या उभयतांचें समाधान केलें. नलराजानेंहि त्या सत्काराचा यथायोग्य स्वीकार करून श्वशु-राची मोठ्या आदरानें शुश्रूषा केली.

( २ ) राजा, त्या समयीं नलराजाचें अशाप्रकारें आगमन झालेलें पाहून त्या विदर्भ नगरींतील प्रजाजनांना मोठा हर्ष झाला. आनंदाच्या जयघोषांनीं सर्व कुंडिनपुर दुमदुमून गेलें. भीमराजाची राजधानी ध्वज-पताकांनीं शोभूं लागली. पौरजनांनीं राजमार्गावर सुवासिक जलाचा व सुगंधित पुष्पांचा सडा घालून दारोदार गुढ्या-तोरणें उभारिलीं.

नगरवासी जनांनीं आपल्या द्वारांत अनेकप्रकारच्या पुष्परचना करून रांगोळ्या काढल्या आणि सर्व देवालयांतून उत्तम पूजा बांधून उत्सव केले.

( ३ ) तिकडे ऋतुपर्णराजाला 'आपल्यापाशीं नलराजाच बाहुकाच्या गुप्त-वेषानें राहिला होता व आतां त्याची दमयंतीशीं भेट झाली आहे.' ही वार्ता कळली, तेव्हां त्याला अतिशय आह्लाद झाला व त्यानें नलराजाला बोलावून त्याची क्षमा मागितली.

पुण्यश्लोक नलराजानेंहि ऋतुपर्णाची अनेक कारणास्तव क्षमा मागून त्याचा सन्मान केला. तेव्हां विस्मित झालेला ऋतुपण म्हणाला—"हे नैषधा, तुझी तुझ्या प्रिय भार्येशीं भेट झाली; हें फार चांगलें झालें. मी तुझें अभिनंदन करितों. हे नलराजा, तूं माझ्या गृहीं अज्ञातवासांत असतांना माझ्या हातून तुझा कांहीं अपराध तर घडला नाहींना! मजकडून बुद्धिपूर्वक किंवा अबुद्धिपुरःसर तुझ्याशीं जर कांहीं अयोग्य वर्तन घडलें असेल तर हे नराधिपा, त्याची मला क्षमा कर."

नल—हे पार्थिवा, तूं माझा अल्पहि अपराध केलेला नाहींस आणि जरी कदाचित् केला असतास तरीहि त्याबद्दल क्रुद्ध न होतां मी तुला क्षमा करणेंच उचित आहे. कारण पूर्वींपासून तूं माझा मित्र व आप्तसंबंधीहि आहेस. यास्तव यापुढें आपला मजवरील लोभ अधिक वाढीव. आतां माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले आहेत. तुझ्या घरीं सर्व उत्तमोत्तम इष्ट भोग भोगीत मी सुखानें राहिलों. फार काय पण तुझ्या गृहाप्रमाणें मी स्वगृहींहि सुख भोगिलें नाहीं. यास्तव तुझी मजपाशीं ठेव म्हणून असलेली ही अश्वविद्या तुला परत देण्याची माझी इच्छा आहे.

असें म्हणून नलराजानें ऋतुपर्णराजाला ती विद्या अर्पण केली व त्या अयोध्याधिपानें त्या विद्येचें यथाशास्त्र ग्रहण केलें. याप्रमाणें ऋतुपर्णानें नलाकडून अश्वविद्या संपादन केली व नलाला अक्षहृदय दिलें. नंतर तो यशस्वी राजा दुसरा सारथि घेऊन स्वनगरीस निघून गेला.

युधिष्ठिरा, ऋतुपर्ण निघून गेल्यानंतर नलराजा कांहीं काल कुंडिनपुरांत राहिला. ३. ६. ७७.

---

## अध्याय ७८ वा.

[ १ नलराजाचें स्वनगरीस प्रत्यागमन. २ पुष्कराशीं द्यूत, त्याचा पराभव व त्यास प्राणदानपूर्वक राज्यविभागसमर्पण. ]

( १ ) बृहदश्व—हे कौंतेया, त्यानंतर नलराजा एक महिनाभर तेथें राहिला व भीमराजाचा निरोप घेऊन तो निषधदेशास जावयास निघाला. त्या वीरानें आपल्याबरोबर अल्प परिवार घेतला होता. तो उदारचरित राजा सोळा हत्ती, पन्नास अश्व व साठ पायदळ इतकेंच अल्प सैन्य घेऊन एका रथानें निघाला.

तो पुण्यश्लोक नल आपल्या वेगानें सर्व पृथ्वीला कांपवीत विदर्भ देशांत जाऊन पोंचला व क्षुब्ध झालेला तो वीरसेनपुत्र मोठ्या त्वरेनें पुष्करापाशीं येऊन म्हणाला—" हे पुष्करा, मीं पुष्कळ द्रव्य संपादन करून आणिलें आहे. यास्तव आपण पुनः द्यूत खेळूं या. दमयंती व मजपाशीं असलेलें सर्व धन याचा मी पण लावितों आणि तूं राज्याचा पण लाव. पुनः द्यूत खेळण्याचा मीं निश्चय केला आहे.

हे नृपाला, तुझें कल्याण असो. आपण प्राणांचा पण लावूं व द्यूत खेळूं. त्यांत शत्रूचें धन जिंकून किंवा आपलें राज्य व धन हरवून आम्ही एकाच पणानें द्यूत करूं या. कारण असा पण लावणें हाच परम धर्म सांगितलेला आहे आणि तूं जर द्यूताची इच्छा करीत नसशील तर युद्ध कर. आपण द्वैरथ्य युद्ध करूं. त्यांत तुझी तरी शांति होईल किंवा मला तरी मृत्यु येईल.

हे पुष्करा, वंशपरंपरेनें प्राप्त झालेलें राज्य कोणत्या ना कोणत्या तरी उपायानें संपादन करावें अशी वृद्धांची आज्ञा आहे. यास्तव हे राजा, तूं या दोहोंपैकीं कोणतें तरी एक कार्य करण्याचा निश्चय कर. फांसे टाकून द्यूतांत तरी प्रवृत्त हो किंवा धनुष्य सज्य करून युद्धाला उभा रहा."

नैषधाचें हें भाषण ऐकून पुष्कर हंसला व आतां स्वतःचा जय निश्चितच आहे, असें मानून नलराजाला म्हणाला—" हे नैषधा, तूं पणाला लावण्यासाठीं द्रव्यार्जन करून आला आहेस, हें पाहून मला फार आनंद झाला. खरोखर

दमयंतीचें दुर्दैव आतां नष्ट झालें, असेंच मानिलें पाहिजे. हे महाबाहो, तुला आपल्या भार्येसह जिवंत असलेलें पाहून मला अतिशय हर्ष होत आहे. आतां, हे नला, तुझ्यापासून जिंकून घेतलेल्या धनानें मीं त्या वैदर्भीला अलंकृत केलें असतां स्वर्गामध्यें इंद्राजवळ असलेल्या अप्सरेप्रमाणें ती मजपाशीं उभी राहील.

हे नैषधा, मी तुझें नित्य स्मरण करीत होतों व तुझी वाटच पहात होतों. कारण शत्रूंशीं द्यूत खेळण्यांत मला फार संतोष वाटतो; यास्तव त्या सर्वांगसुंदरीला आज द्यूतांत जिंकून मी कृतार्थ होईन. दमयंती माझ्या हृदयांत नित्य वास करीत आहे.

याप्रमाणें असंबद्ध प्रलाप करणाऱ्या पुष्कराचें तें भाषण ऐकून नलराजा क्रुद्ध झाला, रोषानें त्याचे नेत्र लाल झाले व आपल्या खड्गानें त्याचा शिरश्छेद करण्याचेंहि त्यानें मनांत आणिलें. तथापि त्या सहिष्णु नृपानें स्मित करून 'हे वत्सा, व्यर्थ कां बडबड करितोस ! तूं पण लाव. त्यांत मीं तुला जिंकिलें, म्हणजे तूं असें भाषण करणार नाहींस' असें म्हटलें.

( २ ) त्यानंतर त्या उभयतांचें द्यूत सुरू झालें. हे राजा, तुझें कल्याण असो; पुण्यश्लोक नलानें एकाच डावांत पुष्कराला त्याचीं रत्नें, कोश, राज्य व प्राण यांसह जिंकलें व पुनः त्याला हंसत हंसत म्हटलें—"हे पुष्करा, आतां हें सर्व निष्कंटक राज्य माझें झालें. हे अधमा, वैदर्भीचें नखहि तुझ्या दृष्टीं पडणें शक्य नाहीं. अरे मूढा, तूं आपल्या परिवारासह त्या साध्वीचा दास बनला आहेस. तथापि हा पुण्यश्लोक नल आहे, समजलास.

अरे मूढा, पूर्वीं तूं मला जें जिंकलेंस तें स्वसामर्थ्यानें नव्हे, तर कलीनें तें घोर कर्म तुजकडून करविलें. पण तूं तें जाणत नाहींस. मी दुसऱ्याचा दोष तुजवर कधींहि लादणार नाहीं. तूं खुशाल जिवत रहा. मी तुला प्राणदान देतों. त्याचप्रमाणें तुझा सर्व संभार व धनांशहि परत करितों. तुजवर पूर्वीप्रमाणेंच माझी प्रीति राहील. तुझ्यावरील माझा स्नेहहि कमी होणार नाहीं. कारण हे पुष्करा, तूं माझा भ्राता आहेस. तूं शतायु हो."

याप्रमाणें सत्यपराक्रमी नलानें स्वभ्रात्याचें सांत्वन करून व त्याला पुनः पुनः आलिंगन देऊन स्वनगराला जावयास सांगितलें.

राजा, नैषधानें आपल्या शत्रूचेंहि असें सांत्वन केलें असतां पुष्कर त्या पुण्यश्लोकाला अभिवादन करून व हात जोडून म्हणाला—"हे राजा, तूं उदारात्मा आहेस. म्हणूनच मला माझे प्राण व निवासस्थान परत देत आहेस. त्यामुळें या लोकीं तुझी अक्षय्य कीर्ति होईल व तूं येथें दीर्घकाल सुखानें रहाशील."

त्यानंतर राजानें सत्कार केलेला पुष्कर एक महिनाभर तेथें राहिला व आपला परिजन, विपुल सेना व नम्र परिचारक यांसह स्वशरीरानें सूर्याप्रमाणें चमकत मोठ्या आनंदानें स्वनगरास निघून गेला.

याप्रमाणें धनवान् व निरुपद्रव झालेल्या पुष्कराला स्वनगरास पाठवून श्रीमान् नलराजा अतिशय सुशोभित केलेल्या नगरींत प्रविष्ट झाला व त्या निषधाधिपानें सर्व पौरजनांचें सांत्वन केलें.

तेव्हां आपला पूर्व राजा विजयी होऊन स्वस्थानीं पुनः परत आला आहे, असें पाहून त्याच्या नगरांतील व राष्ट्रांतील लोक अतिशय संतुष्ट झाले आणि अमात्यांसह सर्व प्रमुख नागरिक त्यास म्हणाले—"हे प्रभो, या नगरांतील व राष्ट्रांतील सर्व लोक आज परम सुखी झाले आहेत. इंद्राच्या उपासनेसाठीं देव जसे त्याच्या समीप जातात, तसे आम्ही सर्व पौरजन तुझ्यापाशीं प्राप्त झालों आहों." ३. ६. ७८.

---

## अयाय ७९ वा.

[ १ नलाचा अभ्युदय. २ युधिष्ठिराचें आश्वासन. ३ बृहदश्वापासून त्याला अक्षविद्येची प्राप्ति. ४ पार्थाच्या तपश्चर्येचा वृत्तांत ऐकून त्याचा खेद. ]

( १ ) बृहदश्व—हे युधिष्ठिरा, याप्रमाणें पुण्यश्लोकाचें राष्ट्र व नगर त्याच्या आगमनानें हृष्ट होऊन महोत्सवांत प्रवृत्त झालें असतां नलराजानें साध्वी दमयंतीला आपल्या राजधानींत आणण्यासाठीं मोठी सेना पाठविली. तेव्हां महात्म्या भीमराजानेंहि दमयंतीला पतिगृहीं सत्कारपूर्वक पाठविलें.

प्रिय अपत्यांसह वैदर्भी निषधदेशास आली असतां नलराजा परम संतुष्ट झाला व देवराज नंदनवनामध्यें जसा विहार करितो, त्याप्रमाणें तो सत्यप्रतिज्ञ राजा आपल्या पतिपरायण भार्येसह स्वराष्ट्रांत आनंदानें विहार करूं लागला. आपल्या सत्यप्रतिज्ञेनें तो जंबू-द्विपांतील सर्व राजांमध्यें प्रसिद्ध झाला. नष्ट झालेलें राज्य परत मिळवून तो नृपति पूर्वीप्रमाणेंच प्रजेचें पालन करूं लागला. त्यानें विपुल दक्षिणा देऊन स्वपराक्रमानें अनेक यज्ञ केले.

(२) हे राजेंद्रा, नलाप्रमाणेंच तूंहि आपल्या सर्व सुहृदांसह लवकरच सुखी होशील. हे वीरा, दुर्द्यूतामुळें भार्येसह नरश्रेष्ठ नलाला किती दुःख भोगावें लागलें याचा तूं विचार कर. असहाय असलेल्या नलाला असें घोर दुःख प्राप्त झालें असूनहि धर्मशीलतेमुळें त्याचा पुनः मोठा उत्कर्ष झाला. तूं तर आपले सर्व भ्राते व साध्वी कृष्णा, यांसह धर्माचेंच अनुचिंतन करीत या महारण्यांत सुखानें रहात आहेस. वेद व वेदांगें यांत निष्णात असलेले उत्तमोत्तम ब्राह्मण तुझ्या सहवासांत आहेत, तेव्हां तूं अधिक दुःखी कीं नल, याचा तूंच विचार कर.

कर्कोटक नाग, दमयंती, नल व राजर्षि ऋतुपर्ण यांचें नामसंकीर्तन कलीचा नाश करणारें आहे. हे धर्मज्ञा, हें नलचरित्रहि कलिनाशक आहे. हे राजा, हा इतिहास ऐकून तुझ्यासारख्या विपद्ग्रस्त राजाचें समाधान होणें शक्य आहे.

पुरुषार्थ अस्थिर आहे. त्याचें नित्य चिंतन कर, पण त्याची सिद्धि व असिद्धि यांचा विचार करूं नको. हे नृपते, हा इतिहास ऐकून तूं शांतचित्त हो. शोक करूं नको. हे महाराज, या संकटप्रसंगीं असा विषाद करणें तुला योग्य नाहीं.

धीर पुरुष दैव प्रतिकूल व पराक्रम निष्फल झाला असतां चित्ताला खिन्न होऊं देत नाहींत. जे कोणी मानव नलाचें हें शुभचरित्र वारंवार कथन करितात व ऐकतात त्यांना दारिद्र्यदुःख भोगावें लागत नाहीं. सर्व इष्ट अर्थ प्राप्त होतात व ते कृतार्थ होतात. पुत्र-पौत्रादि, पश्वादि व आरोग्यादि सर्व ऐहिक भोग प्राप्त होऊन ते पूर्ण सुखाचा अनुभव घेतात.

हे कौंतेया, 'तो दुष्ट दुर्योधन शकुनीच्या साह्यानें मला द्यूताचें पुनः आह्वान करील' अशी जी तुला, किंबहुना तुम्हां सर्वंच पांडवांना भीति वाटत आहे, ती तुमची भीति मी घालवितों. कारण हे राजा, मी अक्षज्ञ आहें. मी अक्ष-हृदय पूर्णपणें जाणतों. हे पांडुपुत्रा, तूं ती विद्या मजपासून संपादन कर. मी तुजवर प्रसन्न झालों आहें.

(३) वैशंपायन—राजा जनमेजया, बृहदश्वाचें हें सर्व भाषण ऐकून युधिष्ठिर संतुष्ट झाला व 'भगवन्, मीं आपल्यापासून अक्षहृदय तत्त्वतः जाणण्याची इच्छा करितों' असें म्हणाला.

तेव्हां त्या बृहदश्व महर्षीनें महात्म्या पांडवाला अक्षदेवतला प्रसन्न करून घेण्याची विद्या दिली व तो महातपस्वी मुनि आपलें स्नानादि-आह्निक उर-कण्यास निघून गेला.

त्यानंतर दृढव्रत युधिष्ठिरानें निरनिराळीं तीर्थें, पर्वत व वनें यांतून आलेल्या तपस्वी ब्राह्मणांच्या तोंडून 'पराक्रमी अर्जुन दुर्धर तप करीत आहे' अशी वार्ता ऐकिली.

( ४ ) ब्राह्मण—हे धर्मराजा, तुझा कनिष्ठ भ्राता सव्यसाची वायुभक्षण करून उग्र तपश्चर्येमध्यें प्रवृत्त झाला आहे. त्या नियतव्रत तपस्वी धनंजयासारखा दुसरा कोणीहि उग्र तप करणारा मुनि आम्हीं यापूर्वीं पाहिला नाहीं. जणुं काय मूर्तिमंत धर्मच भासणारा तो श्रीमान्, एकाकी क्षत्रमुनि आपल्या तेजानें इंद्रकीलपर्वताला तापवीत रुद्राला प्रसन्न करण्यासाठीं तीव्र तपश्चर्येचे क्लेश सहन करीत आहे.

जनमेजया, आपला प्रिय भ्राता घोर वनांत असें उग्र तप करीत आहे, हें ऐकून युधिष्ठिराला अतिशय खेद झाला व तो शरणार्थी युधिष्ठिर संतप्त हृदयानें त्या बहुश्रुत ब्राह्मणांस आपल्या भ्रात्याविषयीं अनेक प्रश्न विचारूं लागला. ३. ६. ७९.

येथें सहावें नलोपाख्यानपर्व समाप्त झालें.

---

## तीर्थयात्रापर्व ७.



### अध्याय ८० वा.

[ १ अर्जुनाविषयीं द्रौपदी व भीमादि भ्राते यांच्या मनाचें अस्वास्थ्य. ]

(१) जनमेजय—हे भगवन्, माझा प्रपितामह काम्यकवनांतून निघून गेला असतां त्या धनंजयावांचून पांडवांनीं काय केलें, तें मला सांग. आदित्यामध्यें जसा विष्णु त्याचप्रमाणें तो विजयी महाधनुर्धर अर्जुन सर्व पांडवांची गति होता, असें मला वाटतें. त्या संग्रामांतून परत न फिरणाऱ्या इंद्रतुल्य पराक्रमी अर्जुनावांचून ते माझे पूर्वपितामह वनांत कसे राहिले !

वैशंपायन—हे वीरा, सत्य पराक्रमी अर्जुन काम्यकवनांतून निघून गेला असतां ते पांडुपुत्र दुःख-शोकपरायण झाले. सूत्र तुटलेल्या मालेंतील मण्यांप्रमाणें व पंख तुटलेल्या पक्ष्यांप्रमाणें इतर पांडव अप्रसन्नचित्त झाले. कुबेरावांचून चैत्ररथवन जसें शून्य होतें, त्याप्रमाणें क्लेशावह कर्म न करणाऱ्या त्या कौंतेयावांचून काम्यकवनहि शून्य भासूं लागलें.

युधिष्ठिरादि चार भ्राते व द्रौपदी त्या वनांत मोठ्या दुःखानें काल कंठूं लागलीं. भीमादि महारथ पांडुपुत्र ब्राह्मणांसाठीं शुद्ध बाणांनीं विविध मेध्य मृगांची मृगया करीत हिंडत असत. ते वीर भ्राते नित्य वन्य आहार संपादन करून व तो आपल्या आश्रमांत आणून ब्राह्मणांस निवेदन करीत असत. तथापि धनंजयाच्या वियोगानें त्यांच्या चित्ताला स्वस्थता वाटत नसे. त्या प्रिय भ्रात्यासाठीं ते अहर्निश सोत्कंठ होत असत. विशेषतः पांचालीला तिच्या मध्यम पतीची वारंवार आठवण होत असे.

ती भामिनी एकदा उद्विग्न मनानें पांडवश्रेष्ठ युधिष्ठिरास म्हणाली— " महाराज, द्विबाहु असूनहि युद्धांत सहस्रबाहु अर्जुनाची बरोबरी करणारा वीर धनंजय दृष्टीं पडत नसल्यामुळें मला हें वन रमणीय वाटत नाहीं. पृथ्वीचा कोणता भाग जरी पाहिला, तरी तो मला शून्यच दिसतो. या वनांतील सर्व वृक्ष फळें व पुष्पें यांनीं आश्चर्यकारक दिसत आहेत, तथापि त्या सव्यसाचीवांचून मला ते रमणीय वाटत नाहींत.

नीलमेघाप्रमाणें कांतिमान् व मत्तगजाप्रमाणें गमन करणारा जो कमलनयन कनिष्ठ कुंतीकुमार त्याच्या अभावीं मला हें काम्यक-वन सर्व शोभाविरहित भासत आहे. ज्याच्या धनुष्याचा घोष मेघगर्जनेप्रमाणें ऐकूं येत असे, त्या सव्यसाचीच्या स्मरणानें माझ्या मनाचें स्वास्थ्य पार नाहींसें झालें आहे."

जनमेजया, प्रिय पांचालीचा हा विलाप ऐकून शत्रूंचा संहार करणारा भीमसेन म्हणाला—" हे भद्रे, खरोखर तूं नेहमीं मला प्रिय असलेलेंच बोलत असतेस. तुझें अमृततुल्य भाषण ऐकून माझ्या मनाला समाधान वाटतें. ज्याच्या दोन्ही भुजा दीर्घ, सम, पुष्ट व परिघासारख्या दृढ असून ज्यांवर धनुष्याच्या दोरीचे मोठ-मोठे घट्टे पडले आहेत, खड्ग, आयुधें व धनुष्यें हीं ज्याच्या हातांत नेहमीं असतात व सुवर्णाचीं बाहुभूषणें घातल्यामुळें ज्याचे भुज पांच फणांच्या नागांप्रमाणें भासतात, त्या पुरुषश्रेष्ठावांचून आम्हांला हें वन ज्यांतील सूर्य नष्ट झाला आहे, अशा आकाशाप्रमाणें भासत आहे.

ज्या महापराक्रमी अर्जुनाच्या बाहुबलाचा आश्रय करून पांचाल व कौरव समरांगणामध्यें सज्ज होऊन युद्धार्थ उभ्या राहिलेल्या देवांनाहि भीत नाहींत, ज्या महात्म्याच्या बाहुबलाचा आश्रय करून 'आम्हीं संग्रामांत शत्रूंना जिंकलेंच आहे व आम्हांला पृथ्वीचें राज्य प्राप्त झालेंच आहे,' असें समजतों,

त्या माझ्या प्रिय धनंजय भ्रात्यावांचून आम्हांला या काम्यक वनांत मुळींच सुख वाटत नाहीं. मला या सर्व दिशा अंधकारानें व्याप्त झाल्यासारख्या शून्य भासतात."

भीमाचें हें वचन ऐकून नकुलाचा कंठ अश्रूंनीं दाटून आला व तो म्हणाला—"हे भ्रात्या, देवसुद्धां ज्याच्या युद्धांतील पराक्रमाचें कौतुक करीत असतात, त्या श्रेष्ठ धनुर्धरावांचून आम्हांला या वनांत सौख्य कसलें! त्या महातेजस्वी वीरानें उत्तर दिशेंत जाऊन युद्धामध्यें महा बलाढ्य गंधर्वश्रेष्ठांना जिंकिलें व तित्तिरी पक्ष्यांप्रमाणें नीलवर्ण व वायूसारखे वेगवान् जातिवंत अश्व आणिले आणि ते आपल्या ज्येष्ठ भ्रात्याला राजसूययज्ञप्रसंगीं मोठ्या प्रेमानें अर्पण केले, त्या अप्रतिम पराक्रमी देवतुल्य भ्रात्यावांचून या काम्यक वनांत रहाणें मला मुळींच आवडत नाहीं.

सहदेव—ज्या महारथ्यानें पूर्वी समरांगणांत द्रव्य आणि कन्या जिंकून त्या राजसूययज्ञांत राजा युधिष्ठिराला अर्पण केल्या, ज्या अतुल तेजस्वी एकट्या वीरानें वासुदेवाच्या संमतीनें यादवांचा युद्धांत पराभव करून सुभद्रेचें हरण केलें, त्या पराक्रमी धनंजयाचें हें आसन आश्रमांत रिकामें पाहून हे महाराजा, माझें हृदय शांत होत नाहीं. मला हें अरण्य सोडून जावेंसें वाटतें. त्या वीर भ्रात्यावांचून हें वन आम्हांला रम्य वाटत नाहीं. ३-७-८०

---

## अध्याय ८१ वा.

[ १ नारददर्शन. २ त्याला युधिष्ठिराचा पृथ्वीप्रदक्षिणेच्या फलाविषयीं प्रश्न. ३ भीष्म व पुलस्त्य यांच्या तद्विषयक संवादाचा उपक्रम. ]

(१) वैशंपायन—राजा, धनंजयासाठीं उत्सुक झालेले भीमादि भ्राते व कृष्णा यांचीं हीं भाषणें ऐकून धर्मराजहि अत्यंत उद्विग्न झाला. इतक्यांत त्यानें नुकत्याच हवन केलेल्या अग्नीप्रमाणें ब्राह्मविद्येच्या तेजानें देदिप्यमान झालेल्या देवर्षि नारदाला येत असलेलें पाहिलें. त्याला पहातांच भ्रात्यांसह धर्मराज उठून उभा राहिला व त्यानें त्या महात्म्याची यथाविधि पूजा केली. भ्रात्यांनीं परिवेष्टित झालेला तो कुरुनंदन देवांनीं परिवेष्टित झालेल्या इंद्राप्रमाणें भासला. ज्याप्रमाणें मेरूला सूर्यप्रभा किंवा वेदांना सावित्री सोडीत नाहीं त्याप्रमाणें याज्ञसेनी आपल्या वीर पतींपासून धर्मतः क्षणभरहि दूर रहात नसे. असो.

युधिष्ठिराच्या पूजेचा स्वीकार करून भगवान् नारदानें त्या धर्मपुत्राचें सांत्वन केलें व तो ऋषि महात्म्या धर्मराजास म्हणाला—"हे धार्मिकश्रेष्ठा, तुझी काय इच्छा आहे! मी तुझें कोणतें प्रिय करूं?"

(२) तें ऐकून युधिष्ठिरानें भ्रात्यांसह त्यास वंदन केलें व हात जोडून म्हटलें—"हे महाभाग, सर्व लोकांना पूज्य असलेले आपण संतुष्ट झालां म्हणजे आपल्या प्रसादानें मला सर्व इष्ट प्राप्त झालेंच आहे, असें मी समजतों. पण त्यांतूनहि मी माझ्या भ्रात्यांसह आपल्याला अनुग्राह्य वाटत असेन, तर माझ्या एका संदेहाची निवृत्ति करा. तीर्थतत्पर असलेला जो पुरुष पृथ्वीप्रदक्षिणा करितो त्याला कोणतें फल मिळतें, तें आपण मला तत्त्वतः सांगा."

नारद—हे धर्मराजा, बुद्धिमान् भीष्मानें पूर्वी पुलस्त्याच्या तोंडून हें सर्व श्रवण केलें आहे. तेंच मी तुला सांगतों. सावधान चित्तानें ऐक.

(३) पूर्वी धर्मनिष्ठांतील श्रेष्ठ भीष्माचार्य भागीरथीच्या तीरावर मुनींसह पितृव्रत आचरीत राहिला होता. तो गंगाद्वाराचा शुभ प्रदेश देव, गंधर्व व देवर्षि यांच्या वास्तव्यानें पावन झालेला होता. त्या पवित्र क्षेत्रीं महा तेजस्वी भीष्म पितर, देव आणि ऋषि यांचें शास्त्रविहित कर्मानें तर्पण करीत असे.

अशाप्रकारें कांहीं काल लोटल्यानंतर एकदा तो धर्मात्मा जप करीत असतां त्या श्रेष्ठ राजर्षीला विलक्षण तेजानें युक्त असलेल्या पुलस्त्य ऋषीचें दर्शन झालें. आपल्या कांतीनें देदीप्यमान होणाऱ्या त्या उग्र तपस्व्याला पाहून भीष्माला परम आह्लाद झाला व विस्मयहि वाटला.

हे भारता, त्यावेळीं अकस्मात् प्रकट झालेल्या त्या महाभागाचें भीष्मानें यथाविधि पूजन केलें व त्या जितेंद्रिय वीरानें त्या ऋषीचें चरणतीर्थ मस्तकावर धारण करून त्याला आपलें नांव कथन केलें.

भीष्म म्हणाला—हे भगवन्, तुझें कल्याण असो. मी भीष्म आपला दास आहें. हे देवर्षे, तुझ्या केवळ दर्शनानेंच मी सर्व पातकांपासून मुक्त झालों आहें. हे युधिष्ठिरा, असें बोलून धर्मधारण करणारांतील श्रेष्ठ भीष्म वाणीचें नियमन करून हात जोडून स्तब्ध राहिला. नियम व वेदाध्ययन यांच्या योगानें कृश झालेल्या त्या कुरुकुलश्रेष्ठ भीष्माला पाहून मुनि प्रसन्न झाला. ३. ७. ८१.

---

## अध्याय ८२ वा.

[ १ पुलस्त्य व भीष्म यांचा तीर्थयात्रेविषयीं संवाद. २ पुष्करतीर्थाचें माहात्म्य. ३ पुढील जंबू-द्वीपादिकांच्या यात्रेचा क्रम.]

( १ ) पुलस्त्य—हे धर्मज्ञा, तुझ्या या विनयानें, इंद्रियजयानें व सत्यानें मी अतिशय संतुष्ट झालों आहें. तूं पितृभक्तीनें या अशाप्रकारच्या धर्मांचा आश्रय केलास म्हणूनच तुला माझें दर्शन झालें. हे वत्सा, तुजवर माझी परम प्रीति आहे. हे भीष्मा, माझें दर्शन कधीं निष्फल होत नसतें. मी तुझें कोणतें प्रिय करूं तें सांग. तूं जें मागशील तें मी तुला देईन.

भीष्म—हे महाभाग, सर्व लोकांना पूज्य असलेला तूं मजवर प्रसन्न होऊन मला साक्षात् दर्शन दिलेंस एवढ्यानेंच मी कृतार्थ झालों आहें. तथापि, हे धर्मनिष्ठांतील श्रेष्ठ महर्षे, मजवर कांहीं अनुग्रह करण्याची जर तुझी इच्छा असेल, तर माझ्या मनांतील एक संशय मी तुला विचारितों, त्याचें निरसन कर. तीर्थयात्रेच्या फलाविषयीं माझ्या मनांत कांहीं धार्मिक जिज्ञासा आहे; ती पूर्ण करण्यास तूंच समर्थ आहेस. हे भगवन्, पृथ्वीप्रदक्षिणा करणाऱ्या पुरुषाला कोणतें फल प्राप्त होतें तें मला यथार्थ सांग.

पुलस्त्य—हे वत्सा, ऋषींचा परम आधार असें जें तीर्थाटनाचें फल, तें मी तुला मोठ्या संतोषानें सांगतों, एकाग्रचित्तानें ऐक.

जो मनुष्य हात, पाय व मन यांचें संयमन करून विद्या, तप व कीर्ति यांनीं युक्त होतो, त्याला सर्व तीर्थयात्रेचें फल मिळतें. जो पुरुष प्रतिग्रहापासून निवृत्त होतो, प्राप्त स्थितींत संतुष्ट रहातो व जो अहंकाररहित, दंभविहीन, निष्कर्मा, अल्पाहार करणारा, जितेंद्रिय, सर्व पापांपासून मुक्त, क्रोधशून्य, सत्यशील, दृढव्रत व सर्व प्राण्यांविषयीं दयावान् असतो, त्याला सर्व तीर्थांचें फल प्राप्त होतें.

हे राजन्, ऋषींनीं यज्ञ सांगितले आहेत. त्यांचें फल प्रथम या लोकीं व मरणोत्तर देवलोकीं मिळतें. पण दरिद्री मनुष्याला यज्ञ करितां येणें शक्य नाहीं. कारण यज्ञ अनेक उपकरणांनीं युक्त असून त्यांच्या साहित्याचा विस्तार फार मोठा असतो. राजा, केवल भूपतीच यज्ञ करण्यास समर्थ असतात किंवा क्वचित् धनवान् पुरुष तो करूं शकतो. परंतु द्रव्यहीन, नीच लोकांच्या साहाय्यानें युक्त, असहाय, एकाकी व पत्न्यादि साधनांनीं रहित असलेल्या पुरुषाला

केव्हांहि यज्ञ करितां येत नाहीं. द्रव्यहीनांनाहि जें करितां येणें शक्य आहे व ज्याचें फल यज्ञफलाइतकेंच आहे, तो तीर्थयात्राविधि तूं माझ्या तोंडून ऐक.

हे भारतश्रेष्ठा, मी तुला ऋषींचें परम गुह्य सांगतों, तें ऐक. तीर्थयात्रेचें फल यज्ञाहूनहि अधिक आहे. जो मनुष्य तीर्थक्षेत्रीं जाऊन तीन दिवस उपोषण करीत नाहीं, आणि सुवर्ण व गायी यांचें दान देत नाहीं, तो दरिद्री होतो. तीर्थयात्रेनें जें फल प्राप्त होतें, तें अग्निष्टोमादि विपुल दक्षिणायुक्त यज्ञ केल्यानेंहि प्राप्त होत नाहीं.

( २ ) हे गंगापुत्रा, या मृत्युलोकीं देवाधिदेवाचें 'पुष्कर'-नामक त्रैलोक्यांत प्रसिद्ध असलेलें पवित्र तीर्थ आहे. जो महाभाग्यवान् असतो तोच त्या तीर्थावर अवश्य जातो.

हे कुरुश्रेष्ठा, प्रातःकालीं, मध्याह्नीं व सायंकाळीं पुष्कर तीर्थामध्यें कोट्यवधि तीर्थांचा अंतर्भाव होत असतो. हे विभो, या तीर्थांत आदित्य, इंद्र, रुद्र, मरुद्गणांसह साध्य, गंधर्व, व अप्सरा नित्य निवास करितात. हे महाराज, याच पवित्र तीर्थांत देव, दैत्य, ब्रह्मर्षि यांनीं तप करून महत्पुण्य संपादन केलें.

हे राजा, मनांत केवल पुष्करतीर्थामध्यें स्नान करण्याची इच्छा केल्यानेंहि सर्व पाप नष्ट होऊन त्या पुरुषाला स्वर्गांत श्रेष्ठ स्थान प्राप्त होतें. हे महाराज, त्या पवित्र तीर्थांत पितामह कमलासन ब्रह्मदेव नित्य वास करितो. या पुष्करतीर्थांत स्नान करूनच पूर्वीं ऋषिगणांसह देवांनीं महत्पुण्यानें युक्त होऊन सिद्धि प्राप्त करून घेतल्या.

अशा या पुण्यतीर्थांत पितृ-देवार्चनांत रत होऊन स्नान करणारांस अश्वमेधाच्या दसपट फल मिळतें, असें विद्वानांचें मत आहे.

हे राजन्, पुष्करारण्याचा आश्रय करून तेथें एका ब्राह्मणाला जरी भोजन दिलें, तरी केवळ तेवढ्या कर्मानेंच तो पुरुष इह व परलोक जिंकितो. त्याचप्रमाणें शाका, मुळें, फळें, किंवा ज्या कोणत्याहि अन्य पदार्थांवर एखादा श्रद्धावान् पुरुष उपजीविका करीत असेल, तो पदार्थ ब्राह्मणाला दिला असतां त्या असूया न करणाराला अश्वमेध यज्ञाचें फल प्राप्त होतें.

हे भीष्मा, या पुष्करतीर्थांत जे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र स्नान करितात, ते पुनर्जन्माला प्राप्त होत नाहींत. हे शांतनवा, जो मानव विशेषें-

करून कार्तिकी पौर्णिमेस पुष्करांत स्नान करितो, तो ब्रह्मलोकांतील अक्षय भोग भोगितो. जो पुरुष सकाळीं व सायंकाळीं हात जोडून पुष्करतीर्थाचें स्मरण करितो, त्याला सर्व तीर्थांत स्नान केल्याचें पुण्य लाभतें. स्त्री-पुरुषांनीं जन्मापासून आचरिलेलें सर्व पाप पुष्करांतील केवल स्नानानें नाश पावतें.

हे गांगेया, सर्व देवांमध्यें मधुसूदन जसा प्रमुख आहे तसें सर्व तीर्थांत पुष्कर श्रेष्ठ आहे. हे राजा, जो नर नियत व शुचिर्भूत होऊन बारा वर्षें पुष्करांत राहतो, तो प्रजापतीच्या सायुज्याला प्राप्त होऊन ब्रह्मलोकीं जातो. कार्तिकी पौर्णिमेस पुष्करतीर्थांत एक दिवस केलेल्या वास्तव्याचें फल शंभर वर्षें आचरिलेल्या अग्निहोत्राच्या फलाबरोबर आहे.

( १ ) काशी, प्रयाग व पुष्कर हीं तीर्थें ज्ञानप्रद व त्यामुळेंच शुद्ध सत्त्वमय आहेत. तीं अनादि सिद्ध असून त्यांना तीर्थत्व देणारें दुसरें कोणतेंच बाह्य निमित्त आम्हांला अवगत नाहीं. पुष्करतीर्थीं गमन, तेथील तप, दान व वास हीं सर्वच दुर्लभ आहेत. नियताहार व इंद्रियसंयमन यांनीं युक्त होऊन बारा रात्रीं पुष्करतीर्थीं वास करावा व त्या पवित्र तीर्थाला प्रदक्षिणा घालून जंबूमार्गांत प्रवेश करावा. देव, ऋषि व पितर यांनीं सेवन केलेल्या जंबूमार्गांत प्रवेश केल्यानें त्या पुरुषाला सर्व भोगांसह अश्वमेधाचें फल प्राप्त होतें.

जंबूमार्गामध्यें पांच रात्री घालविल्यानें पुरुष पावन होतो. तो दुर्गतीला प्राप्त होत नाहीं. उलट उत्तम सिद्धि मिळवितो. जंबूमार्गांतून परत येऊन तंदुलिकाश्रमास जावें, म्हणजे तो पुरुष दुर्गतीचें उल्लंघन करून ब्रह्मलोकीं जातो.

हे कुरुनंदना, पितर व देव यांच्या पूजनांमध्यें रत असलेल्या पुरुषानें आगस्त्य सरोवरास प्राप्त होऊन तीन दिवस उपोषण करावें. तेथें शाका किंवा फळें यांवर निर्वाह करणाराला श्रेष्ठ कौमारस्थान प्राप्त होतें. तेथून सर्व लोकांस पूज्य असलेल्या रम्य कण्वाश्रमास जावें. कारण तें आद्य व पुण्य धर्मारण्य आहे. त्यांत प्रवेश करितांच पुरुष सर्व पापरहित होतो. मिताहार व जितेंद्रिय होऊन कण्वाश्रमांत देव व पितर यांचें पूजन केल्यानें सर्व उपभोगांनीं समृद्ध असें यज्ञफल प्राप्त होतें.

नंतर त्याला प्रदक्षिणा करून 'ययातिपतन'-तीर्थाला जावें. त्यायोगें अश्वमेध यज्ञाचें फल प्राप्त होतें. तेथून नियत-आहार व नियत-व्रत होऊन महाकालाकडे जावें. त्या क्षेत्रांतील कोटितीर्थांत स्नान केलें असतां अश्वमेधफलाची प्राप्ति होते.

तेथून त्या धर्मनिष्ठ पुरुषानें महादेवाच्या स्थाणुतीर्थाला जावें. तें तीर्थ 'भद्र-वट'-नांवानें त्रैलोक्यांत प्रसिद्ध आहे. तेथें जाऊन श्रीमहेश्वराचें दर्शन घेतलें असतां त्या ईश्वराच्या प्रसादानें तो नर समृद्ध व निष्कंटक ऐश्वर्यानें युक्त होऊन गणाधिपति होतो.

नंतर त्रैलोक्यांत प्रसिद्ध असलेल्या नर्मदा नदीकडे जावें. तेथें पितर व देव यांचें तर्पण केलें असतां अग्निष्टोमाचें फल प्राप्त होतें. तेथून जितेंद्रिय ब्रह्म-चारी पुरुष दक्षिणसमुद्रावर गेला असतां त्याला अग्निष्टोमाचें फल लाभतें व तो विमानारूढ होतो. त्यानंतर नियतव्रत व मिताहार यांनीं युक्त असलेल्या पुरुषानें चर्मण्वती नदीला जावें. तेथें त्यास रतिदेवाच्या आज्ञेनें अग्निष्टोमाचें फल मिळतें.

तेथून हे धर्मज्ञा, हिमालयपुत्र अर्बुद (अबूचा पहाड) पर्वतावर जावें. पूर्वीं त्या ठिकाणीं पृथ्वीला एक मोठें छिद्र होतें. तेथेंच त्रैलोक्यामध्यें प्रख्यात असलेल्या वसिष्ठाचा आश्रम आहे. त्या आश्रमांत एक रात्र राहिलें असतां सहस्र गायींच्या दानाचें फल मिळतें.

त्यानंतर जितेंद्रिय ब्रह्मचारी पुरुषानें पिंगतीर्थांत स्नान करावें, म्हणजे त्याला शंभर कपिला गायींच्या दानाचें फल मिळतें. तेथून हे राजेंद्रा, श्रेष्ठ प्रभास-तीर्थाला जावें. तेथें देवतांचें मुख व वायु ज्याचा सारथि आहे, असा हुताशन नित्य संनिहित असतो. त्या तीर्थांत स्नान केल्यानें पुरुष पावन व नियतचित्त होतो आणि त्याला अग्निष्टोम व अतिरात्र यांचें फल मिळतें.

नंतर सरस्वती व सागर यांच्या संगमावर स्नान केल्यानें सहस्र गोप्रदानाचें फल व स्वर्गलोक, यांची प्राप्ति होते आणि हे भरतश्रेष्ठा, तो आपल्या अंग-कांतीनें सतत देदीप्यमान होत असतो. नियत चित्तानें सलिलराज तीर्थांत स्नान करावें. तीन रात्रीं तेथें राहून स्नानानंतर पितृ-देवतांचें तर्पण करावें. म्हणजे तो पुरुष चंद्राप्रमाणें प्रकाशूं लागतो व त्याला अश्वमेधाचें फल मिळतें.

**नारद**—हे युधिष्ठिरा, त्या पुलस्त्य-ऋषीनें भीष्माला आणखीहि जें तीर्थ-महात्म्य सांगितलें, तें मी तुला सांगतों. लक्ष देऊन ऐक.

त्यानंतर दुर्वासानें विष्णूला जेथें वर दिला त्या 'वरदान'-तीर्थास जावें. तेथें स्नान केल्यानें गोसहस्र फल मिळतें. तेथून नियतचित्त व नियत-आहार होऊन द्वारकेस जावें. तेथील पिंडारकामध्यें स्नान केल्यानें पुष्कळ वित्त प्राप्त होतें. हे

महाभागा, त्या तीर्थांत अद्यापि कमललक्षणांनीं चिह्नित अशा मुद्रा दिसतात. त्रिशूलचिह्नित पद्में दृष्टीं पडतात. हे पुरुषश्रेष्ठा, त्या तीर्थांत महादेवाचें नित्य सांनिध्य असतें.

सागर व सिंधु यांच्या संगमावर जाऊन नियत चित्तानें स्नान करावें. देव, पितर व ऋषि यांचें तर्पण करावें, म्हणजे तो मनुष्य स्वतेजानें देदीप्यमान होणाऱ्या वारुणलोकास प्राप्त होतो. तेथील 'शंकुकर्णेश्वर'-देवाचें पूजन केल्यानें अश्वमेधाच्या दसपट पुण्य लाभतें, असें विद्वान् लोक सांगतात.

हे युधिष्ठिरा, त्या तीर्थाला प्रदक्षिणा घालून त्रैलोक्यांत प्रसिद्ध असलेल्या 'दमि'-तीर्थास जावें. तेथें ब्रह्मादि देव महेश्वराची उपासना करीत असतात. त्या तीर्थांत स्नान करून व देवगणांनीं युक्त असलेल्या रुद्राचें तीर्थ घेऊन पुरुष पावन होतो आणि त्याचें जन्मप्रभृति केलेलें सर्व पाप नष्ट होतें. त्या दमीची सर्व देवांनीं स्तुति केली आहे. या तीर्थांत स्नान केलें असतां अश्वमेधाचें फल प्राप्त होतें.

पूर्वी भगवान् विष्णूनें दैत्य व दानव यांस मारून या तीर्थांतील स्नानानें आपल्या पापाचें शोधन केलें. हे धर्मज्ञा, तेथून स्तुत्य वसोर्धारा-तीर्थास जावें. तेथें नुसतें गेल्यानेंच अश्वमेधफलाचा लाभ होतो. हे धर्मा, त्या तीर्थांत स्नान करून शुचिर्भूत व शांतचित्त होऊन देव व पितर यांचें तर्पण करावें. म्हणजे तो पुरुष विष्णुलोकीं पूज्य होतो.

हे भरतश्रेष्ठा तेथें वसूंचें पवित्र सरोवर आहे. त्यांत स्नान करून त्याचें जलपान केल्यानें पुरुष वसूंना संमत होतो. 'सिंधूत्तम'-नांवानें प्रसिद्ध व सर्व पापांचा नाश करणारें एक तीर्थ तेथें आहे. त्यांत स्नान केल्यानें बहु सुवर्णदानाचें फल मिळतें.

शुचिर्भूत व सदाचारसंपन्न पुरुष भद्रतुंगाला गेला असतां ब्रह्मलोकास प्राप्त होऊन परम गतीला जातो. सिद्धसेवित शक्राच्या 'कुमारिका'-तीर्थाला जाऊन त्यांत स्नान करणारा पुरुष सत्वर स्वर्गलोकीं जातो. सिद्धांनीं सेवन केलेलें रेणुका-तीर्थहि तेथेंच आहे. त्यांत स्नान करून विप्र चंद्रासारखा निर्मल होतो.

नंतर हे राजेंद्रा, नियतचित्त व नियताहार होऊन 'पंच नदास' जावें. म्हणजे त्याला पंचयज्ञांच्या फलाची प्राप्ति होते. तेथून 'भीमा'—नदीच्या उत्तम मूल-

स्थानीं जाऊन स्नान करावें. म्हणजे तो कुंडलें धारण करणारा देवीपुत्र होतो व त्यास एक लक्ष गोप्रदानाचें फल मिळतें.

त्रिभुवनांत प्रसिद्ध असलेल्या श्रीकुंडास प्राप्त होऊन पितामहास नमस्कार केला असतां गोसहस्रफल मिळतें. तेथून उत्तम विमलतीर्थास जावें. तेथें अद्यापि सुवर्णाचे व रुप्याचे म्ह० सोनेरी व रुपेरी रंगाचे मत्स्य दिसतात. त्यांत स्नान केल्यानें पुरुष सत्वर इंद्रलोकीं जातो व सर्वपापरहित झालेल्या त्याला परम गति मिळते.

वितस्था-नदीतीरावर जाऊन व देव-पितरांना तृप्त करून पुरुष वाजपेयाच्या फलाचा अधिकारी होतो. काश्मीर देशांत तक्षकाचें 'वितस्थ'-नांवाचें भवन आहे. तें सर्व पापांचा नाश करितें. त्यांत स्नान केल्यानेंहि वाजपेयाचें फल मिळतें व परम गति प्राप्त होते.

तेथून त्रैलोक्यांत प्रसिद्ध असलेल्या 'वडवा'-तीर्थास जावें. सायंकालीं स्नान करून सप्तार्चीला यथाशक्ति चरु निवेदन करावा, म्हणजे पितरांना अक्षय दानाचें फल मिळतें, असें विद्वान् सांगतात.

येथें ऋषि, पितर, देव, गंधर्व इत्यादि सर्व देवादिकांनीं व त्यांच्या अधिपतींनीं सहस्रवार्षिक परम दीक्षा घेऊन विष्णूला प्रसन्न करण्यासाठीं चरु शिजविला व सात, सात ऋत्विजांनीं ईश्वराची स्तुति केली. त्यामुळें संतुष्ट झालेल्या केशवानें त्यांस आठपट ऐश्वर्य व सर्व इष्ट फल दिलें आणि मेघामध्यें अदृश्य होणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें तो देव केशव तेथेंच अंतर्धान पावला. त्यामुळें तें तीर्थ 'सप्तचरु'-नांवानें प्रसिद्ध झालें. हे भारता, एक लक्ष गायीचें दान, सहस्र अश्वमेध व शंभर राजसूय यांहून हा सप्तार्चीला दिलेला चरु अधिक श्रेष्ठ आहे.

हे नरेंद्रा, नंतर तेथून परत फिरावें व 'रुद्र'-पदास जावें. तेथें महादेवाची पूजा केल्यानें अश्वमेधफल प्राप्त होतें. ब्रह्मचर्य व चित्तैकाग्र्य यांनीं युक्त होऊन 'मणिमान्'-क्षेत्रास जावें. तेथें एक रात्र राहिलें असतां अग्निष्टोमाचें फल मिळतें.

तेथून लोकप्रसिद्ध देविकेला जावें. तेथेंच विप्रांची उत्पत्ति श्रुत आहे. तें त्रिशूलपाणि शंकराचें लोकप्रसिद्ध स्थान आहे. तेथें स्नान करून व महेश्वराचें यथाशक्ति पूजन करून चरु निवेदन करावा, म्हणजे सर्व कामांनीं समृद्ध असलेल्या यज्ञाचें फल मिळतें.

तेथें देवसेवित 'कामाख्य'-रुद्रतीर्थ आहे. त्यांत स्नान केल्यानें सिद्धि सत्वर प्राप्त होते. त्या क्षेत्रांत यजन व याजन करून, ब्रह्मवालुका व पुण्यजल यांस स्पर्श करून मरण पावलेला मनुष्य शोकसंतप्त होत नाहीं. ती देविका पांच योजनें लांब व अर्ध-योजन रुंद आहे. देव व ऋषि तिचें सेवन करितात, त्यामुळें ती पवित्र आहे.

हे धर्मज्ञा, त्यानंतर क्रमानें 'दीर्घसत्रास' जावें. तेथें ब्रह्मादि देव, सिद्ध व महर्षि दीक्षा घेऊन आणि नियतव्रत होऊन या दीर्घ सत्राची उपासना करितात. येथें गेल्यानेंच राजसूय व अश्वमेघ या दोहोंचें फल मिळतें. तेथून 'विनशन'-तीर्थास जावें. या विनशन क्षेत्रीं मेरुपृष्ठावर जाणारी सरस्वती गुप्त झाली व तीच पुढें चमसोद्भेद, नागोद्भेद व शिवोद्भेद यांमध्यें प्रकट झाली.

त्यांतील चमसोद्भेदांत स्नान केल्यानें अग्निष्टोमफल, नागोद्भेदांत स्नान केल्यानें नागलोक व शिवोद्भेदांत स्नान केल्यानें गोसहस्रफल मिळतें. हे राजेंद्रा, दुर्लभ 'शशयान'-तीर्थास जावें. तेथें ससाच्या रूपानें गुप्त असलेले पुष्कर दिसतात.

हे महाराज, तेच पुष्कर प्रतिवर्षीं कार्तिकी पौर्णिमेस सरस्वती नदीमध्यें उपलब्ध होतात. हे नरश्रेष्ठा, त्यांत स्नान केल्यानें पुरुष चंद्रासारखा कांतिमान् होऊन त्यास गोसहस्रफल प्राप्त होतें.

तेथून कुमारकोटीस जाऊन तेथें नियत चित्तानें स्नान करावें आणि पितर व देव यांच्या पूजनांत तत्पर व्हावें, म्हणजे दहा सहस्र गोप्रदानाचें फल मिळतें व कुलाचा उद्धार होतो. त्यानंतर हे धर्मात्म्या, 'रुद्रकोटीला' जावें. तेथें पूर्वी रुद्राच्या दर्शनेच्छेनें कोट्यवधि मुनि मोठ्या हर्षानें जमले होते. हे भारता, त्यावेळीं त्यांच्यामध्यें 'वृषभध्वजाचें दर्शन मी आधीं घेईन, मी आधीं घेईन.' अशी अहमहमिका चालली होती. हे राजा, याप्रमाणें तेथें ऋषींचा प्रचंड समुदाय जमलेला पाहून त्या भक्तवत्सल योगीश्वरानेंहि ऋषींचा क्षोभ शांत करण्यासाठीं योगाचा आश्रय केला व कोट्यवधि रुद्र निर्माण करून तो प्रत्येक ऋषीच्या पुढें उभा राहिला; त्यामुळें प्रत्येकजण 'मींच रुद्राला प्रथम पाहिलें,' असें मानूं लागला.

त्या सर्व मुनींवर महादेव प्रसन्न झाला व त्यांच्या परमभक्तीनें संतुष्ट होऊन त्या उमापतीनें त्यांस 'आजपासून तुमच्या धर्मांची वृद्धि होईल.' असा वर

दिला. त्या रुद्रकोटींत स्नान करून शुचिर्भुत झालेला नर अश्वमेधाला प्राप्त होऊन त्याच्या कुलाचा उद्धार होतो.

तेथून हे राजेंद्रा, लोकप्रसिद्ध सरस्वतीच्या संगमावर जावें. तेथील सर्व लोक केशवाची उपासना करितात व चैत्र शुद्ध चतुर्दशीस ब्रह्मादि देव व तपोधन ऋषि त्या संगमावर गमन करितात. त्या तीर्थांत स्नान केल्यानें विपुल धनप्राप्ति होऊन सर्व पापांची निवृत्ति होते व तो पुण्यात्मा ब्रह्मलोकीं जातो.

हे नरश्रेष्ठा, ज्या सरस्वतीच्या पवित्र तीरावर ऋषींचीं सत्रें समाप्त झालीं, तेथेंच मरण पावलेल्या पुरुषाला सहस्र गोप्रदानांचें फल मिळतें. ३. ७.८२.

---

## अध्याय ८३ वा.

[ १ कुरुक्षेत्रादिकांचें वर्णन. ]

( १ ) नारद—हे युधिष्ठिरा, त्या पुलस्त्यमुनीनें भीष्माला आणखी कोणकोणतीं तीर्थें सांगितलीं, तें मी तुला निवेदन करितों. हे राजेंद्रा, स्तुत्य कुरुक्षेत्रास गमन करावें. त्याचें नुसतें दर्शन घेतल्यानेंच सर्व जंतु पापापासून मुक्त होतात. 'मी कुरुक्षेत्राला जाईन व तेथें वास करीन.' असें सतत बोलणाराहि सर्व पापांपासून मुक्त होतो. वायूनें उडविलेली कुरुक्षेत्रांतील धूळहि दुष्कर्मांचा नाश करून नराला परमगतीस नेते.

सरस्वतीच्या दक्षिणेस व दृषद्वतीच्या उत्तरेस जो कुरुक्षेत्राचा भाग आहे, त्यांत वास करणारे लोक स्वर्गांतच रहातात. जेथें ब्रह्मादि देव, ऋषि, सिद्धादि व गंधर्वादि श्रेष्ठ जीव नित्य गमन करितात, त्या सरस्वतीच्या अति पवित्र ब्रह्मक्षेत्रांत बुद्धिमान् पुरुषानें महिनाभर वास करावा. कुरुक्षेत्राचें मनानें नुसतें चिंतन जरी केलें, तरी पुरुषाचें सर्व पाप नष्ट होऊन तो ब्रह्मलोकीं जातो.

'कुरुक्षेत्र' या शब्दाचाच पापनिवर्तक असा अर्थ आहे. कारण तें ब्रह्मसाक्षात्काराचें स्थान आहे. म्हणूनच त्याला जाबालोपनिषदांत 'ब्रह्मसदन' असें म्हटलें आहे. त्यामुळें मोठ्या श्रद्धेनें कुरुक्षेत्रास जाणाऱ्या पुरुषाला राजसूय व अश्वमेध यांचें फल मिळतें. तेथें 'चक्रुक'-नांवाचा महा बलाढ्य यक्ष द्वारपाल आहे, त्याला अभिवादन केल्यानें गोसहस्रफल मिळतें.

तेथून विष्णूच्या 'सतत'-नामक उत्तम स्थानास जावें. तेथें विष्णूचें नित्य सान्निध्य असतें. त्यांत स्नान करून त्रैलोक्याच्या कारणभूत हरीला वंदन केल्यानें अश्वमेधाचें फल व विष्णुलोक प्राप्त होतो.

नंतर सुप्रसिद्ध 'पारिप्लव'-तीर्थास जावें. म्हणजे अग्निष्टोम व अतिरात्र यांचें फल मिळतें. पृथ्वी-तीर्थास गेल्यानें गोसहस्रफल मिळतें. शालूकिनीस जाऊन 'दशाश्वमेध'-तीर्थांत स्नान केल्यानें दशाश्वमेधफल मिळतें. सर्पदेवीस जाऊन 'उत्तम नागतीर्थांत' स्नान केल्यानें अग्निष्टोमाचें फल व नागलोक यांची प्राप्ति होते.

हे धर्मज्ञा, तेथून द्वारपाल तरंतुकाला जावें. तेथें एक रात्र राहिल्यानें सहस्र गोफल मिळतें. त्यानंतर पंचनदाला जावें. तेथें नियतव्रत होऊन व नियत आहार करून 'कोटितीर्थांत' स्नान केलें असतां अश्वमेधाचें फल लाभतें. तेथून अश्विनीकुमारांच्या तीर्थाला जाणारा मानव रूपसंपन्न होतो.

हे नरश्रेष्ठा, जेथें पूर्वी विष्णु वराहरूपानें राहिला होता, त्या 'वाराहतीर्थांत' स्नान करणारास अग्निष्टोमाचें फल मिळतें. जयंतींतील 'सोमतीर्थांत' स्नान केल्यानें राजसूयाचें व 'एकहंसांत' स्नान केल्यानें सहस्र गोप्रदानांचें फल मिळतें आणि तो मनुष्य पावन होऊन पुंडरीकास प्राप्त होतो. महात्म्या स्थाणूच्या 'मुंजवट'-स्थानास जाऊन एक रात्र उपोषण केलें असतां गाणपत्याची प्राप्ति होते.

हे महाराज, तेथेंच लोकप्रसिद्ध यक्षिणी आहे. तिचें दर्शन घेऊन स्नान केल्यास सर्व इच्छा पूर्ण होतात. कुरुक्षेत्राचें तें प्रख्यात द्वार आहे. तीर्थांचें सेवन करणाऱ्या शांतचित्त पुरुषानें तिला प्रदक्षिणा घालून पुष्कराप्रमाणेंच पवित्र असलेल्या त्या तीर्थांत स्नान करावें. पितर व देवता यांचें पूजन करावें, म्हणजे तो पुरुष कृतकृत्य होतो.

जामदग्न्य रामानें हें कुरुक्षेत्राचें द्वार निर्माण केलें आहे. त्यानंतर हे युधिष्ठिरा, 'रामऱ्हदावर' जावें. वीर परशुरामानें आपल्या तेजानें क्षत्रियांचा उच्छेद केला व त्यांच्या रक्तानें पांच ऱ्हद निर्माण करून आपल्या पितरांना तृप्त केलें, असें श्रुत आहे. तेव्हां ते रामाचे पितर संतुष्ट होऊन त्यास म्हणाले— "हे महाभाग भार्गवा, या तुझ्या पितृभक्तीनें व पराक्रमानें आम्ही संतुष्ट झालों आहों. तरी वर माग. हे वीरा, तुझें कल्याण असो. तुझी काय इच्छा आहे?"

तें ऐकून शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ परशुराम हात जोडून आकाशांत स्थित असलेल्या आपल्या पितरांस म्हणाला—" भगवन्, आपण जर मजवर प्रसन्न झालां असाल व मजवर अनुग्रह करण्याची आपली इच्छा असेल तर तुमच्या प्रसादानें माझ्या तपाची वृद्धि व्हावी. मीं क्रोधवश होऊन 'क्षत्रिय'-जातीचा उच्छेद केला आहे. पण तुमच्या तेजानें मीं त्या पापासून मुक्त व्हावें आणि हे क्षत्रियांच्या रक्तानें भरलेले ऱ्हद तीर्थभूत आणि भूलोकीं प्रसिद्ध व्हावे अशी माझी इच्छा आहे."

रामाचें हें प्रिय वचन ऐकून संतुष्ट झालेले त्याचे पितर मोठ्या हर्षानें त्यास म्हणाले—" वत्सा, तुझ्या पितृभक्तीनें तुझ्या तपाची उत्तरोत्तर अशीच वृद्धि होवो. क्षत्रियांच्या नाशामुळें तुला जें पाप लागलें होतें त्यांतूनहि तूं मुक्त झाला आहेस. ते आपल्या कर्मानेंच मृत्युमुखीं पडले. तूं निर्माण केलेले हे ऱ्हद तीर्थत्वास प्राप्त होतील व त्यांत स्नान करून जे पितृतर्पण करितील, त्यांचे पितर संतुष्ट होऊन या लोकीं दुर्लभ असलेलाहि त्यांचा मनोरथ पूर्ण करतील. ते शाश्वत स्वर्गलोकाला जातील."

हे राजन्, भार्गवरामाला असे वर देऊन व प्रीतीनें त्याचा निरोप घेऊन त्याचे पितर संतुष्ट चित्तानें अंतर्धान पावले.

याप्रमाणें त्या महात्म्या भार्गवाचे हे पांच पवित्र 'रामऱ्हद' आहेत. यांत स्नान करून व रामाचें पूजन करून ब्रह्मचर्य व इतर शुभ व्रत धारण करणारा पुरुष श्रीमान् होतो व त्यास असंख्य सुवर्णदानाचें फल प्राप्त होतें.

तेथून 'वंशमूलकास' जावें, त्यांत स्नान करून आपल्या वंशाचा उद्धार करावा. 'कायशोधन'-तीर्थास जाऊन त्यांतील स्नानानें शरीरशुद्धि करून घ्यावी. त्यामुळें सर्वोत्तम शुभ लोकांची प्राप्ति होते. हे धर्मज्ञा, पूर्वीं विष्णूनें जेथें लोकांचा उद्धार केला, त्या लोकप्रसिद्ध 'लोकोद्धार'-तीर्थास जाऊन त्यांत स्नान केलें असतां तो पुरुष आपल्या लोकांचा उद्धार करितो. 'श्री'-तीर्थास प्राप्त होऊन व शांतचित्तानें त्यांत स्नान करून देव व पितर यांचें पूजन केलें असतां उत्तम श्री प्राप्त होते.

कपिलातीर्थांत स्नानादि पूर्वोक्त सर्व विधि केले असतां सहस्र कपिला-दानाचें फल मिळतें. सूर्यतीर्थावर जाऊन तेथें स्नान, पूजन व उपवास केल्यानें अग्निष्टोमफल व सूर्यलोक यांची प्राप्ति होते. पुढें क्रमानें 'गोभवनास' जाऊन त्यांत स्नान करणारास गोसहस्रफल मिळतें. शंखिनीतीर्थांत स्नान केल्यानें उत्तम लोकाची प्राप्ति होते.

तेथून 'अरंतुक'—द्वारपालास जावें. तें सरस्वतींतील महात्म्या यक्षेंद्राचें तीर्थ आहे. त्यांत स्नान केल्यानें पुरुषाला अग्निष्टोमाचें फल लाधतें. तेथून 'ब्रह्मावर्तास' जावें. त्यांतील स्नानानें ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. तेथून श्रेष्ठ 'सुतीर्थकास' जावें. त्या तीर्थांत देवतांसह पितर नित्य संनिहित असतात. त्यांत स्नान-पूजनादि केल्यानें अश्वमेधाचें फल व पितृलोक यांचा लाभ होतो.

हे नरव्याघ्रा, त्यानंतर 'अंबुमतींतील' सर्वोत्तम 'सुतीर्थास' जावें. काशी-श्वराच्या मनिकर्णिकादि तीर्थांत स्नान केल्यानें पुरुष सर्व व्याधींपासून मुक्त होऊन ब्रह्मलोकीं पूज्य होतो. तेथेंच 'मातृतीर्थ' आहे. त्यांत स्नान केलेल्या पुरुषाची प्रजावृद्धि होते व विपुल ऐश्वर्य मिळतें.

तेथून मिताहार व जितेंद्रिय पुरुषानें 'सीतवनास' जावें. तेथें एक फार मोठें तीर्थ आहे. तसलें तीर्थ दुसऱ्या कोठेंहि मिळणें शक्य नाहीं. तें नुसत्या दर्शनानेंच पुरुषाला पावन करितें. त्यांत स्नान केल्यानें पुरुष पवित्र होतो. हे महाराज, तेथें 'श्वाविल्लोमापह'-तीर्थ आहे. तीर्थपरायण विद्वान् त्यांत स्नान करून अतिशय संतुष्ट होतात.

हे भरतश्रेष्ठा, द्विजोत्तम त्या तीर्थावर प्राणायाम करीत बसतात व त्या-योगेंच अंगावरील लोम घालवितात आणि शुद्धचित्त होऊन परम गतीला प्राप्त होतात. 'दशाश्वमेधिक'-तीर्थांत स्नान केल्यानें मनुष्य परम गतीला जातो. हे राजा, व्याधाच्या शरांनीं पीडलेले कृष्णमृग ज्या सरोवरांत स्नान करून मनुष्यत्वाला प्राप्त झाले, त्या मानुषतीर्थास जाऊन स्नानादि विधि केल्यानें पुरुष सर्व पापांपासून मुक्त होऊन स्वर्गलोकीं पूज्य होतो. या मानुष-तीर्थाच्या पूर्वेस एक कोस अंतरावर 'आपगा'-नामक सिद्धसेवित प्रख्यात नदी आहे. तेथें देव व पितर यांस उद्देशून 'श्यामाक'—धान्याचें भोजन देणाऱ्या मानवास फार मोठें पुण्य लागतें. तेथें एका ब्राह्मणाला भोजन घातल्यानें कोटि ब्राह्मणभोजनाचें श्रेय लाभतें. तेथें स्नानादि करून एक रात्र वास केल्यास अग्निष्टोमाचें फल मिळतें.

हे राजेंद्रा, तेथून 'ब्रह्मोदुंबर' या नांवानें भूलोकीं प्रसिद्ध असलेल्या ब्रह्मदे-वाच्या उत्तम स्थानीं जावें. तेथील 'सप्तर्षि'—कुंडामध्यें व महात्म्या कपिलाच्या 'केदारामध्यें' स्नान करावें. त्या ब्रह्मस्थानांतील स्नानादिकांच्या योगानें पुरुष सर्व पापरहित व शुद्धात्मा होऊन ब्रह्मलोकीं जातो. कपिष्ठलाच्या दुर्लभ केदारास प्राप्त होऊन तपानें सर्व पाप दग्ध झालेला पुरुष अंतर्धान पावतो.

तेथून लोकप्रसिद्ध 'सरक'-तीर्थास जावें. कृष्णपक्षाच्या चतुर्दशीस 'वृषध्वजास' गेल्यानें सर्व मनोरथ पूर्ण होऊन स्वर्गलोकाची प्राप्ति होते. हे कुरुनंदना, 'सरक'-तीर्थामध्यें तीन कोटी तीर्थें आहेत. त्याचप्रमाणें रुद्रकोटींतील कूपांत व ऱ्हदामध्येंहि तशींच असंख्य तीर्थें आहेत. इलास्पदतीर्थहि तेथेंच आहे. त्यांत स्नान-पूजनादि केल्यानें मनुष्य कधींहि दुर्गतीला प्राप्त होत नाहीं व त्याला वाजपेयाचें पुण्य मिळतें. 'किंदान' व 'किंजप' यांमध्यें स्नान केलें असतां पुरुषाला त्यानें केलेल्या दानाचें व जपाचें अनंत फल मिळतें.

'कलशी'-तीर्थांतील स्नानानें श्रद्धाळु व जितेंद्रिय पुरुषाला अग्निष्टोमाचें फल मिळतें. सरक-तीर्थाच्या पूर्वेस महात्म्या नारदाचें 'अंबाजन्म' या नांवाचें लोकप्रसिद्ध तीर्थ आहे. त्यांत स्नान करून प्राणत्याग करणाऱ्या पुरुषाला नारदाच्या अनुज्ञेनें उत्तम लोकाची प्राप्ति होते. शुक्लपक्षाच्या दशमीस 'पुंडरीक'-तीर्थास जाऊन स्नान करावें म्हणजे 'पुंडरीक'-यागाचें फल मिळतें.

तेथून प्रसिद्ध 'त्रिविष्टप'-तीर्थास जावें. तेथें 'वैतरणी' या नांवाची पवित्र व पापाचा नाश करणारी नदी आहे. त्या तीर्थांत स्नान करून शूलपाणि वृषध्वजाचें पूजन केल्यानें पुरुष सर्व पापांपासून मुक्त होऊन परम गतीला जातो. हे राजेंद्रा, तेथून उत्तम 'फलकी'-वनास जावें. त्या वनाचा आश्रय करून देव हजारों वर्षें विपुल तप आचरितात.

'दृषद्वती'-मध्यें स्नान व तर्पण केल्यानें अग्निष्टोम-अतिरात्रांचें फल मिळतें. 'सर्व देवांच्या' तीर्थांत स्नान केल्यानें गोसहस्रफल आणि 'पाणिखात'-तीर्थांत स्नान व तर्पण केल्यानें अग्निष्टोम, अतिरात्र व राजसूय या यागांचें फल मिळून तो पुरुष ऋषिलोकीं जातो.

हे राजेंद्रा, तेथून उत्तम 'मिश्रक'-तीर्थास जावें. महात्म्या व्यासानें ब्राह्मणासाठीं तेथें सर्व तीर्थांचें मिश्रण केलें आहे, असें आम्हांस श्रुत आहे. जो नर या मिश्रकामध्यें स्नान करितो, त्याला सर्व तीर्थांतील स्नानांचें श्रेय लाधतें. तेथून 'व्यासवनास' जावें. 'मनोजवामध्यें' स्नान करणाऱ्या पुरुषाला गोसहस्रफल मिळतें. देवीच्या 'मधुमती'-तीर्थास जाऊन पुरुष पवित्र होतो. तेथें स्नानादि केल्यानें देवीच्या अनुज्ञेनें त्याला गोसहस्रफल मिळतें.

कौशिकी व दृशद्वती यांच्या संगमावर जो नियताहार पुरुष स्नान करितो तो सर्व पापांपासून मुक्त होतो. तेथून व्यासस्थलीस जावें. तेथें पुत्रशोकानें

संतप्त झालेल्या बुद्धिमान् व्यासानें देहत्यागाचा निश्चय केला. पण देवांनीं त्याला त्या स्थलींतून वर काढलें. त्या गोस्थलीस गेल्यानें सहस्र गोप्रदानांचें फल मिळतें. 'किंदत्त'-कूपावर तिलप्रस्थाचें दान दिलें असतां पुरुष सर्व ऋणांतून मुक्त होऊन परम सिद्धीला प्राप्त होतो.

'वेदी-तीर्थांत स्नान केल्यानें सहस्र गोप्रदानाचें फल मिळतें. सुप्रसिद्ध 'अह' व 'सुदिन' या दोन तीर्थांत स्नान केल्यानें पुरुष सूर्यलोकीं जातो. 'मृगधूमास' जाऊन गंगेंत स्नान करावें व महादेवाचें पूजन करावें, म्हणजे अश्वमेधाचें फल लाभतें. 'देवीतीर्थांत' स्नान केल्यानें गोसहस्रफल मिळतें. तेथून प्रसिद्ध 'वामनकास' जावें. त्या क्षेत्रांतील विष्णुपदीं स्नान करून वामनाचें पूजन केलें असतां पुरुष सर्व पापांपासून मुक्त होऊन विष्णुलोकीं जातो.

'कुलंपुनांत' स्नान केल्यानें पुरुष स्वकुलाचा उद्धार करितो. 'पवनऱ्हद' या नांवाच्या उत्तम मरुत्तीर्थांत स्नान केल्यानें पुरुषश्रेष्ठ विष्णुलोकीं पूज्य होतो.

'अमरऱ्हदांत'स्नान व अमराधिपाचें पूजन केल्यानें अमरांच्या प्रभावानें तो स्वर्गलोकीं पूज्य होतो. शालिहोत्राच्या शालिसूर्यतीर्थांत यथाविधि स्नान केल्यानें गोसहस्रफल मिळतें.

हे भरतश्रेष्ठा, सरस्वतीच्या 'श्रीकुंज'-तीर्थांतील स्नानाचें अग्निष्टोमफल मिळतें. नैमिषारण्यांतील तपस्वी ऋषि 'नैमिषकुंजास' प्राप्त होऊन तीर्थयात्रा प्रसंगानें पूर्वीं कुरुक्षेत्रास गेले आणि तेथें ऋषींना स्नानादि करण्यास अवकाश मिळेल व त्यांना सुखावह होईल, असा सरस्वतीचा कुंज त्यांनीं निर्माण केला. त्यांतील स्नानाचें अग्निष्टोमफल सांगितलें आहे.

सर्वोत्तम 'कन्या'-तीर्थांत स्नान केल्यानें गोसहस्रफल मिळतें. तेथून ब्रह्मतीर्थास जावें. तेथें स्नान केल्यानें शूद्रहि ब्राह्मण्यास प्राप्त होतो व ब्राह्मण शुद्धचित्त होऊन परम गतीला जातो. तेथून 'सोम'-तीर्थास जावें· त्यांत स्नान केल्यानें सोमलोक प्राप्त होतो. तेथून सप्तसारस्वतास जावें.

हे राजा, त्याच तीर्थांत पूर्वीं लोकप्रसिद्ध 'मंकणक'-सिद्ध रहात होता. एकदां त्याच्या हाताला कुशाग्र टोचलें व त्यांतून शाकरस वाहूं लागला. तो पाहून ऋषि मोठ्या हर्षानें नाचूं लागला. ऋषि नाचत आहे, असें पाहून त्याच्या तेजानें मोहित झालेलें सर्व स्थावर-जंगम नृत्य करूं लागलें. तेव्हां ब्रह्मादि देव

व तपोधन ऋषि यांनीं महादेवाकडे जाऊन ‘ हे देवा, ज्यायोगें हा ऋषि नृत्य करणार नाहीं, असा कांहीं उपाय योज ’ अशी त्यास विज्ञप्ति केली.

तेव्हां देवांच्या हितेच्छेनें महादेव त्या ऋषीपाशीं आला व संतुष्ट चित्तानें त्यास म्हणाला—“ हे धर्मज्ञ महर्षे, तूं नृत्य कां करितोस ! तुझ्या या हर्षाचें कारण काय ! ”

तें ऐकून ऋषि म्हणाला—हे द्विजसत्तमा, धर्ममार्गामध्यें स्थित असलेल्या मज तपस्व्याच्या हातांतून हा शाकरस कसा गळत आहे, हें तूं पहात नाहींस काय ! हा चमत्कार पाहून मी अतिशय हृष्ट झालों व आनंदातिशयानें नाचूं लागलों आहें.

तेव्हां तपःसिद्धीच्या आसक्तीनें मोहित झालेल्या त्या ब्राह्मणास देव हंसून म्हणाला—“हे विप्रा, मला यांत कांहींच आश्चर्य वाटत नाहीं. तूं आतां माझ्या तपाचा प्रभाव पहा.”

हे नरश्रेष्ठा, इतकें बोलून बुद्धिमान् महादेवानें आपल्या अंगुलीच्या अग्रानें अंगुष्ठावर ताडन केलें. त्यांतून बर्फासारखी शुभ्र खडीसाखर निघाली. हा चमत्कार पाहून ब्राह्मण लज्जित झाला व त्या उमापतीच्या चरणांवर मस्तक ठेवून त्यास शरण गेला.

ऋषि म्हणाला—रुद्राहून श्रेष्ठ असें दुसरें कांहीं नाहीं. हे शूलपाणे, या देव-दानवात्मक जगाची तूंच गति आहेस. हें सर्व चराचर त्रैलोक्य तूंच उत्पन्न केलेंस. कल्पक्षय झाला असतां तूंच सर्वांना ग्रासितोस. देवांनाहि तुझें तत्त्व कळणें शक्य नाहीं, मग तें मला कोठून कळणार ! हे सर्व ब्रह्मादि देव तुझ्या शरीरांत दिसत आहेत. तूं सर्व आहेस. लोकांचा कर्ता व करविता आहेस. तुझ्या प्रसादानेंच सर्व लोक निर्भयपणें या लोकीं सुख भोगितात.

याप्रमाणें स्तुति करून तो मुनिश्रेष्ठ महादेवास म्हणाला—हे भगवन्, तुझ्या प्रसादानें माझा हात अक्षत होऊन त्यांतून वाहणारा हा शाकरस थांबो.

तेव्हां महादेव प्रसन्न होऊन त्या ब्रह्मर्षीस म्हणाला—“ हे विप्रा, माझ्या प्रसादानें तुझें तप सहस्रधा वृद्धि पावो. हे महामुने, मी तुझ्या-बरोबर या आश्रमांत वास करीन. सप्तसारस्वतामध्यें स्नान करून जे माझें पूजन करितील त्यांना इहलोकीं किंवा परलोकीं दुर्लभ असें कांहीं नाहीं. ते

निःसंशय सरस्वतीच्या लोकांस प्राप्त होतील." इतकें बोलून महादेव तेथेंच गुप्त झाला.

हे राजा, नंतर 'औशनस'-तीर्थास जावें. तेथें ब्रह्मादि देव व तपोधन ऋषि यांचा नित्य वास असून भार्गवाचें प्रिय करण्याच्या इच्छेनें भगवान् कार्तिकेय नित्य त्रिकालीं त्या स्थलीं येतो. सर्व पापांची निवृत्ति करणाऱ्या 'कपालमोचन'-तीर्थांत स्नान करून पुरुष निष्पाप होतो. तेथून अग्नितीर्थास जावें. त्यांत स्नान केल्यानें अग्निलोकप्राप्ति व कुलाचा उद्धार हें फल मिळतें.

हे युधिष्ठिरा, विश्वामित्राचें तीर्थ तेथेंच आहे. त्यांत स्नान केल्यानें ब्राह्मण्याची प्राप्ति होते आणि ब्रह्मकुलांत जन्म घेऊन शुचिर्भूत व नियतचित्त होऊन, त्यांत स्नान करणाऱ्या पुरुषास ब्रह्मलोक मिळतो आणि सात पिढ्यांपर्यंत त्याच्या कुलाचा उद्धार होतो, यांत संशय नाहीं. तेथून कार्तिकेयाच्या प्रसिद्ध 'पृथूदक'-तीर्थास जावें. त्यांत स्नान करून देवार्चनांत रत व्हावें. म्हणजे ज्ञानानें किंवा अज्ञानानें केलेलें सर्व अशुभ कर्म निवृत्त होतें.

त्या लोकप्रसिद्ध तीर्थांत मानुषबुद्धीनें स्नान करणारी स्त्री असो किंवा पुरुष असो, त्यांस केवळ स्नानानेंच सर्व पापनिवृत्ति होऊन अश्वमेधाचें फल व स्वर्गलोक मिळतो. कुरुक्षेत्र अतिशय पवित्र आहे. त्याहून सरस्वती, सरस्वतीहून तीर्थें व सर्व तीर्थांहून हें पृथूदक अधिक पुण्यप्रद आहे. सर्व तीर्थांमध्यें श्रेष्ठ असलेल्या या पृथूदक-तीर्थांत जपपरायण होऊन जो शरीराचा त्याग करतो, त्याला पुनः मरणदुःख भोगावें लागत नाहीं.

सनत्कुमार व महात्मा व्यास यांनीं त्या तीर्थाचें माहात्म्य गाइलें आहे. पृथूदकाहून दुसरें श्रेष्ठ तीर्थ नाहीं. तें यज्ञार्ह, पवित्र व पावन आहे, यांत संशय नाहीं. त्यांत स्नान करून पापी नरहि स्वर्गलोकीं जातात. तेथेंच 'मधुस्रव'-तीर्थ आहे. त्यांत स्नान केल्यानें गोसहस्र फल मिळतें. तेथून क्रमानें सरस्वती व अरुणा यांच्या संगमावर जावें. त्रिरात्र उपोषण करून यांत स्नान केल्यानें ब्रह्महत्यादोष निवृत्त होतो. त्या पुरुषाला अग्निष्टोम व अतिरात्र यांचें फल मिळून त्याच्या सात पुरुषांचा उद्धार होतो.

तेथेंच 'अर्धकील'-तीर्थ आहे. दर्भीनें पूर्वी ब्राह्मणांवर अनुग्रह करण्यासाठीं तें तीर्थ उत्पन्न केलें. त्यांत स्नान करणारा ब्राह्मण व्रत, उपनयन, उपवास, क्रिया व मंत्र यांनीं युक्त होतो.

हे पुरुषश्रेष्ठा, त्यांत स्नान करून क्रिया-मंत्रविहीन असलेला ब्राह्मण व्रती व विद्वान् होतो, हें फल प्राचीन लोकांनीं अनुभविलें आहे. दर्भीनें या 'अर्धकील'-तीर्थांत चारी समुद्र आणिले आहेत, त्यामुळें त्यांत स्नान केलेला पुरुष दुर्गतीला प्राप्त होत नाहीं व त्याला चार सहस्र गोप्रदानांचें फल मिळतें.

तेथून 'शतसहस्रक'-तीर्थास जावें. तेथें लोकप्रसिद्ध दोन तीर्थें आहेत. त्यांत स्नान केल्यानें गोसहस्रफल मिळतें. तेथें केलेलें दान किंवा उपवास सहस्रपट फल देतात. तेथून उत्तम 'रेणुका'-तीर्थास जावें. तेथें अभिषेकादि केल्यानें निष्पाप झालेल्या पुरुषाला अग्निष्टोमफल मिळतें.

जितक्रोध व जितेंद्रिय पुरुषानें 'विमोचन-तीर्थांत स्नान केलें असतां तो प्रतिग्रहकृत सर्व दोषांपासून मुक्त होतो. ब्रह्मचारी व जितेंद्रिय पुरुषानें पंचवटीस जावें. तेथें गेल्यानें तो महत्पुण्यानें युक्त होऊन पुण्यवानांच्या लोकीं पूज्य होतो. पंचवटींत योगेश्वर वृषध्वज साक्षात् रहातो. त्याचें पूजन केल्यानें पुरुषाला सिद्धि प्राप्त होते. वारुणतीर्थ तैजस असून तें आपल्या तेजानें देदीप्यमान होत असतें. ब्रह्मादि देवांनीं व तपोधन ऋषींनीं गुहाला येथेंच देवांच्या सैन्यापत्यावर अभिषेक केला.

तैजसाच्या पूर्वेस कुरुतीर्थ आहे. त्यांत स्नान करणारा ब्रह्मचारी व जितेंद्रिय पुरुष सर्व पापांपासून मुक्त होऊन ब्रह्मलोकीं जातो. त्यानंतर नियतव्रत व नियताहार होऊन 'स्वर्गद्वारास' जावें. म्हणजे स्वर्गलोक व ब्रह्मलोक यांची क्रमानें प्राप्ति होते. तीर्थसेवी पुरुषानें 'अनरक'-तीर्थास जावें. त्यांत स्नान करणारास दुर्गति कधींच प्राप्त होत नाहीं.

हे राजेंद्रा, तेथें नारायणप्रभृति देवांसह साक्षात् ब्रह्मदेव नित्य येत असतो. त्या तीर्थांत रुद्रपत्नीचेंहि सांनिध्य आहे. त्या देवीच्या दर्शनानें पुरुष दुर्गतीला जात नाहीं. हे महाराज, तेथेंच असलेल्या उमापति विश्वेश्वराचें दर्शन घेतलें असतां पुरुष सर्व पापांपासून मुक्त होतो. तेथून 'पद्मनाभ'–नारायणक्षेत्रास गेल्यानें तो पुरुष अतिशय तेजस्वी होऊन विष्णुलोकीं जातो. त्या सर्वदेवांच्या तीर्थांत स्नान करणारा सर्व दुःखांपासून मुक्त होऊन चंद्राप्रमाणें कांतिमान् होतो.

तेथून स्वस्तिपुराला जाऊन त्या तीर्थाला प्रदक्षिणा घालणारास गोसहस्रफल प्राप्त होतें. 'पावन'-तीर्थाला जाऊन पितर व देवता यांचें तर्पण करणा-

रास अग्निष्टोमाचें फल मिळतें. तेथेंच ‘गंगाऱ्हद’ व ‘कूप’ हीं दोन तीर्थें आहेत. त्या तीर्थांत तीन कोटी तीर्थांचा अंतर्भाव होतो. त्या तीर्थांत स्नान केलें असतां त्या पुरुषाला स्वर्गलोकाचा लाभ होतो. ‘आपगा’-तीर्थांत स्नान करून महादेवाचें पूजन करणाराला प्रथम गणाधिपत्य प्राप्त होऊन त्याच्या कुलाचा उद्धार होतो. तेथून लोकप्रसिद्ध स्थाणुवटाला जावें. तेथें स्नान करून एक रात्र राहिलें असतां रुद्रलोक प्राप्त होतो.

तेथून ‘बदरीपाचन’-वसिष्ठाश्रमास जावें. तेथें त्रिरात्र उपोषण करून बदरीभक्षण करावें. जो बारा वर्षें बदरीभक्षण करतो व तीन दिवस उपोषण करतो, त्या दोघांनाहि सारखेंच फल मिळतें. तेथून ‘रुद्रमार्गास’ प्राप्त होऊन एक अहोरात्र उपवास केल्यानें पुरुष इंद्रलोकीं पूज्य होतो. ‘एक रात्र’-तीर्थास जाऊन तेथें नियत व सत्यवादी होऊन एक रात्र उपोषण केल्यानें पुरुष ब्रह्म-लोकीं पूज्य होतो.

तेथून महात्म्या तेजोराशि आदित्याच्या आश्रमास जावें. तें त्रैलोक्यप्रसिद्ध तीर्थ आहे. त्या तीर्थांत स्नान करून आदित्याची पूजा करणारा पुरुष आदित्यलोकीं जाऊन कुलाचा उद्धार करितो. सोमतीर्थांत स्नान करून तीर्थसेवी पुरुष सोम-लोकीं जातो. महात्म्या दधीचीच्या पुण्यतम तीर्थास जावें. तेथें तपोनिधि अंगिरा सारस्वत गेला होता. त्या तीर्थांत स्नान केल्यानें अश्वमेधफल व सारस्वती गति प्राप्त होते. तेथून नियत ब्रह्मचाऱ्यानें कन्याश्रमास जावें. तेथें त्रिरात्र उपोषण केलें असतां दिव्य कन्याशत व स्वर्गलोक यांची प्राप्ति होते.

तेथून ‘संनिहिती’—तीर्थास जावें. तेथें ब्रह्मादि देव व तपोधन ऋषि प्रत्येक मासीं येतात व महत्पुण्यानें युक्त होतात. संनिहितीलाच ‘कुरुक्षेत्र’ म्हणतात. सूर्यग्रहणाच्या वेळीं त्यांत स्नान केल्यानें शंभर अश्वमेधांचें फल प्राप्त होतें व त्याचा याग शाश्वत फल देतो.

पृथ्वीमध्यें व अंतरिक्षांत असलेलीं सर्व तीर्थें, नद्या, ऱ्हद, तडाग व इतर लहान-मोठे सर्व तीर्थभूत जलाशय प्रत्येक महिन्यांत अमावास्येच्या दिवशीं तेथें येतात, म्हणून कुरुक्षेत्राला ‘संनिहिती’ म्हणतात. त्यांत स्नान-पान करून पुरुष स्वर्गलोकीं पूज्य होतो. अमावास्येच्या दिवशीं सूर्यग्रहणाच्या वेळीं जो पुरुष कुरुक्षेत्रांत श्राद्ध करितो, त्याचें फल ऐक.

यथाविधि केलेल्या सहस्र अश्वमेधांचें फल कुरुक्षेत्रांत स्नान करून श्राद्ध करणाऱ्या मानवास प्राप्त होतें. स्त्री किंवा पुरुष यांनीं जें कांहीं दुष्कृत कर्म

केलें असेल, तें सर्व कुरुक्षेत्रांतील केवल स्नानानेंच नष्ट होतें व तो कमलासारख्या तेजस्वी विमानांतून ब्रह्मलोकीं जातो. कुरुक्षेत्राच्या द्वारपालभूत 'चक्रुक'-यक्षाला अभिवादन करून कोटितीर्थांत स्नान केल्यानें बहु सुवर्णाचा लाभ होतो. तेथील गंगाऱ्हदतीर्थांत स्नान केल्यानें राजसूय व अश्वमेध यांचें फल प्राप्त होतें, हें पूर्वी सांगितलेंच आहे.

पृथ्वीमध्यें नैमिष, अंतरिक्षांत पुष्कर व त्रिभुवनांत कुरुक्षेत्र श्रेष्ठ आहे. 'कुरुक्षेत्रांतील वायूनें उडालेली धूळहि मानवास पावन करिते' इत्यादि कुरुक्षेत्राचें वर्णन पूर्वी केलेंच आहे. तुरंतुकार व तुक आणि रामऱ्हद व चक्रुक यांच्या मधील अंतरास कुरुक्षेत्र असें म्हणतात. त्यासच समंतपंचक व पितामहाची उत्तरवेदी अशीं नांवें आहेत. ३. ७. ८३.

---

## अध्याय ८४ वा.

[ १ पुलस्त्यतीर्थयात्रा, धर्मतीर्थादिकांचें वर्णन. ]

(१) पुलस्त्य—हे महाराज, तेथून पुढें सर्वोत्तम 'धर्मतीर्थास' जावें. तेथें महाभाग धर्मानें उत्तम तप केलें. त्यानेंच हें पवित्र तीर्थ निर्माण केलें असून त्याच्याच नांवानें तें प्रसिद्ध झालें. त्यांत स्नान केल्यानें धर्मशील व शांतचित्त पुरुष आपल्या कुलांतील सात पिढ्यांचा उद्धार करितो. तेथून 'ज्ञानपावन'-तीर्थास गेल्यानें अग्निष्टोमाचें फल व मुनिलोक यांची प्राप्ति होते. हे राजा, तेथून 'सौगंधिक'-वनास जावें. तेथें ब्रह्मादि देव, ऋषि, सिद्ध, चारण, इत्यादि श्रेष्ठ जीव निवास करितात. त्या वनांत प्रवेश करतांच पुरुष सर्व पापांपासून मुक्त होतो. तेथून पुढें सर्व नद्यांतील उत्तम नदी, जी 'प्लक्षा' देवी सरस्वती तिच्या तीरावर जाऊन स्नान करावें. त्या नदीचें जल एका वारुळांतून येत असतें. तेथें देव व पितर यांचें पूजन केल्यानें अश्वमेधाचें फल मिळतें.

तेथेंच 'ईशानाध्युषित' या नांवाचें दुर्लभ तीर्थ आहे. ज्या वल्मीकांतून तें पुण्यजल बाहेर येतें, तेथून 'शम्या' या नांवाचें मुद्गराकृति यज्ञोपकरण एखाद्या बलवान् पुरुषानें फेंकलें असतां तें जेथवर जाऊन पडतें, त्याच्या सहापट प्रदेशांत केलेलें पुण्यकर्म सहस्र कपिलादानाचें व अश्वमेधाचें फल देतें, असें भविष्यपुराणादिकांत सांगितलें आहे.

'शतकुंभा,' 'सुगंधा' व 'पंचयक्षा' या तीर्थांस जाणाराला स्वर्गलोक प्राप्त होतो. तेथेंच 'त्रिशूलखात'-नांवाचें तीर्थ आहे. पितर व देव यांच्या पूजनांत तत्पर असलेल्या पुरुषानें तेथें स्नान केलें असतां त्याला गाणपत्याची प्राप्ति होते. हे राजेंद्रा, तेथून देवीच्या 'शाकंभरी' या नांवानें प्रसिद्ध असलेल्या दुर्लभ स्थानास जावें. ती सुव्रतादेवी एक सहस्र वर्षें आहार वर्ज्य करून प्रत्येक महिन्यास एकदा शाकाहार करीत असे. त्या देवीच्या भक्तीनें तपोधन ऋषि तेथें आले असतां तिनें त्यांचें शाकेनेंच आतिथ्य केलें. त्यामुळें तिचें 'शाकंभरी' हें नांव प्रसिद्ध झालें. त्या स्थानास प्राप्त होऊन ब्रह्मचर्य व चित्तसमाधान यांनीं युक्त असलेल्या पुरुषानें त्रिरात्र उपोषण करावें व चवथ्या दिवशीं शाकाहार करावा. म्हणजे त्या शुचिर्भूत पुरुषाला बारा वर्षें शाकाहार केल्याचें फल देवीच्या अनुग्रहानें मिळतें.

तेथून प्रसिद्ध सुवर्णाख्य क्षेत्रास जावें. तेथें विष्णूनें पूर्वीं रुद्राच्या प्रसादासाठीं त्याची आराधना केली. त्यामुळें देवतांना दुर्लभ असलेले अनेक वर त्यास प्राप्त झाले. संतुष्ट झालेल्या त्रिपुरनाशकानें त्यास म्हटलें—"हे कृष्णा, तूं या लोकीं सर्वांना अतिशय प्रिय होशील. सर्व जगत् त्वत्प्रधान होईल' यांत संशय नाहीं.

हे राजेंद्रा, तेथें जाऊन वृषध्वजाचें पूजन केल्यानें पुरुषाला अश्वमेधाचें फल व गाणपत्य यांची प्राप्ति होते. तेथून 'धूमावतीस' जावें. तेथें त्रिरात्र उपोषण केल्यानें सर्व इष्ट भोग प्राप्त होतात. त्या देवीच्या दक्षिणार्धभागीं 'रथवर्त'-नामक स्थान आहे. श्रद्धालु जितेंद्रिय पुरुषानें त्यावर आरोहण करावें. म्हणजे तो महादेवाच्या प्रसादानें परम गतीला प्राप्त होतो.

हे भरतश्रेष्ठा, त्या स्थानाला प्रदक्षिणा घालून सर्व पापनाशक 'धारा'-स्थानास प्राप्त व्हावें. त्या धारेमध्यें स्नान केलें असतां पुरुषावर शोकाचा प्रसंग येत नाहीं. तेथून पुढें जात असतां महागिरीला नमस्कार करून स्वर्गद्वारतुल्य असलेल्या गंगाद्वारास प्राप्त व्हावें. तेथील कोटितीर्थामध्यें शांतचित्तानें स्नान करावें, म्हणजे 'पुंडरीक'-यागाचें फल मिळून कुलाचा उद्धार होतो. तेथें एक रात्र राहिल्यास गोसहस्रफल मिळतें.

'सप्तगंग,' 'त्रीगंग' व 'शक्रावर्त' यांमध्यें देव व पितर यांचें यथाविधि तर्पण करणारा पुरुष स्वर्गांतील पुण्यलोकीं पूज्य होतो. 'कनखल'-तीर्थांत

स्नान करून त्रिरात्र तेथें उपवास करणारास अश्वमेधाचें फल प्राप्त होऊन मरणोत्तर स्वर्गलोक मिळतो.

हे नराधिपा, तेथून तीर्थसेवी पुरुषानें ' कपिलावटाला' जावें. तेथें एक रात्र उपोषण केल्यानें गोसहस्र फल मिळतें. महात्म्या कपिलाचें लोकप्रसिद्ध ' नागराज-तीर्थ' आहे. त्या नागतीर्थांत स्नान केल्यानें मानवांना सहस्र कपिलांचें फल मिळतें. तेथून शांतनूच्या श्रेष्ठ ' ललितक '-तीर्थाला जावें. तेथें स्नान केल्यानें पुरुष दुर्गतीला प्राप्त होत नाहीं. जो पुरुष गंगा व यमुना यांच्या संगमावर स्नान करितो, त्याला दशाश्वमेधाचें फल प्राप्त होऊन त्याच्या कुलाचा उद्धार होतो.

हे राजेंद्रा तेथून लोकप्रसिद्ध 'सुगंधाला' जाणारा पुरुष सर्व पापांपासून मुक्त होऊन ब्रह्मलोकीं पूज्य होतो. तेथून रुद्रावर्ताला जाऊन स्नान करणारा तीर्थसेवी मनुष्य स्वर्गलोकीं जातो. गंगा आणि सरस्वती यांच्या संगमावर स्नान करणाऱ्या मानवास अश्वमेधाचें फल मिळून मरणोत्तर स्वर्गप्राप्ति होते.

'भद्रकर्णेश्वराला' जाऊन तेथें देवाचें यथाविधि पूजन करणारा दुर्गतीला जात नाहीं व स्वर्गांत अग्रपूजेला प्राप्त होतो. 'कुब्जाम्रकाला' जाणाराला गोसहस्रफल मिळून तो स्वर्गलोकीं जातो. 'अरुंधती'-वटाला जाऊन सामुद्रिक तीर्थांत स्नान केल्यानें अश्वमेधाचें फल, गोसहस्र फल व कुलोद्धार यांची प्राप्ति होते. पुढें क्रमानें ब्रह्मावर्तास गेल्यानें अश्वमेध व सोमलोक, यमुनेच्या उगम स्थानीं स्नान केल्यानें अश्वमेधफल व स्वर्गलोक, दर्वीसंक्रमण-तीर्थास गेल्यानें-हि तेंच फल, सिद्ध व गंधर्व यांनीं सेवन केलेल्या सिंधूच्या उगमस्थानीं जाऊन तेथें पांच रात्र निवास केल्यास विपुल वित्त आणि अति दुर्गम नदीला प्राप्त झाल्यानें अश्वमेध व स्वर्ग यांची प्राप्ति होते.

तेथून ' ऋषिकूल्या ' व ' वासिष्ठ ' या तीर्थांस जावें. सर्व वर्णांचे लोक वासिष्ठीचें उल्लंघन करून, ऋषिकूल्येमध्यें स्नान करून देवादिकांचें तर्पण करून, त्यांस प्राप्त होतात. भृगुतुंगास जाऊन एक महिना शाकाहार करीत राहिल्यास अश्वमेधाचें फल मिळतें. वीरप्रमोक्षतीर्थास जाऊन पुरुष सर्व पापांपासून मुक्त होतो.

' कृत्तिका ' व ' मघा ' यांच्या तीर्थांस प्राप्त होऊन अग्निष्टोम व अतिरात्र यांचें श्रेय मिळतें. विद्यातीर्थांस प्राप्त होऊन त्यांत स्नान करावें व रात्रीं सर्व पापांचा नाश करणाऱ्या महाश्रमामध्यें निराहार रहावें. म्हणजे शुभलोकांची प्राप्ति होते.

'महालय'-क्षेत्रांत सायंकाळीं एकदा भोजन करून एक महिना वास केल्यास पुरुष सर्व पापांपासून मुक्त होऊन त्यास विपुल सुवर्णाचा लाभ होतो आणि तो मागील दहा, पुढील दहा व आपण एक मिळून एकवीस पिढ्यांचा उद्धार करितो.

पितामहानें सेवन केलेल्या 'वैतसिकास' प्राप्त होऊन अश्वमेधफल व शुक्रत्व यांची प्राप्ति होते. सिद्धसेवित 'सुंदरिका'-तीर्थास जावें. तेथें देवगणासह ब्रह्मदेव नित्य वास करितो. नैमिषाचा शोध करीत निघालेल्या पुरुषाचें अर्धें पाप नाश पावतें व त्यांत प्रविष्ट झालेला पुरुष सर्व पापांपासून मुक्त होतो.

तीर्थतत्पर पुरुषानें तेथें एक मास वास करावा. कारण पृथ्वींतील सर्व तीर्थांचा नैमिषांत अंतर्भाव होतो. नियताहार व नियतेंद्रिय होऊन तेथें स्नान करणारांस 'गवालंभ'-यज्ञाचें फल प्राप्त होतें व तो सात पिढ्यांपर्यंत आपल्या कुलाचा उद्धार करितो. जो उपवासपरायण पुरुष नैमिषामध्यें प्राणत्याग करितो, तो सर्व लोकांमध्यें सुख भोगतो, असें विद्वान् सांगतात. हे श्रेष्ठ राजा, हें नैमिषतीर्थ नित्य मेध्य व पुण्य आहे.

गंगोद्भेदास जाऊन त्रिरात्र उपोषण करणाऱ्या पुरुषाला वाजपेयप्राप्ति होऊन तो सदा ब्रह्मीभूत होतो. सरस्वतीला जाऊन पितर व देवता यांस तृप्त करणारा पुरुष सारस्वतलोकांस प्राप्त होतो. ब्रह्मचारी व समाहित पुरुषानें तेथून बाहुदेस जावें. तेथें एक रात्र वास केल्यानें तो स्वर्गलोकीं पूज्य होतो व त्याला 'देवसत्र'-यज्ञाचें फल मिळतें. पितृ-देवार्चनपरायण पुरुषाला वाजपेयाची प्राप्ति होते. तेथून क्रमानें 'विमलाशोक'-तीर्थास जाऊन एक रात्र राहिल्यानें स्वर्गलोकीं मान्यता मिळते. तेथून सरयूंतील 'गोप्रतार'-तीर्थास जावें. त्याच तीर्थांत देहत्याग करून राम आपले भृत्य, सैन्य व वहानें यांसह स्वर्गलोकीं गेला. रामाचा प्रसाद व सत्यसंकल्प या दोन कारणांनीं त्या तीर्थांत स्नान करणारा पुरुष सर्व पापांपासून मुक्त व स्वर्गलोकीं पूज्य होतो.

हे कुरुनंदना, गोमतींतील रामतीर्थांत स्नान केल्यानें पुरुष अश्वमेधाला प्राप्त होऊन आपल्या कुलाचा उद्धार करितो. तेथें शतसाहस्रक तीर्थ आहे. नियतव्रत व मिताहार होऊन त्यांत स्नान केल्यानें गोसहस्र फल मिळतें. तेथून भर्तृस्थानास जावें, म्हणजे अश्वमेधाचें फल मिळतें. कोटितीर्थांत स्नान व गुहाचें पूजन केल्यानें गोसहस्रफल मिळतें व तो पुरुष तेजस्वी होतो.

तेथून वाराणशीस जाऊन वृषध्वजाचें पूजन करून 'कपिला'-ऱ्हदामध्यें स्नान केल्यानें राजसूयप्राप्ति होते. अविमुक्त स्थानास प्राप्त होऊन देवदेवाचें दर्शन घेतल्यानें ब्रह्महत्येचा दोष निवृत्त होतो व तेथेंच प्राणत्याग केल्यानें मोक्षप्राप्ति होते. गोमती व गंगा यांच्या प्रसिद्ध संगमावरील दुर्लभ मार्कंडेय-तीर्थास प्राप्त होऊन अग्निष्टोम व कुलोद्धार हें फल प्राप्त होतें. तेथून गयेस जाऊन अश्वमेध व कुलोद्धार यांची प्राप्ति करून घ्यावी. तेथेंच त्रैलोक्यांत प्रसिद्ध असलेला अक्षय वट आहे. त्याठिकाणीं पितरांना उद्देशून दिलेलें दान अक्षय फल देतें.

महानदींत स्नान करून पितृ-देवतांचें तर्पण करावें. म्हणजे अक्षय लोकांची प्राप्ति व कुलोद्धार होतो. तेथून धर्मारण्यानें सुशोभित झालेल्या ब्रह्मसरोवरास प्रभातीं गेल्यानें ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. ब्रह्मदेवानें त्या सरोवरांत श्रेष्ठ यज्ञीय स्तंभ उभारला आहे. त्या यूपास प्रदक्षिणा केल्यानें वाजपेयाचें फल मिळतें.

हे राजेंद्रा, तेथून लोकप्रसिद्ध 'धेनुक'-तीर्थास जावें. तेथें एक रात्र राहून तिलधेनूचें दान द्यावें. हे राजा, तेथें पर्वतावर वत्सासह संचार करणाऱ्या कपिलेचीं पावलें उमटलेलीं अद्यापि स्पष्ट दिसतात. तेथें धूलीस्नान केल्यानें सर्व अशुभ कर्मांची निवृत्ति होते. तेथून 'गृध्रवट'-नामक देवस्थानास जावें व भस्मस्नान करून वृषध्वजाचें दर्शन घ्यावें. म्हणजे ब्राह्मणाला द्वादश वार्षिक व्रताचें पुण्य लाभतें व इतर क्षत्रियादिकांच्या सर्व पापांचा नाश होतो.

तेथून गायनानें नादित झालेल्या उदय पर्वतास जावें. तेथें सावित्रीचें पद स्पष्ट दिसतें. तेथें तीक्ष्णव्रत ब्राह्मणानें संध्योपासना करावी. म्हणजे त्याला बारा वर्षें संध्योपासना केल्याचें फल मिळतें. तेथेंच प्रसिद्ध 'योनिद्वार' आहे. तेथें गेल्यानें पुरुष योनिक्लेशापासून मुक्त होतो.

जो मनुष्य गयेमध्यें शुक्ल व कृष्ण या दोन्ही पक्षांत वास करितो, तो आपल्या सात पूर्वजांचा उद्धार करितो. अनेक पुत्रांची इच्छा करावी म्हणजे त्यांतील एक तरी गयेला जाईल. किंवा अश्वमेध याग करील किंवा नील वृषभाचा उत्सर्ग करील. तेथून 'फल्गु'तीर्थास जावें. म्हणजे अश्वमेध व व फार मोठी सिद्धि प्राप्त होते.

तेथून धर्म जेथें नित्य वास करितो, त्या 'धर्मप्रस्थास' जाऊन तेथें कूपोदक निर्माण करून, त्यानें स्नान करून, शुचिर्भूत व्हावें. देव व पितर यांचें तर्पण

केल्यानें पुरुष निष्पाप होऊन स्वर्गास जातो. तेथेंच आत्मचिंतन करणाऱ्या मतंग-महर्षीचा आश्रम आहे. त्या रमणीय व श्रम आणि शोक यांचा विनाश करणाऱ्या आश्रमास जाऊन ‘गवामयन’-यज्ञाचें फल मिळतें. तेथील धर्माला स्पर्श केल्यानें अश्वमेधाचें फल प्राप्त होतें.

हे भरतश्रेष्ठा, तेथून सर्वोत्तम ब्रह्मस्थानास जावें व ब्रह्मदेवाचें दर्शन घ्यावें. म्हणजे त्याला राजसूय व अश्वमेध यांचें फल मिळतें. पुढें राजगृहास जाऊन स्नान केलें असतां तो पुरुष कक्षीवान् महर्षीप्रमाणें सुखी होतो. तेथें पुरुषानें शुचिर्भूत होऊन यक्षिणीचा नैवेद्य भक्षण करावा, म्हणजे तो महापापांपासून मुक्त होतो.

‘मणिनागाला’ गेल्यानें गोसहस्रफल मिळतें. जो मणिनागाचें तीर्थ प्राशन करितो, त्याला सर्पदंश झाला असतांहि विष बाधत नाहीं. तेथून गौतमाच्या प्रिय वनास जावें. तेथें ‘अहल्याऱ्हदांत’ स्नान केल्यानें पुरुष परम गतीला जातो, त्याच्या आश्रमास गेल्यानें आत्मैश्वर्य प्राप्त होतें. तेथें एक सुप्रसिद्ध जलाशय आहे. त्यांत स्नान केल्यानें अश्वमेधाचें फल प्राप्त होतें.

जनकराजर्षीच्या देवपूजित कूपांत अभिषेक केल्यानें विष्णुलोकाची प्राप्ति होते. ‘सर्वपापविनाशन’-तीर्थास गेल्यानें वाजपेय व सोमलोक, गंडकीस गेल्यानें वाजपेय व सूर्यलोक ‘विशल्या’-नदीस गेल्यानें अग्निष्टोम व स्वर्गलोक यांची प्राप्ति होते.

हे धर्मज्ञा, ‘अधिवंग’-तपोवनांत गेल्यानें ,तीर्थसेवी पुरुष गुह्यकामध्यें सुख भोगितो. सिद्धसेवित ‘कंपना’-नदीस गेल्यानें पुंडरीक व स्वर्गलोक, ‘माहेश्वरी’-धारेस गेल्यानें अश्वमेध व कुलोद्धार, देवांच्या पुष्करणीस गेल्यानें अश्वमेध व दुर्गतीचा अभाव हें फल प्राप्त होतें. सोमपदास जाऊन माहेश्वर-तीर्थांत स्नान केल्यानें अश्वमेधफल प्राप्त होतें. तेथें तीर्थांची एक कोटि संख्या श्रुत आहे. कूर्मरूपी असुर तिला हरण करून नेत होता. पण प्रभु विष्णूनें तिला सोडवून परत आणिलें. त्या तीर्थकोटींत स्नान करून पुंडरीक व विष्णुलोक यांची प्राप्ति होते.

हे राजेंद्रा, तेथून नारायण तीर्थाला जावें. तेथें भगवान् विष्णूचा सर्वदा निवास असतो आणि ब्रह्मादि देव, तपोधन ऋषि व आदित्य, वसु, रुद्रादि देवता त्या ठिकाणीं नित्य जनार्दनाची उपासना करितात. तेथें अद्भुत कर्मे करणारा

विष्णु 'शालग्राम'-नांवानें प्रसिद्ध आहे. त्या त्रैलोक्येश, अव्यय व वरद विष्णूचें दर्शन घेतलें असतां अश्वमेधाचें फल मिळून विष्णुलोकाची प्राप्ति होते.

तेथेंच सर्व पापांपासून मुक्त करणारा एक कूप आहे. त्या कूपांत सर्वदा चारी समुद्रांचें सांनिध्य असतें. त्यांत स्नान करणारा कदापि दुर्गतीला जात नाहीं. तेथें जाऊन अव्यय व वर देणाऱ्या महादेवाचें दर्शन घेणारा मानव मेघांतून सुटलेल्या चंद्राप्रमाणें आपल्या कांतीनें शोभतो.

'जातिस्मर'-क्षेत्रांत स्नान करून शुचिर्भूत व शुद्धचित्त पुरुषाला पूर्व जन्माचें स्मरण होतें. 'माहेश्वर'-पुरास जाऊन वृषध्वजाचें पूजन करून उपवास केल्यानें इष्ट मनोरथ पूर्ण होतात. तेथून सर्व पापविनाशक 'वामन'-तीर्थास जाऊन हरीचें दर्शन घेतलें असतां दुर्गति प्राप्त होत नाहीं.

कुशिकाश्रमास जाऊन 'कौशिकी'-तीर्थांत स्नान करावें. म्हणजे राजसूय यज्ञाचें फल मिळतें. तेथून चंपकारण्यास व ज्येष्ठिल-तीर्थास जाऊन तेथें एकेक रात्र राहिल्यानें गोसहस्रफल मिळतें. त्या क्षेत्रांत देवीसह विश्वेश्वराचें दर्शन घेतलें असतां मित्रावरुणाच्या लोकाला प्राप्त होतो व त्रिरात्र उपोषण केल्यास अग्निष्टोमाचें फल मिळतें.

'कन्यासंवेद्यास' गेलें असतां मनूचा लोक प्राप्त होतो. त्या 'कन्या'-क्षेत्रांत जो अल्पहि दान देतो, त्याला त्याचें अक्षय फल मिळतें, असें ऋषि सांगतात. तेथून प्रसिद्ध 'निर्वीर'-क्षेत्रास गेल्यास अश्वमेध व विष्णुलोक यांची प्राप्ति होते. निर्वीरा संगमावर जे दान देतात, ते निरुपद्रव शक्रलोकास प्राप्त होतात.

तेथेंच वसिष्ठाचा आश्रम आहे. त्यांत स्नान केलें असतां वाजपेयाचें फल मिळतें. देवकूटास गेल्यानें अश्वमेध व कुलोद्धार हें फल प्राप्त होतें. हे धर्मज्ञा, जेथें कुशिकपुत्र विश्वामित्रानें श्रेष्ठ सिद्धि मिळविली, त्या कौशिकमुनीच्या ऱ्हदाला जावें. तेथें एक मास निवास केला असतां अश्वमेधाचें पुण्य लागतें. त्या महाऱ्हदरूप पुण्य तीर्थाच्या तीरावर वास करणाऱ्या पुरुषाला विपुल संपत्ति मिळून तो दुर्गतीला जात नाहीं.

हे नरश्रेष्ठा, तेथें आश्रमांत रहाणाऱ्या कार्तिकेयाचें दर्शन घेणारास अश्वमेधफलाची प्राप्ति होते. त्रिभुवनांत प्रसिद्ध असलेल्या 'अग्निधारा'-तीर्थांत स्नान केल्यानें अग्निष्टोमाचें फल मिळतें. अव्यय वरद विष्णूचें दर्शन घेऊन पर्वत-

राजाच्या समीपच असलेल्या ‘ पितामह’-सरोवरास जावें. त्यांत स्नान करणारास अग्निष्टोमाची प्राप्ति होते. तेथें ब्रह्मसरोवरांतून निघालेली लोकपावन प्रसिद्ध ‘ कुमारधारा’-नदी आहे. त्यांत स्नान करणारा स्वतःला कृतार्थ मानितो व दिवसभर उपवास करून सायंकाळीं भोजन करणारा ब्रह्महत्येच्या दोषापासून मुक्त होतो.

हे कुरुनंदना, तेथून लोकप्रसिद्ध ‘ गौरीशंकर ’-नांवाच्या हिमालयाच्या शिखरावर जावें. तेथें असलेल्या ‘ स्तन’-कुंडांत स्नान केल्यानें वाजपेयाचें फल मिळतें व पितर आणि देवता यांच्या अर्चनांत तत्पर झाल्यास अश्वमेधाचें फल व इंद्रलोक यांची प्राप्ति होते.

ताम्रारुणास जाऊन तेथें ब्रह्मचर्य व चित्तैकाग्र्य यांनीं युक्त होऊन रहाणारास अश्वमेधाचें फल मिळून तो ब्रह्मलोकीं जातो. ‘नंदिनी’-तीर्थावर असलेल्या देवसेवित कूपास गेलें असतां नरमेधाचें फल प्राप्त होतें. ‘ कालिका’-संगमांत स्नान करून कौशिकी व अरुणा या नद्यांच्या तीरावर त्रिरात्र उपोषण केल्यास पुरुष सर्व पापांपासून मुक्त होतो.

तेथून उर्वशीतीर्थ, सोमाश्रम व कुंभकर्णाश्रम या क्षेत्रांस जाणाऱ्या श्रद्धालु पुरुषाचा पृथ्वीवर बहुमान होतो. ब्रह्मचारी व नियतव्रत राहून ‘कोकामुखांत’ स्नान केलें असतां पूर्वजन्मांचें स्मरण होतें, असा पूर्वजांचा अनुभव आहे.

‘पूर्व ’-नदीस जाणारा द्विज कृतार्थ होतो व तो सर्व पापांपासून मुक्त झालेला मानव इंद्रलोकीं जातो. ‘क्रौंचनिषूदन’-ऋषभद्वीपास जाऊन सरस्वती नदीमध्यें स्नान करणारा विमानांतून विहार करितो. मुनिसेवित औद्दालक-तीर्थांत स्नान केल्यानें सर्व पापांचा नाश होतो. ब्रह्मर्षिसेवित पवित्र धर्मतीर्थास गेल्यानें वाजपेयाची प्राप्ति होते. तो पुण्यवान् पुरुष विमानारूढ होऊन पूज्य होतो. चंपातीर्थावर जाऊन, भागीरथींत तर्पण करून दंडार्त-देवतेचें दर्शन घेणारास गोसहस्रफल मिळतें. ३. ७. ८४.

---

## अध्याय ८५ वा.

[ १ पुलस्त्यतीर्थयात्रा. २ नारदाचें युधिष्ठिराला तीर्थयात्रेविषयीं प्रोत्साहन. ]

(१) पुलस्त्य—हे भरतश्रेष्ठा, तीर्थराज ‘संध्यातीर्थांत’ स्नान केल्यानें पुरुषाला निःसंशय विद्याप्राप्ति होते. पुरातनकालीं रामाच्या प्रभावानें तें तीर्थ

निर्माण झालें आहे. लौहित्य-तीर्थास गेल्यानें बहु सुवर्णप्राप्ति होते. 'करतोया'-नदीस जाऊन त्रिरात्र उपोषण केल्यानें अश्वमेधाची प्राप्ति होते.

गंगा व सागर यांच्या संगमावर स्नान केल्यानें दशगुण अश्वमेधफल मिळतें. गंगेच्या परतीरास जाऊन स्नान व त्रिरात्र उपोषण केल्यानें पुरुष सर्व पापांपासून मुक्त होतो. तेथून वैतरणींतील विरज तीर्थास प्राप्त होऊन पुरुष चंद्रासारखा शोभतो. पवित्र कुलतीर्थाचें उल्लंघन केल्यानें सर्व पापांचा नाश होऊन गोसहस्रफल व स्वकुलाचा उद्धार हें फल मिळतें.

शोण व ज्योतीरथ्या यांच्या संगमावर स्नान व देव-पितृतर्पण केल्यानें अग्निष्टोमाचें फल मिळतें. शोण व नर्मदा यांच्या संगमावरील वंशगुल्मांत स्नान केल्यानें अश्वमेधाचें फल प्राप्त होतें. कोशलेंतील 'वृषभतीर्थास' जाऊन त्रिरात्र उपोषण करणाऱ्या पुरुषास वाजपेयाचें फल मिळतें. तेथीलच काल-तीर्थांत स्नान केल्यानें दहा गायी व एक वृषभ यांच्या दानाचें फल मिळतें. पुष्पवतींत स्नान व त्रिरात्र उपोषण करणाऱ्या पुरुषास गोसहस्र फल व स्वकुल-शुद्धि प्राप्त होते.

बदरिका-तीर्थांत स्नान केल्यानें दीर्घ आयुष्य व स्वर्गलोक यांची प्राप्ति होते. चंपातीर्थास जाऊन भागीरथींत उदकक्रिया करून दंडाख्य-तीर्थास गेल्यानें गोसहस्र फल मिळतें. तेथून पवित्र लपेटिकेस जाऊन तेथें स्नानादि केल्यानें वाजपेयफल मिळून तो मानव सर्व देवांना पूज्य होतो. तेथून जाम-दग्न्यानें सेवन केलेल्या महेंद्रास जाऊन रामतीर्थांत स्नान करावें. म्हणजे अश्वमेधफल प्राप्त होतें. तेथेंच 'मतंग केदार' आहे. त्यांत स्नान केल्यानें गोसहस्र फल मिळतें.

हे पांडुपुत्रा, पुढें श्रीपर्वतावर जाऊन नदीतीरावर स्नान करावें, तेथें वृषध्वजाचें पूजन केल्यास अश्वमेधाची प्राप्ति होते. श्रीपर्वतावर देवीसह महादेव व देवांसह ब्रह्मदेव मोठ्या आनंदानें राहिला होता. तेथील देव-ऱ्हदांत स्नान करून शुचि व शुद्धचित्त झालेला पुरुष अश्वमेध व परासिद्धि यांस प्राप्त होतो.

पांड्य-देशांतील देवपूजित वृषभ-पर्वतास गेल्यानें वाजपेयाचें फल मिळून स्वर्गांतील सुखोपभोग प्राप्त होतात. तेथून अप्सरांच्या गणांनीं युक्त असलेल्या कावेरीस जावें. तेथें स्नान केल्यानें गोसहस्रफल प्राप्त होतें. समुद्रतीरीं कन्या-

तीर्थ आहे. त्यांत स्नान केल्यानें सर्व पापनिवृत्ति होते. हे राजेंद्रा, समुद्रामध्यें सर्व लोकांस वंद्य व त्रिभुवनांत प्रसिद्ध असें गोकर्णक्षेत्र आहे. तेथें ब्रह्मादि देव, तपोधन ऋषि, भूत, यक्ष, पिशाच, किन्नर, महोरग, सिद्ध, चारण, गंधर्व, मानुष, पन्नग, नद्या, सागर व पर्वत उमापतीची उपासना करितात. जो पुरुष त्रिरात्र उपोषण करून तेथील ईशानाची उपासना करितो, त्याला अश्वमेध-फल व गाणपत्य यांची प्राप्ति होते. तेथेंच बारा दिवस राहिल्यानें पुरुष पूतात्मा होतो.

तेथूनच पुढें त्रैलोक्यपूजित गायत्री-क्षेत्रास जावें व त्रिरात्र वास करावा म्हणजे गोसहस्रफल मिळतें. हे राजा, जो योनिसंकर पावलेला असूनहि तेथें गायत्रीचा पाठ करितो, त्याला त्या तीर्थमाहात्म्यामुळें ती गायत्री एखाद्या गाथेप्रमाणें मुखोद्गत होते. गायत्रीचा हा प्रत्यय ब्राह्मणांच्या अनुभवानें सिद्ध झाला आहे. पण जो अब्राह्मण असतो त्याची पूर्वी सिद्ध असलेलीहि गायत्री तेथें स्फुरत नाहीं. तो तेथें पाठ करीत असला तरी विसरतो.

तेथून विप्रर्षि संवर्ताच्या वापीस जावें. म्हणजे तो रूपवान् व भाग्यवान् होतो. नंतर वेणेस जाऊन त्रिरात्र उपवास करावा म्हणजे हंस-मयूरयुक्त विमान प्राप्त होतें. तेथून सिद्धसेवित गोदावरीस गेल्यानें गोमेध व वासुकीचा उत्तम लोक यांची प्राप्ति होते. वेणेच्या संगमावर स्नान केल्यानें अश्वमेधफल व वरदा-संगमावर स्नान केल्यानें गोसहस्रफल मिळतें. ब्रह्मस्थानास प्राप्त होऊन त्रिरात्र उपोषण केल्यानें गोसहस्रफल व स्वर्गलोक यांची प्राप्ति होते.

उपप्लवनास जाऊन, ब्रह्मचर्य व चित्तैकाग्र्य यांनीं युक्त होऊन तेथें त्रिरात्र उपवास केल्यानें अश्वमेधफल प्राप्त होतें. त्यानंतर कृष्णा-वेणेच्या जलापासून झालेल्या अरण्यांतील ह्रदांत स्नान केल्यानें पूर्वजन्माचें स्मरण होतें. तेथें देवराज इंद्र शत ऋतु करून स्वर्गाला गेला. त्या देवऱ्हदाला 'जातिस्मर' ऱ्हद असेंहि म्हणतात. तेथें नुस्तें गमन केल्यानेंच अग्निष्टोमफल मिळतें.

तेथून सर्वऱ्हदास जाऊन त्यांत स्नान केल्यानें, पयोष्णी-नदींत स्नान केल्यानें व दंडकारण्यास जाऊन तेथील पवित्र तीर्थांत स्थान केल्यानें गोसहस्र फल मिळतें. महात्म्या शुकाच्या शरभंगाश्रमास गेल्यानें त्या पुरुषाला केव्हांहि दुर्गति प्राप्त होत नाहीं. तेथून जामदग्न्यसेवित शूर्पारकास जाऊन रामतीर्थांत स्नान केल्यानें विपुल वित्त मिळतें.

जितेंद्रिय व नियताहार होऊन सप्त गोदावरांमध्यें स्नान केल्यानें महत्पुण्य लागतें व तो पुरुष देवलोकास जातो. तेथून देवपथास गेलें असतां देवसत्राचें पुण्य लागतें. तुंगारण्यास जाऊन ब्रह्मचारी व जितेंद्रिय व्हावें. पूर्वी सारस्वत ऋषीनें तेथें शिष्यांस वेद पढविले. अंगिरसाच्या पुत्राचे वेद नष्ट झाले असतां तो मुनि ऋषींच्या उत्तरीयामध्यें सुखानें राहिला व ओंकाराचा यथाविधि जप करूं लागला. त्यामुळें त्यानें पूर्वी ज्यांचा अभ्यास केला होता, त्या सर्व विद्या त्याला आठवल्या. तेथें ऋषि, देव, वरुण, अग्नि, प्रजापति, नारायण, महादेव व देवांसह भगवान् पितामह यांनीं भृगूला आपलें याजन करावयास सांगितलें. तेव्हां त्या तेजस्वी ऋषीनें त्यांचें यथाविधि पुनराधान केलें. आज्यभागानें अग्नीला तृप्त केलें. त्यामुळें देव व ऋषि क्रमानें आपापल्या स्थानीं गेले.

राजा, त्या तुंगकारण्यांत प्रविष्ट झालेल्या स्त्रीचें अथवा पुरुषाचें सर्व पाप नष्ट होतें. विद्वान् पुरुषानें नियत व नियताहार होऊन तेथें एक मास वास करावा, म्हणजे तो ब्रह्मलोकीं जातो व आपल्या कुलाचा उद्धार करतो. 'मेधाविकास' प्राप्त होऊन पितर व देव यांस तृप्त करावें, म्हणजे अग्निष्टोम-फलाची प्राप्ति होऊन स्मृति व धारणाशक्ति यांचा लाभ होतो.

तेथेंच 'कालंजल' या नांवाचा एक लोकप्रसिद्ध ह्रद आहे. त्यांत स्नान केल्यानें गोसहस्रफल मिळतें.

हे भरतश्रेष्ठा, जो पुरुष 'कालंजल'-पर्वतावरील देवह्रदांत स्वतः स्नान करून दुसऱ्यास स्नान घालतो, तो स्वर्गलोकीं पूज्य होतो. तेथून पर्वतश्रेष्ठ चित्रकूटास जावें. तेथें सर्व पापांचा नाश करणारी मंदाकिनी आहे. तिच्या पवित्र जलांत स्नान करून पितृ-देवार्चनांत रत झालेल्या पुरुषास अश्वमेध व परम गति यांचा लाभ होतो.

हे धर्मज्ञा, तेथून महासेन गुह जेथें नित्य संनिहित असतो, त्या सर्वोत्तम भर्तृस्थानास जावें. तेथें गेल्यानेंच तो सिद्ध होतो. कोटितीर्थांत स्नान केल्यानें गोसहस्र फल मिळतें. त्याला प्रदक्षिणा घालून ज्येष्ठ स्थानास जावें व महादेवाची पूजा करावी. म्हणजे तो पुरुष चंद्राप्रमाणें शोभतो.

हे युधिष्ठिरा, तेथून पुढें ज्यांत चार समुद्र रहातात, त्या प्रसिद्ध कूपाजवळ जाऊन स्नान व पितृदेवार्चन यांत रत व्हावें म्हणजे पुरुष नियतचित्त व पावन होऊन परम गतीला जातो. हे राजेंद्रा, पूर्वी दाशरथि राम जेथून गंगेचें उल्लं-

वन करून गेला त्या शृंगवेर पुरास जावें. त्या तीर्थांत स्नान केल्यानें सर्व पापें नाश पावतात. गंगेंत स्नान करून ब्रह्मचारी व समाहित पुरुष निष्पाप होतो व त्याला वाजपेयाचें फल मिळतें.

तेथून मुंजवटास जाऊन महादेवास वंदन करावें व प्रदक्षिणा घालावी म्हणजे गाणपत्यप्राप्ति होते. तेथील जाह्नवी-तीर्थांत स्नान केल्यानें पुरुष सर्व पापांपासून मुक्त होतो.

तेथून प्रयागास जावें. तेथें देव, दिशा, लोकपाल, साध्य, पितर, सनत्कुमारादि महर्षि, अंगिरादि महर्षि, नाग, सिद्ध, गंधर्व, अप्सरा, नद्या, सागर, प्रजापतीसह भगवान् हरि इत्यादि सर्व राहतात. तेथें तीन कुंडें असून त्यांच्या मधून जाह्नवी मोठ्या वेगानें वहाते.

सूर्यकन्या देवी यमुना त्रिभुवनांत प्रसिद्ध आहे, ती लोकपावन नदी तेथेंच गंगेला मिळाली आहे. गंगा व यमुना यांचा मध्यप्रदेश हेंच पृथ्वीचें जघन आहे, प्रयाग हें उपस्थ आहे, कंबल व अश्वतर हें प्रतिष्ठान आहे व भोगवती हें तीर्थ आहे. हा सर्व प्रदेश प्रजापतीची वेदी आहे.

त्या सुक्षेत्रांत मूर्तिमंत वेद, यज्ञ व तपोधन ऋषि प्रजापतीची उपासना करितात. देव व चक्रधर राजे मोठमोठे याग करितात. म्हणूनच प्रयागक्षेत्र सर्व तीर्थांहून श्रेष्ठ व पुण्यतम मानिलें आहे. तेथें गमन केल्यानें, किंवा त्या तीर्थाचें नामसंकीर्तन केल्यानेंहि पुरुष मृत्युकालाचें भय व पातक यांपासून मुक्त होतो. त्या लोकप्रसिद्ध गंगा-यमुनासंगमांत जो स्नान करितो त्याला राजसूय व अश्वमेध हें फल प्राप्त होतें. ही देवांची सुसंकृत यजनभूमि आहे. तेथें दिलेलें अल्प दानहि महत्फल देतें.

वेदांमध्यें आत्महत्येची निंदा केली आहे. व्यवहारांतहि ती निंद्य मानिली आहे. तथापि या प्रयागमरणाविषयीं आपला बुद्धिभेद होऊं देऊं नये. कारण साठ कोटि, दहा हजार तीर्थें या प्रयागांत नित्य संनिहित असतात, असें सांगितलें आहे. चारी विद्येचें अध्ययन व सत्य भाषण केल्यानें जें पुण्य प्राप्त होतें, तेंच गंगा-यमुनासंगमांत स्नान केल्यानें लाभतें.

तेथें ‘ भोगवती ’ या नांवाचें वासुकीचें उत्तम तीर्थ आहे. त्यांत स्नान करणारास अश्वमेधाचें फल प्राप्त होतें. तेथें त्रैलोक्यविश्रुत ‘हंसप्रपतन’-तीर्थ आहे व गंगेमध्यें दशाश्वमेधिक तीर्थ आहे. गंगा कुरुक्षेत्रासारखी आहे, यास्तव

तिच्यामध्यें कोठेंहि स्नान करावें. पण कनखलामध्यें स्नान करण्यांत विशेष आहे. प्रयागांतील स्नानाचें तर फारच महत्त्व आहे.

एखाद्या मनुष्यानें कितीहि पाप केलें असलें तरी गंगेंत स्नान केल्यानें त्याचें क्षालन होतें. अग्नि जसा काष्ठाला दग्ध करितो, त्याप्रमाणें गंगोदक सर्व दुष्कर्मांचा नाश करितें. कृतयुगांत सर्वच तीर्थें पवित्र आहेत. त्रेतायुगांत पुष्कर, द्वापरांत कुरुक्षेत्र व कलियुगांत गंगा पवित्र मानली आहे. पुष्करामध्यें तप करावें. महालयांत दान द्यावें. मलयावर अग्न्यारोहण करावें. भृगुतुंगावर उपवास करावे, पण पुष्कर, कुरुक्षेत्र व मगधांतील गंगा यांत केवल स्नान केल्यानेंच पुरुष मागच्या सात व पुढच्या सात पिढ्यांचा उद्धार करितो.

गंगा नामस्मरणानेंच पुरुषाला पावन करिते, दर्शनानें त्याचें कल्याण करिते आणि स्नान व पान यांच्या योगानें सात पुरुषांपर्यंत कुलाचा उद्धार करिते. मनुष्याच्या अस्थीला जोंवर गंगाजलाचा स्पर्श होत असतो तोंवर तो स्वर्गलोकीं पूज्य होतो. गंगेंतील पुण्य तीर्थें व पवित्र आयतनें यांची उपासना केल्यानें पुरुषाला पुण्य लागतें व तो देवलोकाचा अधिकारी होतो.

गंगेसारखें पवित्र तीर्थ, केशवाहून श्रेष्ठ देव व ब्राह्मणाहून उत्तम मानव नाहीं, असें पितामहानें सांगितलें आहे. हे महाराज, जेथें गंगा असते तोच देश, तेंच तपोवन व गंगातीर हेंच सिद्धिक्षेत्र आहे, असें जाणावें. हें सत्यवचन ब्राह्मण, साधु, पुत्र, मित्र व अनुकूल शिष्य यांच्या कानांत सांगावें. हें वचन धन, धर्म व स्वर्ग यांस हितावह आहे. हें पुण्य, रम्य, पावन व उत्तम धर्म्य आहे. हें महर्षींचें सर्व पापनाशक गुह्य आहे.

पुलस्त्याची ही यात्रा ब्राह्मणामध्यें जो कथन करितो तो स्वतः निष्पाप होऊन स्वर्गलोकीं जातो. हें तीर्थवंशानुकीर्तन वित्त, स्वर्ग व पुण्य देणारें आहे. तें वैराचें शमन करून कल्याण करितें. पुरुषाची धारणाशक्ति वाढवितें. याच्या श्रवणानें अपुत्राला पुत्र, निर्धनाला धन, राजाला पृथ्वीजय व वैश्याला विपुल ऐश्वर्य देतें. शूद्राला इष्ट भोग प्राप्त होतात व ब्राह्मण वेदशास्त्रपारंगत होतो. जो पुरुष या तीर्थपुण्याचें नित्य श्रवण करितो तो निष्पाप होऊन मागच्या अनेक जन्मांस स्मरतो व स्वर्गसुख भोगितो.

(२) हे राजन्, मीं तुला गम्य व अगम्य तीर्थें सांगितलीं. सर्व तीर्थांच्या दर्शनेच्छेनें मनांत त्यांचें चिंतन करावें. वसु, साध्य, आदित्य, मरुत, अश्विनि-

कुमार व देवतुल्य ऋषि या सर्व सुकृतेच्छु महात्म्यांनीं यांत स्नानें केलीं आहेत; त्याचप्रमाणें हे सुव्रता, तूंहि नियतचित्त होऊन तीर्थाटन कर व पुण्यानेंच पुण्याची वृद्धि कर.

शास्त्रदृष्टि सत्पुरुष शुद्ध इंद्रियें, श्रद्धा व श्रुतिवचन यांनीं युक्त होऊन या सर्व तीर्थांस प्राप्त होतात. व्रतरहित, अशुद्धचित्त, अशुचि, तस्कर व कुटिलमति पुरुष या तीर्थांत स्नान करीत नाहींत. पण तूं सद्वृत्त व नित्य धर्मात्मदर्शी आहेस. तुझा पिता, पितामह व सर्व प्रपितामह आणि ऋषींसह ब्रह्मादिदेव हे सव तुझ्या धर्मानें संतुष्ट झाले आहेत. हे इंद्रोपम भीष्मा, तूं वसूंच्या लोकांस प्राप्त होशील व या लोकीं तुझी शाश्वत महत्कीर्ति होईल.

नारद्—हे पांडवा, भीष्माला असें बोलून व त्याची अनुज्ञा घेऊन भगवान् पुलस्त्य ऋषि प्रसन्नचित्तानें तेथेंच अंतर्धान पावला. हे कुरुनंदना, ज्यानें शास्त्राचा तत्त्वार्थ जाणला आहे, अशा भीष्मानेंहि पुलस्त्यवचनावरून पृथ्वी-पर्यटन केलें. याप्रमाणें ही पावन करणारी पापनाशक तीर्थयात्रा लोकांमध्यें प्रसिद्ध झाली आहे. जो या विधीनें पृथ्वीवर संचार करील त्याला मरणोत्तर शंभर अश्वमेधांचें फल मिळेल.

पण हे धर्मराजा, तुला तर त्याच्याहि आठपट पुण्य लागेल. कुरुश्रेष्ठ भीष्मालाहि पूर्वीं असेंच पुण्य लाधलें आहे. कारण तूं आपल्याबरोबर हा सर्व ऋषिसमुदाय नेशील. हे भारता, हीं सर्व तीर्थें राक्षसांच्या गणांनीं व्याप्त आहेत. त्यामुळें या पूर्वीं एवढ्या ऋषिसमूहासह तुजवांचून दुसरा कोणताच राजा या तीर्थांना गेलेला नाहीं.

जो मनुष्य प्रातःकालीं उठून या देवर्षिसेवित चरित्राचें नित्य पठन करितो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो. वाल्मीकि, कश्यप, आत्रेय, कुंडजठर, विश्वामित्र, गौतम, असित, देवल, मार्कंडेय, गालव, भरद्वाज, वसिष्ठ, उद्दालक, शौनक, पुत्रासह तपस्वी व्यास, मुनिश्रेष्ठ दुर्वास, महातप जाबालि, हे सर्व तपोधन ऋषिश्रेष्ठ तुझी प्रतीक्षा करीत आहेत.

हे महाराज, या ऋषींसह तूं पूर्वोक्त तीर्थांस जा. महातपस्वी लोमशऋषि लवकरच तुजकडे येईल. त्याच्या बरोबर तूं तीर्थयात्रेला निघ. त्या वेळीं मीहि तुझ्याबरोबर येईन. म्हणजे शांतनुरूपानें अवतीर्ण झालेल्या महाभिष राजाप्रमाणें तुझीहि फार मोठी कीर्ति होईल.

हे कुंतीपुत्रा, जसा धर्मात्मा ययाति व राजा पुरूरवा तसा तूंहि आपल्या धर्मानें शोभतोस. जसा भगीरथ राजा व सुप्रसिद्ध राम, तसाच सूर्याप्रमाणें असलेला तूंहि आपल्या पुण्यानें सर्व भूपतींहून अधिक शोभत आहेस. मनु, इक्ष्वाकु, महा यशस्वी पूरु व वैन्य, यांप्रमाणें तूंहि प्रसिद्ध आहेस. ज्याप्रमाणें पूर्वी वृत्राचा वध करणारा देवराज आपल्या सर्व शत्रूंना दग्ध करून त्रैलोक्याचें पालन करूं लागला, त्याप्रमाणें तूंहि सर्व शत्रूंचा क्षय करून सुखानें प्रजेचें पालन करशील. हे धर्मात्म्या, तूं स्वधर्मानें पृथ्वीचें राज्य मिळवून कार्तवीर्य अर्जुनाप्रमाणें त्रिभुवनांत प्रख्यात होशील.

**वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें धर्मराजाला आश्वासन देऊन देवर्षि नारदमुनि त्याच्या अनुज्ञेनें तेथेंच गुप्त झाला. धर्मात्मा युधिष्ठिरहि त्याचेंच चिंतन करीत राहिला. त्या वीरानें तीर्थयात्रेचें पुण्य ऋषींना निवेदन केलें. २. ७. ८५.

---

## अध्याय ८६ वा.

[१ युधिष्ठिराची अर्जुनाविषयीं उत्सुकता. २ धौम्यास अन्य रम्य वनाविषयीं प्रश्न.]

(१) **वैशंपायन**—हे महाराज, बुद्धिमान् नारदाचें वचन ऐकून व आपल्या भ्रात्यांचें मत जाणून राजा युधिष्ठिर पितामहतुल्य असलेल्या धौम्यास म्हणाला—"हे भगवन्, मीं त्या सत्यपराक्रम पुरुषश्रेष्ठ जिष्णूला अस्त्रें संपादन करण्यासाठीं दूर घालविलें व तो अपरिमित धैर्यानें युक्त असलेला महाबाहु माझी आज्ञा शिरसा मान्य करून कष्टकर तपश्चर्येंत प्रवृत्त झाला. तो वीर मजवर अनुरक्त व समर्थ असून तपोधन आहे. प्रभु वासुदेवाप्रमाणें तो अस्त्र-प्रयोगामध्यें अतिशय निष्णात आहे.

हे ब्रह्मन्, हे दोघे शत्रूंचा नाश करणारे कृष्ण किती पराक्रमी आहेत हें मी व प्रतापी व्यास जाणतों. वासुदेव व धनंजय हे दोघे साक्षात् विष्णु असून तीन युगांत अवतीर्ण होतात. कृतयुगांत मूर्ति-संज्ञक धर्मभार्येच्या ठिकाणीं नर-नारायणरूपानें व द्वापरांत केशवार्जुनरूपानें अवतीर्ण झाले आहेत. त्यामुळें हे दोघे पुराणपुरुष आहेत. आमच्या सारखे मानुष नाहींत.

नारदालाहि त्यांचें हें स्वरूप अवगत आहे. कारण तो मला सर्वदा हेंच सांगत असतो. त्यावरून मीहि हे दोघे नर-नारायण ऋषि आहेत, असें निश्च-

यानें जाणतों. माझा कनिष्ठ भ्राता अर्जुन समर्थ आहे, असें जाणून मीं त्याला इंद्रकील पर्वतावर पाठविलें. तो इंद्रपुत्र इंद्राहून यत्किंचित्हि न्यून नाहीं. म्हणूनच मीं त्याला त्या देवेंद्राचें दर्शन घेण्यासाठीं व त्याच्यापासून अस्त्रें संपादन करण्यासाठीं घोर अरण्यांत पाठविलें.

भीष्म व द्रोण अतिरथ आहेत. कृप व द्रोणपुत्र दुर्जय आहेत. धृतराष्ट्राच्या पुत्रानें त्या महारथांना युद्धासाठीं अनुकूल करून घेतलें आहे. ते सर्व वेदवेत्ते, शूर व सर्व अस्त्रांस जाणणारे असून पार्थाशीं युद्ध करण्याची सतत इच्छा करितात. दिव्यास्त्र जाणणारा सूतपूत्र कर्ण तर एक अग्नीच आहे. अस्त्रवेग हेंच त्याचें वायुबल, बाण याच ज्वाला, टणत्कार हाच ध्वनि व क्रोध हाच धूम असून धार्तराष्ट्र याच वायूनीं त्याला उद्दीपित केलें आहे. तो युगांतीं कालानें प्रेरणा केलेल्या प्रलयाग्नीप्रमाणें माझ्या सैन्यरूपी तृणाला दग्ध करील, यांत संशय नाहीं.

पण कृष्णरूपी वायूनें प्रेरणा केलेला, दिव्यास्त्ररूपी विद्युत्समूहानें प्रज्वलित झालेला, श्वेत अश्व याच बलाकांस धारण करणारा, गांडीव याच इंद्रधनुष्यानें दुःसह होणारा व शरधारांनीं क्षुब्ध झालेला अर्जुनाख्य मेघ समरांगणांत प्रदीप्त कर्णाग्नीला शांत करील, यांत संशय नाहीं. तो बीभत्सु साक्षात् इंद्रापासूनच दिव्य अस्त्रें संपादन करील. तो भीष्मादि सर्व महारथ्यांचें निवारण करण्यास निःसंशय समर्थ आहे. एका धनंजयावांचून भीष्मादिकांना जिंकण्यास दुसरा कोणीहि समर्थ नाहीं.

पण ज्यानें सर्व अस्त्रें संपादन केलीं आहेत, असा तो बीभत्सु आमच्या दृष्टीं पडेल कीं नाहीं, याचाहि मला संशय वाटत आहे. कारण तो महात्मा तपश्चर्येचा हा महद्भार आपल्या मस्तकावर घेऊन कदाचित् जीवितालाहि मुकेल. त्याच्यावांचून आम्हां सर्वांना अतिशय क्लेश होत आहेत.

(२) हे पुरुषश्रेष्ठा, या काम्यकवनांत कृष्णेसह आम्ही सर्व पांडव अर्जुनावांचून व्याकुळ झालों आहों. आमच्या चित्ताला स्वास्थ्य नाहीं. यास्तव हे ब्रह्मन्, आम्हांला विपुल अन्न व फळें यांनीं युक्त असलेलें व पुण्य कर्में करणाऱ्या मुनिजनांनीं सेवन केलेलें दुसरें एखादें रम्य व पवित्र वन असल्यास सांग. म्हणजे आम्ही तेथें मेघाची प्रतीक्षा करणाऱ्या कृषीवलाप्रमाणें वीर व सत्यपराक्रमी अर्जुनाची मार्गप्रतीक्षा करीत कांहीं काल सुखावें

घालवूं. आपण ब्राह्मणाच्या मुखानें विविध आश्रम, रमणीय सरोवरें, नद्या व पर्वत यांचें जर वर्णन ऐकलें असेल तर तें मला सांगा. कारण अर्जुनावांचून मला आतां या काम्यकवनांत रहाणें मुळींच रुचत नाहीं. यास्तव आपण आतां अन्य रम्य प्रदेशीं जाऊं या. ३-७-८६.

---

## अध्याय ८७ वा.

[ १ धौम्यानें पूर्व दिशेंतील तीर्थादिकांचें केलेलें वर्णन. ]

( १ ) वैशंपायन—हे परिक्षित्पुत्रा, चारी पांडव व पांचाली अर्जुनासाठीं अतिशय उत्सुक व दीन झालीं आहेत, हें पाहून बृहस्पतितुल्य असलेला धौम्य त्यांच्या चित्ताचें समाधान करीत म्हणाला—"हे निष्पाप युधिष्ठिरा, ब्राह्मणांना अतिशय संमत असलेले पुण्य आश्रम, दिशा, तीर्थें व पर्वत मी तुला सांगतों. माझ्या तोंडून त्यांचें श्रवण केल्यावर द्रौपदी व भ्राते यांसह तूं शोकरहित होशील.

हे पांडवा, अगोदर त्यांच्या श्रवणानेंच तुला पुण्य लागेल. पण हे नरोत्तमा, तेथें प्रत्यक्ष गेल्यास त्याहून शतपट पुण्याचा लाभ होईल. मी प्रथम राजर्षींनीं सेवन केलेल्या रम्य प्राची दिशेचें यथास्मृति वर्णन करितों.

त्या देवर्षिसेवित दिशेंत 'नैमिष' या नांवाचें पवित्र स्थान आहे. त्यांत देवांचीं पृथक् पृथक् पुण्य तीर्थें आहेत. देवर्षिसेवित पुण्य व रम्य गोमती-नदीहि तेथेंच आहे. देवांची यज्ञभूमि व सूर्यपुत्र यमाचें 'शामित्र'-यज्ञांतील पशुमारणस्थान तेथेंच आहे.

राजर्षिसेवित पुण्य गय पर्वत व पवित्र ब्रह्मसरोवरहि नैमिषांतच असून देव व ऋषि त्यांचें सेवन करितात.

हे पुरुषश्रेष्ठा, त्यासाठींच 'पुष्कळ पुत्रांची इच्छा करावी, म्हणजे त्यांतील एक तरी गयेला जाईल, अश्वमेध करील किंवा नील वृषाचा उत्सर्ग करील आणि मागच्या व पुढच्या दहा पुरुषांचा उद्धार करील' असें पुरातन विद्वान् सांगतात.

हे नरेंद्रा, महानदी, गयशिर व अक्षय्यकरणवट तेथेंच आहे. हे प्रभो, गयेंत पितरांना उद्देशून दिलेलें अन्न अक्षय्य होतें. तेथेंच पुण्य जलानें युक्त

असलेली 'फल्गु'-नांवाची महानदी व विपुल फल-मूलांनीं युक्त असलेली कौशिकी नदी आहे. तपोधन विश्वामित्राला ब्राह्मणत्व तेथेंच प्राप्त झालें.

भगीरथानें जिच्या तीरावर विपुल दक्षिणायुक्त अनेक क्रतु केले, ती गंगा-नदीहि तेथेंच आहे. हे कुरुनंदना, जेथें कौशिक विश्वामित्रानें पुत्रांसह याग केला, तें पंचाल देशांतील 'उत्पलावन' प्रसिद्ध आहे. सर्व ब्राह्मण त्याचें महत्त्व सांगत असतात. विश्वामित्राची ती अतिमानुष विभूति पाहून भगवान् जामदग्न्यानेंहि त्याच्या वंशांची प्रसंशा केली. कान्यकुब्ज देशांत त्या कौशिकानें इंद्रासह सोमपान केलें व तो क्षत्रियवर्णांतून बाहेर पडून स्वतःला ब्राह्मण म्हणवूं लागला.

हे वीरा, गंगा व यमुना यांचा लोकप्रसिद्ध संगम जन्म-मरणादि लोक-प्रसिद्ध दुःखांपासून सोडविणारा, त्यामुळेंच ऋषिसेवित, धर्मवृद्धिकर व पापनाशक आहे. तेथें भूतात्म्या पितामहानें प्राचीन कालीं याग केला. त्यामुळें तो संगम 'प्रयाग' या नांवानें प्रसिद्ध झाला. हे राजा, तेथें अगस्त्याचा आश्रम आहे. तें तापसारण्य अनेक तापसांनीं भूषित झालें आहे.

'कालंजल'-पर्वतावर एक 'हिरण्यबंधु'-नांवाचा रम्य उपपर्वत आहे. त्याला 'आगस्त्यपर्वत' असेंहि म्हणतात. तो पवित्र व शुभ आहे. महात्म्या भार्गवाचा महेंद्रपर्वत प्रसिद्ध आहे. पितामहानें पूर्वीं तेथेंहि याग केला. ज्या 'मणिकर्णिका'-नांवाच्या सरोवरांत पवित्र भागीरथी प्रविष्ट झाली, तिच्या तीरावरील प्रदेशाला 'ब्रह्मशाला' असें म्हणतात. तिचें 'वाराणसी' असेंहि दुसरें नांव आहे. तो प्रदेश निष्पाप तापसांनीं नेहमीं व्याप्त असतो. त्या वाराणसीचें दर्शन अतिशय पुण्यप्रद आहे.

'मतंगाचा केदार' या नांवानें प्रसिद्ध असलेला एक मोठा आश्रम आहे. तो पवित्र व मंगलप्रद आहे. तेथेंच विपुल फळें, मुळें व उदक यांनीं रम्य झालेला 'कुंडोद-पर्वत' आहे. तेथें तृषेनें व्याकुळ झालेल्या नैषधाला मधुर जल मिळालें व तो सुखी झाला. तेथेंच तापसांनीं सुशोभित झालेलें पवित्र देववन आहे. त्या पर्वतावर 'नंदा' व त्याच्या समीप 'बाहुदा'-नदी आहे.

हे धर्मात्म्या, याप्रमाणें मीं तुला पूर्वदिशेंतील तीर्थें, नद्या, पर्वत व पवित्र आश्रमस्थानें सांगितलीं. आतां इतर तीन दिशांतील तीर्थादि सांगतों, तीं ऐक." ३. ७. ८७.

## अध्याय ८८ वा.

[ १ दक्षिणेंतील तीर्थादिकांचें वर्णन. ]

( १ ) धौम्य—हे धर्मराजा, दक्षिणेंतील पवित्र तीर्थें मी तुला यथामति सविस्तर सांगतों, तीं तूं ऐक. त्या दिशेंत पवित्र गोदावरी नदी प्रसिद्ध आहे. तिच्या तीरीं अनेक आश्रम असून त्या महानदींत विपुल जल आहे व अनेक तापस तिचें सेवन करितात. 'वेणा' व 'भीमरथी' या आणखीं दोन प्रसिद्ध नद्या दक्षिणेंत आहेत. त्या पापाचें भय घालविणाऱ्या आणि पशु, पक्षी व तापसालय, यांनीं भूषित झालेल्या आहेत.

राजर्षि नृगाची 'पयोष्णी'-नांवानें प्रसिद्ध असलेली आणखीं एक नदी आहे. तिच्यामध्यें विपुल जलानें युक्त व ब्राह्मणांनीं सेवित अशीं अनेक तीर्थें आहेत. नृगराजा याग करीत असतां त्याच्या समक्ष महायोगी मार्कंडेयानें त्याच्या वंशाला अनुरूप अशी गाथा गायिली, असें आम्हीं ऐकिलें आहे. "नृगाच्या यज्ञांतील सोमपानानें इंद्र हृष्ट झाला व दक्षिणांनीं ब्राह्मण संतुष्ट झाले" अशा अर्थाची ती गाथा होती.

नृगराजानें पयोष्णीच्या तीरीं वाराहतीर्थांत आपला हा याग केला. या पयोष्णीचें वर काढलेलें व भूमीवरून वायूनें उडविलेलें जल यावज्जीव केलेल्या पातकांचें क्षालन करितें. तेथें शूलपाणीचें स्वर्गाहून उंच व शुद्ध असें शृंग आहे. त्याचें दर्शन घेतलें असतां व स्वतः तसेंच दुसरें शृंग करून त्याचें दर्शन घेतलें असतां पुरुष शिवपुरास जातो.

गंगादि जलपूर्ण नद्या एकीकडे व एकटी पयोष्णी दुसरीकडे, अशी तुलना करूं लागल्यास सर्व तीर्थांहून ही पयोष्णीच श्रेष्ठ आहे, असें मला वाटतें. त्या दक्षिण दिशेंतच विपुल फळें व मुळें यांनीं युक्त असें 'माठरवन' आहे व 'वर्णश्रोतस'-पर्वतावर एक यूप आहे. राजा, प्रवेणीच्या उत्तर मार्गांतील व पवित्र कण्वाश्रमांतील पुण्य तापसारण्यें मीं जशीं ऐकलीं होतीं तशीं तुला कथन केलीं.

शूर्पारकांत महात्म्या जमदग्नीची वेदी आहे. 'चंद्रा' व 'पाषाणतीर्था' या दोन रम्य नद्या आहेत. हे कौंतेया, अनेक आश्रमांनीं युक्त असलेलें 'अशोक'-तीर्थहि तेथेंच आहे. पांड्यदेशांत 'अगस्त्यतीर्थ' व 'वारुणतीर्थ' आहे. व

त्याच देशांत बाल्यावस्थेपासून कुमारींप्रमाणें आचरण करणाऱ्या, रागादिविहीन, परमात्मा याच पतीची इच्छा करणाऱ्या व मोठ्या भगवद्भक्त स्त्रिया आहेत.

आतां हे पांडुनंदना, मी तुला 'ताम्रपर्णी'-नदीचें माहात्म्य सांगतों. देवांनीं मोक्षाच्या इच्छेनें या नदीतीरावरील आश्रमांत फार मोठें तप आचरिलें. हे भारता, 'गोकर्ण'-क्षेत्र त्रिभुवनांत प्रसिद्ध आहे. तेथें एक मोठा ह्रद आहे. तेथील जल शीतल, विपुल, पवित्र व हितावह आहे. पाप्यांना त्याचें दर्शनहि शक्य नाहीं. तेथें वृक्ष, तृण, फल, मूळें, इत्यादिकांनीं प्रसिद्ध असलेला अगस्त्य-शिष्याचा आश्रम असून त्याला लागूनच पवित्र 'देवसम'-पर्वत आहे. त्याच प्रदेशांत 'वैदूर्य' व 'मणिमय'-पर्वतहि आहेत. विपुल फल, मूल व जल यांनीं युक्त असलेला अगस्त्याचा आश्रमहि तेथेंच आहे.

हे राजा, मी आतां तुला सुराष्ट्रांतीलहि पवित्र स्थानें, आश्रम, नद्या व सरोवरें सांगतों. तेथें 'चमसोद्भेदन' हें प्रसिद्ध आयतन आहे, असें ब्राह्मण सांगतात. समुद्रांत 'प्रभास'-संज्ञक देवांचें तीर्थ आहे. तेथेंच तापसांनीं सेविलेलें पवित्र पिंडारक तीथ व सत्वर सिद्धि देणारा 'उज्जयंत'-नांवाचा फार मोठा पर्वत आहे. हे धर्मराजा, त्याविषयीं देवर्षिश्रेष्ठ नारदानें म्हटलेला एक प्राचीन श्लोक श्रुत आहे, तो तूं ऐक—"सुराष्ट्रदेशांतील पवित्र व मृगपक्षि-सेवित 'उज्जयंत'-पर्वतावर जो तप करितो, तो स्वर्गलोकीं पूज्य होतो."

सुराष्ट्रांतच पवित्र द्वारवती नगरी आहे. त्यांत हा पुराण देव मधुसूदन रहातो. तोच साक्षात् सनातन धर्म आहे. वेदवेत्ते ब्राह्मण व आत्मज्ञ जन महात्म्या कृष्णालाच सनातन धर्म म्हणतात. हा गोविंद पवित्र वस्तूंमध्यें परम पवित्र, पुण्यांमध्यें परम पुण्य व मंगलांमध्यें परम मंगल आहे. हा सनातन पुंडरीकाक्ष देवाधिदेव त्रैलोक्यामध्यें वास करितो. तोच अव्ययात्मा परमेश्वर व व्ययात्मा क्षेत्रज्ञ आहे. अचिंत्यात्मा मधुसूदन त्याच प्रदेशीं रहातो. ३. ७. ८८.

---

## अध्याय ८९ वा.

[ १ पश्चिमेंतील तीर्थादिवर्णन. ]

(१) धौम्य—हे राजा, पश्चिम दिशेचा आश्रय करून वसलेल्या आनर्त-देशांतील तीर्थादि पवित्र स्थानें मी तुला सांगतों. प्रियंगु, आम्र, इत्यादि-कांच्या वनांनीं युक्त असलेली, वाळा व विविध फळें यांनीं शोभणारी, पश्चिम

वाहिनी पवित्र नर्मदानदी तेथें आहे. त्रैलोक्यांतील पवित्र तीर्थें, आयतनें, नद्या, वनें, पर्वत आणि ब्रह्मादि देव, सिद्ध, ऋषि व चारण, यांसह नर्मदेंत स्नान करावयास येतात. तेथें विश्रवसू-मुनीचा श्रेष्ठ आश्रम आहे, तेथेंच नर-वाहन कुबेर उत्पन्न झाला.

नर्मदेच्या समीपच 'वैदूर्यशिखर-'नांवाचा पवित्र पर्वतश्रेष्ठ आहे. तिच्या तीरावरील वृक्षांचीं पानें हिरवीं असून सर्व वृक्ष पुष्प व फलें यांनीं युक्त आहेत. त्या पर्वताच्या शिखरावर 'फुल्लपद्म'-नामक एक पवित्र व आश्चर्यकारक सरोवर आहे. हे महाराज, त्यांतील कमलें नित्य प्रफुल्लित असून देव व गंधर्व त्यांचें सेवन करितात. त्या स्वर्गोपम व देवर्षिसेवित पर्वतावर वेदध्वनि-श्रवणादि अनेक चमत्कार अनुभवास येतात.

तेथें पवित्र डोहांनीं युक्त असलेली विश्वामित्रा नदी आहे. याच पुण्यप्रद नदीच्या तीरावरील अष्टकादि महात्म्यांमध्यें स्वर्गांतून भ्रष्ट झालेला नहुषपुत्र ययाति पडला व त्या ऋषींशीं धर्म्य संवाद करून त्याला पुनः सनातन धर्म्य लोक प्राप्त झाले.

त्याच प्रदेशांत एक पवित्र डोह असून तेथेंच मैनाक पर्वत आहे. त्याच-प्रमाणें विपुल फल-मूलांनीं युक्त असलेला असित पर्वत तेथेंच आहे. कक्षसेनाचा आश्रम व च्यवन मुनींचा आश्रमहि त्याच ठिकाणीं आहे. तेथें अल्प तपश्चर्येनें मानव सिद्ध होतात.

युधिष्ठिरा, तेथेंच पशु-पक्ष्यांनीं व्याप्त असलेला शम-दमसंपन्न ऋषींचा जंबू-मार्ग नांवाचा एक आश्रम आहे. त्याच्या समीपच सतत तापसांनीं युक्त असलेल्या व पुण्यतम अशा 'केतुमाला' व 'मेध्या' या दोन नद्या व गंगाद्वार हीं प्रसिद्ध स्थानें आहेत. हे राजेंद्रा, ब्राह्मणसेवित पुण्यप्रद सैंधवारण्य तेथेंच आहे.

त्याच प्रदेशीं पितामहाचें पवित्र पुष्कर सरोवर असून वानप्रस्थाश्रमी ध्यान-परायण सिद्धांना प्रिय असलेला मुनींचा आश्रमहि आहे. हे कुरुश्रेष्ठा, तीर्थ-शीलांनीं या आश्रमांत निवास करावा म्हणून प्रजापतीनें पुढील गाथा म्हटली आहे. "सज्जनानें पुष्करतीर्थावर जाण्याची मनांत नुस्ती इच्छा जरी केली तरी त्याच्या पातकांचा नाश होऊन तो स्वर्गलोकीं सुखोपभोग घेतो." ३. ७. ८९.

---

## अध्याय ९० वा.

[ १ धौम्यानें केलेलें उत्तरेंतील तीर्थादिकांचें वर्णन. ]

( १ ) धौम्य—हे धर्मराजा, उत्तर दिशेंत जीं पवित्र तीर्थें आहेत, तीं मी तुला सांगतों. तीं तूं सावधान चित्तानें ऐक. कारण हे वीरा, ऐकलेल्या कथेचें मनांत धारण केल्यानें ती शुभ श्रद्धा उत्पन्न करिते. सरस्वती नदी अति पवित्र असून तिच्या तीरावर तीर्थांची मालिकाच लागलेली आहे. ती नदी मोठ्या वेगानें समुद्राकडे वहाते व यमुनाहि तिला येऊन मिळते. तेथेंच 'प्लक्षावतरण' या नांवाचें शुभ व अति पवित्र तीर्थ आहे. तिच्या तीरावर याग करून सरस्वतीच्या जलानें अवभृत स्नान केलेले द्विज स्वर्गलोकीं जातात.

हे निष्पापा, तेथेंच दिव्य 'अग्निशिर'-नांवाचें एक पवित्र स्थान आहे. त्या स्थानीं सृंजयपुत्र सहदेवानें मोठा याग केला. एक यष्टि मोठ्या वेगानें फेंकून ती जेवढ्या अंतरावर जाऊन पडेल, तेवढा विस्तीर्ण यज्ञमंडप घालून त्यांत याग करणें, यालाच 'शम्याक्षेप' म्हणतात. हा याग सृंजयपुत्रानें तेथें केला. त्याविषयीं इंद्रानें गाइलेली एक गाथा द्विजश्रेष्ठ या लोकीं नेहमीं गात असतात. "यमुनेच्या तीरावर सृंजयपुत्र सहदेवानें अग्नीचें सेवन केलें व त्या प्रसंगीं त्यानें एक लक्ष सुवर्णांची दक्षिणा दिली." तेथेंच चक्रवर्ती भरतराजानें एकशें अठ्ठेचाळीस अश्वमेध केले. शरभंगाचा पवित्र आश्रम तेथेंच आहे. तो पूर्वीप्रमाणें अद्यापिहि ब्राह्मणांचे सर्व मनोरथ पूर्ण करितो, असें सांगतात. हे महाराज, पूर्वी ऋषींनीं जेथें यज्ञ केले, त्या सरस्वती नदीचें वालखिल्य ऋषींनीं सतत सेवन केलें आहे. त्या महात्म्यांना ती नदी अत्यंत पूज्य वाटते.

हे युधिष्ठिरा, तेथेंच प्रसिद्ध दृषद्वती नदी आहे. नरश्रेष्ठ पांचाल्याच्या नांवानें प्रसिद्ध असलेला 'पांचाल्य'-वटवृक्षहि तेथेंच आहे. यशस्वी दाल्भ्याचा 'दाल्भ्यघोष' त्याच ठिकाणीं असून भूमीवरील तो दाल्भ्याश्रम अतिशय पवित्र असल्याविषयीं त्रिभुवनांत ख्याति आहे.

हे कुरुश्रेष्ठा, नर व नारायण हे दोघे पुराणऋषि तेथें कृष्णमृगीच्या वर्णाचे दिसतात. पण वस्तुतः ते वर्णरहित आहेत. हे प्रभो, ते दोघेहि पुराणऋषि वेदज्ञ, वेदार्थज्ञ व वेदविद्या उत्तम प्रकारें जाणणारे असून त्या दोघांनीं तेथें अनेक पवित्र यज्ञ केले. इंद्र व वरुण यांसह अनेक देवांनीं पूर्वी विशाख-यूपा-मध्यें महत्तप आचरिलें, त्याच्या योगानें तो प्रदेश पुण्यतम झाला.

जमदग्नीनें रम्य व पवित्र 'पलाशका-'मध्यें याग केला. तेव्हां सर्व श्रेष्ठ नद्या मानुष शरीरें धारण करून व आपापलें जल घेऊन तेथें आल्या व त्या ऋषिश्रेष्ठाच्या सभोंवार उभ्या राहिल्या. हे महाराज, त्या महात्म्या जमदग्नीची दीक्षा पाहून विश्वावसूनें स्वतः हा श्लोक म्हटला—"महात्मा जमदग्नि देवतांच्या उद्देशानें याग करीत असतां सर्व नद्या तेथें आल्या व त्यांनीं आपापल्या मधुर जलांनीं ब्राह्मणांस तृप्त केलें."

हे युधिष्ठिरा, गंगेनें गंधर्वादिकांनीं सेवित व किरातादिकांचें निवासस्थान अशा पर्वतश्रेष्ठ हिमालयाचा आपल्या वेगानें भेद केला. त्याच पवित्र स्थानाला 'गंगाद्वार' असें म्हणतात. तें पुण्य तीर्थ ब्रह्मर्षिगणसेवित आहे.

हे कुरुनंदना, तेथेंच 'कनखल' हें पवित्र क्षेत्र असून सनत्कुमारानें तेथें वास केला. त्याच ठिकाणीं 'पुरु'-नामक पर्वत असून पुरूरवा राजा त्या पर्वतावर गेला होता. भृगूनें ज्या महर्षिगणसेवित पर्वतावर तप केलें, तो 'भृगुतुंग' या नांवाचा भृग्वाश्रम प्रसिद्ध आहे.

जो शाश्वत नारायण भूत, भविष्यत् व वर्तमान या तिन्ही कालांचें नियमन करितो, त्या पुरुषोत्तमाचा 'विशाला' या नांवाचा आश्रम बदरीसमीप आहे. तो त्रिभुवनांत प्रसिद्ध आहे. पूर्वीं जी गंगा शीतजलानें युक्त होती, तीच तेथें उष्णजलानें वाहूं लागली. बदरीसमीप असलेल्या विशालाश्रमाजवळील गंगेंतील वाळु सुवर्णतुल्य आहे. तेथें महाभाग देव व ऋषि नित्य येतात आणि प्रभु नारायणाला नमस्कार करितात.

जेथें सनातन परमात्मा नारायण देव असतो, तेथें सर्व जगत्, सर्व तीर्थें व सर्व आयतनें रहातात. तेंच पुण्य परम ब्रह्म, तेंच तीर्थ, तेंच तपोवन व तोच परम देव होय. नारायण हाच भूतांचा महेश्वर, त्यांना कर्मफल देणारा व त्यांचें शाश्वत परम पद आहे. ज्याला जाणून शास्त्रदृष्टि विद्वान् कधींहि संतप्त होत नाहींत, तो महायोगी आदिदेव मधुसूदन जेथें असतो, तेथेंच सर्व देव, तपोधन ऋषि व सर्व सिद्ध रहातात. तो शाश्वत देव पुण्यांचेंहि पुण्य आहे, यांत संशय नाहीं.

हे राजन्, मीं तुला पृथ्वींतील पवित्र तीर्थें व आयतनें सांगितलीं. वसु, साध्य, आदित्य इत्यादि देव, देवतुल्य ऋषि व इतर महात्मे यांनीं त्यांचें सतत सेवन केलें आहे. हे कुंतीपुत्रा, तूं श्रेष्ठ ब्राह्मण व महाभाग भ्राते यांसह या

पवित्र तीर्थांतून संचार कर म्हणजे तुझी अर्जुनाविषयींची उत्कंठा शिथिल होईल. ३. ७. ९०.

## अध्याय ९१ वा.

[ १ लोमश-ऋषीचें इंद्रलोकाहून युधिष्ठिरापाशीं आगमन. २ इंद्रसंदेशकथन. ]

(१) वैशंपायन—हे राजश्रेष्ठा, याप्रमाणें धौम्यमुनि बोलत असतां महातेजस्वी लोमश-ऋषि अकस्मात् तेथें आले. तेव्हां स्वर्गलोकीं इंद्राला सामोरे जाणाऱ्या देवांप्रमाणें आपला सर्व परिवार आणि ब्राह्मण यांसह ज्येष्ठ पांडव युधिष्ठिर त्या मुनिश्रेष्ठाला सामोरा गेला आणि त्याचा यथाशास्त्र सत्कार केल्यावर धमराजानें त्या मुनीला पर्यटनाचें कारण व तेथें येण्याचा उद्देश विचारिला. तेव्हां पांडुपुत्राच्या प्रश्नानें संतुष्ट झालेला तो मुनि मधुर वाणीनें पांडवांना जणु काय हर्षवीतच म्हणाला—" हे कुंतीपुत्रा, मी यदृच्छेनेंच सर्व लोकांत संचार करीत असतों. एकदा मीं फिरत फिरत सहज इंद्रलोकीं गेलों असतां, तेथें सुरेश्वराला व त्याच्याच अर्ध्या आसनावर बसलेल्या तुझ्या सव्यसाची वीर भ्रात्याला पाहिलें. तेव्हां मला अतिशय विस्मय वाटला.

इतक्यांत ' हे मुने, तूं पांडुपुत्रांकडे जा,' अशी अमरेश्वर इंद्रानें मला आज्ञा केली. म्हणून त्या देवेंद्राच्या व महात्म्या पार्थाच्या वचनावरून मी अनुजांसह तुला भेटण्यासाठीं मोठ्या त्वरेनें येथें आलों आहें. हे वत्सा, मी तुला एक प्रिय वार्ता सांगणार आहें. ती पांचाली व हा ऋषिसमुदाय यांच्यासह तूं ऐक.

हे विभो, महाबाहु अर्जुनानें रुद्राला प्रसन्न करून त्याच्यापासून तूं सांगितलेलें तें अप्रतिम दिव्य अस्त्र संपादन केलें आहे. हे कुरुश्रेष्ठा, अमृतापासून उत्पन्न झालेलें जें ' ब्रह्मशिर '-संज्ञक उग्र अस्त्र रुद्रानें तपाच्या योगानें मिळविलें होतें, तें भयंकर अस्त्र सव्यसाची पार्थाला प्राप्त झालें आहे. तें अस्त्र प्रयोग-उपसंहारादि मंत्र, प्रायश्चित्त व मंगल यांसह त्यानें प्राप्त करून घेतलें असून शिवाय वज्र, दंड इत्यादि अन्य अस्त्रेंहि संपादन केलीं आहेत.

हे पांडुपुत्रा, महापराक्रमी पार्थानें यम, कुबेर वरुण, व इंद्र यांच्यापासूनहि अनेक दिव्य अस्त्रें मिळविलीं आहेत. त्याचप्रमाणें विश्वावसुपुत्रापासून गायन,

---

१ अस्त्राग्नीनें निरपराध जीवांचा दाह झाल्यामुळें लागणाऱ्या दोषाचें शोधन. २ दग्ध झालेल्या आरामादिकांचा पुनः विकास होणें.

वादन, नृत्य व साम यांचें यथाशास्त्र व यथाविधि ज्ञान संपादिलें आहे. अशा-प्रकारें कृतास्त्र झालेला तुझा कनिष्ठ भ्राता धनंजय गंधर्ववेद संपादन करून इंद्रलोकीं सुखानें रहात आहे.

( २ ) हे युधिष्ठिरा, आतां सुरश्रेष्ठ इंद्र पार्थाविषयीं मजपाशीं जें बोलला, तें मी तुला सांगतों, ऐक. देवेंद्र म्हणाला—‘ हे द्विजोत्तमा, तूं फिरतां फिरतां मनुष्यलोकीं जाशील, यांत संशय नाहीं. त्या वेळीं तूं त्या धर्मराजाला सांग कीं, तुझा कनिष्ठ भ्राता अर्जुन आतां अस्त्रविद्येंत प्रवीण झाला आहे. तो देवांनाहि अशक्य असलेलें निवात-कवचादिकांच्या वधाचें फार मोठें कार्य करून मग मनुष्यलोकीं परत जाईल. तोंपर्यंत तूं भ्रात्यांसह तपोनिष्ठ होऊन रहा. हे नरेंद्रा, तपासारखें श्रेष्ठ साधन नाहीं. तपानें महत्पदाची प्राप्ति होते.

मी सत्यप्रतिज्ञ कर्णाला पूर्णपणें जाणतों. तो महाधनुर्धर वीर, बलवान्, उत्साही, महायुद्धविशारद व महाअस्त्रवेत्ता आहे. तो सूर्याचा पुत्र स्कंदतुल्य असून अतिशय रूपवान् आहे.

त्याचप्रमाणें कार्तिकेयाहूनहि अधिक पराक्रमी असलेल्या अर्जुनालासुद्धां मी जाणतों. तो सूर्यपुत्र कर्ण संग्रामांत पार्थाच्या सोळाव्या कलेलाहि पात्र नाहीं. शिवाय तुला कर्णाविषयीं जें भय वाटत आहे, तें अर्जुन परत गेल्यावर मी त्याच्या कवच-कुंडलांचा अपहार करून दूर करीन. हा लोमश-ऋषि तुम्ही तीर्थ-यात्रेची मनीषा पूर्ण करील. यास्तव हे भारता, या महर्षीनें कथन केलेल्या तीर्थयात्रेच्या फलावर तूं अश्रद्धा ठेवूं नको. ३. ७. ९१.

---

## अध्याय ९२ वा.

[ १ अर्जुनसंदेशकथन. २ लोमशाचें तीर्थयात्रेस प्रोत्साहन. ३ युधिष्ठिराची कृतकृत्यता व तीर्थयात्रेचा निश्चय. ४ लोमशाच्या सूचनेवरून असमर्थ परिवाराचें निवर्तन. ]

( १ ) लोमश—हे धर्मराजा, आतां धनंजयानेंहि जें सांगितलें आहे तें ऐक. तो पृथापुत्र म्हणाला—“ हे भगवन्, तुला सर्व तपें व परम धर्म माहीत आहे. त्याचप्रमाणें श्रीमान् भूपालांचा सनातन राजधर्महि तुला अवगत आहे. तूं परम पावन पुरुषालाहि जाणतोस. यास्तव तूं तीर्थपुण्यानें पांडवांना युक्त

कर. हे तपोधना, ज्यायोगें युधिष्ठिर तीर्थास जाऊन गोप्रदानें करील, असा त्यास उपदेश कर."

असें बोलून अर्जुनानें पुनः म्हटलें—" हे विप्रश्रेष्ठा, युधिष्ठिर तीर्थयात्रा करीत असतां त्याचें राक्षसांपासून व दुर्गम प्रदेशांतून रक्षण करणारा तूंच आहेस. हे द्विजसत्तमा, दधीचिमुनि जसें इंद्राचें, किंवा अंगिरा जसें रवीचें रक्षण करितो, तसें तूं कौंतेयांचें राक्षसांपासून रक्षण कर. धर्मात्म्या युधिष्ठिराचा तूं रक्षक असल्यावर पर्वतप्राय प्रचंड राक्षस त्याच्या समीप जाण्यासहि धजणार नाहींत."

(२) युधिष्ठिरा, इंद्राची आज्ञा व अर्जुनाची प्रार्थना मान्य करून मी तुझ्या संरक्षणासाठीं तुजबरोबर पर्यटनास येईन. मीं पूर्वीं दोन वेळां तीर्थयात्रा केली आहे. तथापि आतां तुझ्याबरोबर तिसऱ्यांदा तीं पुण्यतीर्थें पाहीन. हे कुंतीपुत्रा, पूर्वीं पुण्यवान् मन्वादि राजर्षींनीं ही भयनाशक तीर्थयात्रा केली आहे.

हे युधिष्ठिरा, अंतःकरण सरळ नसलेल्या, असंस्कृत, विद्याहीन, पापाचरणी व वक्रबुद्धीच्या मनुष्यांना या तीर्थांत स्नान घडत नाहीं. परंतु, हे धर्मराजा, तूं स्वभावतःच सत्यप्रतिज्ञ, धर्माचरणी व धर्मज्ञ आहेस. यास्तव तीर्थयात्रेच्या योगानें तूं सर्व आसक्तींपासून सर्वथा मुक्त होशील. राजाभगीरथ, गय, ययाति इत्यादि भूपति जसे पुण्यवान् होते, तसाच हे युधिष्ठिरा, तूंहि आहेस.

(३) युधिष्ठिर—हे महर्षे, आपलें हें भाषण ऐकल्यावर हर्षातिशयामुळें मला काय बोलावें हें सुचत नाहीं. हे विप्रश्रेष्ठा, देवराज इंद्र ज्याचें स्मरणपूर्वक कुशल विचारितो, त्याच्याहून अधिक भाग्यवान् कोण आहे! त्याचप्रमाणें आपण ज्याला भेटून आलांत तो महापराक्रमी धनंजय ज्याचा भ्राता आहे व साक्षात् इंद्र ज्याचें स्मरण करितो, त्याच्याहून अधिक दैववान् कोण आहे!

हे भगवन्, आतां तूं मला तीर्थदर्शनाविषयीं जें सांगत आहेस, त्याविषयीं धौम्य मुनीच्या वचनावरून माझा पूर्वींच निश्चय झाला आहे. यास्तव ज्यावेळीं तीर्थदर्शनास जावें, असें तूं म्हणशील त्याच वेळीं निघण्यास मी तयार आहें. कारण तीर्थयात्रेविषयीं माझा पूर्ण निश्चय झाला आहे.

(४) वैशंपायन—जनमेजया, युधिष्ठिराचा तीर्थयात्रेला जाण्याचा दृढनिश्चय झालेला पाहून लोमश म्हणाला—" हे राजा, तूं आपल्याबरोबर अल्प परिवार घे. म्हणजे तुला इच्छेप्रमाणें सर्वत्र गमन करितां येईल."

लोमशऋषींची ही सूचना ऐकतांच युधिष्ठिर आपल्या परिवाराला परत जाण्याची आज्ञा करीत म्हणाला—"भिक्षेवर निर्वाह करणारे ब्राह्मण, यति, आणि ज्यांना क्षुधा, तृषा, प्रवासाचे श्रम व शीतादिकांची पीडा सहन होत नसेल, त्या सर्वांनीं येथूनच परत फिरावें. त्याचप्रमाणें मिष्टान्न भक्षण करणारे द्विज, पक्कान्नें, पेयें, मांसाचे पदार्थ इत्यादि भक्षण करणाऱ्या व सूदांवर अवलंबून राहणाऱ्या लोकांनींहि परत फिरावें. मी ज्या भृत्यवर्गाला वृत्ति नेमून दिल्या आहेत व त्यांच्या पोषणाची व्यवस्था केली आहे, त्यांनींहि येथून परत जावें. जे पौरजन राजभक्तिपुरस्सर माझ्या मागोमाग आले आहेत त्यांनीं महाराज धृतराष्ट्रापाशीं जावें. म्हणजे तो नराधिप त्यांना योग्यकाळीं यथान्याय वेतन देईल आणि जर धृतराष्ट्र महाराजांनीं तुम्हांला योग्य वेतन दिलें नाहीं, तर आमचें प्रिय करण्याची इच्छा करणारा पांचालनृपति राजाद्रुपद तुम्हांला इष्ट वेतन देईल."

वैशंपायन—राजा, युधिष्ठिराचें हें आज्ञावचन ऐकून दुःखार्त झालेले बहुतेक पौरजन, अनेक ब्राह्मण व प्रमुख यति हस्तिनापुरास निघून गेले. तेव्हां धृतराष्ट्रानें युधिष्ठिरावरील प्रेमामुळें त्या सर्वांना योग्य आश्रय देऊन त्यांना धन व वेतन यांनीं संतुष्ट केलें.

याप्रमाणें बराच मोठा परिवार निघून गेल्यानंतर कुंतीपुत्र युधिष्ठिर, लोमशमुनि व थोडे ब्राह्मण यांसह काम्यकवनांत त्रिरात्र मोठ्या सुखानें राहिला. ३. ७. ९२.

---

## अध्याय ९३ वा.

[ १ काम्यक वनांतील ब्राह्मणांची आपल्यालाहि बरोबर नेण्याविषयीं प्रार्थना. २ व्यासादिकांचें दर्शन व उपदेश. ३ तीर्थयात्राप्रस्थान. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, त्यानंतर युधिष्ठिर तीर्थयात्रेला निघाला असतां त्या काम्यकवनांत रहाणारे सर्व ब्राह्मण त्याच्यापाशीं येऊन म्हणाले—"हे धर्मराजा, तूं भ्राते व महात्मा लोमश-ऋषि यांसह पुण्यप्रद तीर्थांना जात आहेस, तेथें आम्हांलाहि घेऊन जा. हे महाराजा, आम्हांला तीर्थयात्रा घडणें शक्य नाहीं. तुझ्या साह्यावांचून आम्हांला तीं सर्व तीर्थें अगम्य आहेत. त्यांचा मार्ग हिंस्र पशूंनीं व्यापिलेला असल्यामुळें भयंकर आहे. यास्तव परिवारावांचून एकट्या-दुकट्या माणसाला तेथें जातां येणें शक्य नाहीं.

हे नराधिपा, तुझे भ्राते श्रेष्ठ धनुर्धर आहेत. त्या शूरांनीं संरक्षण केलें असतां आम्ही मोठ्या सुखानें तीर्थयात्रा करूं व तुझ्या प्रसादानें आम्हांला तीर्थांचें व वनांचें सुखावह फल प्राप्त होईल. तुझ्या पराक्रमानें सर्व प्रकारें सुरक्षित असलेले आम्ही तीर्थस्नानानें शुद्ध व तीर्थदर्शनानें निष्पाप होऊं. तीर्थांत स्नान केलेल्या तुलाहि राजश्रेष्ठ कार्तवीर्य, राजर्षि अष्टक, लोमपाद व सार्वभौम राजा वीर भरत यांचे दुष्प्राप शाश्वत लोक प्राप्त होतील. हे भूपाला, तुझ्याबरोबर आम्हीहि प्रभासादि तीर्थें, महेंद्रादि पर्वत, गंगादि नद्या व प्लक्षादि वनस्पति या सर्वांस पहाण्याची इच्छा करितों.

हे जनाधिपा, तुझी जर ब्राह्मणांवर कांहीं भक्ति असेल तर आमचें हें वचन सत्वर मान्य कर. म्हणजे तुझें कल्याण होईल. हे महाबाहो, तपाला विघ्न करणाऱ्या राक्षसांनीं सर्व तीर्थें व्यापिलीं आहेत. त्यांच्यापासून आमचें रक्षण कर. धौम्य व बुद्धिमान् नारद यांनीं अनेक तीर्थें सांगितलीं. तपस्वी लोमश-देवर्षीनेंहि कांहीं तीर्थांचें वर्णन केलें. हे नराधिपा, त्या सर्व तीर्थांतून तूं आम्हांसह यथाविधि पर्यटन कर. म्हणजे लोमशाकडून रक्षण केला गेलेला तूं निष्पाप होशील."

राजा, ते ब्राह्मण हर्षानें आर्द्रनयन होऊन युधिष्ठिराची अशी प्रार्थना करूं लागले असतां भीमादि वीर भ्रात्यांनीं परिवेष्टित असलेला तो पांडवश्रेष्ठ लोमश व धौम्य यांची अनुज्ञा घेऊन त्या सर्व ऋषींस 'ठीक आहे' असें म्हणाला. नंतर त्या जितेंद्रिय राजानें भीमादि भ्राते व सुकुमारी द्रौपदी यांसह तीर्थयात्रेला जाण्याचा निश्चय केला.

(२) जनमेजया, इतक्यांत महाभाग व्यास, देवर्षि नारद व पर्वत हे महाप्राज्ञ मुनि पांडवांना भेटण्यासाठीं काम्यकवनांत आले. तेव्हां युधिष्ठिरानें त्यांचा यथाविधि सत्कार केला असतां सन्मान केलेले ते महात्मे पांडवांस म्हणाले—"हे युधिष्ठिरा, भीमा, आणि नकुल-सहदेवहो, तुम्ही अगोदर मानसशुद्धि करा आणि शुद्धचित्त होऊन मग पवित्र तीर्थांना जा. शास्त्रज्ञ ब्राह्मण शरीरशुद्धीला मानुषव्रत आणि चित्तशुद्धीला दैवव्रत म्हणतात. दोषरहित मन हेंच दोन्ही प्रकारच्या शुद्धीचें परम साधन आहे. यास्तव सर्वांबरोबर मित्रभाव ठेवून व शुद्धचित्त होऊन पवित्र तीर्थांचें दर्शन घ्या. तुम्ही शारीर व मानस शुद्धीनें युक्त होऊन, नियत व्रत धारण करून, दैवव्रताचा आश्रय केल्यास तुम्हांला शास्त्रोक्त फल प्राप्त होईल."

( ३ ) तेव्हां 'ठीक आहे' असें बोलून त्या पांडवांनीं कृष्णेसह लोमश, व्यास, नारद व पर्वत यांच्या चरणांना स्पर्श केला आणि त्या सर्व दिव्य व मानुष ऋषींनीं स्वस्त्ययन केलें असतां ते वीर धौम्य व वनवासी ऋषि यांसह मार्गशीर्ष पौर्णिमेनंतर येणाऱ्या पुष्यनक्षत्रावर यात्रेला निघाले. त्यांनीं अजिनें परिधान करून दंड, वल्कलें व जटा धारण केल्या आणि अभेद्य कवचांनीं युक्त होऊन ते पांडव पर्यटनास निघाले. इंद्रसेनादि भृत्य, पंधरा रथ, स्वयंपाकी व इतर परिचारक, इतका परिवार आपल्याबरोबर घेऊन त्या वीरांनीं तरवारी कंबरेला लटकावल्या, शरपूर्ण भाते पाठीवर बांधले व याप्रमाणें सायुध होऊन ते वीर पूर्वाभिमुख निघाले. ३. ७. ९३.

---

## अध्याय ९४ वा

[ १ लोमशानें केलेलें युधिष्ठिराचें समाधान. ]

( १ ) युधिष्ठिर—हे लोमशमहर्षे, मी श्रेष्ठ गुणांनीं युक्त नाहीं, असें मला वाटत नाहीं. तथापि असें असह्य दुःख भोगीत आहें. माझ्यासारखा दुःखी राजा दुसरा कोणीहि नसेल. दुर्योधनासारखे आमचे शत्रु सद्गुणांनीं रहित व धर्माचरण करणारे नसतांहि त्यांचा आज उत्कर्ष होत आहे, याचें कारण काय ?

लोमश—हे राजन्, अधर्माचरणी लोकांचा अधर्मानें उत्कर्ष होत आहे, याविषयीं तूं खिन्न होऊं नको. कारण हे कुंतीपुत्रा, जो पुरुष अधर्मानें ऐश्वर्य मिळवितो, त्यायोगें स्वतःचें कल्याण झालेलें पहातो व शत्रूंना जिंकतो, तो शेवटीं समूळ नाश पावतो.

हे धर्मज्ञा, अधर्मानें ऐश्वर्यसंपन्न झालेले अनेक दैत्य व दानव शेवटीं नाश पावल्याचें मी नेहमीं पहात आहें. हे विभो, पूर्वीं देवयुगांत मीं हें सर्व पाहिलें आहे. देवांनीं धर्म स्वीकारला व असुरांनीं धर्माचा त्याग केला. हे भरतश्रेष्ठा, देवांनीं त्या वेळीं नद्या, क्षेत्रें, पर्वत इत्यादि पवित्र तीर्थांत प्रवेश केला आणि असुरांनीं तीर्थस्नान, दर्शन इत्यादि न करणें हा अधर्म स्वीकारला. त्यामुळें त्यांच्या मनांत दर्पाचा प्रादुर्भाव झाला. 'आम्ही जात्याच पावन आहों. आम्हांला तीर्थयात्रादिकांची काय गरज आहे' असा ते दर्पयुक्त अभिमान बाळगूं लागले. त्यांना कोणी अपूज्य मानिल्यास किंवा त्यांच्या दुरभिमानास प्रतिबंध

केल्यास ते क्रुद्ध होऊं लागले. क्रोधवश झाल्यामुळें त्यांना अकार्याची लज्जा वाटेनाशी झाली. निर्लज्ज बनलेल्या त्या असुरांना लोकनिंदेचें भय वाटेनासें झालें व शेवटीं त्यांचा नाश झाला.

हे पृथापुत्रा, अशा निर्लज्ज, हीनवृत्ति व वृथा व्रताचरणी लोकांना क्षमा, ऐश्वर्य व स्वधर्म सत्वर सोडून जातात, असा नियम असल्यामुळें अर्थात्च लक्ष्मी देवांपाशीं गेली व अलक्ष्मी असुरांपाशीं गेली. तेव्हां त्या अलक्ष्मीनें ज्यांच्यामध्यें प्रवेश केला आहे, अशा त्या दर्पाभिभूत दानवादिकांमध्यें कलि प्रविष्ट झाला. अर्थात् अलक्ष्मी आणि कलि यांच्या वश झालेल्या, दर्पयुक्त, क्रियाहीन, अविवेकी व मानाभिभूत झालेल्या त्या दैत्यांचा अल्पावधींतच विनाश झाला. राजा, याप्रमाणें यशोहीन झालेले ते दैत्य पूर्णपणें नाश पावले.

परंतु हे धर्मराजा, पुण्यशील देवांनीं तप, यज्ञ, दान व आशीर्वचन यांच्या योगें सागर, नद्या, सरोवरें व पवित्र देवालयें यांत प्रवेश केला. त्यामुळें सर्व पातकांचा नाश होऊन त्यांनीं श्रेय संपादन केलें. देवांचा हा उत्कर्ष पाहून आर्जवादि नियमांनीं युक्त असलेले विद्वान्‌हि पूर्वोक्त तीर्थांस गेले व त्यामुळें श्रेष्ठ ऐश्वर्याला प्राप्त झाले.

त्याचप्रमाणें तूंहि आपल्या अनुजांसह पवित्र तीर्थांत स्नान करून पुनः आपल्या पूर्व ऐश्वर्याला प्राप्त होशील. कारण हा सनातन मार्ग आहे.

हे युधिष्ठिरा, पूर्वीं नृगराजा, औशीनर शिबि, भगीरथ, वसुमन, गय, पुरु व पुरूरवा हे नृपश्रेष्ठ नित्य तप, पवित्र तीर्थांतील उदकाचा स्पर्श आणि महात्म्यांचें दर्शन यांच्या योगानें जसे पावन झाले आणि यश, पुण्य व धन यांना प्राप्त झाले, त्याचप्रमाणें हे कौंतेया, तूंहि आपल्या गतवैभवाला प्राप्त होशील आणि इक्ष्वाकूप्रमाणेंच आपले पुत्र, आप्त व बांधव यांसह विपुल ऐश्वर्य भोगशील.

युधिष्ठिरा, देवांनीं तपोबलानें पुण्यप्रद कीर्ति मिळविली. सर्व देवर्षि व मुचकुंद, मांधाता, मरुत्त इत्यादि महीपाल यांनींहि सुकृतीनेंच तिला संपादन केलें. हे पांडवा, तुलाहि ती तशीच प्राप्त होईल. धृतराष्ट्रपुत्रांना अधर्म आणि मोह यांनीं वश केलें आहे. त्यामुळें दैत्यांप्रमाणें तेहि सत्वर नाश पावतील, यांत संशय नाहीं. ३. ७. ९४.

---

## अध्याय ९५ वा.

[ १ पांडवांची तीर्थयात्रा. २ शमठानें गेलेलें गययज्ञाचें वर्णन. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, याप्रमाणें ते सर्व वीर पांडव भिन्न भिन्न पवित्र स्थानीं रहात क्रमानें नैमिषारण्यास प्राप्त झाले. त्या पांडवांनीं गोमतीच्या पवित्र तीर्थांत स्नानें केलीं व ब्राह्मणांना गायी व धन दिलें. त्या तीर्थांत देव, पितर व ब्राह्मण यांस पुनः पुनः तृप्त करून पुढें क्रमानें कन्यातीर्थ, अश्वतीर्थ, गोतीर्थ, कालकोटी व विषप्रस्थ-पर्वत या स्थानीं वास केला आणि 'बाहुदा'-नदींत स्नानें केलीं.

देवांचें 'देवयजन' जें 'प्रयाग'-क्षेत्र त्यांत वास व स्नानें करून गंगा व यमुना यांच्या संगमावर त्या सत्यप्रतिज्ञ वीरांनीं उत्तम तप आचरिलें. त्यामुळें ते महात्मे निष्पाप झाले व त्यांनीं ब्राह्मणांना विपुल धन दिलें. राजा, तेथून ते वीर पांडुपुत्र तपस्वी जनसेवित प्रजापतीच्या वेदीला ब्राह्मणांसह प्राप्त झाले व तेथें राहिले. वन्य हवीनें द्विजांचें सतत संतर्पण करणाऱ्या त्या वीरांनीं तेथें उत्तम तप आचरिलें. तेथून ते पुण्यवान् व धर्मज्ञ गय राजर्षीनें सुसंस्कृत केलेल्या महीधरास गेले. तेथें 'गयशिर' या नांवाचा वृक्ष व पवित्र महानदी आहे. तिच्या तीरावर वेत्रलतांची पंक्तीच लागली आहे. ती नदी आपल्या पुलिनानें सुशोभित झाली आहे. तेथून पुढें ते दिव्य व पवित्र 'धरणीधर'-कूटास प्राप्त झाले. तेथें ऋषिसेवित पवित्र 'ब्रह्मसर'-नामक तीर्थ आहे. तेथेंच भगवान् अगस्त्य सूर्याला शरण गेला. स्वतः सनातन धर्मराजहि तेथें राहिला होता. हे राजा, सर्व नद्यांचे संगम त्या तीर्थांत अंतर्भूत होतात. पिनाकपाणि महादेव तेथें नित्य वास करितो.

वीर पांडवांनीं तेथें चातुर्मास्य याग केले. प्रसिद्ध अक्षय्य वटासमीप त्यांनीं महान् ऋषियज्ञ केला. त्या अक्षय देवयजनामध्यें केलेलें कर्म अक्षय फल देतें. निश्चयी पांडवांनीं तेथें उपवास केले. पांडवांना भेटण्यासाठीं तेथें शेकडों तपोधन ऋषि आले व त्यांनीं ऋषिप्रोक्त विधीनें चातुर्मास्य याग केला. त्या ब्राह्मणांच्या महासभेंत विद्यावृद्ध, तपोवृद्ध व वेदपारंगत ब्राह्मण महात्म्यांच्या कथा सांगूं लागले. त्यांतील 'शमठ'-नामक एका कौमारव्रत धारण केलेल्या विद्याव्रतस्नात ब्राह्मणानें गयाची कथा सांगितली.

( २ ) तो म्हणाला—गय-राजर्षि अमूर्तरयाचा पुत्र होय. त्याचीं पवित्र कर्में मी तुम्हांला सांगतों, तीं ऐका. त्या 'अमूर्तरयस्'-गयाचा विपुल अन्न व

दक्षिणा यांनीं युक्त असलेला महा यज्ञ येथेंच झाला. त्यावेळीं येथें अन्नाच्या असंख्य पर्वतप्राय राशी पडल्या होत्या. घृताचे ओहोळ व दह्याच्या नद्या वहात होत्या. उत्तम शाकादिकांचे हजारों प्रवाह चालले होते.

हे राजा, याप्रमाणें प्रत्यहीं षड्रस अन्न सिद्ध करून तें सर्व याचकांस दिलें जात असे. त्या यज्ञांत इतर सामान्य ब्राह्मणहि सुसंस्कृत अन्न यथेष्ट भक्षण करीत असत. दक्षिणाकालीं होणारा वेदघोष स्वर्गापर्यंत जाऊन पोंचत असे. त्या वेदध्वनीपुढें दुसरा कोणताहि ध्वनि ऐकूं येत नसे. हे भूपाला, तुला काय आश्चर्य सांगूं! त्या पवित्र शब्दानें भूमि, दिशा, अंतरिक्ष व आकाश हीं सर्व भरून जात. शुभ अन्न-पानांनीं तृप्त झालेले देशोदेशींचे तेजस्वी मानव त्या गयाच्या यज्ञाविषयीं अशी गाथा गातात—

" गयाच्या यज्ञामध्यें भोजन करण्याची इच्छा करणारे आतां कोण राहिले आहेत? कोणी नाहींत. कारण सर्व प्राणी तृप्त होऊन अद्यापि अन्नाचे पर्वतप्राय पंचवीस ढीग शिल्लक राहिले आहेत. अमित तेजस्वी राजर्षि गयानें आपल्या यज्ञांत जें महत्कार्य केलें, तें त्यापूर्वीं कोणीं केलें नाहीं व पुढेंहि कोणी करणार नाहीं. गयाच्या हविर्द्रव्यानें तृप्त झालेले देव दुसऱ्या कोणीं दिलेलीं हविर्द्रव्यें ग्रहण करण्यास आतां कसे समर्थ होतील! वाळवंटांतील वाळु, अंतरिक्षांतील नक्षत्रें, किंवा वृष्टि करणाऱ्या मेघाच्या जलधारा, जशा कोणालाहि मोजतां येत नाहींत, त्याप्रमाणें गययज्ञांतील दक्षिणेची गणना करण्यास कोणीहि समर्थ नाहीं."

हे कुरुनंदना, त्या भूपालाचे असे अनेक यज्ञ या सरोवरासमीप झाले. ३. ७. ९५.

---

## अध्याय ९६ वा.

[ १ अगस्त्याच्या हातून वातापीच्या नाशाविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न. २ वातापि व इल्वल यांचा वृत्तान्त. ३ अगस्त्योपाख्यानारंभ.]

( १ ) वैशंपायन—हे पारिक्षिता, त्यानंतर विपुल दक्षिणा देणारा तो कुंतीपुत्र युधिष्ठिर वातापीच्या 'मणिमती'-नामक नगरीस जाऊन अगस्त्याश्रमांत राहिला. तेथें गेल्यानंतर त्या पांडवानें लोमश मुनीला विचारिलें—" हे भगवन्, अगस्त्यानें वातापीचा कशासाठीं नाश केला! मानवांचा अंत कर-

णाऱ्या त्या दैत्याचा कोणता प्रभाव होता ! त्या असुरानें अगस्त्याला क्रुद्ध कां केलें !"

लोमश—हे कौरवनंदना, पूर्वी 'मणिमती'-नगरींत 'इल्वल'-नांवाचा एक दैत्य रहात असे. त्याला 'वातापि'-नामक एक कनिष्ठ भ्राता होता. तो दितिपुत्र एकदा एका तपोयुक्त ब्राह्मणाला म्हणाला कीं, भगवान् मला एक इंद्रतुल्य पुत्र देवो.

परंतु त्या ब्राह्मणानें दैत्याला इंद्रासारखा पुत्र दिला नाहीं. म्हणून तो असुर त्या ब्राह्मणावर अतिशय क्रुद्ध झाला. हे राजेंद्रा, त्या क्रोधी ब्रह्मघातकी इल्वलानें आपल्या 'वातापि'-भ्रात्याला मायावी छागाचें म्हणजे बकऱ्याचें रूप धारण करावयास सांगितलें. तेव्हां तो इच्छेस येईल तसें रूप घेणारा वातापि असुर तत्काल मायावी बकरा झाला.

तेव्हांपासून तो इल्वल या मायावी छागाला शिजवून ब्राह्मणांना भोजन घाली व त्यांचा प्राणघात करण्याची इच्छा करी. ब्राह्मणाचें भोजन झाल्यावर त्या दुष्ट इल्वलानें यमसदनीं गेलेल्या आपल्या भ्रात्याला हांक मारतांच तो पुनः देहधारण करून जिवंत झालेला दृष्टीं पडे.

इल्वल पुनः त्या वातापि असुराला छाग करून, त्याला शिजवून, ब्राह्मणांना जेऊं घाली व आपल्या भ्रात्याला पुनः हांक मारीत असे. इल्वलानें उच्च स्वरानें हांक मारलेली ऐकतांच तो मायावी, बलवान् व ब्राह्मणशत्रु वातापि ब्राह्मणाचें उदर फाडून तत्काल हंसतच बाहेर पडत असे.

याप्रमाणें तो दुष्टबुद्धि इल्वल ब्राह्मणांना वारंवार भोजन घालून त्यांचा घात करूं लागला.

हे महाराज, याच वेळीं एकदा भगवान् अगस्त्य-मुनीनें आपले पितर एका गर्तेंत अधोमुख होऊन लोंबकळत आहेत, असें पाहिलें. तेव्हां त्यानें 'तुम्ही असे लोंबकळत कां राहिलां आहां ?' असा त्यांना प्रश्न केला.

त्यावर ते ब्रह्मवेत्ते म्हणाले—आम्ही संतानासाठीं असे लोंबकळत आहों. आम्ही तुझे पितर असून संततीच्या अभावीं या गर्तेंत लोंबकळत राहिलों आहों. यास्तव हे अगस्त्या, तूं जर उत्तम अपत्य उत्पन्न करशील, तर आम्ही या दुर्गतीपासून मुक्त होऊं आणि तुलाहि श्रेष्ठ गति मिळेल.

तेव्हां तो सत्यधर्मपरायण तेजस्वी मुनि त्यांस म्हणाला—हे पितरहो, तुमचा हा मानस-संताप दूर होवो. मी तुमची इच्छा पूर्ण करीन.

त्यानंतर तो भगवान् ऋषि संतानप्राप्तीविषयीं विचार करूं लागला. परंतु आपल्या संततीला योग्य अशी एकहि स्त्री त्याला आढळली नाहीं. तेव्हां त्या श्रेष्ठ ऋषीनें निरनिराळ्या प्राण्यांच्या उत्तम अवयवांचा संग्रह केला व त्यापासून एक उत्कृष्ट स्त्रीरत्न निर्माण केलें.

त्यानंतर त्या महा तपस्वी मुनीनें पुत्रासाठीं तप करणाऱ्या विदर्भराजाला स्वतःच्या कार्यासाठीं निर्मिलेली ती कन्या अर्पण केली. तेव्हां तिनें त्या राजगृहीं जन्म घेतला. विद्युल्लतेसारखी चमकणारी व आपल्या सौंदर्यानें शोभणारी ती कन्या तेथें वाढूं लागली.

या कन्येचा जन्म झालेला पहातांच विदर्भराजानें मोठ्या हर्षानें तें वर्तमान ब्राह्मणांना निवेदन केलें. तेव्हां विप्रांनीं त्या राजकन्येचें अभिनंदन करून ‘लोपामुद्रा’ असें नांव ठेविलें.

नंतर हे राजा, जलांतील कमलिनीप्रमाणें किंवा अग्नीच्या शुभ ज्वालेप्रमाणें ती स्वरूपानें शोभणारी कन्या अतित्वरेनें वाढूं लागली. ती राजनंदिनी यौवनारूढ झाली असतां उत्तम अलंकारांनीं युक्त असलेल्या शंभर कन्या व सर्वथा तिच्या सेवेंत तत्पर असलेल्या शभर दासी यांच्या परिवारांत राहूं लागली. ती शंभर दासींनीं परिवेष्टित झालेली व शंभर कन्यांमध्यें स्थिर असलेली राजकुमारी अंतरिक्षांतील रोहिणीच्या प्रभेप्रमाणें शोभूं लागली.

परंतु महात्म्या अगस्त्याच्या भयामुळें त्या यौवनावस्थेस प्राप्त झालेल्या व शीलाचारसंपन्न असलेल्या कन्येस वरण्याला कोणीहि पुरुष धजला नाहीं. त्या अप्सरेसारख्या रूपवती कन्येनें सदाचरण व सत्यव्रत यांच्या योगानें आपल्या पित्याला व इतर सर्व आप्तजनांस संतुष्ट केलें. हे राजा, आपली सद्गुणी कन्या आतां उपवर झाली आहे, असें पाहून तिचा पिता ‘ही यौवनसंपन्न कन्या कोणाला द्यावी?’ असा विचार करूं लागला. ३. ७. ९६.

---

## अध्याय ९७ वा.

[ १ अगस्त्यानें केलेली लोपामुद्रेची भार्यार्थ याचना. २ त्याला तिची प्राप्ति. ३ त्या उभयतांची तपश्चर्या. ४ लोपामुद्रेशीं संवाद व मुनीचें धनार्जनार्थ गमन. ]

( १ ) लोमश—भगवान् अगस्त्यानें 'लोपामुद्रा गृहस्थाश्रमांत नियुक्त करण्यास योग्य झाली आहे' असें जेव्हां पाहिलें तेव्हां वैदर्भराजाकडे जाऊन त्यास म्हटलें—"हे राजन्, पुत्रासाठीं विवाह करण्याची माझी इच्छा आहे, त्यासाठीं मी तुजपाशीं लोपामुद्रेची मागणी करितों. ती कन्या मला दे."

मुनीनें अशी प्रार्थना केली असतां विदर्भराजा सचिंत झाला. कारण तो त्या महर्षीला 'नाहीं' असें म्हणण्यासहि समर्थ नव्हता व आपली कन्या त्याला द्यावी, असेंहि त्याला वाटेना. शेवटीं आपल्या भार्येकडे येऊन तो राजा म्हणाला—"हा महर्षि मोठा सामर्थ्यवान् आहे. तो क्रुद्ध झाल्यास शापाग्नीनें मला दग्ध करील."

( २ ) तेव्हां राजा भार्येसह दुःखित झाला आहे असें पाहून लोपामुद्रा योग्यकालीं त्याच्या समीप येऊन म्हणाली—"हे तात, माझ्यासाठीं आपण असे दुःखी होऊं नका. अगस्त्यमुनीस माझें समर्पण करून आपलें रक्षण करा."

कन्येचें हें वचन ऐकून त्या विदर्भाधिपतीनें महात्म्या अगस्त्याला कन्येचें समर्पण केलें. लोपामुद्रेची प्राप्ति झाली असतां तो आपल्या भार्येला म्हणाला—"हे शुभे, तूं या मूल्यवान् वस्त्राभरणांचा त्याग कर." पतीची ही आज्ञा ऐकतांच त्या साध्वीनें दर्शनीय, अमूल्य व सुखावह वस्त्राभरणांचा त्याग करून वल्कलें व अजिनें यांचा स्वीकार केला आणि पतीचेंच व्रत व आचार, यांचें ग्रहण केलें.

( ३ ) त्यानंतर तो भगवान् अगस्त्यमुनि गंगाद्वारास प्राप्त झाला आणि अनुकूल पत्नीसह उग्र तप आचरूं लागला. पतीवर अनुरक्त झालेली ती राजकन्या लोपामुद्रा मोठ्या आदरानें त्याची सेवा करूं लागली.

प्रभु अगस्त्यहि तिच्यावर प्रसन्न झाला. त्यानंतर बराच काल लोटला असतां एकदा तपस्तेजानें शोभणाऱ्या व ऋतुस्नात लोपामुद्रेला भगवान् ऋषीनें अवलोकन केलें. तिची सेवा, शुद्धि, दम, कांति व रूप यांनीं प्रसन्न होऊन त्या मुनीनें तिला जवळ बोलाविलें.

( ४ ) तेव्हां लज्जित झालेली ती भामिनी हात जोडून असें नम्र वचन बोलली—"पति प्रजेसाठींच भार्येचें पाणिग्रहण करतो, यांत संशय नाहीं. पण हे भगवन्, आपल्या विषयीं माझ्या मनांत जी एक इच्छा आहे, ती आपण पूर्ण करा. माझ्या पित्याच्या गृहीं उच्च प्रासादावर जशी माझी शय्या आहे, तशा उत्तम शय्येवर आपला समागम व्हावा अशी माझी मनीषा आहे. त्याचप्रमाणें आपण पुष्पमाला धारण करून विविध अलंकारांनीं भूषित व्हावें. मींहि आपल्या समीप येण्यासाठीं यथेष्ट दिव्याभरणें धारण करावीं, अशी माझी उत्कट इच्छा आहे. हीं असलीं वल्कलें व काषाय वस्त्रें धारण करून मी आपल्या समीप येणार नाहीं. कारण तपस्व्यांचीं हीं वल्कलादि आभरणें पवित्र आहेत, तीं भोगादिकांच्या संपर्कास योग्य नाहींत."

पत्नीचें हें वचन ऐकून अगस्त्य म्हणाला—"लोपामुद्रे, तुझ्या पित्या-पाशीं जसें विपुल धन आहे, तसें मजपाशीं नाहीं."

लोपामुद्रा—हे तपोधन, आपण समर्थ आहां. आपल्या तपाच्या प्रभा-वानें जीवलोकांतील सर्व धन एका क्षणांत संपादन करण्यास समर्थ आहां !

अगस्त्य—हे साध्वि, तूं म्हणतेस तें खरें आहे. पण तपःसामर्थ्यानें धन संपादन केल्यास माझ्या तपाचा क्षय होईल. यास्तव ज्यायोगें माझ्या तपाचा क्षय होणार नाहीं, असेंच कांहीं कार्य मला सांग.

लोपामुद्रा—हे प्रभो, माझा ऋतुकाल अगदीं अल्प अवशिष्ट राहिला आहे आणि भूषणांवांचून तर मी तुझ्याशीं समागम करूं इच्छीत नाहीं. तुझ्या तपाचा नाश व्हावा अशीहि माझी इच्छा नाहीं. यास्तव माझा मनोरथ पूर्ण होऊन तुझ्या धर्माचाहि लोप न होईल अशाप्रकारें मला इष्ट असलेलीं भूषणें संपादन कर.

अगस्त्य—हे शुभे, तुझ्या बुद्धीनें जर हाच मनोरथ निश्चित केला असेल तर तूं येथें धर्माचरण करीत रहा. मी द्रव्यसंपादन करावयास जातों. ३. ७. ९७.

## अध्याय ९८ वा.

[ १ श्रुतर्वादि तीन राजांपासून द्रव्याची अप्राप्ति. २ इल्वलाकडे द्रव्यार्थ गमन. ]

( १ ) **लोमश**—हे युधिष्ठिरा, त्यानंतर तो अगस्त्यमुनि धनाची भिक्षा मागण्यास निघाला. तो सर्व भूपालांत श्रेष्ठ असलेल्या 'श्रुतर्वा'-राजाकडे गेला.

अगस्त्यमुनि आल्याचें ऐकतांच त्या नृपालानें अमात्यांसह आपल्या देशाच्या सीमेवर जाऊन त्या महर्षीचें सन्मानपूर्वक स्वागत केलें. त्यास यथाविधि अर्घ्य-पाद्यादि अर्पण केल्यावर त्या भूपतीनें हात जोडून नम्रपणें त्या मुनीस आगमनाचा हेतु विचारिला.

राजाचा तो प्रश्न ऐकून अगस्त्य म्हणाला—"हे पृथ्वीपाला, मी तुझ्यापाशीं द्रव्यप्राप्तीच्या इच्छेनें आलों आहें, यास्तव दुसऱ्या कोणत्या प्राण्याला पीडा न देतां तूं यथाशक्ति मला धनविभाग दे."

लोमश—हे पांडवा, मुनीचें हें वचन ऐकून त्या उदारचरित राजानें आपला सर्व आय-व्यय त्या मुनीला निवेदन केला आणि 'हे विद्वन्, यांतील जेवढें धन शिल्लक राहतें, असें आपणांस वाटेल, त्या सर्वांचा आपण स्वीकार करा' असें म्हटलें.

राजाचें हें सयुक्तिक भाषण ऐकून त्या समबुद्धि मुनीनें त्या भूपालाचें उत्पन्न व विनियोग ताडून पाहिले असतां, ते दोन्ही सम असल्याचें त्याला दिसून आलें. तेव्हां यांतील धन ग्रहण करून इतर प्राण्यांना पिडा देणें योग्य नव्हे, असें जाणून तो उदार अंतःकरणाचा महर्षि 'श्रुतर्वा'-राजाला बरोबर घेऊन 'ब्रध्नश्व'-राजाकडे गेला.

त्या नृपतीनेंहि आपल्या देशाच्या सीमेवर जाऊन त्यांचें यथाविधि स्वागत केलें. अर्घ्य-पाद्यादिकांनीं पूजन केलें आणि त्याची अनुज्ञा घेऊन त्यांस आगमनाचें प्रयोजन विचारिलें.

तेव्हां अगस्त्य म्हणाला—हे भूपाला, आम्ही दोघे येथें द्रव्याच्या इच्छेनें आलों आहों. यास्तव तुझ्या प्रजाजनांचा भाग कमी न होतां, जें द्रव्य उरत असेल तें आम्हांला दे.

लोमश—हे राजा, तेव्हां त्या ब्रध्नश्वानें त्या दोघांना आपला सर्व आय-व्यय दाखविला आणि 'यांत जितकें धन तुम्हांला अधिक आहे असें दिसेल, तें सर्व तुम्ही घ्या' असें म्हटलें. तेव्हां 'अगस्त्य' व श्रुतर्वा' या दोघांनीं त्याचे आय-व्यय

पाहिले व जितका आय तितकाच व्यय आहे, असें पाहून यांतून कांहीं घेतल्यास प्राण्यांना पीडा होईल, असें अगस्त्याला वाटलें. म्हणून तो द्विज 'श्रुतर्वा' व 'ब्रध्नश्व' यांसह श्रीमान् 'पौरुकुत्स त्रसदस्यूकडे' गेले. तेव्हां त्या इक्ष्वाकुकुलोत्पन्न राजश्रेष्ठानें त्या तिघांचें पूर्वींप्रमाणेंच स्वागत व यथाविधि पूजन करून त्यांस आगमनाचें कारण विचारिलें.

त्या वेळीं अगस्त्यानें पूर्वींप्रमाणेंच ' आम्ही धनेच्छेनें आलों आहों. यास्तव प्रजेला पीडा न देतां आम्हांला यथाशक्ति धन दे ' असें म्हटलें.

पूर्वोक्त दोन राजांप्रमाणेंच त्रसदस्यूनेंहि आपले आय-व्यय त्यांस दाखवून ' यांतून जें धन उरेल तें तुम्ही घ्या ' असें सांगितलें.

अगस्त्याला त्या नृपतीच्या आय-व्ययाचाहि पूर्वींप्रमाणेंच अनुभव आला. तेव्हां यांतील धन घेतल्यास प्राण्यांना पीडा होईल, असें समजून तो स्वस्थ बसला.

( २ ) तें पाहून ते तिन्ही राजे परस्परांकडे अवलोकन करून त्या महामुनीस म्हणाले—" हे ब्रह्मन्, हा ' इल्वल '-नामक दानव भूलोकीं अति धनाढ्य आहे. आपण सर्व त्याच्याकडे जाऊन धनाची याचना करूं या.

तेव्हां अगस्त्यानेंहि त्यांचें म्हणणें मान्य केलें. इल्वलापाशीं वित्तयाचना करणें त्या सर्वांस उचित वाटलें व ते तिन्ही राजे अगस्त्यासह इल्वलाकडे त्वरेनें जावयास निघाले. ३. ७. ९८.

---

## अध्याय ९९ वा.

[ १ अगस्त्यादिकांचें इल्वल दानवाकडे आगमन. २ वातापीचा नाश. ३ धनप्राप्ति. ४ अगस्त्यपुत्राचा जन्म. ५ भार्गवरामाच्या पुनस्तेजोप्राप्तीचा वृत्तान्त. ]

( १ ) लोमश—हे पांडवा, अगस्त्य महर्षींसह पूर्वोक्त तीन राजे आपल्याकडे आले आहेत, हें जाणून इल्वल दानव अमात्यांसह आपल्या देशाच्या सीमेवर त्यांस सामोरा आला. त्या दानवानें त्यांचें स्वागत व सत्कार केला आणि आपल्या वातापि भ्रात्याला मेष बनवून व त्याचें मांस शिजवून त्यांचें आतिथ्य केलें. तेव्हां महा असुर वातापीलाच मेष बनवून, त्याला मारून त्याचें मांस शिजविलें आहे, असें पाहून ते तिन्ही राजर्षि खिन्न झाले व काय करावें हें त्यांस सूचेना.

( २ ) तेव्हां तो मुनिश्रेष्ठ अगस्त्य त्या राजर्षींस म्हणाला—"तुम्ही विषाद मानूं नका. मी या महा असुराला भक्षण करीन." नंतर तो महर्षि श्रेष्ठ आसनावर बसला. इल्वलानेंहि प्रसन्न चित्तान त्या ब्राह्मणाला वातापीचें मांस वाढविलें असतां एकट्या मुनीनेंच तें सर्व भक्षण केलें.

ब्राह्मणाचें भोजन झालेलें पहातांच इल्वलानें वातापीला मोठ्यानें हाक मारिली. तेव्हां अगस्त्यानें अपान वायु सोडला. त्याची मेघासारखी प्रचंड गर्जना झाली.

तिकडे इल्वल दानव 'हे वातापे, सत्वर बाहेर ये,' असें पुनः पुनः म्हणतच होता. तेव्हां मुनिश्रेष्ठ अगस्त्य हंसून म्हणाला—"अरे मूढा, तो तुझा वातापि भ्राता आतां कोठून येणार? मीं त्याला माझ्या उदरांत केव्हांच पचवून टाकिलें आहे."

( ३ ) तें ऐकून इल्वल खिन्न झाला व आपण वारंवार हाका मारीत असूनहि ज्या अर्थी तो महासुर बाहेर येत नाहीं, त्या अर्थी या ब्राह्मणानें खरोखरच त्याला पचवून सोडिलें असावें, असें त्यालाहि वाटलें आणि तो अमात्यांसह नम्र होऊन व हात जोडून म्हणाला—"हे विप्रश्रेष्ठा, तुम्ही कशासाठीं आलां अहां? मी तुमचें कोणतें कार्य करूं?"

तेव्हां अगस्त्य हंसतच त्या इल्वलास म्हणाला—हे असुरा, आम्ही सर्व तुला धनेश्वर मानीत आहों. हे तिन्ही राजे विशेष धनाढ्य नाहींत आणि मला तर विपुल धनाची इच्छा आहे. यास्तव तूं इतर प्राण्यांना पीडा न देतां आम्हांला इष्ट धन दे.

तें ऐकून इल्वलानें ऋषीला अभिवादन केलें व म्हटलें—माझ्या मनांतून तुम्हांपैकीं कोणाला काय द्यावयाचें आहे हें जर तूं जाणशील, तर मी तुम्हांला इष्ट धन देईन.

अगस्त्य—हे महासुरा, या तीन नृपालांतील एकेकाला दहा सहस्र गायी व तेवढेंच सुवर्ण देण्याची तुझी इच्छा आहे आणि मला वीस हजार गायी, तितकेंच सुवर्ण, सुवर्णमय रथ व मनासारखे वेगवान् दोन अश्व इतकें वित्त देण्याचा तुझा मानस आहे, यास्तव हे इल्वला, हा हिरण्मय रथ आतांच मला देण्याचा तूं निश्चय कर.

तें ऐकून हा महर्षि दुसऱ्याचें मनोगत जाणण्यास समर्थ आहे, हें पाहून इल्वल अतिशय खिन्न झाला. तथापि त्यानें त्या ब्राह्मणास त्याहून अधिक धन दिलें.

पूर्वोक्त हिरण्मय रथाला विराव आणि सुराव हे दोन अश्व जोडिले. तेव्हां त्या वेगवान् अश्वांनीं तें सर्व वित्त व अगस्त्यमुनि यांसह त्या तिन्ही नृपतींस सत्वर अगस्त्याश्रमास नेऊन पोंचविलें आणि अगस्त्यानें अनुज्ञा दिली असतां ते तिन्ही नरेश्वर आपापल्या नगरीस निघून गेले.

( ४ ) याप्रमाणें त्या मुनीनें लोपामुद्रेचा सर्व मनोरथ पूर्ण केला. तेव्हां ती पतिव्रता म्हणाली—" हे भगवन्, आपण माझा सर्व इष्ट मनोरथ पूर्ण केला आहे. यास्तव आतां माझ्या ठिकाणीं वीर्यवान् अपत्य उत्पन्न करा. "

अगस्त्य—हे शुभे, मी तुझ्या या सदाचरणानें संतुष्ट झालों आहें. हे कल्याणि, आतां अपत्याविषयींचा विचार मी तुला सांगतों तो ऐक. तुझी काय इच्छा आहे ! तुला ' एक सहस्र पुत्र असावे ' असें वाटतें किंवा सहस्र पुत्रांच्या तोडीचे शंभर पुत्रच हवेत कीं सहस्र पुत्रतुल्य दहाच पुत्र होऊं देत किंवा सहस्रतुल्य एकच पुत्र असावा, असें वाटतें !

लोपामुद्रा—हे तपोधना, मला सहस्रांची बरोबरी करणारा एकच पुत्र असूं दे. कारण विद्या व शील यांनीं हीन असलेल्या अनेक पुत्रांहून विद्वान् व सुशील एकच पुत्र अधिक श्रेयस्कर आहे.

तेव्हां ' ठीक आहे ' असें म्हणून तो श्रद्धावान् अगस्त्यमुनि श्रद्धा व शील यांनीं युक्त असलेल्या लोपामुद्रेशीं सुसंगत झाला व गर्भाचें आधान करून तो वनांत निघून गेला.

अगस्त्यमुनि वनांत निघून गेला असतां तो गर्भ लोपामुद्रेच्या उदरांत सतत सात वर्षें वाढत राहिला व सातवें वर्ष संपतांच ' दृढस्यु '-नांवाचा महाविद्वान् अगस्त्यपुत्र आपल्या प्रभावानें जणुं काय प्रज्वलित होऊन गर्भाशयांतून बाहेर पडला.

हे भारता, तो महा तपस्वी ऋषिपुत्र जणुकाय शिक्षादि षडंगें व उपनिषदें यांसह वेदांचा जणुकाय जप करीतच उत्पन्न झाला. पुढें अल्प कालांतच तो ऋषिपुत्र महा तेजस्वी ब्राह्मण झाला. तो तेजस्वी पुत्र बालक असतांनाच पितृगृहीं अरण्यांतून इध्माचे भारे आणीत असे. त्यामुळें त्याला 'इध्मवाह' असें म्हणूं लागले.

१ सहस्रसंमितः पुत्र एकोऽप्यस्तु तपोधन ।
एको हि बहुभिः श्रेयान् विद्वान् साधुरसाधुभिः ॥

आपला पुत्र अध्ययन, इध्मवाहन इत्यादि कार्यांत तत्पर आहे, असें पाहून मुनि संतुष्ट झाला. याप्रमाणें अगस्त्यमुनीनें उत्तम अपत्य उत्पन्न केलें. त्यामुळें त्याच्या पितरांना इष्ट लोक प्राप्त झाले. तेव्हांपासून हा अगस्त्याश्रम भूलोकीं प्रसिद्ध झाला.

हे युधिष्ठिरा, मीं पूर्वीं वर्णन केल्याप्रमाणें अगस्त्यमुनीनें प्रह्लादकुलोत्पन्न वातापीला आपल्या उदरांत पचवून सोडिलें. रमणीय गुणांनीं युक्त असलेला हा आश्रम त्या महर्षीचा आहे. तशीच ही देव-गंधर्वसेवित पवित्र भागीरथी अंतरिक्षांत वाऱ्यानें हलविलेल्या पताकेप्रमाणें शोभत आहे. ती अंतरिक्षांत, भूलोकीं व पाताललोकीं आपल्या प्रचंड ओघानें नागिणीप्रमाणें वहात असते. म्हणूनच तिला त्रिपथगा असेंहि म्हणतात. ही गंगा मातेप्रमाणें सर्व दक्षिण दिशेला स्नान घालते. ती समुद्राची प्रिय महिषी पूर्वीं शंभूच्या जटेंतून भ्रंश पावली. हे पांडवहो, तुम्ही या अति पवित्र नदीमध्यें यथेष्ट स्नान करा.

( ५ ) हे महाराज, त्रिभुवनप्रसिद्ध व महर्षिगणसेवित अशा या भृगु-तीर्थाचें माहात्म्य तूं आतां ऐक. जामदग्न्य रामानें या पवित्र तीर्थांत स्नान व आचमन करून दाशरथि रामानें हरण केलेलें आपलें तेज पुनः संपादन केलें. दाशरथि रामाचें वैर ज्यानें संपादन केलें आहे अशा भार्गवानें आपलें तेज जसें परत मिळविलें, तसें हे कौंतेया, तूं भ्राते व कृष्णा यांसह या तीर्थांत स्नान करून दुर्योधनानें हरण केलेलें आपलें तेज पुनः संपादन कर.

वैशंपायन—राजा जनमेजया, लोमशाचें हें हितवचन ऐकून भीमादि भ्राते व कृष्णा यांसह युधिष्ठिरानें त्या तीर्थांत स्नान केलें आणि देव व पितर यांचें तर्पण केलें. त्यामुळें त्या तीर्थमाहात्म्यानें युधिष्ठिर अधिकच तेजस्वी व अजिंक्य झाला.

त्यानंतर तो पांडुपुत्र युधिष्ठिर लोमशमहर्षीस म्हणाला—हे भगवन्, भार्गवरामाचें तेज दाशरथि रामानें कसें हरण केलें तें मला सांग.

लोमश—हे राजेंद्रा, बुद्धिमान् भृगुपुत्र व वीर रघुनंदन यांचा तो प्रसंग तूं सावधान चित्तानें ऐक. भगवान् विष्णु रावणाच्या वधासाठीं आपल्या स्वरूपानें महात्म्या दशरथाचा पुत्र झाला. आम्हीं अयोध्येंत उत्पन्न झालेल्या त्या रामाला पाहिलें आहे.

त्या दाशरथि रामाचे धनुर्भंगादि पराक्रम ऐकून ऋचीकनंदन भार्गवरामालाहि त्याला पहाण्याची इच्छा झाली व तो रेणुकापुत्र मोठ्या कुतूहलानें क्षत्रियांचा संहार करणारें आपलें दिव्य धनुष्य घेऊन रघुपति रामाचें वीर्य किती आहे, हें पहाण्यासाठीं अयोध्येस गेला.

क्षत्रियकुलांतक राम आपल्या राष्ट्राच्या सिमेवर आला आहे, असें ऐकून दशरथानें रामाला आपल्या परिवारासह त्याच्याकडे पाठविलें. तेव्हां तो दशरथनंदन आपल्या पुढें येऊन उभा आहे, असें पाहून तो भृगुनंदन त्यास हंसतच म्हणाला—"हे राजपुत्रा, कालासारख्या दुर्धर राजांचा ज्यानें नाश केला आहे असें हें माझें धनुष्य आहे. हे क्षत्रिया, तुझ्यांत जर सामर्थ्य असेल, तर मोठ्या यत्नानें माझ्या या धनुष्यावर गुण चढीव."

तें ऐकून रघुनंदन त्यास म्हणाला—हे पूज्य ब्राह्मणा, तूं माझा असा अपमान करूं नको. मी क्षात्रधर्मापासून केव्हांहि च्युत होणार नाहीं. विशेषतः इक्ष्वाकूच्या कुलांत मी उत्पन्न झालों आहें. त्यामुळें मी द्विजांमध्यें अधम आहें, असें तूं समजूं नको. मी माझ्या पूर्वजांच्या बाहुवीर्यानें ही आत्मश्लाघा करीत आहें; स्वपराक्रमानें नव्हे.

असें भाषण करणाऱ्या त्या दाशरथीला जामदग्न्य म्हणाला—"वत्सा, व्यर्थ वल्गना करूं नको. हें धनुष्य घेऊन त्यांवर गुण चढीव."

तेव्हां त्या रघुनायकानें जामदग्न्याचें तें क्षत्रियविनाशक दिव्य धनुष्य मोठ्या रोषानें त्याच्या हातांतून ओढून घेतलें व सहज लीलेनें त्यावर गुण चढविला आणि त्या वीर्यवान् क्षत्रियपुत्रानें हंसतच टणत्कार केला. तेव्हां अशनीच्या ध्वनीसारखा तो भयंकर शब्द ऐकून सर्व भूतें भयभीत झालीं.

नंतर तो सीतापति जामदग्न्यास म्हणाला—हे ब्रह्मन्, मी तुझ्या या दिव्य धनुष्यावर गुण चढविला आहे, आतां तुझें कोणतें कार्य करूं तें सांग.

तेव्हां जामदग्न्य राम महात्म्या रघुनंदनास एक दिव्य बाण देऊन म्हणाला—"हे क्षत्रिया, हा शर धनुष्याला जोडून आकर्ण ओढ. मला तुझें सामर्थ्य पाहूं दे."

लोमश—परशुरामाचें हें वचन ऐकून रघुनायक क्रोधानें जणु काय प्रदीप्त झाला आणि म्हणाला—"हे भार्गवा, तूं दर्पयुक्त झाला आहेस, असें मीं पूर्वी ऐकलें होतें व तेंच आतां साक्षात् अनुभवीत आहें. तथापि मी तुला आतां

क्षमा करितों. पितामहाच्या प्रसादानें सर्व क्षत्रियांना जिंकून तूं विशिष्ट तेज संपादन केलें आहेस. खरोखर त्यामुळेंच तूं माझा असा तिरस्कार करितोस. पण हे भार्गवा, मी तुला दिव्य दृष्टि देतों. तूं मला स्वरूपानें पहा.

तेव्हां भार्गवराम दाशरथि-रामाच्या शरीरांत आदित्य, वसु, रुद्र, साध्य, मरुद्गण, पितर, अग्नि, नक्षत्रें, ग्रह, गंधर्व, राक्षस, यक्ष, नद्या, सर्व तीर्थें, ब्रह्मभूत सनातन वालखिल्य ऋषि, सर्व देवर्षि, समुद्र, पर्वत, क्रतूंसह वषट्कार, उपनिषदांसह वेद, सचेतन सामदेवता, मूर्तिमंत धनुर्वेद, मेघ, वृष्टि, विद्युत् इत्यादि सर्व जगत्, पाहून चकित झाला.

त्यानंतर त्या भगवान् विष्णूनें परशुरामाच्या अंगावर तो बाण सोडला. त्याबरोबर अंतरिक्ष शुष्क अशनि व महोल्का यांनीं व्याप्त झालें. भूमीवरील धूळ उडूं लागली, मेघ वृष्टि करूं लागले, भूकंप झाले व मेघ गर्जना करूं लागले. रामाच्या हातून सुटलेला तो बाण भार्गवाला विह्वल करून व त्याचें तेज हरण करून निघून गेला.

तेव्हां विह्वल झालेला परशुराम सावध झाल्यावर त्या तेजस्वी विष्णूला प्रणाम करून त्याच्याच अनुज्ञेनें महेंद्र पर्वतावर निघून गेला व तेथें त्या लज्जित झालेल्या महातपस्वी भृगुनंदनानें भयभीत होऊन वास केला.

पुढें एक संवत्सर अशा स्थितींत गेल्यानंतर परशुराम निस्तेज, मदरहित व दुःखी होऊन राहिला आहे असें पाहून त्याचे पितर त्याला म्हणाले—" हे वत्सा, साक्षात् विष्णूचें दर्शन झालें असतां तूं त्याच्याशीं अयोग्य आचरण केलेंस, हें बरें नव्हे.

तो भगवान् त्रिभुवनांत सर्वदा पूज्य व मान्य आहे. यास्तव हे पुत्रा, तूं आतां पवित्र वधूसर नदीवर जा व तेथील अभयप्रद तीर्थांत स्नान कर. म्हणजे तुला तुझें पूर्वतेज पुनः प्राप्त होईल. पूर्वी देवयुगांत त्या ' दीप्तोद '-नामक तीर्थांत तुझ्या प्रपितामह-भृगूनें उग्र तप आचरिलें होतें. "

हे युधिष्ठिरा, पितरांचें हें वचन ऐकून भार्गवानें त्यांच्या सांगण्याप्रमाणें त्या पावन तीर्थांत स्नान केलें; तेव्हां त्याला त्याच्या पूवतेजाची तत्काल प्राप्ति झाली. हे पांडुपुत्रा, याप्रमाणें महापराक्रमी परशुरामानें, विष्णूनें हरण केलेलें आपलें तेज पुनः संपादन केलें. ३. ७. ९९.

---

## अध्याय १०० वा.

[ १ वृत्रवधासाठीं वज्रोत्पत्तीचा वृत्तान्त. ]

( १ ) युधिष्ठिर—हे लोमशमुने, त्या बुद्धिमान् अगस्त्य महर्षीच्या अद्भुत कर्मांचा सविस्तर वृत्तान्त पुनः ऐकण्याची माझी इच्छा आहे.

लोमश—हे महाराज, ठीक आहे. मी त्या अमिततेजस्वी अगस्त्य-मुनीचा अद्भुत प्रभाव तुला पुनः सांगतों ऐक. त्याची कथा दिव्य व अतिमानुष आहे.

पूर्वी कृतयुगांत असंख्य युद्धदुर्मद घोर दानव होते. ते परम दारुण दैत्य 'कालकेय' या नांवानें प्रसिद्ध असून, त्यांनीं वृत्रासुराचा आश्रय करून नानाप्रकारच्या आयुधांनीं इंद्रप्रभृति देवांवर चाल केली व त्यांस अतिशय पीडा दिली.

तेव्हां सर्व देव वृत्रवधाचा यत्न करण्यासाठीं इंद्राला पुढें करून ब्रह्मदेवा-पाशीं गेले व हात जोडून उभे राहिले. त्यांस पाहून परमेष्ठि असें म्हणाला— "हे देवहो, तुमचें इष्ट कार्य मीं जाणलें आहे. वृत्राचा वध होईल, असा उपाय मी तुम्हांला सांगतों.

'दधीच'-नांवाचा एक उदारबुद्धि व प्रख्यात महर्षि आहे. तुम्ही सर्व त्याच्याकडे जाऊन वर मागा म्हणजे तो धर्मात्मा तुम्हांला मोठ्या संतोषानें वर देईल. त्यानें 'वर देतों' असें म्हटलें म्हणजे जयाची इच्छा करणारे तुम्ही सर्व 'हे ब्रह्मन्, त्रैलोक्याच्या हितासाठीं तुझ्या अस्थि आम्हांला दे' अशी याचना करा.

तुमचें हें वचन ऐकतांच तो महात्मा देहत्याग करून तुम्हांला अस्थि देईल. त्याच्या त्या अस्थि घेऊन त्यापासून एक महाभयंकर दृढ वज्र निर्माण करा. त्या प्रचंडध्वनि करणाऱ्या शत्रुनाशक घोर वज्रानें इंद्र वृत्रासुराचा वध करील. वृत्रवधाचा हा निश्चित उपाय मीं तुम्हांला सांगितला आहे. त्याप्रमाणें सत्वर करा."

याप्रमाणें पितामहानें अनुज्ञा दिली असतां ते सर्व देव नारायणाला पुढें करून 'दधीच'-मुनीच्या आश्रमाला गेले. तो मुनीचा आश्रम सरस्वतीच्या परतीरावर असून अनेक लतावृक्षांनीं परिवेष्टित होता. सामगान करणारे ब्राह्मण आपल्या सामांनीं एखादा प्रदेश जसा दुमदुमून सोडतात, त्याप्रमाणें

तो आश्रम भ्रमर, कोकिल, जीवंजीवक इत्यादि पक्ष्यांच्या ध्वनींनीं नादित झाला होता.

महिष, वराह, स्रमर आणि चमर हे पशु त्या प्रदेशीं निर्भयपणें वारंवार संचार करीत असत. मदोन्मत्त हत्ती व हत्तीणी तेथील सरोवरांत नित्य क्रीडा करीत व आपल्या चीत्कारांनीं तो प्रदेश दुमदुमून सोडीत. सिंह, व्याघ्र व गिरिकंदरांतून रहाणारे इतर हिंस्र प्राणी आपल्या भयंकर गर्जनांनीं तो प्रदेश अनुनादित करीत असत. त्या आश्रमांतील निरनिराळे प्रदेश लतापुष्पादिकांनीं सुशोभित झाले होते.

हे राजा, याप्रमाणें स्वर्गतुल्य असलेल्या त्या आश्रमांत सर्व देव येऊन पोंचले. तेथें ब्रह्मदेवासारख्या आपल्या शरीरकांतीनें सूर्याप्रमाणें प्रकाश पावणाऱ्या त्या 'दधीच'-मुनीला त्यांनीं पाहिलें. ते सर्व त्या महर्षींच्या समीप गेले व त्यांनीं त्याच्या चरणांवर मस्तकें ठेवून आणि त्यांस प्रणाम करून ब्रह्मदेवानें सांगितल्याप्रमाणें वर मागितला.

तेव्हां परम संतुष्ट झालेला 'दधीच'-मुनि त्या सुरोत्तमांस म्हणाला—"हे देवहो, मी आपल्या देहाचा त्याग करूनहि तुमचें हित करीन."

इतकें बोलून त्या जितेंद्रिय मुनीनें तत्काल प्राणत्याग केला. तेव्हां ब्रह्मदेवाच्या उपदेशाप्रमाणें मृत झालेल्या त्या मुनीच्या अस्थि घेऊन ते देव अतिशय हृष्ट झाले आणि आपल्या विजयासाठीं त्वष्ट्याजवळ येऊन त्यांनीं त्या अस्थींचें वज्र तयार करावयास सांगितलें. देवांचें वचन ऐकून त्वष्ट्यालाहि मोठा हर्ष झाला व शुचिर्भूत होऊन त्या महात्म्यानें मोठ्या यत्नानें अति उग्ररूप वज्र निर्माण केलें.

नंतर तो मोठ्या संतोषानें इंद्रास म्हणाला —"हे देवेंद्रा, तूं आज या श्रेष्ठ वज्रानें आपल्या उग्र वृत्रशत्रूचा नाश कर आणि शत्रुरहित होऊन आपल्या सर्व देवगणांसह स्वर्गलोकीं स्थिर हो. तूं समग्र स्वर्गाचें सुखानें शासन कर."

त्वष्ट्याचें हें वचन ऐकून हृष्ट झालेल्या पुरंदरानें शुचिर्भूत होऊन त्या उग्र वज्राचें ग्रहण केलें. ३-७-१००.

---

## अध्याय १०१ ला.

[ १ देवासुरांचा संग्राम. २ वृत्राचा वध. ३ कालेयांचा समुद्रप्रवेश व जगाच्या नाशाचा उद्यम. ]

( १ ) लोमश—हे पांडवा, त्यानंतर बलाढ्य देवांकडून सुरक्षित असलेला वज्रधर इंद्र भूलोक व द्युलोक यांना व्यापून राहिलेल्या वृत्रासुरापाशीं आला. पर्वतप्राय शरीरानें युक्त असलेल्या कालकेयांनीं त्या असुराचें सर्व बाजूंनीं संरक्षण केलें होतें. त्यांनीं आपलीं आयुधें वर उचललेलीं असल्यामुळें ते शृंगयुक्त पर्वतांप्रमाणेंच दिसत होते.

त्यानंतर देवांचें दानवांशीं दोन घटका तुमुल युद्ध झालें. त्यामुळें सर्व त्रिभुवन भयग्रस्त झालें. परस्परांच्या आयुधांचा परस्परांच्या शरीरांवर आघात होत असल्यामुळें त्यांचा भयंकर खणखणाट ऐकूं येऊं लागला. एकमेकांचीं आयुधें एकमेकांच्या आयुधांवर आपटून मोडून गेलीं.

हे महाराज, ताल वृक्षावरून ताडगोळे जसे भूमीवर पडतात, तशीं तुटलेलीं मस्तकें अंतरिक्षांतून खालीं पडूं लागलीं. कालकेयांनीं सुवर्णाचीं कवचें चढवून व परिघायुधें धारण करून वणव्यानें पेटलेल्या वृक्षांप्रमाणें देवांवर चाल केली. तेव्हां देव मोठ्या अभिमानानें धांवत येणाऱ्या त्या वेगवान् दैत्यांचा वेग सहन करण्यास समर्थ झाले नाहींत. त्यामुळें ते पराभूत होऊन भयानें पळूं लागले.

देव भीतीनें पळत आहेत व वृत्र उत्तरोत्तर वृद्धि पावत आहे, असें पाहून इंद्रहि मोहित झाला. त्याला काय करावें, तें सूचेना. कालेयांच्या भयानें उद्विग्न झालेला तो पुरंदर सत्वर साक्षात् नारायण प्रभूला शरण गेला. इंद्र ‘ किंकर्तव्यतामूढ ’ झाला आहे, असें पाहून सनातन विष्णूनें त्याच्या बलाची वृद्धि करण्यासाठीं आपलें तेज त्याच्या ठिकाणीं स्थापन केलें.

तेव्हां विष्णूनें इंद्राचें रक्षण केलेलें पाहून सर्व देवगण व पुण्यवान् ब्रह्मर्षि यांनींहि आपापलें तेज इंद्राला अर्पण केलें. त्यामुळें शक्र अतिशय बलाढ्य झाला. विष्णु, सर्व देवता व महाभाग ऋषि, यांच्या तेजानें देवेंद्र अतिशय बलाढ्य झाला आहे, असें पाहून वृत्रासुर भयंकर सिंहनाद करूं लागला. त्याच्या प्रचंड गर्जनांनीं पृथ्वी, दिशा, पर्वत, अंतरिक्ष व स्वर्ग, किंबहुना सर्व त्रिभूवनच कांपूं लागलें.

वृत्रासुराचा तो प्रचंड व घोर सिंहनाद ऐकून महेंद्र अतिशय संतप्त व भयाकुल झाला.

( २ ) पण हे राजा, तेजस्वी देवेंद्रानें आपल्या शत्रूच्या वधासाठीं तें उग्र वज्र सोडिलें. तेव्हां त्या अमोघ वज्रानें ताडित होत्साता तो सुवर्णमाला धारण करणारा महासुर पूर्वी विष्णूच्या हातांतून निसटलेल्या मंदरयुक्त मेरू-प्रमाणें भूमीवर पडला. तो दैत्यश्रेष्ठ मरून पडला असतां भयानें व्याकुळ झालेला इंद्र सरोवरांत प्रवेश करण्यासाठीं धांवला.

आपण अमोघ वज्र वृत्रावर सोडिलें आहे व तो दैत्य मेला आहे, याचें त्याला भानच राहिलें नाहीं. पण आपला भयंकर शत्रु नष्ट झाला आहे, असें पाहून देव आणि महर्षि अतिशय हृष्ट झाले व मोठ्या आनंदानें इंद्राची स्तुति करूं लागले.

( ३ ) वृत्रवधामुळें सर्व दैत्य दुःखाकुल झाले आहेत असें पाहून देवांनीं एकमतानें मोठ्या त्वरेनें त्यांच्यावर प्रहार केले. तेव्हां भयानें आर्त झालेल्या त्या सर्व असुरांनीं समुद्रांत प्रवेश केला. जलचर प्राण्यांनीं व्याप्त असलेल्या विस्तीर्ण सागरांत प्रवेश केल्यावर ते सर्व एकत्र जमले व त्यांनीं सर्व त्रैलो-क्याचा नाश करण्याचा संकेत केला.

त्यांतील कांहीं मतिमान् व निश्चयी असुरांनीं त्रैलोक्यनाशाचे अनेक उपाय सुचविले. तेव्हां उपायांचा विचार करणाऱ्या त्या राक्षसांची कालवशात् अशी घोर मति झाली.

ते कालेय म्हणाले—या भूलोकीं विद्या व तप यांनीं युक्त असलेल्या ब्राह्म-णांचा नाश प्रथम करावा. कारण तपाच्या बलावर या सर्व लोकांचें अस्तित्व अवलंबून आहे. यास्तव या भूलोकीं जे तपस्वी व धर्मज्ञ आहेत त्यांचा सत्वर वध करा. त्यांचा नाश झाला म्हणजे सर्व जगाचा विनाश झालाच म्हणून समजा.

शेवटीं हाच विचार निश्चित करून ते दुष्ट कालेय परम संतुष्ट झाले व महासागर याच दुर्गाचा आश्रय करून ते आपल्या जगत्संहाराच्या कार्यास उद्युक्त झाले. ३. ७. १०१.

---

## अध्याय १०२ रा.

[ १ कालेयांनीं केलेला ब्राह्मणांचा विध्वंस. २ त्यांच्या नाशाविषयीं नारायणाची प्रार्थना. ]

( १ ) लोमश—हे युधिष्ठिरा, याप्रमाणें जलनिधीचा आश्रय करून कालेय त्रैलोक्याचा नाश करण्यास प्रवृत्त झाले. ते कश्यपापासून झालेले कालेचे पुत्र अतिशय क्रुद्ध होऊन रात्रीं समुद्रांतून बाहेर पडत व ऋषींचे आश्रम व पुण्य आयतनें यांतील मुनींना नित्य भक्षण करीत. त्या दुरात्म्यांनीं एकदा वसिष्ठाच्या आश्रमांतील ऐशीं ब्राह्मण व त्याच्या आसपास रहाणारे एकशें आठ ब्राह्मण आणि इतर नऊ तपस्वी यांना भक्षण केलें. द्विजसेवित च्यवनाश्रमांत जाऊन फल-मूलाशन करणाऱ्या शंभर मुनींस भक्षिलें. याप्रमाणें ते कालेय रात्रीं तपस्वी ब्राह्मणांचा संहार करीत व दिवसा समुद्रांत दडून रहात.

एकदा त्यांनीं भरद्वाजाश्रमांतील वायुभक्षण व जलसेवन करणाऱ्या वीस नियत ब्रह्मचाऱ्यांना खाल्लें आणि हे राजा, याच क्रमानें ते दुष्ट दैत्य आपल्या भुजबलाचा आश्रय करून रात्रीं ब्राह्मणांच्या सर्व आश्रमांस पीडा देऊं लागले.

मृत्यूनें ज्यांना ग्रासिलें आहे, अशा त्या दितिजांनीं अनेक ब्राह्मणांची निर्दयपणें हिंसा केली. पण ते दैत्य अशा प्रकारें त्या तपस्वी तापसांचा संहार करीत आहेत, हें कोणाहि मानवाला कळलें नाहीं. नित्य प्रभातकालीं ते सर्व व्रतानें कृश झालेले मुनि भूमीवर गतप्राण होऊन पडलेले दिसत असत. ज्यांचें मांस क्षीण झालेलें, रक्त शुष्क झालेलें, मज्जा, आंतडीं व सांधे छिन्न-भिन्न झालेले आहेत, अशाप्रकारच्या मृतदेहांनीं ही भूमि शंखांच्या राशीप्रमाणें व्यापिलेली दिसत असे. त्या तापसांचे कलश फुटून गेलेले, स्रुक्-स्रुवादि उपकरणें भग्न झालेलीं आणि त्यांच्या अग्निहोत्राचा विध्वंस झालेला दृष्टीं पडत असे.

याप्रमाणें कालेयांच्या भयानें पीडित झालेलें सर्व जगत् स्वाध्याय, वषट्कार, यज्ञोत्सव व क्रिया यांनीं रहित झाल्यामुळें निरुत्साह दिसूं लागलें. अशा रीतीनें ब्राह्मणांचा क्षय होत असलेला पाहून सर्व मानव स्वसंरक्षणासाठीं भीतीनें दश-दिशांत पळून गेले.

कित्येकांनीं गुहेंत प्रवेश केला, कोणीं निर्झरांचा आश्रय केला व इतर कांहींनीं तर मरणाच्या भीतीनेंच प्राण सोडिले. त्यांतील कांहीं शूर धनुर्धर

वीरांनीं मोठ्या संतोषानें दानवांच्या वधासाठीं पराकाष्ठेचा यत्न केला. परंतु समुद्राचा आश्रय केलेल्या त्या दानवांच्या समीप ते पोचूं शकले नाहींत. उलट त्यांना अतिशय श्रम होऊन शेवटीं त्यांचाच नाश झाला.

( २ ) हे नराधिपा, याप्रमाणें यज्ञोत्सवक्रिया नष्ट होऊन जगत् उत्साहशून्य झालें असतां देवांना परम चिंता वाटूं लागली. ते सर्व भयभीत होऊन इंद्रापाशीं गेले व त्यांनीं शरणागताचा आश्रय असलेल्या परम पावन नारायणाला शरण जाण्याचा संकेत केला.

ते सर्व देव वैकुंठाला गेले व अपराजित मधुसूदनाला नमस्कार करून म्हणाले—“ हे प्रभो, तूं आमचा स्रष्टा व पोषण करणारा आहेस आणि जगताचें हरण करणाराहि तूंच आहेस. तूंच हें सचराचर विश्व निर्माण केलेंस. हे कमलनयना, पूर्वी या नष्ट झालेल्या पृथ्वीचा तूंच वराहशरीराचा आश्रय करून लोकहितासाठीं उद्धार केलास.

हे पुरुषोत्तमा, पूर्व युगांत तूंच नारसिंहरूप धारण करून आदि दैत्य महाबलाढ्य हिरण्यकश्यपूचा नाश केलास. त्याचप्रमाणें तूं वामनशरीर घेऊन सर्व भूतांना अवध्य असलेल्या महा असुर बलीला त्रैलोक्याच्या राज्यापासून भ्रष्ट केलेंस.

यज्ञामध्यें विघ्न करणाऱ्या व धनुष्य धारण करणाऱ्या ‘ जंभ ’-नामक प्रसिद्ध व क्रूर असुराचाहि वध तूंच केलास. अशाप्रकारच्या तुझ्या अद्भुत कर्मांची गणनाच करितां येत नाहीं. हे विभो, भयभीत झालेल्या आमची आतांहि तूंच परम गति आहेस. हे देवदेवेशा, आम्ही लोकहितासाठीं तुझी प्रार्थना करीत आहों. यास्तव तूं हे सर्व लोक, देव आणि शक्र यांचें या महद्भयापासून रक्षण कर. ३. ७. १०२

---

## अध्याय १०३ रा.

[ १ देवांनीं स्तुतिपूर्वक नारायणाला निवेदन केलेलें आपलें दुःख. २ अगस्त्याकडून समुद्रशोषणानें कालेयांना निराधार करविण्याचा उपदेश. ३ देवांचें अगस्त्याकडे आगमन व स्तुति. ]

( १ ) देव म्हणाले—हे हृषीकेशा, तुझ्याच प्रसादानें देव, मानव, तीर्यक् व स्थावर ही चतुर्विध प्रजा वृद्धि पावते. तुजकडून वृद्धि पावलेल्या त्या प्रजा हव्य-कव्यांनीं स्वर्गांतील देवादिकांची वृद्धि करितात.

सांप्रत लोकांवर फार मोठें संकट ओढवलें आहे. रोज रात्रीं ब्राह्मणांचा भयंकर वध होत असतो. पण तो कोण करितें हें आम्हांला कळत नाहीं. हे अच्युता, ब्राह्मणांचा क्षय झाला असतां पृथ्वी क्षीण होईल आणि पृथ्वीचा नाश झाला असतां देवांचा क्षय होईल. यास्तव हे जगत्पते, तूं आम्हांवर कृपा कर. तुझ्या प्रसादानें जगत् सुखी होईल. तूं संरक्षण केलेल्या या लोकांचा नाश होणार नाहीं.

(२) विष्णु—हे देवहो, सर्व प्रजेच्या क्षयाचें कारण मला कळलें आहे. तुम्हांलाहि तें सांगतों. स्वस्थचित्तानें ऐका.

'कालेय'-नांवाचा परम दारुण दैत्यसमुदाय आहे. त्यानें वृत्राचा आश्रय करून समग्र जगताला व्यथित केलें होतें. नंतर बुद्धिमान् इंद्रानें वृत्रासुराचा वध केल्याचें पाहून त्या सर्व दुष्ट दानवांनीं आपल्या जीविताचें रक्षण करण्यासाठीं समुद्रांत प्रवेश केला.

तो सर्व दैत्यसमूह नक्र व ग्राह यांनीं व्यापिलेल्या घोर समुद्रांत वास करून लोकांचा नाश करण्यासाठीं रात्रीं ऋषींचा संहार करीत असतो. परंतु समुद्राचा आश्रय केलेल्या त्याचा क्षय करतां येणें शक्य नाहीं. यास्तव तुम्ही समुद्राचेंच शोषण करण्याचा विचार करा. पण समुद्रशोषण करण्यास अगस्त्यमहर्षीवांचून दुसरा कोणी समर्थ नाहीं आणि समुद्रशोषण केल्यावांचून ते दैत्य तुमच्या हातीं लागणें शक्य नाहीं.

(३) भगवान् विष्णूचें हें वचन ऐकून व त्या परमात्म्याची आज्ञा घेऊन सर्व देव अगस्त्याश्रमास गेले. तेथें त्यांनीं त्या तेजस्वी महात्म्या मैत्रावरुणपुत्राला पाहिलें. देव जशी पितामहाची उपासना करितात, तशी अनेक ऋषि त्याची उपासना करीत होते.

आपल्या प्रतिज्ञेपासून च्युत न होणाऱ्या त्या आश्रमस्थ तपोराशि अगस्त्यापाशीं जाऊन देव त्याच्या अद्भुत कर्मांनीं त्याची स्तुति करूं लागले.

देव म्हणाले—हे भगवन्, पूर्वीं इंद्रपदावर आरूढ झालेल्या नहुषानें सर्व लोकांना अतिशय पीडा दिली. तेव्हां तूंच त्यांची गति झालास. त्या लोकशत्रूला तूं आपल्या तेजानें देवांच्या ऐश्वर्यापासून व स्वर्गलोकापासूनहि च्युत केलेंस.

विंध्य-पर्वत सूर्यावर रागावून त्याचा मार्ग अडविण्यासाठीं अतिशय वाढूं लागला. पण तूं नम्र झालेल्या त्याला त्याच स्थितींत रहावयास सांगितलेंस. तेव्हांपासून तुझ्या वचनाचें उल्लंघन न करितां तो तसाच राहिला आहे. पुनः कधींहि वाढला नाहीं. त्या वेळीं विंध्य पर्वताच्या वृद्धीमुळें उत्पन्न झालेल्या अंधकारानें सर्व लोकांना ग्राशिलें व मृत्यूनेंहि प्रजेला पीडिलें होतें; त्या संकट-प्रसंगीं तूंच सर्व प्रजेचा रक्षक झालास व तुझ्या अनुग्रहानें सर्व जगत् अत्यंत सुखी झालें. याप्रमाणें भयभीत झालेल्या आमची तूंच नित्य गति आहेस. म्हणून भयानें व्याकुल झालेले आम्ही सर्व तुज वरदापाशीं वराची याचना करावयास आलों आहों. ३. ७. १०३

---

## अध्याय १०४ था.

[ १ अगस्त्यप्रभावानें विंध्यपर्वताचा निग्रह. २ देवांच्या प्रार्थनेनें अगस्त्याचें समुद्रतीरीं आगमन. ]

(१) युधिष्ठिर म्हणाला—हे लोमशमुने, क्रुद्ध झालेला विंध्य पर्वत एकाएकीं कां बरें वाढला ? तें सविस्तर वृत्त ऐकण्याची माझी इच्छा आहे.

लोमश—सूर्य उदयास्तसमयीं ' मेरु '-संज्ञक कनक महा शैलाला नित्य प्रदक्षिणा घालीत असतो. तें पाहून विंध्य-पर्वत सूर्याला म्हणाला—"ज्याप्रमाणें तूं प्रत्यहीं मेरूला प्रदक्षिणा घालतोस, त्याप्रमाणें मलाहि घालीत जा."

तेव्हां तो आदित्य विंध्य पर्वतास म्हणाला—हे शैलेंद्रा, मी आपल्या इच्छेनें मेरूला प्रदक्षिणा घालीत नाहीं. तर ज्या महादेवानें हें जगत् निर्माण केलें त्यानेंच मला हा मार्ग उपदेशिला आहे.

सूर्याचें हें वचन ऐकून विंध्याद्रि क्रुद्ध झाला आणि सूर्य-चंद्रांचा मार्ग अड-विण्याच्या इच्छेनें एकाएकीं वाढूं लागला. तेव्हां सर्व देव एकसंघानें त्या महाद्रिराज विंध्याकडे आले व सान्त्व वचनांनीं त्याचें निवारण करूं लागले. पण त्या जड अचलानें देवांचें म्हणणें मान्य केलें नाहीं.

तेव्हां ते सर्व देव आश्रमस्थ, तपस्वी व अद्भुत वीर्यवान् अगस्त्य-मुनीकडे आले आणि त्यांनीं त्या धर्मज्ञाला आपल्या आगमनाचें कारण निवेदन केलें.

देव—हे द्विजोत्तमा, हा विंध्यपर्वत क्रोधवश होऊन सूर्य, चंद्र व नक्षत्रें यांचा मार्ग अडवीत आहे. हे महाभागा, त्याचें निवारण करण्यास तुजवांचून दुसरा कोणीहि समर्थ नाहीं. यास्तव तूं त्याचें निवारण कर.

देवांचें हें वचन ऐकून लोपामुद्रेसह 'अगस्त्य'-मुनि वृद्धि पावणाऱ्या विंध्य पर्वतापाशीं आला व त्यास म्हणाला—"हे पर्वतोत्तमा, मी कांहीं कार्यासाठीं दक्षिणदिशेकडे चाललों आहें. तूं मला मार्ग द्यावास अशी माझी इच्छा आहे आणि मी दक्षिणदिशेंतून परत येईंपर्यंत तूं असाच लीन होऊन माझी मार्गप्रतीक्षा करीत रहा. हे शैलेंद्रा, मी दक्षिणदिशेंतून आपल्या आश्रमाकडे परत गेलों, म्हणजे तूं आपल्या इच्छेप्रमाणें यथेष्ट वृद्धि पाव."

हे शत्रुनाशका, विंध्याद्रीशीं असा संकेत करून अगस्त्य-मुनि जो एकदा दक्षिणदिशेकडे गेला, तो अद्यापि परत फिरला नाहीं व विंध्यहि तेव्हांपासून तसाच नम्र होऊन राहिला आहे.

(२) हे युधिष्ठिरा, 'अगस्त्याच्या प्रभावानें विंध्यपर्वत वृद्धि कसा पावला नाहीं?' असें जें तूं मला विचारिलें होतेंस, त्याचें कारण मीं तुला सांगितलें. आतां हे राजा, सर्व देवांनीं अगस्त्याचा वर संपादन करून कालेयांचा नाश कसा केला, हें मी तुला सांगतों; ऐक.

देवांचें तें पूर्वोक्त स्तुतिवचन ऐकून मैत्रावरुणि त्यास म्हणाला—"हे देवहो, तुम्ही कोणत्या आशयानें येथें आलां अहां? तुम्ही मजपासून कोणत्या वराची इच्छा करितां?" अगस्त्याचें हें अनुकूल वचन ऐकून देव म्हणाले—"हे महात्मन्, आपण महासागराचें प्राशन करावें. म्हणजे आम्ही देव व द्विज यांस पीडा देणाऱ्या 'कालेय-'संज्ञक शत्रूंचा सर्व परिवारासह नाश करूं. आपण समुद्र-प्राशन केल्यानें आमचें फारच मोठें कार्य होईल."

देवांचें हें वचन ऐकून मुनि म्हणाला—ठीक आहे, मी तुमचा हा मनोरथ पूर्ण करून सर्व लोकांना सुखी करीन.

हे सुव्रता पांडवा, देवांस असें सांगून तो मुनि, तपःसिद्ध ऋषि व देव यांसह, सरित्पति सागरापाशीं गेला. त्या वेळीं महर्षीचें तें अद्भुत कर्म पहाण्याच्या इच्छेनें मनुष्य, उरग, गंधर्व, यक्ष व किंपुरुषहि त्यास अनुसरले.

तो मुनि सर्व परिवारासह भयंकर गर्जना करणाऱ्या समुद्रापाशीं आला. त्यावेळीं तो महासागर आपल्या ऊर्मींनीं जणुकाय नृत्यच करीत होता. तो वायूच्या योगानें जणुंकाय वल्गना करीत होता, फेनसमूहांनीं जणुकाय हंसत होता व गिरिकंदरांमध्यें जणुकाय अडखळत होता.

हे कौंतेया, अगस्त्यासह ते सर्व देव, गंधर्व, महोरग व महाभाग ऋषि असंख्य ग्रहांनीं व्याप्त व विविध पक्षिसमूहांनीं युक्त अशा महोदधीच्या तीरावर येऊन पोंचले. ३. ७. १०४.

---

## अध्याय १०५ वा.

[ १ अगस्त्यानें केलेलें समुद्रशोषण. २ कालेयांचा नाश. ३ देवांचा समुद्रपूर्तीविषयीं विचार. ]

( १ ) लोमश—हे कुंतीपुत्रा, भगवान् वारुणि-ऋषि समुद्रतीरीं आल्यावर तेथें प्राप्त झालेल्या देवांस व ऋषींस म्हणाला—" मी लोकहितासाठीं या सागराचें प्राशन करितों. आतां तुम्हांला शत्रुनाशासाठीं जें कर्तव्य असेल तें सत्वर करा."

इतकें बोलून त्या सत्यप्रतिज्ञ मैत्रावरुणीनें क्रुद्ध होऊन सर्व लोकांसमक्ष समुद्राचें प्राशन केलें. तो महात्मा द्विज समुद्राचें शोषण करीत आहे असें पाहून इंद्रादि देव अतिशय विस्मित झाले व त्यांनीं विविध स्तुतीच्या योगानें त्याचा सत्कार केला.

देव म्हणाले—हे लोकोत्पादका, तूंच आमचा रक्षक व सर्व लोकांना कर्मफल देणारा आहेस. तुझ्या प्रसादानेंच देवांसह या सर्व जगाचा नाश होणार नाहीं.

( २ ) देव अशी स्तुति करीत असतां, गंधर्व मंगल वाद्यें वाजवीत असतां व विद्याधर दिव्य पुष्पांची वृष्टि करीत असतां त्या महात्म्यानें समुद्राला जलरहित केलें. महासागर शुष्क झाला आहे, असें पहातांच अतिशय हृष्ट झालेल्या सर्व देवांनीं दिव्य आयुधें धारण करून मोठ्या शौर्यानें दानवांवर प्रहार केले. महा बलाढ्य, वेगवान् व सिंहनाद करणाऱ्या महात्म्या देवांचे ते उग्र प्रहार दानवांस सहन झाले नाहींत. तेहि भयंकर सिंहनाद करून देवांशीं तुमुल युद्ध करूं लागले.

त्या देव-दानवांचें मुहूर्तभर घोर युद्ध झालें. पण ते कालेय महात्म्या मुनींच्या तपानें पूर्वीच दग्ध झाले होते. त्यामुळें स्वसामर्थ्यानें अतिशय यत्न करणाऱ्याहि त्या दैत्यांचा देवांनीं तत्काल नाश केला.

सुवर्णाभरणें, कुंडलें व बाहुभूषणें धारण करणारे ते कालेय देवतांच्या आयुधांनीं छिन्न-भिन्न झाले असतां पुष्पित पलाश-वृक्षाप्रमाणें शोभले. शेवटीं देवांच्या हातांतून निसटून जीव घेऊन पळालेले कांहीं कालेय पृथ्वीचें विदारण करून पाताळांत जाऊन राहिले.

आपले शत्रु नष्ट झाले आहेत असें पाहून देव त्या मुनिश्रेष्ठाची विविध वाक्यांनीं स्तुति करीत असें म्हणाले:—

( ३ ) देव—हे महर्षे, तुझ्या प्रसादानें लोकांना महत्सुख प्राप्त झालें आहे. तुझ्या तेजानेंच हे क्रूर कर्मे करणारे कालेय नष्ट झाले. हे महाबाहो, आतां तूं शुष्क केलेल्या या सागरास पुनः जलपूर्ण कर. तूं प्राशन केलेलें जल पुनः यामध्यें सोडून दे.

तें ऐकून तो मुनिश्रेष्ठ त्यांस म्हणाला—हे देवहो, मी सर्व उदक माझ्या उदरांत जिरवून टाकिलें आहे. यास्तव तुम्ही अन्य कांहीं उपाय योजून मोठ्या प्रयत्नानें या समुद्राला जलपूर्ण करा.

त्या उदारात्म्या महर्षीचें हें वचन ऐकून सर्व देव विस्मित व खिन्न झाले. नंतर परस्परांची अनुज्ञा घेऊन व मुनिश्रेष्ठास प्रणाम करून ती सर्व प्रजा स्व-स्वस्थानीं निघून गेली.

पण देव विष्णूसह समुद्राच्या पूर्तीसाठीं पुनः पुनः विचार करून पितामहाकडे आले व हात जोडून 'हे भगवन्, अगस्त्यानें प्राशन केलेल्या समुद्राची जलपूर्ति कशी होईल, याचा आपण विचार करा' असें म्हणाले. ३. ७. १०५.

---

## अध्याय १०६ वा.

[ १ समुद्रपूर्तीच्या प्रसंगानें सगराची उपकथा. २ त्याची पुत्रार्थ तपश्चर्या व वरप्राप्ति. ]

( १ ) लोमश—हे युधिष्ठिरा, लोकपितामह ब्रह्मा समीप आलेल्या त्या देवांस म्हणाला—"हे विबुधहो, तुम्ही सर्व शांतचित्तानें स्वस्थानीं जा. अग-

ल्यानें शुष्क केलेला हा सागर दीर्घ कालानें पूर्वजांच्या उद्धारासाठीं महाराजा भगीरथानें केलेल्या प्रयत्नानें आपल्या मूळ स्वरूपास प्राप्त होईल."

पितामहाचें हें वचन ऐकून सर्व सुरोत्तम त्या कालाची प्रतीक्षा करीत स्व-स्वस्थानीं निघून गेले.

युधिष्ठिर म्हणाला—हे मुने, भगीरथाचे पूर्वज शुष्क सागराच्या जल-पूर्तीला कारण कसे झाले ! व भगीरथानें त्यासाठीं दीर्घ प्रयत्न कसा केला ? तें सर्व सविस्तर ऐकण्याची माझी इच्छा आहे. यास्तव हे तपोधना, त्या प्राचीन राजांचें उत्तम चरित्र मला सांग.

वैशंपायन—हे जनमेजया, युधिष्ठिरानें असा प्रश्न केला असतां तो विप्रश्रेष्ठ लोमश महात्म्या सगराचें माहात्म्य कथन करूं लागला. तो म्हणाला—" हे भारता, पूर्वी इक्ष्वाकुकुलांत 'सगर'-नांवाचा एक प्रतापवान् राजा होऊन गेला. तो रूप, सत्त्व आणि बल यांनीं युक्त परन्तु अपुत्र होता. त्यानें हैहय व तालजंघ या नृपालांचा वध करून सर्व क्षत्रियांना वश करून घेतलें व सुराज्य चालविलें.

त्या भूपतीला वैदर्भी व शैब्या या नांवाच्या रूप-यौवनसंपन्न दोन भार्या होत्या. त्या राजर्षीनें आपल्या या दोन्ही भार्यांसह कैलासपर्वतावर जाऊन पुत्र-प्राप्तीसाठीं उग्र तप आचरिलें. त्याची तीव्र तपश्चर्या पाहून महात्मा त्रिनेत्र पिनाकपाणि संतुष्ट झाला व त्या अनेक रूपें धारण करणाऱ्या उमापति ईशानें त्यांस दर्शन दिलें.

तेव्हां त्या महाबाहु राजानें दोन्ही भार्यांसह वरद महादेवाला वंदन करून पुत्राची याचना केली.

ती ऐकून प्रसन्न झालेल्या शंकरानें भार्येसह असलेल्या त्या नृपतीस म्हटलें— "हे नृपते, तूं ज्या मुहूर्तावर येथें वर मागत आहेस, त्या मुहूर्ताचें फलच असें आहे कीं तुला एका स्त्रीच्या ठिकाणीं साठ हजार शूर परंतु अतिशय गर्विष्ठ पुत्र होतील व ते सर्व नाश पावतील आणि दुसऱ्या स्त्रीच्या ठिकाणीं एकच वंशधर शूर पुत्र होईल" इतकें बोलून तो रुद्र अंतर्धान पावला.

हे पांडवा, तो सगरराजाहि आपल्या भार्यांसह संतुष्ट चित्तानें स्वनगरीला निघून गेला. त्यानंतर वैदर्भी व शैब्या या त्याच्या दोन्ही भार्यांना गर्भ राहिला. कांहीं कालानें वैदर्भी प्रसूत होऊन तिला एक भोपळा झाला आणि शैब्येला देवासारखा रूपवान् पुत्र झाला.

तेव्हां त्या राजानें तो भोंपळा फेंकून देण्याचा विचार केला असतां अंतरिक्षांतून अशी घनगंभीर देववाणी त्याच्या कानीं पडली—"हे राजन्, असें साहस करूं नको. या आपल्या पुत्रांचा त्याग करणें योग्य नव्हे. या भोपळ्यांतील बिया काढून त्यांचें मोठ्या यत्नानें संरक्षण कर. या बिया पृथक् पृथक् घृतपूर्ण पात्रांमध्यें ठेवून तीं उबेंत ठेवलीं असतां तुला साठ सहस्र पुत्र प्राप्त होतील. महादेवानें तुला अशाच क्रमानें पुत्रप्राप्ति होईल असें सांगितलें आहे. यास्तव त्याच्या विरुद्ध वागण्याचें मनांतहि आणूं नको." ३. ७. १०६.

---

## अध्याय १०७ वा.

[ १ साठ सहस्र सागरांची उत्पत्ति. २ त्यांचें औद्धत्य. ३ सगराचा यज्ञ व अश्वाचें हरण. ४ यज्ञिय अश्वाचा शोध करीत असतां कपिलाच्या तेजानें सगरपुत्रांचा नाश. ५ सगरानें केलेला असमंजसाचा त्याग. ६ अंशुमानाला कपिलाच्या वराची प्राप्ति. ७ सगराची यज्ञसमाप्ति आणि सगर, अंशुमान् व दिलीप यांची स्वर्गप्राप्ति. ]

( १ ) लोमश—हे कौंतेया, अंतरिक्षांत झालेली ती आकाशवाणी ऐकून त्या राजानें तिच्यावर पूर्ण विश्वास ठेविला व त्याप्रमाणें सर्व घडवून आणिलें. त्या नराधिपानें त्या भोपळ्यांतील एकेक बीज काढून घृतपूर्ण पात्रांत ठेविलें आणि पुत्रांच्या रक्षणामध्यें तत्पर असलेल्या त्या मनुजेश्वरानें प्रत्येक पात्र एकेका दासीच्या स्वाधीन केलें.

त्यानंतर दीर्घ कालानें त्या पात्रांतून महाबलाढ्य पुत्र बाहेर पडले. याप्रमाणें रुद्राच्या प्रसादानें त्या राजर्षीला साठ हजार अप्रतिम पुत्रांची प्राप्ति झाली. ते सर्वहि उग्र, क्रूर कर्में करणारे व आकाशगामी होते. त्यांची संख्या विपुल असल्यामुळें ते इंद्रासह सर्व देवांस तुच्छ मानूं लागले. ते शूर व युद्धकुशल सगरपुत्र देव, गंधर्व, राक्षस व इतर सर्व प्राणी यांना पीडा देऊं लागले.

( २ ) ते मंदबुद्धि सगरपुत्र अशाप्रकारें क्लेश देऊं लागले असतां सर्व लोक देवतांसह ब्रह्मदेवाला शरण गेले. तेव्हां सर्वलोकपितामह त्यांना म्हणाला—"हे देवहो, या सर्व लोकांसह तुम्ही आलांत तसे परत जा. लवकरच या सागरांचा स्वतःच्या कर्मांनींच भयंकर नाश होईल."

( ३ ) पितामहाचें हें वचन ऐकून ते सर्व देव आणि लोक त्याची अनुज्ञा घेऊन निघून गेले. त्यानंतर पुष्कळ काल निघून गेला असतां वीर्यवान् 'सगर'-

राजानें अश्वमेधाची दीक्षा घेतली. तेव्हां त्याच्या पुत्रांनीं रक्षण केलेला त्याचा अश्व पृथ्वीवर संचार करूं लागला. सगरपुत्र त्या अश्वाचें मोठ्या प्रयत्नानें जरी रक्षण करीत होते, तरीहि तो श्यामकर्ण अश्व जलरहित व भीषण दिसणाऱ्या समुद्रापाशीं येतांच गुप्त झाला.

तें पाहून ते सर्व सगरपुत्र 'अश्वाचें कोणीं तरी हरण केलें आहे' असें समजून पित्यापाशीं आले व 'अश्वाचें कोणीं तरी हरण केलें आहे, तो कोठें दिसत नाहीं' असें सगराला सांगूं लागले.

तेव्हां तो राजा त्यांस म्हणाला—हे पुत्रहो, तुम्ही दाही दिशांत त्या अश्वाचा शोध करा. तें ऐकून सागर पित्याच्या आज्ञेनें दाही दिशांत त्या अश्वाचा शोध करण्यासाठीं निघाले आणि हे महाराज, त्या सगरपुत्रांनीं सर्व पृथ्वीतलावर अश्वाचा शोध केला. परंतु तो अश्व किंवा त्याचा हरणकर्ता त्यांस कोठेंहि आढळला नाहीं. नंतर ते सर्व भ्राते एकत्र जमून परस्परांस भेटले व पित्यापाशीं परत येऊन, हात जोडून नम्रपणें म्हणाले—

"हे तात, आम्हीं समुद्र, वनें, द्वीपें, नद्या, नद, गिरिकंदर, पर्वत व महारण्यें यांतून हिंडून सर्व पृथ्वीभर अश्वाचा शोध केला. हे महाराज, आपल्या आज्ञेनें आम्हीं पृथ्वीचा एकहि भाग सोडिला नाहीं. पण अश्व किंवा अश्वहर्ता यांतील कोणाचाच शोध लागला नाहीं."

(४) युधिष्ठिरा, आपल्या पुत्रांचें हें वचन ऐकून क्रोधवश झालेला राजा सगर दैववशात् त्या सर्व पुत्रांस म्हणाला—"हे मूढांनो, तुम्ही पुनः जाऊन अश्वाचा शोध करा आणि त्या यज्ञिय अश्वावांचून परत येऊं नका. अश्वाचा शोध लाविल्यावांचून परत यावयाचेंच नाहीं, अशा निश्चयानें तुम्ही येथून निघून जा."

राजाची ही आज्ञा शिरसामान्य करून ते सगरपुत्र पुनः सर्व पृथ्वीभर अश्वाचा शोध करीत फिरूं लागले. तों एके ठिकाणीं त्यांना पृथ्वी विदीर्ण झालेली दिसली. तेव्हां ते सर्व सागर त्या बिळापाशीं एकत्र जमले व कुदळी, खोरीं इत्यादि साधनांनीं तेथेंच खोदूं लागले. त्या वीरांनीं मोठ्या प्रयत्नानें समुद्राचें विदारण केलें. त्यामुळें तो वरुणालय अतिशय पीडित झाला. त्याच्या आश्रयानें रहाणारे विविध प्राणी आर्तरव करूं लागले. कारण ते बलाढ्य सगरपुत्र समुद्राचें समंततः विदारण करूं लागले असतां ज्यांचे

मस्तकादि देहावयव छिन्न-भिन्न झाले आहेत, असे सर्व प्राणी त्यावेळीं अतिशय दुःखी झाले.

याप्रमाणें ते बलोन्मत्त सागर वरुणालय समुद्राला खणीत असतां दीर्घकाल लोटला. हे राजा, शेवटीं अतिक्रुद्ध झालेल्या त्या सगरपुत्रांनीं समुद्राच्या ईशान्य प्रदेशीं पातालाचें विदारण केलें. तों तेथें भूतलावर संचार करीत असलेला यज्ञिय अश्व त्यांना दिसला.

त्या अश्वाजवळच ज्वालांनीं देदीप्यमान झालेल्या अग्नीप्रमाणें आपल्या तेजानें दुर्निरीक्ष्य झालेल्या तेजोराशि महात्म्या कपिलालाहि त्यांनीं पाहिलें. आपला यज्ञिय अश्व दृष्टीं पडतांच सगरपुत्रांस परम आल्हाद झाला आणि त्या आनंदाच्या भरांत कालानेंच प्रेरणा केल्यामुळें त्या महात्म्या कपिलाचा अनादर करून ते सागर मोठ्या आवेशानें अश्वाचें ग्रहण करावयासाठीं त्याच्या समीप धांवतच गेले.

तेव्हां, हे धर्मराजा, मुनिश्रेष्ठ कपिल क्रुद्ध झाला. त्या मुनिश्रेष्ठ कपिलाला वासुदेव असेंहि म्हणतात. त्या महात्म्यानें आपले प्रसन्न नेत्र विकृत करून सगरपुत्रांवर उग्रतेजाचा वर्षाव केला आणि त्या मंदबुद्धि सागरांस दग्ध करून सोडिलें.

याप्रमाणें साठ सहस्र सगरपुत्र कपिलाच्या तेजानें भस्मसात् झाले आहेत, असें पाहून महातपस्वी नारदानें सगरभूपतीपाशीं जाऊन त्याला तो वृत्तान्त निवेदन केला.

देवर्षीच्या मुखानें ती घोर वार्ता ऐकून, ‘सगर’-राजा मुहूर्तभर विमनस्क होऊन स्वस्थ बसला. इतक्यांत त्याला महादेवाच्या वचनाचें स्मरण झालें असतां त्यानें असमंजसाच्या अंशुमान् पुत्राला बोलावून आणिलें आणि तो आपल्या त्या पौत्राला म्हणाला—“ हे वत्सा, माझे अतिशय बलाढ्य साठ सहस्र पुत्र माझ्यासाठीं कपिलाच्या तेजानें मरण पावले आणि हे निष्पापा, प्रजेचें हित इच्छिणाऱ्या मीं स्वधर्मसंरक्षणासाठीं तुझ्या पित्याचाहि त्याग केला आहे. ”

( ५ ) युधिष्ठिर—हे तपोधना, राजश्रेष्ठ सगरानें सर्वथा अत्याज्य असलेल्या पुत्राचा त्याग कां केला, तें मला सांग.

लोमश—हे पांडुपुत्रा, सगराला शैब्या-भार्येच्या ठिकाणीं झालेला 'असमंजस'-नांवाचा एक पुत्र होता. तो नगरवासी जनांच्या दुर्बल बालकांचा गळा धरून, तीं आक्रोश करीत असतां, त्यांस नदींत फेकून देत असे. त्यामुळें भय व शोक यांनीं पीडित झालेले पौरजन राजापाशीं आले व हात जोडून नम्रपणें त्यास म्हणाले—"हे महाराज, परचक्रादिकांमुळें उत्पन्न झालेल्या भयापासून आमचें रक्षण करणारा तूंच आहेस. यास्तव तुझ्या असमंजस-पुत्रापासून उत्पन्न झालेल्या आमच्या घोर भीतीचें निवारण करण्यासहि तूंच समर्थ आहेस."

पौर जनांचें हें भयंकर वचन ऐकून सगरराजा अतिशय खिन्न झाला व आपल्या सचिवांस म्हणाला—"हे अमात्यहो, माझ्या 'असमंजस'-पुत्राला या राजधानींतून आजच्या आज घालवून द्या. तुम्हांला जर माझें प्रिय करावयाचें असेल तर माझी ही आज्ञा सत्वर मान्य करा."

हे कुंतीपुत्रा, भूपालाची ही आज्ञा शिरसामान्य करून सचिवांनीं राजपुत्राला नगरांतून सत्वर बाहेर घालविलें. महात्म्या सगरानें पौरजनांच्या हितासाठीं आपल्या पुत्राचा कसा त्याग केला, तें मीं तुला सांगितलें. आतां त्यानें आपल्या महाधनुर्धर 'अंशुमान्'-पौत्राला काय सांगितलें तेंहि मी सांगतों ऐक.

( ६ ) सगर म्हणाला—हे वत्सा, तुझ्या पित्याच्या त्यागानें, माझ्या साठ सहस्र पुत्रांच्या विनाशानें व यज्ञिय अश्वाच्या अप्राप्तीनें मला अतिशय क्लेश होत आहेत. यास्तव हे पौत्रा, दुःखानें अतिशय संतप्त व यज्ञांत उद्भवलेल्या विघ्नानें मोहित झालेल्या माझा तूं उद्धार कर. यज्ञिय अश्वाला परत आणिल्यानेंच माझ्या मनाचें समाधान होईल.

महात्म्या सगरानें असें सांगितलें असतां बुद्धिमान् अंशुमान् आपल्या पितामहाच्या दुःखानें दुःखित होऊन त्या सागरांनीं पृथ्वीचें जेथें विदारण केलें होतें त्या प्रदेशीं गेला. त्याच मार्गानें त्यानें समुद्रांत प्रवेश केला आणि तेथें असलेला महात्मा कपिल व तो यज्ञिय अश्व यांना पाहिलें.

त्यानें त्या तेजोराशि पुराण महर्षीला साष्टांग प्रणाम करून त्याला आपलें कार्य निवेदन केलें. तेव्हां तो धर्मात्मा कपिलमुनि अंशुमानावर प्रसन्न होऊन 'हे वीरा, मी वरद आहें. तुला कोणता वर देऊं तें सांग' असें बोलला.

तेव्हां तो सगरपौत्र अंशुमान् त्यास म्हणाला—भगवन्, माझ्या पितामहाच्या यज्ञपूर्तीसाठीं आपण मला हा यज्ञिय अश्व परत द्या. त्याचप्रमाणें आपल्या क्रोधाग्नीनें दग्ध झालेले हे साठ सहस्र सागर आपल्या प्रसादानें पावन व्हावे, असें मी इच्छितों.

तें ऐकून महातपस्वी 'कपिल'-मुनि त्यास म्हणाला—हे वीरा, तुझें कल्याण असो. मी तुझे सर्व मनोरथ पूर्ण करितों. तुझ्या ठिकाणीं क्षमा, धर्म व सत्यहि प्रतिष्ठित आहे. तुझ्यासारख्या पौत्राच्या योगानें राजा सगर कृतार्थ झाला आहे व तुझा पिता पुत्रवान् झाला आहे. तुझ्याच प्रभावानें साठ सहस्र सागर स्वर्गास जातील. तुझा पौत्र महेश्वराला संतुष्ट करून त्रिपथगा गंगा-देवीला सागराच्या उद्धारासाठीं भूलोकीं आणील. हे नरश्रेष्ठा, तुझें कल्याण असो. हा यज्ञिय अश्व घेऊन जा. महात्म्या सगराचा यज्ञ पूर्ण होवो.

भगवान् कपिलानें असें सांगितलें असतां तो पराक्रमी राजपौत्र यज्ञिय अश्व घेऊन धर्मात्म्या सगराच्या यज्ञमंडपांत आला व त्या विजयी अंशुमानानें आपल्या पितामहाच्या चरणांवर मस्तक ठेविलें. तेव्हां सगरानें त्याच्या मस्त-काचें अवघ्राण केलें.

त्या सत्पौत्रानेंहि अश्वाचा शोध करीत असतां जें जें कांहीं ऐकलें व पाहिलें होतें, तें तें सर्व आपल्या पितामहाला कथन केलें. सागरांच्या नाशाचा वृत्तान्तहि त्याला सांगितला आणि शेवटीं 'मीं यज्ञिय अश्वहि कपिलाच्या अनुज्ञेनें आणला आहे' असें म्हटलें.

तें ऐकून सगरराजा पुत्रांचें दुःख विसरला. त्यानें अंशुमानाची मोठी प्रशंसा केली व आपला महक्रतु संपविला.

(७) राजा युधिष्ठिरा, याप्रमाणें ज्यानें मोठ्या यत्नानें आपला यज्ञ संप-विला आहे, त्या सगराचा सर्व देवांनीं मोठा सत्कार केला. त्या महात्म्यानें वरुणालय समुद्राला आपल्या पुत्रस्थानीं कल्पिलें आणि दीर्घकाल समुद्र-वलयांकित पृथ्वीचें राज्य करून व शेवटीं आपल्या अंशुमान् पौत्रावर सर्व राज्य-भार टाकून त्यानें स्वर्गलोकीं गमन केलें.

धर्मात्म्या अंशुमानानेंहि आपल्या पितामहाप्रमाणेंच दीर्घकाल समुद्रान्त पृथ्वीचें राज्य केलें. त्याला दिलीप या नांवाचा मोठा धर्मज्ञ पुत्र झाला. अंशु-मानूहि आपलें राज्य त्याला समर्पण करून स्वर्गलोकीं गेला. दिलीपानें पित-

रांच्या निधनाची भयंकर वार्ता ऐकून दुःखित मनानें त्यांच्या उद्धाराचा विचार केला. त्या राजानें गंगेला भूलोकीं आणण्यासाठीं दीर्घ प्रयत्न केला. पण जन्मभर यत्न करूनहि तो त्या देवीला भूलोकीं आणूं शकला नाहीं. त्याचा पुत्र भगीरथ श्रीमान्, धर्मपरायण, सत्यवाक् व अनसूयु होता. त्याला राज्यावर स्थापून दिलीप वनांत गेला व त्यानें तपःसिद्धि मिळवून कालयोगानें वनांतूनच परलोकीं गमन केलें. ३. ७. १०७.

---

## अध्याय १०८ वा.

[ १ भगीरथाची गंगाराधना. २ तिच्याच आज्ञेनें शंकराचें प्रसादसंपादन. ]

( १ ) लोमश—हे भारता, तो महा धनुर्धर चक्रवर्ती भगीरथ राजा सर्व लोकांच्या मनाला व नेत्रांना आनंद देत असे. त्या महा पराक्रमी राजानें आपले पितर कपिल महर्षींच्या तेजानें दग्ध झाले असून त्यांना स्वर्गलोकाची प्राप्ति झालेली नाहीं, असें ऐकलें. त्यामुळें त्याला फार दुःख झालें.

त्या महात्म्यानें राज्यभार सचिवांवर टाकून उग्र तप करण्याचा निश्चय केला व तो नरेश्वर हिमालयाच्या शिखरावर गेला. त्यानें तपाच्या योगानें गंगेची आराधना करण्याचा निश्चय केला. तपश्चरणानें त्या महात्म्याचें सर्व पाप नष्ट झालें. तो महात्मा ज्या पर्वतश्रेष्ठ हिमालयावर तपश्चर्या करीत होता, तो पर्वतराज धातुमय विविधाकार शृंगांनीं भूषित झाला होता. त्याच्या शिखरावर अनेक मेघ विश्रांति घेत होते. अनेक नद्या व त्यांच्या तीरावरील लतागृहें यांच्या योगानें तो अतिशय शोभत होता.

त्या पर्वतराजाच्या गुहांतून सिंह-व्याघ्रादि हिंस्र प्राणी मोठ्या सुखानें रहात होते. विचित्र पक्षी आपल्या विविध शब्दांनीं त्याला नादित करीत होते. भृंगराज, हंस, दात्यूह, जलकुक्कुट, मयूर, कोकिल व चकोरादि पुत्रप्रिय पक्षी यांनीं तो पर्वत अतिशय रम्य दिसत होता.

त्या पर्वतावरील पद्मिनींनीं व्याप्त असलेले रम्य जलाशय सारस पक्ष्यांच्या मधुर रवानें नादित झाले होते. तेथील शिलातलांवर किन्नर व अप्सरा नित्य येऊन बसत असत. त्यावरील दाट वृक्ष दिग्गजांच्या दंतप्रहारांनीं व्रणयुक्त झालेले दिसत होते. विद्याधरांचा संघ त्यावरून वारंवार संचार करीत असे. तो पर्वत नानारत्नांनीं युक्त होता. भयंकर विषारी व सप्तजीह्व भुजंग त्यावर

इतस्ततः विहार करीत होते. तो हिमालय कांहीं ठिकाणीं रजततुल्य व कांहीं ठिकाणीं सुवर्णतुल्य दिसत होता.

हे राजा, अशा त्या हिमालयाच्या रम्य प्रदेशांत तो नरश्रेष्ठ भगीरथ फलमूलाशन करून एक हजार वर्षें ( दीर्घकाल ) घोर तप आचरीत राहिला.

याप्रमाणें एक हजार दिव्य वर्षें निघून गेलीं असतां साक्षात् गंगेनें त्याला दर्शन दिलें व ती देवी त्यास म्हणाली—हे महाराज, तूं माझ्यापासून कशाची इच्छा करीत आहेस? मी तुला काय देऊं तें सांग, म्हणजे मी तुझी मनीषा पूर्ण करीन.

गंगेचें हें वचन ऐकून राजा त्या हैमवतीला म्हणाला—हे वरद महानदि माझे पितामह यज्ञिय अश्वांचा शोध करीत असतां नाश पावले. कपिलानें त्यांना यमसदनीं पाठविलें. ते साठ हजार महात्मे सागर कपिलाजवळ जातांच एका क्षणांत दग्ध झाले. अशा दुर्मरणानें नाश झाल्यामुळें त्यांना स्वर्गांत रहातां येत नाहीं. हे महाभागे, जोंवर तूं त्यांच्या मृत शरीरांवर आपल्या जलाचें सिंचन केलें नाहींस, तोंवर त्या सागरांना उत्तम गति मिळणार नाहीं. यास्तव हे हैमवति, तूं त्या सगरपुत्रांना स्वर्गलोकीं ने. त्या माझ्या पितरांच्या उद्धारासाठीं मी तुजपाशीं याचना करीत आहें.

( २ ) लोमश—हे राजेंद्रा, राजाची ही प्रार्थना ऐकून लोकनमस्कृत गंगा मोठ्या प्रेमानें भगीरथाला म्हणाली—" हे महाराज, तुझ्या सांगण्याप्रमाणें मी निःसंशय करीन. परंतु गगनांतून भूमीवर पडणाऱ्या माझा वेग सहन करण्यास एका नीलकंठ-महेश्वरावांचून दुसरा कोणीहि समर्थ नाहीं. यास्तव हे महाबाहो, त्या वरद महादेवाला तूं तपानें संतुष्ट कर. म्हणजे तो ईश्वर स्वर्गांतून च्युत झालेल्या मला आपल्या मस्तकावर धारण करील आणि पितरांचें हित करण्याच्या इच्छेनें तूं जे क्लेश सहन केले आहेस ते सफल होतील. तुझा मनोरथ पूर्ण होईल."

गंगादेवीचें हें वचन ऐकतांच महाराज भगीरथानें कैलासपर्वतावर जाऊन कांहीं काल तीव्र तप आचरिलें आणि श्रीशंकराला प्रसन्न करून त्याच्यापासून आपल्या पितरांना स्वर्गवास प्राप्त होण्यासाठीं गंगाधारण करण्याचा वर मिळविला. ३. ७. १०८.

---

## अध्याय १०९ वा.

[ १ गंगेचें भूलोकीं अवतरण. ]

( १ ) लोमश—हे पांडुपुत्रा, भगीरथराजाचें हें वचन ऐकून देवांचें प्रिय करण्यासाठीं राजाला ' तथास्तु ' असें म्हणून भगवान् पुनः म्हणाला—" हे महाभाग, गगनांतून खालीं पडणाऱ्या दिव्य व पुण्यप्रद देवनदीला तुझ्यासाठीं मी मस्तकावर धारण करीन. "

राजा भगीरथाला असें बोलून भगवान् शंभु विविध आयुधें धारण करणाऱ्या घोर पार्षदांसह हिमालयापाशीं आला आणि तेथें उभा राहून तो नरश्रेष्ठ भगीरथाला म्हणाला—" हे महाबाहो, तूं शैलकन्या गंगेची प्रार्थना कर. स्वर्गांतून पडणाऱ्या त्या श्रेष्ठ नदीला मी आपल्या मस्तकावर धारण करीन. "

शंकरानें असें म्हटलें असतां राजा भगीरथानें शुचिर्भूत व नम्र होऊन गंगेचें चिंतन केलें. तेव्हां राजानें जिचें स्मरण केलें आहे अशी ती पुण्य जलानें युक्त असलेली रम्य नदी महेश्वराला खालीं स्थित असलेलें पाहून एकदम गगनांतून च्युत झाली.

ती दिव्य नदी स्वर्गांतून खालीं पडत आहे, असें पाहून महर्षींसह देव, गंधर्व, उरग व यक्ष तो अद्भुत चमत्कार पहाण्यासाठीं अंतरिक्षांत एकत्र जमा झाले. तों ती महा आवर्तांनीं व मत्स्य-नक्रादि भयंकर जलचरांनीं युक्त असलेली हिमालयकन्या गंगा आकाशांतून खालीं पडली. तेव्हां हे राजन्, त्या गिरिजेशानें गगनमेखलेप्रमाणें शोभणाऱ्या तिला तत्काल आपल्या मस्तकावर धारण केलें.

महेश्वराच्या मस्तकावर पडलेली व तीन मार्गांनीं समुद्राकडे वहात जाणारी ती गंगा जणुकाय मौक्तिकमालेप्रमाणेंच शोभली. तिचें शुभ्र व फेनयुक्त जल हंसपंक्तीप्रमाणें भासत होतें.

ती फेनपटलानें व्याप्त झालेली नदी कांहीं ठिकाणीं वक्रगतीनें, तर कोठें अडखळत एखाद्या प्रमत्त युवतीप्रमाणें जाऊं लागली. केव्हां केव्हां तिच्या जलाचा कर्णमधुर खळखळाट ऐकूं येत असे. हे राजा, याप्रमाणें अनेक लीला करीत ती पुण्य नदी भूतलावर येऊन पोंचली व भगीरथाला म्हणाली—"हे महाराज, मी कोणत्या मार्गानें वाहूं, तें मला दाखीव. हे पृथ्वीपते, मी तुझ्यासाठींच या भूलोकीं आलें आहें. "

तेव्हां भगीरथ ज्या ठिकाणीं महात्म्या सागरांचे मृतदेह पडले होते, तेथेंच त्या गंगेच्या पुण्यजलानें त्यांना पावन करण्यासाठीं जावयास निघाला.

हे युधिष्ठिरा, लोकनमस्कृत हर भगीरथाचें प्रिय करण्यासाठीं गंगेला मस्तकावर धारण करून ती भूलोकीं प्रवृत्त होतांच देवांसह श्रेष्ठ कैलासपर्वतावर निघून गेला.

इकडे भगीरथराजा गंगेसह समुद्रापाशीं आला आणि त्यानें गंगाजलानें त्या विस्तीर्ण शुष्क समुद्रास जलपूर्ण करून सोडिलें. त्या उदारचरित राजानें गंगेला आपली कन्या मानिलें आणि पूर्णमनोरथ झालेल्या त्या नराधिपानें पितरांना उद्देशून तर्पण केलें.

याप्रमाणें हे पांडवा, त्रैलोक्यांत वहाणारी गंगा समुद्राच्या पूर्तीसाठीं भूतलावर कशी अवतरली, महात्म्या अगस्त्यानें कोणत्या कारणानें समुद्रजल प्राशन केलें, ब्राह्मणांचा नाश करणाऱ्या वातापीचा नाश कसा झाला, हा सर्व तूं विचारलेला वृत्तान्त मीं तुला निःशेष कथन केला आहे. ३. ७. १०९.

---

## अध्याय ११० वा.

[ १ युधिष्ठिराचें नंदा, अपरनंदा व हेमकूट यांकडे क्रमानें प्रयाण व पर्वतावरील अद्भुतदर्शन. २ त्याचें निमित्तकथन. ३ ऋष्यशृंगाचें जन्मवृत्त. ४ लोमपादाच्या राज्यांतील अनावृष्टि व तिच्या निवृत्तीसाठीं उपाययोजना. ]

( १ ) वैशंपायन—हे जनमेजया, त्यानंतर युधिष्ठिर क्रमानें भयनाशक-नंदा आणि अपरनंदा या दोन नद्यांना जाऊन तेथून हेमकूट पर्वतावर गेला. तेथें त्यानें अनेक अद्भुत व अचिंत्य पदार्थ पाहिले. तेथील मेघ व शिला वायूवांचून संचार करीत असत. त्यामुळें ज्यांचें मन उद्विग्न झालें आहे, असे लोक त्यावर चढण्यास समर्थ होत नसत.

तेथें वायु सतत वहात असून पर्जन्यवृष्टिहि नित्य होत असे. त्या प्रदेशांत स्वाध्यायाचा घोष ऐकूं येत असे, पण अध्ययन करणारा मात्र कोणी दृष्टीं पडत नसे. त्या ठिकाणीं भगवान् हव्यवाहन अग्नि प्रातःकाळीं व सायंकाळीं दृष्टीं पडत असे. मक्षिका असह्य दंश करून तपामध्यें विघ्न करीत असत. तेथें गेलेला मनुष्य त्या पर्वतदर्शनाविषयीं विरक्त होऊन आपलें गृह, स्त्री, इत्यादिकांचें स्मरण करूं लागे.

(२) याप्रमाणें अनेक अद्भुत प्रकार पाहून युधिष्ठिरानें लोमशमुनीला त्यांविषयीं प्रश्न केला असतां त्या महर्षीनें जसें ऐकलें होतें, तसेंच सांगण्यास आरंभ केला—

लोमश—हे शत्रुकर्शन राजन्, आम्हीं हा वृत्तान्त पूर्वीं जसा ऐकला होता, तसा मी तुला सांगतों, लक्षपूर्वक ऐक.

या ऋषभकूट शैलशृंगावर पूर्वीं ' ऋषभ '-नांवाचा एक अतिशय क्रोधी तापस रहात होता. त्याला शेंकडों वर्षांचें आयुष्य होतें. एकदा येथें इतर कोणीं मनुष्यें भाषण करूं लागलीं असतां हा तपस्वी क्रुद्ध होऊन पर्वताला म्हणाला—" हे गिरिश्रेष्ठा, जो कोणी येथें येऊन बोलूं लागेल, त्यावर तूं पाषाण फेंकीत जा. "

नंतर तो वायूला हांका मारून म्हणाला—' हे वायो, तूं शब्द करूं नको. '

तेव्हांपासून या पर्वतशिखरावर कोणीं बोलूं लागल्यास मेघगर्जना होऊन त्याचा शब्द बंद पडतो. याप्रमाणें त्या महर्षीनें क्रोधानें कांहीं कृत्यें केलीं व कांहींचा निषेध केला.

हे राजा, पूर्वीं एकदा देव नंदानदीवर गेले असतां तेथें त्या देवांच्या दर्शनासाठीं लोकांची अकस्मात् गर्दी झाली, असें श्रुत आहे. परंतु इंद्रादि देवांची त्यांना दर्शन देण्याची इच्छा नसल्यामुळें त्यांनीं हा पर्वत विघ्नरूप व दुर्गम करून ठेविला. तेव्हांपासून हे कौंतेया, मानवांना या पर्वताचें दर्शनहि अशक्य झालें आहे. मग त्यावरील आरोहण तर दूरच राहिलें.

हे युधिष्ठिरा, उग्र तप आचरिल्यावांचून या महागिरीकडे पहाणेंहि शक्य नाहीं किंवा त्यावर आरूढ होण्यासहि कोणी समर्थ नाहीं. यास्तव तूं वाणीचें नियमन कर. हे भारता, या पर्वतावर पूर्वीं देवांनीं श्रेष्ठ यज्ञ केले होते. त्यांचीं कांहीं चिह्नें अद्यापि दृष्टीं पडतात.

येथील दूर्वा दर्भांसारख्या दिसत असून त्या सर्व भूमीवर पसरल्या आहेत. त्याचप्रमाणें हे अनेक वृक्ष यूपांच्या आकाराचे झाले आहेत.

येथें अद्यापि देव आणि ऋषि रहात आहेत. त्यांचा अग्नि प्रातःकालीं व सायंकालीं दिसत असतो. येथें स्नान करणाराचें पातक तत्काल नाश पावतें. यास्तव हे युधिष्ठिरा, तूं अनुजांसह या नदींत स्नान कर. या नंदानदींत स्नान केल्यानंतर आपण विश्वामित्रानें जेथें उग्र तपश्चर्या केली त्या कौशिकी-नदीच्या तीरावर जाऊं.

वैशंपायन—हे राजा, त्यानंतर युधिष्ठिरानें आपल्या सर्व परिवारासह त्या नदींत स्नान केलें व तेथून तो पुण्य व रम्य कौशिकी-नदीस गेला. त्या नदीचें जल शीतल व शुभ होतें.

(३) लोमश—हे भरतर्षभा, ही कौशिकी पवित्र देवनदी आहे आणि तिच्या तीरावर विश्वामित्राचा हा रम्य आश्रम दिसत आहे व हा दुसरा पुण्याश्रम महात्म्या कश्यपाचा आहे. याचा 'ऋष्यशृंग' या नांवाचा एक तपस्वी व जितेंद्रिय पुत्र होता. त्यानें आपल्या तपःप्रभावानें इंद्राकडून वृष्टि करविली. दीर्घकाल अनावृष्टि झाली असतां या महात्म्याच्या भीतीनें वृत्रशत्रु शक्रानें विपुल वृष्टि केली.

तो काश्यपकुलोत्पन्न विभांडकाचा तेजस्वी पुत्र एका मृगीच्या ठिकाणीं उत्पन्न झाला. त्या प्रभूनें लोमपादाच्या राज्यांत पूर्वोक्त वृष्टिरूप अद्भुत कर्म केलें व सर्वत्र धान्यादिकांची समृद्धि झाली असतां त्या भूपतीनें आपली 'शांता'-कन्या त्याला अर्पण केली. सूर्य जसा सावित्रीचें समर्पण करितो, तशी लोम-पादानें त्या ऋषीला आपली कन्या अर्पण केली.

युधिष्ठिर—हे भगवन्, काश्यपपुत्र ऋष्यशृंग मृगीच्या ठिकाणीं कसा उत्पन्न झाला, आणि विरुद्ध योनिसंसर्ग झाला असतांहि तो तपस्वी कसा निपजला! तसेंच, लोमपादाच्या राज्यांत दीर्घकाल अनावृष्टि झाली असतां त्या बुद्धिमान् अल्पवयस्क ऋषिपुत्राच्या भीतीनें बल व वृत्रासुर यांचाहि नाश करणाऱ्या इंद्रानें अकस्मात् वृष्टि कशी केली! जिनें मृगभूत ऋषीचेंहि चित्त आकर्षण करून घेतलें त्या नियतव्रत राजकन्येचें स्वरूप कसें काय होतें? राजर्षि लोमपाद मोठा धार्मिक म्हणून त्याची प्रसिद्धि आहे, असें असतां इंद्रानें त्याच्या राष्ट्रांत अनावृष्टि कां केली? हे भगवन्, हा सर्व वृत्तांत तूं मला सविस्तर व यथार्थ सांग. ऋष्यशृंगाचें अद्भुत कर्म ऐक-ण्याची माझी इच्छा आहे.

लोमश—युधिष्ठिरा, विभांडक महर्षि तपानें शुद्धचित्त झाला होता. तो अमोघ वीर्यवान् व प्रजापतीसारखा तेजस्वी होता. त्या अति पूज्य महर्षीला प्रता-पवान् व तेजस्वी ऋष्यशृंग पुत्र कसा झाला व तो बालक असून वृद्धांनाहि संमत कसा झाला, तें मी तुला सांगतों, ऐक.

तो देवतुल्य असलेला ऋषि महान्हदाचा आश्रय करून दीर्घकाल तपश्चर्या करीत राहिला. पण एकदा तो मुनि ऱ्हदामध्यें स्नान करीत असतां त्यानें उर्वशीला पाहिलें आणि क्षुब्धचित्त झालेल्या त्याचें वीर्य ऱ्हदांतच स्खलन पावलें.

इतक्यांत एक तृषित हरिणी तेथें आली व तिनें तें अमोघ वीर्य जलासह प्राशन केलें. त्यामुळें तिला गर्भ राहिला. वस्तुतः ती पूर्वी देव-कन्या होती. तिला एका ऋषीनें 'तूं मृगी होशील' असा शाप दिला. ती लोककर्त्या ब्रह्मदेवाला शरण गेली. तेव्हां त्या पितामहानें 'तूं मृगी होऊन एका मुनीला जन्म दिलास म्हणजे या शापापासून मुक्त होशील.' असें पूर्वींच सांगून ठेविलें होतें.

विधात्याचें हें वचन अमोघ असल्यामुळें व भवितव्य अपरिहार्य असल्या-मुळें त्या मृगीच्या ठिकाणीं हा विभांडकपुत्र उत्पन्न झाला. तो महर्षि ऋष्य-शृंग वनामध्येंच तपःपरायण होऊन राहिला.

हे राजा, त्या महात्म्या ऋषीच्या मस्तकावर एक शृंग होतें. त्यामुळें तो 'ऋष्यशृंग' या नांवानें प्रसिद्ध झाला. त्यानें आपल्या पित्यावांचून दुसरा कोणताहि मनुष्य पाहिला नव्हता. त्यामुळें हे राजा, त्याचें मन नित्य ब्रह्मचर्यांत रत झालें.

त्याच वेळीं अयोध्याधिपति दशरथाचा 'लोमपाद'-नांवाचा अंगदेशाधिपति मित्र होता. त्यानें ब्राह्मणाशीं बुद्धिपुरःसर मिथ्याचरण केलें. त्यानें प्रथम एका ब्राह्मणाला 'मी तुला अमुक देईन.' असें अभिवचन देऊन नंतर 'मीं तुला कांहीं देण्याचें क़बूल केलें नव्हतें.' असें मिथ्या भाषण केलें. त्यामुळें सर्व ब्राह्मणांनीं त्या राजाचा त्याग केला. त्याच्या पुरोहितांनींहि यदृच्छेनें सदोष धर्माचरण केलें. त्यामुळें त्याच्या राष्ट्रांत दीर्घकाल अनावृष्टि झाली व प्रजेला अतिशय पीडा होऊं लागली.

तेव्हां तो खिन्न झालेला लोमपाद विद्वान्, तपोयुक्त व इंद्राकडून वृष्टि कर-विण्यास समर्थ असलेल्या ब्राह्मणांस शरण जाऊन 'माझ्या राष्ट्रांत पर्जन्यवृष्टि होईल' असा तुम्ही कांहींतरी उपाय योजा, असें त्यांस म्हणाला.

तें ऐकून त्या विद्वान् ब्राह्मणांनीं त्यांस आपापलीं मतें सांगितलीं. त्यांतील एक श्रेष्ठ मुनि त्यास म्हणाला—" हे राजेंद्रा, सर्व ब्राह्मण तुजवर क्रुद्ध झाले

आहेत. त्यांच्या शांतीसाठीं कांहीं प्रायश्चित्त कर. हे राजा, तूं विभांडक-मुनीच्या 'ऋष्यशृंग-' पुत्राला येथें आणीव. त्याचा जन्म वनांतच झाला असून तो वनांतच वाढला आहे. स्त्री हा पदार्थ त्याला कधीं ऐकूनहि ठाऊक नाहीं. तो सर्वथा निष्कपट आहे. हे महाराज, तो महातपस्वी ऋषिपुत्र जर तुझ्या देशांत येईल, तर तत्काल पर्जन्यवृष्टि होईल, यांत मुळींच संशय नाहीं."

हे राजा, ब्राह्मणांचें तें वचन ऐकून लोमपादानें ब्राह्मणांच्या संतोषासाठीं प्रायश्चित्त केलें व ते प्रसन्न झाले असतां तो राजा आपल्या राजधानीस परत आला. त्या वेळीं आपला भूपति स्वनगरीला परत आलेला पाहून सर्व प्रजा संतुष्ट झाली.

आपल्या नगरीस परत आल्यावर त्या अंगपतीनें मंत्रज्ञ सचिवांस एकत्र जमविलें व त्यांच्याशीं संकेत करून ऋष्यशृंगाला आणविण्याचा दीर्घ प्रयत्न केला. शास्त्रज्ञ, अर्थज्ञ व नीतिविशारद अमात्यांशीं त्यानें पुष्कळ ऊहापोह करून उपायाचा निश्चय केला.

नंतर त्या राजानें परवंचनादि कार्यांत अतिशय निष्णात असलेल्या मुख्य मुख्य वेश्यांना आपल्या राजमंदिरांत आणविलें आणि 'हे सुंदर स्त्रियांनो, तुम्ही ऋषिपुत्र ऋष्यशृंगाला उपायानें इकडे आणा. त्या महात्म्याच्या मनांत विषयेच्छा उत्पन्न करून व त्याचा विश्वास संपादन करून तो माझ्या राष्ट्रांत येईल असा प्रयत्न करा' अशी त्यांस आज्ञा केली.

राजानें सांगितलेलें हें दुर्घट कार्य ऐकून त्या सर्व वेश्या राजाचें शासन व ब्राह्मणाचा शाप या दोन्ही आपत्तींस भ्याल्या व निस्तेज आणि मूढ झालेल्या त्या सर्व जणी 'हें कार्य अशक्य आहे' असें बोलल्या.

पण त्यांतील एक वृद्ध स्त्री राजास म्हणाली—हे महाराज, मी त्या तपोधनाला आणण्याचा प्रयत्न करितें. पण तूं आपल्या अमात्यांस मला त्यासाठीं अवश्य असलेलीं भोगसाधनें पुरविण्याची आज्ञा कर. म्हणजे मी त्या ऋषिपुत्र ऋष्यशृंगाला येथें आणण्यास समर्थ होईन.

तें ऐकून लोमपादानें आपल्या भृत्यांस तिला इष्ट असलेलें सर्व भोगसाधन पुरविण्याची आज्ञा केली. त्यानें तिला विपुल धन व विविध रत्नेंहि दिलीं. तेव्हां ती कुशल वृद्ध वेश्या कांहीं रूपसंपन्न व तरुण स्त्रिया बरोबर घेऊन त्या ऋष्यशृंगाच्या वनांत गेली. ३. ७. ११०.

---

## अध्याय १११ वा.

[ १ तापस वेषधारी वेश्येचा ऋष्यशृंगाशीं संवाद. २ तिच्या विलासांनीं ऋषिपुत्राचा मोह. ३ विभांडकानें त्याच्या क्षोभाविषयीं केलेला प्रश्न. ]

( १ ) लोमश—हे राजा, त्या वृद्ध वेश्येनें राजाच्या आज्ञेनें व आपल्याहि बुद्धीनें राजकार्य सिद्ध होण्यासाठीं एक नांव्याश्रम तयार करविला. तो विविध पुष्पें आणि फलें यांनीं युक्त अशा कृत्रिम वृक्षांनीं सुशोभित झाला होता. तो आश्रम अनेक गुल्म, लता, मधुर फलयुक्त वृक्ष यांनीं जणुं काय संपन्न असल्याप्रमाणेंच दिसत होता.

राजानें कुशल शिल्प्यांकडून तो नाव्याश्रम अति रम्य, अति मनोहर व अद्भुतदर्शन बनविला. त्यानंतर ती नाव काश्यपाश्रमाजवळच बांधून त्या वृद्ध वेश्येनें आपल्या हेरांकडून तो मुनि बाहेर केव्हां जातो, याचा शोध करविला व 'विभांडक'-मुनि बाहेर संचार करावयास गेला आहे, असें पाहून त्या धूर्त वृद्धेनें आपल्या एका तरुण वेश्येला कर्तव्याचा उपदेश करून ऋष्यशृंगाकडे पाठविलें.

त्या कुशल तरुणीनें तपामध्यें तत्पर असलेल्या ऋष्यशृंगाजवळ जाऊन त्याचें दर्शन घेतलें आणि ती त्याला म्हणाली—"हे मुने, तापसांचें कुशल आहे ना? तुम्हांला येथें मूल-फलादि अवश्य असलेल्या वस्तु विपुल मिळतात ना? या आश्रमामध्यें तुझें चित्त रत होतें ना? मी आज केवळ तुझ्या दर्शनासाठीं येथें आलों आहें.

हे ऋष्यशृंगा, तुझा पिता पूर्ण तपस्तेजानें युक्त आहे ना! तुजवर तो प्रसन्न आहे ना! आणि हे विप्रा, तूं नित्य स्वाध्याय करतोस ना!

ऋष्यशृंग म्हणाला—हे श्रेष्ठा, तूं आपल्या ऋद्धीनें ज्योतीप्रमाणें प्रकाश पावत आहेस. तूं मला सर्वथा वंद्य वाटतोस. मी तुला तुझ्या इच्छेप्रमाणें पाद्य, फल, मूल इत्यादि देतों. तूं या कृष्णाजिनानें आच्छादित केलेल्या सुखावह कुशासनावर बैस. हे ब्रह्मन्, तुझा आश्रम कोठें आहे? आणि तूं देवाप्रमाणें हें कोणतें व्रत आचरीत आहेस!

वेश्या म्हणाली—हे काश्यपपुत्रा, या शैलाच्या पलीकडे तीन योजनावर माझा आश्रम आहे. तेथें मी रहातों. 'कोणाकडून अभिवादन करून घ्याव-

१ नावेनें तरून जाण्यास योग्य असा आश्रम.

याचें नाहीं व पाद्योदकाला स्पर्श करावयाचा नाहीं' असें माझें व्रत आहे. यास्तव तूं मला अभिवादन करूं नको, उलट मीच तुला आलिंगन देतों.

ऋष्यशृंग—हे तापसा, मी तुला विविध पक्क फलें देतों. त्यांचा तूं स्वीकार कर.

लोमश—हे युधिष्ठिरा, पण त्या तापसानें तीं सर्व वन्य फलें वर्ज्य करून आपल्या जवळचीं अमूल्य, भक्ष्य, रसाळ व रम्य फळें त्याला अर्पण केलीं. तीं पाहून ऋष्यशृंगाला अतिशय आनंद झाला. त्यानंतर त्या वेश्येनें त्याला सुवासिक पुष्पें, उत्तम वस्त्रें व मधुर पेयें दिलीं असतां ऋष्यशृंगानें त्यांचा मोठ्या संतोषानें स्वीकार केला.

( २ ) त्यानंतर ती तापसवेषधारी तरुणी त्याच्याशीं खेळूं लागली. मोठमोठ्यानें हंसून त्याचें रंजन करूं लागली. त्याच्या समीप जाऊन फलानें युक्त असलेल्या लतेप्रमाणें अंगविक्षेप करीत त्याला रमवूं लागली व त्याच्या अवयवांस स्पर्श करून त्याला वारंवार दृढ आलिंगन देऊं लागली.

त्याचप्रमाणें तिनें सर्ज, अशोक, तिलक इत्यादि प्रफुल्लित वृक्ष वांकवून त्यांचे पुष्पगुच्छ तोडिले व प्रमत्त झालेल्या त्या गणिकेनें लाजत लाजत त्या महर्षिपुत्रास मोहित केलें. आतां ऋष्यशृंगाच्या मनांत कामविकार उद्भवला आहे असें पाहून त्या यौवनसंपन्न वेश्येनें त्याला पुनः पुनः दृढ आलिंगन देऊन अधिकच अस्वस्थ केलें आणि ती त्या निष्कपट ऋषिपुत्राला नेत्रकटाक्षांनीं विद्ध करीत अग्निहोत्राचें निमित्त करून हळूच तेथून निघून गेली.

( ३ ) राजा, ती चतुर वेश्या निघून गेली असतां मदनानें विह्वल झालेला ऋष्यशृंग विवेकशून्य होऊन तिचेंच चिंतन करीत त्या निर्जन वनांत निःश्वास टाकीत आर्त होऊन बसला. त्यानंतर कांहीं वेळानें स्वाध्यायसंपन्न विभांडक तेथें आला. त्या काश्यपमुनीचे नेत्र सिंहाप्रमाणें पिंगट व सर्व शरीर आनखाग्र लोमांनीं व्याप्त होतें. तो मुनिश्रेष्ठ सदाचार व समाधि यांनीं युक्त होता.

त्यानें एकांतांत विमनस्क चित्तानें विचार करीत बसलेल्या पुत्राला पाहून व त्याच्या समीप जाऊन म्हटलें—" वत्सा, आज तूं समिधा कशा आणल्या नाहींस! तुझें अग्निहोत्र झालेलें दिसत नाहीं. तूं अद्यापि होमधेनूच्या दोहनासाठीं वत्सहि सोडिलें नाहींस. स्रुक्-स्रुवादि होमपात्रांचें मार्जनहि केलें नाहींस.

बाळा, आज तूं नेहमीसारखा प्रसन्न दिसत नाहींस. तूं अतिशय चिंतामग्न व दीन दिसत आहेस. तेव्हां आज आपल्या या आश्रमांत कोण आलें होतें तें मला सांग." ३. ७. १११.

---

## अध्याय ११२ वा.

[ १ ऋष्यशृंगानें केलेलें तापसवेषधारी वेश्येचें व तिच्या विलासाचें वर्णन. ]

(१) ऋष्यशृंग म्हणाला—हे तात, आज येथें एक जटाधारी ब्रह्मचारी आला होता. तो अति उंच नव्हता व अति ठेंगू नव्हता. त्या ज्ञानसंपन्न ब्राह्मणाची अंगकांति सुवर्णासारखी व दोन्ही नेत्र कमलपत्रासारखे सुंदर असून तो एखाद्या देवासारखा शोभत होता. तो सूर्यासारखा देदीप्यमान असून अतिशय गौरवर्ण होता. त्याचे नेत्र काळेभोर होते.

त्याच्या नीलवर्ण दीर्घ जटा सुगंधयुक्त व प्रसन्न असून त्या सुवर्णरज्जूनें बांधल्या होत्या. त्याच्या कंठांतील अलंकार अंतरिक्षांतील विद्युल्लतेप्रमाणें चमकत होता. त्याच्या कंठाच्या अधोभागीं लोमरहित मनोहर कंदुकाकार दोन अपूर्व अवयव होते. त्याचा नाभिप्रदेश व कटिप्रदेश अतिशय कृश होता. माझ्या या कढदोऱ्याप्रमाणेंच त्याच्या वस्त्राच्या आंत असलेली सुवर्णमय मेखला फार शोभत होती. त्यानें दोन्ही पायांत मंजुल ध्वनि करणारीं कांहीं भूषणें घातलीं असून तीं अतिशय दर्शनीय होतीं. माझ्या या अक्षमालेप्रमाणेंच त्याच्या दोन्ही बाहूंमध्यें ध्वनि करणारीं भूषणें होतीं आणि तो हालचाल करूं लागला असतां सरोवरांतील मत्त हंसरवाप्रमाणें त्यांतून मंजुळ शब्द निघत असे.

त्याचप्रमाणें त्याचीं वल्कलेंहि अद्भुत होतीं. माझीं हीं वल्कलें तशीं सुंदर नाहींत. त्या तापसाचें मृदु भाषण करणारें रमणीय मुख माझ्या हृदयाला संतुष्ट करीत होतें आणि त्याची कोकिलेसारखी वाणी ऐकल्यापासून तर माझें मन अतिशय व्यथित झालें आहे.

हे तात, वसंत-ऋतूंत वायूनें हलविलेलें वन जसें शोभतें, तसा वायूकडून सेवन केला जाणारा व पवित्र सुगंधानें युक्त असलेला तो तापस भासत होता. त्यानें आपल्या जटांचे दोन विभाग करून ते आपल्या मस्तकावर व्यवस्थित बांधले होते. त्याचे दोन्ही कान विचित्र व सुस्वरूप चक्रवाकाकार पदार्थानें आच्छादित झाले होते.

त्याचप्रमाणें त्यानें हातांत एक विचित्र फल घेऊन तें भूमीवर फेंकलें व पुनः तें उजव्या हातांत झेलून घेतलें. अशा प्रकारें त्यानें तें फल वारंवार भूमीवर फेंकून पुनः पुनः झेलून घेतलें. वायूनें हलविलेला वृक्ष जसा पुनः पुनः परिवर्तन पावतो, त्याचप्रमाणें तें फलहि त्याच्या हस्ताच्या आघातानें परिवर्तन पावत असे. हे तात, त्या देवपुत्रासारख्या तापसाला पाहून माझ्या मनांत अतिशय आसक्ति उत्पन्न झाली व त्याच्यावर माझी प्रीति जडली. त्या ब्रह्मचाऱ्यानें मला पुनः पुनः आलिंगन दिलें व माझ्या जटा धरून माझें मस्तक खालीं वांकविलें आणि आपलें मुख माझ्या मुखाला लावून कांहीं शब्द केला. तेव्हां तर मला अपरिमित हर्ष झाला.

परंतु त्यानें मीं दिलेल्या पाद्यादिकांचा स्वीकार केला नाहीं. मीं त्याला फलें समर्पण केलीं, तींहि त्यानें घेतलीं नाहींत. 'कोणापासून पाद्य किंवा फलें ग्रहण करावयाचीं नाहींत, असेंच माझें व्रत आहे.' असं त्यानें मला सांगितलें व उलट त्यानेंच मला फलें दिलीं. तीं मीं खाल्लीं.

खरोखर हे बाबा, तीं फळें अतिशय मधुर होतीं. आपलीं हीं फळें तशीं नाहींत. त्यांची त्वचा यांच्यासारखी कठिण नव्हती व आंतील सारहि तसें नव्हतें. त्या तापसानें मला पिण्यासाठीं मधुर पेय दिलें. तें प्राशन करतांच मला अतिशय हर्ष झाला व कांही वेळानें तर ही भूमि फिरत असल्यासारखीच भासली.

रेशमांत गुंफलेल्या या विचित्र व सुगंधी माला माझ्या गळ्यांत घालून तो साधु आपल्या आश्रमाला निघून गेला. येथून निघून गेलेल्या त्या तेजस्वी मुनीनें माझ्या चित्ताला अस्वस्थ केलें आहे. माझें हें शरीर जणुकाय दग्ध होत आहे. हे तात, मला त्या तापसाजवळ जाण्याची फार इच्छा झाली आहे. त्यानें सतत येथें यावें, असें मला वाटतें.

हे तात, मी त्याच्या समीप जातों. त्याचें हें ब्रह्मचर्य कोणत्या स्वरूपाचें आहे, तें मी समजून घेतों. तो श्रेष्ठ व्रती जसें तप आचरीत आहे, तसेंच मीहि त्याच्याबरोबर आचरीन. त्याच्याच सहवासांत असावें, अशी माझी इच्छा आहे. त्याला पाहिल्यावांचून माझें चित्त स्वस्थ होणार नाहीं. ३. ७. ११२.

---

## अध्याय ११३ वा.

[ १ अशा दुष्ट राक्षसांच्या नादीं न लागण्याविषयीं विभांडकाचा उपदेश. २ लुब्ध झालेल्या ऋष्यशृंगाचें लोमपादाच्या नगरीस गमन. ३ विभांडकाचा क्रोध. ४ त्याची उपायानें शांति. ५ ऋष्यशृंगाची कृतकृत्यता. ]

(१) विभांडक म्हणाला—पुत्रा, अनुपम वीर्यवान् राक्षस असें अद्भुत रूप धारण करून आपल्यासारख्या तपस्व्यांच्या आश्रमांतून संचार करितात व 'आपल्या तपामध्यें विघ्न कसें करतां येईल.' याचाच विचार करीत असतात. ते विचित्र व मनोहर रूपें धारण करून विविध उपायांनीं तपस्व्यांना लुब्ध करितात आणि वनवासी मुनींना उच्च लोक व सुख यांपासून च्युत करितात. यास्तव बाळा, उत्तम लोकांची इच्छा करणाऱ्या जितेंद्रिय मुनीनें त्यांच्या नादीं लागूं नये व त्यांचा सहवास करूं नये.

ते पापाचरणी राक्षस तापसांना विघ्न करण्यांतच मोठा संतोष मानितात. यास्तव त्यांचें मुखावलोकनहि करूं नये. हे वत्सा, तीं मधुर पेयें पापासक्त करणारीं आहेत. असज्जनच त्यांचें सेवन करितात. विचित्र व उज्ज्वल गंधांनीं युक्त असलेल्या पुष्पमाला मुनींना विहित नाहींत.

लोमश—हे युधिष्ठिरा, याप्रमाणें विभांडक-मुनीनें आपल्या पुत्राला 'ते राक्षस आहेत, त्यांच्या सहवासांत राहूं नये.' असें सांगून त्याचें निवारण केलें व तीन दिवस त्या अरण्यांत त्या कपटी स्त्रीचा शोध केला, पण त्याला तिचा शोध लागला नाहीं. तेव्हां तो आपल्या आश्रमास परत आला.

( २ ) पण तो काश्यप पुनः वैदिक विधीनें फलें आणण्यासाठीं अरण्यांत निघून गेला असतां ती कपट तापसी स्त्री ऋष्यशृंग-मुनीला लुब्ध करण्यासाठीं पुनः त्याच्याकडे आली.

तिला पहातांच ऋष्यशृंग अतिशय हृष्ट झाला. त्याचें चित्त चंचल झालें व कामवश झालेला तो मुनिपुत्र तिच्यापाशीं वेगानें धांवत आला व म्हणाला— "जोंवर माझा पिता आला नाहीं, तोंवर आपण तुझ्याच आश्रमांत जाऊं या."

तेव्हां हे राजन्, त्या विलासिनीनें मोठ्या युक्तीनें त्या काश्यपपुत्राला नावेंत बसवून नाव हांकारली आणि विविध उपायानीं त्याचें रंजन करीत त्या ऋयष्शृंगाला अंगाधिपतीच्या समीप नेल. तेव्हां राजानें ती अति शुभ्र

नाव जेथून दिसेल अशा मध्यावर स्थापून व जलांतून तिला वर काढून तिच्या सभोंवार 'नाव्याश्रम'-नांवाचें विचित्र वन तयार करविलें.

नंतर त्या विभांडकाच्या एकुलत्या एक पुत्राला अंतःपुरांत नेलें. त्याबरोबर इंद्रानें प्रसन्न होऊन त्याच्या राष्ट्रांत विपुल जलवृष्टि केली. देवेंद्रानें आपलें सर्व राष्ट्र जलपूर्ण केलेलें पाहून लोमपाद राजा संतुष्ट झाला व त्या पूर्णकाम उदारात्म्यानें आपली 'शांता'-नामक कन्या ऋष्यशृंगाला दिली.

तथापि त्या राजाला 'विभांडक-ऋषि आपल्यावर क्रुद्ध होईल.' अशी भीति वाटत होती. म्हणून त्यानें त्याच्या क्रोधाचा प्रतीकार करण्याचे उपाय योजिले. विभांडक-ऋषि क्रुद्ध होऊन आपल्याकडे येईल, या भीतीनें लोमपादराजानें त्याच्या मार्गावर जागजागीं अनेक गायी व बैल ठेवून भूमि नांगरण्याचें काम सुरू केलें व त्यांच्या संरक्षणासाठीं अनेक शूर पशुपालहि ठेविले.

नंतर तो राजा त्यांस म्हणाला—"हे वीरांनो, पुत्रेच्छु विभांडक-महर्षि जेव्हां तुम्हांला या पशूंविषयीं व भूमिकर्षणाविषयीं विचारील तेव्हां तुम्ही हात जोडून नम्रपणें 'भगवन्, हे सर्व पशु व कृषि तुझ्या पुत्राची आहे. हे महर्षे, तुझी आज्ञा शिरसामान्य करणारे आम्ही तुझे दास आहों. आम्हीं तुझें कोणतें प्रिय करावें?' असें बोलून त्या मुनीला प्रसन्न करा.

(३) इकडे तो क्रोधी विभांडकमुनि फल-मूलादि सामग्री घेऊन आपल्या आश्रमास परत आला. पण आपला ऋष्यशृंग पुत्र आश्रमांत नाहीं, असें पाहून व त्याचा पुष्कळ शोध करून तो जेव्हां कोठेंच दिसेना, तेव्हां तो मुनि अतिशय क्रुद्ध झाला, आणि क्रोधानें संतप्त झालेला तो महर्षि 'हें लोमपाद-राजाचेंच कपटकृत्य असावें' असें समजून त्या अंगराजाला नगर व राष्ट्र यांसह दग्ध करीत चंपा-नगरीकडे निघाला.

(४) तों श्रांत व क्षुधित झालेल्या काश्यपानें आपल्या मार्गांत समृद्ध घोष पाहिले. त्या गोपालांनीं त्याचा राजाप्रमाणें यथाविधि सत्कार केला. तेव्हां तो श्रांत झालेला महात्मा त्या रात्रीं तेथेंच राहिला. गोपांच्या सत्कारांनीं त्याच्या श्रमांचा परिहार झाला असतां 'गोपांनो, तुम्ही कोणाचे भृत्य अहां व हे विपुल पशु व कृषि कोणाची आहे?' असें विचारूं लागला.

तेव्हां ते सर्व गोप त्या महर्षीपाशीं येऊन 'हे भगवन्, हें सर्व धन तुझ्या पुत्राचें आहे.' असें नम्रपणें बोलले.

याप्रमाणें मार्गांतील भिन्न भिन्न प्रदेशीं गोपादिकांकडून सन्मान केला जाणारा व त्यांचें मधुर भाषण श्रवण करणारा तो महर्षि शांतचित्त झाला. मार्गांतील राजसेवकांच्या उपचारांनीं त्याचा बराचसा क्रोध निवृत्त झाला. शेवटीं तो चंपापुरस्थ अंगाधिपतीस येऊन भेटला.

( ५ ) त्या नृपतीनें त्या मुनीचा मोठा सत्कार केला. देवलोकांतील देवेंद्राप्रमाणें भासणारा आपला पुत्र व मेघमंडलांत चमकणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें शोभणारी ' शांता '-स्नुषा यांस पाहून तो अतिशय हृष्ट झाला.

पुत्राचे ग्राम, घोष व शांतापत्नी यांस पाहून ' विभांडक '-मुनीचा प्रचंड क्रोधहि शांत झाला. हे नरेंद्रा, त्या महात्म्यानें लोमपादराजावर मोठा अनुग्रह केला. सूर्य व अग्नि यांप्रमाणें ज्याचा प्रभाव आहे, अशा त्या महर्षीनें पुत्राला तेथेंच ठेवून ' वत्सा, राजाचें सर्व प्रिय करून तुला पुत्र झाला म्हणजे तूं वनांत निघून ये. ' अशी आज्ञा केली.

पित्याचें हें वचन शिरसामान्य करून ऋष्यशृंग कांहीं काल श्वशुरगृहीं राहिला आणि पुत्रोत्पत्ति झाल्यावर तो आपल्या पित्याकडे निघून गेला.

हे नरेंद्रा, चंद्राला रोहिणी, वसिष्ठाला अरुंधती, अगस्त्याला लोपामुद्रा, नलाला दमयंती, वज्रधर इंद्राला शची किंवा मुद्गलाला नारायणी इंद्रसेना जशी अनुकूल असते तशी शांताहि आपल्या वनस्थ ऋष्यशृंग पतीला अनुकूल होऊन व त्याच्या अधीन राहून मोठ्या प्रेमानें त्याची परिचर्या करूं लागली.

हे आजमीढा, त्या महात्म्या ऋष्यशृंगाचा या महाऱ्हदाला शोभविणारा हा पुण्यकीर्ति आश्रम दिसत आहे. यांत स्नान करून तूं कृतकृत्य व विशुद्ध हो आणि अन्य तीर्थांकडे चल. ३. ७. ११३.

---

## अध्याय ११४ वा.

[ १ पांडवांचें कलिंगदेशास गमन. २ वैतरणींत पितृतर्पण व सर्वलोकदर्शन. ३ लोमशाच्या प्रोत्साहनानें युधिष्ठिराचें वेदीवर आरोहण. ]

( १ ) **वैशंपायन**—हे जनमेजया, त्यानंतर ते पांडव 'कौशिकी'-नदींत स्नानादि करून क्रमानें इतर सर्व पवित्र तीर्थांस गेले. पुढें समुद्रतीरावर आऊन ज्या ठिकाणीं गंगानदी सागराला मिळते, त्या ठिकाणीं पांचशें नद्यांच्या

मध्यभागीं त्यांनीं स्नान केलें. नंतर हे भरतश्रेष्ठा, तो कुंतीपुत्र युधिष्ठिर भ्रात्यांसह समुद्रतीरानें कलिंग देशास गेला.

तेव्हां लोमश त्याला म्हणाला—हे युधिष्ठिरा, हाच तो कलिंग देश. येथेंच वैतरणी-नदी आहे. याच ठिकाणीं देवांना शरण जाऊन धर्मानें यज्ञ केला होता. पर्वतांनीं शोभणारें हें वैतरणीचें उत्तरतीर ऋषींचें निवासस्थान आणि द्विजसेवित यज्ञिय भूमि आहे. स्वर्गी जाणाऱ्या लोकांना हें स्थान देवयानमार्गतुल्य आहे. येथेंच पूर्वी इतर ऋषींनींहि अनेक यज्ञ केले.

हे राजेंद्रा, याच पुण्यप्रदेशीं पूर्वी रुद्रानें यज्ञामध्यें 'हा माझा भाग आहे.' असें म्हणून पशूचें ग्रहण केलें.

तेव्हां 'या यज्ञिय पशूचें तूं हरण करूं नको. हा परक्याचा भाग आहे, त्याचा तूं नाश करूं नको. सर्व यज्ञभागाची तूं एकटाच अपेक्षा करूं नको.' असें म्हणून सर्व देवांनीं कल्याणप्रद वाणीनें रुद्राची स्तुति केली आणि इष्टीनें तर्पण करून त्याचा सत्कार केला. तेव्हां त्या पशूला सोडून रुद्र देवयानमार्गानें निघून गेला.

हे युधिष्ठिरा, मी तुला आतां रुद्राची परंपरा सांगतों ऐक. रुद्राच्या भीतीनें देवांनीं सर्व यज्ञिय भागांतील तात्कालिक उत्तम आणि शाश्वत भाग अगोदर रुद्राला अर्पण केला. हे राजा, जो पुरुष आचमन घेऊन ही गाथा नित्य गातो, त्याच्या दृष्टीला देवयानमार्ग साक्षात् दिसूं लागतो.

(२) वैशंपायन—हे पारिक्षिता, त्यानंतर द्रौपदीसह सर्व पांडवांनीं वैतरणींत उतरून स्नान व पितरांचें तर्पण केलें. त्या वेळीं युधिष्ठिर म्हणाला—हे लोमशमुने, या नदींत यथाविधि स्नान करतांच मी तपोबलाच्या योगानें मानुष विषयापासून दूर गेलों आहें, असें मला वाटतें. हे सुव्रता, पहा; तुझ्या प्रसादानें मला हे सर्व लोक दिसत आहेत. जप करणाऱ्या महात्म्या वैखानसांचा हा शब्द ऐकूं येत आहे.

लोमश—हे युधिष्ठिरा, जेथून हा ध्वनि येत आहे, तें पवित्र स्थान येथून तीन लक्ष योजनें दूर आहे. हे राजन्, यास्तव तूं आतां कांहीं न बोलतां स्वस्थ बैस. हे पृथ्वीपाला, स्वयंभू ब्रह्मदेवाचें हें दिव्य वन आहे. येथें प्रतापवान् विश्वकर्म्यानें यज्ञ केला होता. त्या वेळीं ब्रह्मदेवानें पर्वत-वनासह ही सर्व भूमि कश्यपाला दक्षिणा म्हणून अर्पण केली.

तेव्हां हे कौंतेया, आपलें दान झालेलें पहातांच भूमि उद्विग्न होऊन मोठ्या क्रोधानें लोकेश्वर प्रभूला म्हणाली—"हे भगवन्, कोणाहि मानवाला माझें दान करणें योग्य नव्हे. तुझें हें दान व्यर्थ आहे. मी याच क्षणीं रसातलास जातें."

(३) याप्रमाणें भूमि खिन्न झाली आहे, असें पाहून भगवान् कश्यपानें तिला प्रसन्न केलें. तेव्हां त्या महर्षीच्या तपानें प्रसन्न झालेली पृथ्वी जलांतून वर येऊन वेदीच्या रूपानें स्थित झाली. हे पांडवा, हीच ती वेदीच्या आकारानें शोभणारी भूमि आहे. हे महाराज, तूं हिच्यावर आरूढ हो. म्हणजे वीर्यवान् होशील.

हे पांडुनंदना, ही वेदी समुद्राच्या आश्रयानें राहिली आहे. तूं तिच्यावर आरोहण केलेंस कीं तत्काल तुझें कल्याण होईल व तूं हा दुस्तर भवसागर तरून जाशील. हे राजा, तूं या वेदीवर आरूढ होत असतां मी तुझें स्वस्त्ययन करीन. कारण कोणाहि मानवाचा स्पर्श होतांच ही वेदी समुद्रांत प्रवेश करिते.

हे आजमीढा युधिष्ठिरा, "ओंनमो[1] विश्वगुप्ताय नमो विश्वपराय ते। सान्निध्यं कुरु देवेश सागरे लवणांभसि ॥ अग्निर्मित्रो योनिरापोऽथ देव्यो विष्णोरेतस्त्वममृतस्य नाभिः ॥" हें सत्यवचन उच्चारीत तूं या वेदीवर सत्वर आरूढ हो.

तसेंच 'अग्निश्च[2] ते योनिरिडा च देहो रेतोधा विष्णोरमृतस्य नाभिः ॥' या सत्यवाक्याचा जप करीत तूं समुद्रांत स्नान कर. हे राजा, त्यावांचून या सागराला नुस्त्या कुशाग्रानेंहि स्पर्श करणें शक्य नाहीं.

---

१ 'ओंनमो०' हा स्नानादिकांसाठीं समुद्रप्रार्थनेचा मंत्र आहे. ज्याच्यामध्यें सर्व विश्व प्रलयकालीं लीन होतें व जो सर्वांहून श्रेष्ठ आहे, त्या विष्णूला नमस्कार असो. हे देवेशा, क्षारजलानें युक्त असलेल्या या समुद्रांत तूं सान्निध्य कर. अग्नीप्रमाणेंच सूर्यहि जलाची योनि आहे व शरीराकार परिणत झालेल्या जलदेवता व्यापक आत्म्याच्या अभिव्यक्तीचें स्थान आहेत. हे समुद्रा, तें स्थान तूंच आहेस. तूं अमृताचें उत्पत्तिस्थान आहेस.

२ अग्नि तुझी योनि आहे. यज्ञ तुझा देह आहे. विष्णूचा वीर्यरूप असलेला जीव देहामध्यें स्थापिला जातो, तेंच मोक्षाचें साधन आहे.

**वैशंपायन**—हे नरेंद्रा, त्यानंतर ऋषीनें स्वस्त्ययन केलें असतां महात्म्या युधिष्ठिरानें सागरांत प्रवेश केला आणि मुनीच्या आज्ञेप्रमाणें सर्व अनुष्ठान केल्यानंतर महेंद्रपर्वतावर येऊन तेथें एक रात्र निवास केला. ३. ७. ११४.

---

## अध्याय ११५ वा.

[ १ युधिष्ठिराचा अकृतव्रणाला भार्गवरामाच्या दर्शनाविषयीं व चरित्राविषयीं प्रश्न. २ अकृतव्रणानें केलेला भार्गवचरित्राचा उपक्रम. ३ गाधिकन्या सत्यवती व ऋचीक यांचा विवाह. ४ भृगूचा स्नुषेला व तिच्या मातेला पुत्रप्राप्त्यर्थ वर व उपाय. ५ प्रमादानें त्यांचा विपर्यास. ]

( १ ) **वैशंपायन**—हे राजेंद्रा, युधिष्ठिरानें त्या पर्वतावर एक रात्र राहून भ्रात्यांसह तेथील तापसांचा अतिशय सत्कार केला. त्या वेळीं लोमश मुनीनें भृगु, आंगिरस, वासिष्ठ आणि काश्यप या सर्व महर्षींना युधिष्ठिराचा परिचय करून दिला. तेव्हां त्या कौंतेयानें त्यांच्या समीप जाऊन, हात जोडून त्यांना अभिवादन केलें.

नंतर तो पांडव रामाचा वीर अनुचर जो अकृतव्रण त्याच्यापाशीं गेला व म्हणाला—"हे भगवन्, परशुराम तापसांना केव्हां दर्शन देणार आहे? त्याच-प्रसंगीं त्या भार्गवाचें दर्शन घेण्याची माझी इच्छा आहे."

**अकृतव्रण**—हे धर्मराजा, तूं येथें येत आहेस ही वार्ता आत्मज्ञानी रामाला कळली असून तो आपल्या दर्शनानें तुजवरील प्रेम लवकरच व्यक्त करील. राम चतुर्दशीस व अष्टमीस तापसांच्या दृष्टीं पडतो आणि आजची रात्र गेली कीं उद्यां चतुर्दशीच आहे.

**युधिष्ठिर**—हे वीरा, महाबलाढ्य जामदग्न्यरामाचा तूं अनुयायी आहेस. त्या महात्म्याचें सर्व पूर्वचरित्र आणि अद्भुत कर्में तूं प्रत्यक्ष पाहिलीं आहेस. यास्तव हे शूरा, भार्गवरामानें युद्धांत सर्व क्षत्रियांना कोणत्या हेतूनें व कसें जिंकलें तें मला सांग.

( २ ) **अकृतव्रण**—हे भारता, ठीक आहे. भृगुकुलांत उत्पन्न झालेल्या जामदग्न्याचें महदाख्यान अतिशय उत्कृष्ट आहे. त्या परशुरामाचें देवतुल्य चरित्र आणि हैहयाधिपति कार्तवीर्याचें वृत्त मी तुला सांगतों, ऐक.

हे राजशार्दूल पांडवा, भार्गवरामानें ज्या हैहयाधिपति अर्जुनाचा वध केला, त्याला सहस्रबाहु होते. त्या कार्तवीर्याला दत्तात्रेयाच्या प्रसादानें सुवर्णाचें विमान प्राप्त झालें असून पृथ्वींतील सर्व प्राणिमात्र त्याच्या अधीन होते. त्याच्या रथाची गति कोठेंच कुंठित होत नसे. वरानें प्राप्त झालेल्या त्या दिव्य रथांतून तो महापराक्रमी वीर वारंवार देव, यक्ष आणि ऋषि यांचा संहार करून इतर सर्व भूतमात्रास सर्व प्रकारें पीडा देत असे.

तेव्हां हे राजन्, देव व महाव्रत ऋषि, सत्यपराक्रमी देवाधिदेव विष्णूकडे जाऊन म्हणाले—" हे भगवन्, प्राण्यांच्या रक्षणासाठीं कार्तवीर्याचा वध कर. हे प्रभो, त्या हैहयाधिपतीनें दिव्य विमानांतून जाऊन शचीसह क्रीडा करीत असलेल्या इंद्राचाहि पराभव केला आहे."

हे युधिष्ठिरा, देवांची ही प्रार्थना ऐकून भगवान् पद्मनाभानें इंद्राशीं कार्तवीर्याचा नाश करण्याचा संकेत केला. तेव्हां इंद्रानें सर्व लोकांच्या कल्याणाचें जें कार्य निवेदन केलें, तें सर्वहि मान्य करून तो लोकपूजित प्रभु आपल्या रम्य बदरीकाश्रमास निघून गेला.

( ३ ) याच समयीं पृथ्वीवर कान्यकुब्जदेशाचा 'गाधि'-नामक एक महा बलाढ्य प्रसिद्ध भूपाल होता. त्यानें वनवास स्वीकारिला होता. तो पृथ्वीपति वनांत रहात असतां त्याला अप्सरेसारखी एक सुस्वरूप कन्या झाली. योग्य कालीं भार्गव ऋचीकानें तिची मागणी केली.

तेव्हां त्या नियतव्रत ब्राह्मणाला गाधि म्हणाला—हे विप्रश्रेष्ठा, आमच्या कुलांत पूर्वपरंपरेनें चालत आलेले कांहीं उचित आचार आहेत. एक हजार वेगवान् श्यामकर्ण श्वेत अश्व कन्येचें शुल्क घेण्याची आमची कुलपरंपरा आहे. परंतु हे भार्गवा, तुझ्यासारख्या महात्म्याला तें शुल्क दे, असें सांगणें उचित नाहीं आणि तुझ्यासारख्या महात्म्याला तर मला आपली कन्या अवश्य द्यावयाचीच आहे.

ऋचीक—हे नृपते, ज्यांचे कर्ण बाहेरून श्यामवर्ण व आंतून आरक्त आहेत, असे शुभ्र वेगवान् एक सहस्र अश्व जेव्हां मी तुला आणून देईन त्या वेळींच तूं आपली कन्या मला अर्पण कर.

अकृतव्रण—हे राजन्, तेव्हां तो राजा 'ठीक आहे' असें म्हणाला व ऋचीकमुनि वरुणाकडे जाऊन 'हे वरुणा, मला वेगवान् श्यामकर्ण एक हजार शुभ्र अश्व दे. मला ते शुल्कासाठीं पाहिजे आहेत' असें म्हणाला.

'ऋचीक'-मुनीचें हें वचन ऐकतांच वरुणानें तत्काल त्याला इष्ट असलेले अश्व दिले. ते श्रेष्ठ अश्व कान्यकुब्ज देशांतून वाहणाऱ्या ज्या गंगास्थानांतून वर आले तें स्थल 'अश्वतीर्थ'-नांवानें प्रसिद्ध झालें व हे राजा, देव वरपक्षीय होऊन तेथें आले. तेव्हां 'गाधी'-राजानें ते सर्व देव व सहस्र अश्व यांस पाहून आपली कन्या सत्यवती ऋचीकाला विवाहविधीनें अर्पण केली. अशाप्रकारें त्या राजकन्येला धर्मानें मिळवून तो द्विजश्रेष्ठ आपल्या रूपवती पत्नीसह प्रेमानें यथेच्छ क्रीडा करीत काल कंठूं लागला.

त्यानंतर आपल्या पुत्राचा विवाह झाल्याचें ऐकून त्याला भार्येसह पहाण्याच्या इच्छेनें भृगुमहर्षि तेथें आला, व आपल्या पुत्राला पाहून संतुष्ट झाला. त्या वेळीं देवांनाहि पूज्य असलेला तो श्रेष्ठ मुनि आसनावर बसला असतां त्या पती-पत्नींनीं त्याचा योग्य सत्कार केला आणि तीं उभयतां हात जोडून उभीं राहिलीं.

तेव्हां अतिशय हृष्ट झालेला भगवान् भृगु आपल्या स्नुषेला म्हणाला—"हे सुभगे, तुला इष्ट असलेला वर माग. तूं जें मागशील तें मी तुला देईन."

(४) त्या वेळीं हे राजन्, त्या साध्वीनें त्या श्रेष्ठ मुनीला प्रसन्न करून स्वतःला व आपल्या मातेला एकेक पुत्र व्हावा अशी श्वशुराची प्रार्थना केली व त्यानें तिची मनीषा पूर्ण केली.

भृगु म्हणाला—हे वत्से, तूं व तुझी माता ऋतुकालीं स्नान करून पुत्रप्राप्तीसाठीं अश्वत्थ व औदुंबर या दोन वृक्षांना पृथक् पृथक् आलिंगन द्या. तूं औदुंबरला व तिनें अश्वत्थाला आलिंगावें. शिवाय मीं विराट् पुरुषाचें पुनः पुनः ध्यान करून हे दोन चरु तुझ्यासाठीं व तुझ्या जननीसाठीं मोठ्या यत्नानें सिद्ध करून ठेविले आहेत. ते तुम्ही दक्षतेनें प्राशन करा. असें सांगून तो महर्षि अंतर्धान पावला.

(५) हे युधिष्ठिरा, पुढें त्या दोघींनीं वृक्षाला आलिंगन देण्यांत व चरुप्राशन करण्यांत विपर्यास केला. त्यांनीं एकमेकींचे चरु व वृक्ष बदलले. मातेसाठीं नियुक्त केलेल्या चरूचें कन्येनें प्राशन केलें व कन्येसाठीं नियोजित वृक्षाला मातेनें आलिंगन दिलें.

त्यानंतर दीर्घ काल लोटला असतां भगवान् भृगु दिव्य ज्ञानानें हा सर्व प्रकार जाणून पुनः तेथें आला आणि तो महातेजस्वी मुनि आपल्या सत्यवती

स्नुषेला म्हणाला—"हे भद्रे, तूं चरु प्राशन केलास आणि वृक्षालाहि आलिंगन दिलेंस. परंतु हे वत्से, माझ्या सांगण्याच्या विपरीत वागून तुझ्या मातेनें तुला फसविलें आहे. त्यामुळें तुला होणारा पुत्र क्षत्रियवृत्तीचा ब्राह्मण होईल आणि तुझ्या मातेला ब्राह्मणवृत्तीचा क्षत्रिय पुत्र होईल. तो महापराक्रमी पुत्र प्रख्यात व सन्मार्गी निपजेल."

मुनीचें हें वचन ऐकून सत्यवतीनें 'मला अशा प्रकारचा पुत्र नको, फार तर पौत्र तसा होऊं दे' अशी श्वशुराची पुनः पुनः प्रार्थना केली. तेव्हां त्या मुनीनें 'तथास्तु' असें म्हणून तिला संतुष्ट केलें.

त्यानंतर हे पांडवा, योग्यकालीं तिला जमदग्नि पुत्र झाला. तो भार्गवनंदन मूळचाच अतिशय कांतिमान् व तेजस्वी असून वेदाध्ययनानें तर उत्तरोत्तर अधिकच तेजस्वी झाला. त्या तेजस्वी मुनीनें वेदाध्ययनांत अनेक ऋषींचेंहि उल्लंघन केलें. त्या सूर्यासारख्या देदीप्यमान ऋषीला संपूर्ण धनुर्वेद व चतुर्विध अस्त्रें सहज प्राप्त झालीं. ३. ७. ११५.

---

## अध्याय ११६ वा.

[१ जमदग्नीला रेणुकेची प्राप्ति. २ तिच्या पांच पुत्रांचा जन्म. ३ जमदग्नीची पुत्रांना मातृवधाची आज्ञा. ४ त्याचा चारी पुत्रांना शाप. ५ रामानें केलेला मातृवध व वरानें तिचें पुनरुज्जीवन. ६ कार्तवीर्याचा वध. ७ जमदग्नीचा मृत्यु.]

(१) अकृतव्रण—हे युधिष्ठिरा, त्या वेदाध्ययनपरायण महातपस्वी जमदग्नीनें तीव्र तप आचरिलें व नियमनिष्ठ होऊन वेदांना आपल्या वश करून घेतलें. त्यानंतर तो श्रेष्ठ मुनि प्रसेनजित राजाकडे गेला व त्यानें त्याच्या रेणुका-कन्येची मागणी केली. तेव्हां त्या नराधिपानें आपली कन्या त्याला अर्पण केली.

(२) राजकन्या रेणुकेशीं विवाह करून तो भार्गवनंदन वधूसह आपल्या आश्रमास परत आला व त्या सर्वस्वीं अनुकूल असलेल्या भार्येसह पुनः तपश्चर्या करूं लागला. पुढें त्या भार्गवपत्नीला चार पुत्र झाल्यावर 'राम' हा पांचवा पुत्र झाला. परशुराम सर्व भ्रात्यांहून वयानें जरी कनिष्ठ होता, तरी तो पराक्रमांत सर्वांहून श्रेष्ठ होता.

एकदा ते सर्व पुत्र फल-मूलादि आणण्यासाठीं गेले असतां नियतव्रत धारण करणारी रेणुका स्नानासाठीं नदीवर गेली. तों तेथें आलेला मार्तिकावत-देशाचा भूपाल 'चित्ररथराजा' यदृच्छेनें तिच्या दृष्टीं पडला. तो नराधिप गळ्यांत कमलाच्या माला घालून आपल्या पत्नीसह जलक्रीडा करीत होता.

त्या ऐश्वर्यसंपन्न नृपतीला पाहून रेणुकेला त्याच्या प्राप्तीची इच्छा झाली. परंतु हा मनानें व्यभिचार होतांच ती खिन्न व उत्साहहीन होऊन आपल्या आश्रमास परत आली. तेव्हां तिच्या जामदग्न्य-पतीनें धैर्यापासून च्युत व ब्राह्मीकांतीनें रहित झालेल्या तिला पहातांच तिचा मानस व्यभिचार अंत-र्ज्ञानानें जाणला आणि त्या वीर्यवान् महा तेजस्वी मुनीनें तिचा धिक्कार केला.

( ३ ) नंतर जमदग्नीचा ज्येष्ठ पुत्र रुमण्वान् तेथें आला. त्याच्या मागून अनुक्रमें सुषेण, वसु आणि विश्वावसु, हेहि भ्राते येऊन पोंचले. तेव्हां भग-वान् जमदग्नीनें त्या प्रत्येकास मातेचा वध करण्याची क्रमानें आज्ञा केली.

( ४ ) पित्याचें तें निर्दय वचन ऐकून ते सर्व भ्राते खिन्न झाले व मातृस्ने-हानें विह्वल होऊन कांहीं न बोलतां स्वस्थ उभे राहिले. तें पाहून जमदग्नीनें क्रोधानें त्यांस शाप दिला. त्याबरोबर ते चौघेहि भ्राते तत्काल चेतनारहित व मृग-पक्ष्यांप्रमाणें जड होऊन राहिले. इतक्यां शत्रूंचा संहार करणारा राम आश्र-मांत आला. तेव्हां महातपस्वी जमदग्नि त्याला म्हणाला—"हे पुत्रा, या तुझ्या पातकी मातेचा वध कर आणि त्यासाठीं मुळींच खिन्न होऊं नको."

( ५ ) पित्याची ही आज्ञा ऐकतांच रामानें आपली परशु घेतली व तत्काल मातेचा शिरश्छेद केला. पुत्राचें हें साहस पाहून महात्म्या जमदग्नीचा क्रोध शांत झाला व तो प्रसन्न होऊन अकस्मात् म्हणाला—"हे वत्सा, माझ्या सांगण्यावरून तूं हें अतिशय दुष्कर कर्म केलेंस. यास्तव तुझ्या मनांत जेवढ्या इच्छा असतील, त्या सर्वांचा वर माग.

तेव्हां परशुरामानें मातेचें पुनरुज्जीवन, तिला वधाची अस्मृति, मातृवधाच्या पापापासून स्वतःची मुक्तता, भ्रात्यांना पूर्वस्थितीची प्राप्ति, आपल्याला युद्धांत अन्य प्रतियोद्धा नसणें आणि दीर्घ आयुष्य, इतके वर मागून घेतले व महा तपस्वी जमदग्नीनें ते सर्व त्यास दिले.

हे प्रभो, त्यानंतर एकदा ते सर्व जमदग्निपुत्र, बाहेर गेले असतां अनूप देशाचा अधिपति कार्तवीर्य तेथें आला. तेव्हां आश्रमांत आलेल्या त्या राजाचा ऋषिपत्नीनें आदर-सत्कार केला. परंतु युद्धमदानें मत्त झालेल्या त्या नरेश्वरानें तिच्या सत्काराचा स्वीकार केला नाहीं. उलट आश्रमाचा विध्वंस करून होमधेनु आक्रोश करीत असतां तिच्या वत्साचें बलात्कारानें हरण केलें व तेथील उत्तमोत्तम वृक्षांना छिन्न-भिन्न करून तो निघून गेला.

( ६ ) थोड्या वेळानें राम आश्रमांत परत आला असतां त्याला पित्यानें सर्व वृत्तान्त सांगितला. तो ऐकून व हंबरणाऱ्या गायीला पाहून तो अतिशय क्रुद्ध झाला आणि आपलें श्रेष्ठ धनुष्य घेऊन मृत्यूच्या वश झालेल्या कार्तवीर्यावर धांवून गेला. त्या शत्रुनाशक भार्गवानें युद्धांत त्या सहस्रार्जुनाचा पराभव केला आणि त्याचे परिघासारखे सहस्र बाहु आपल्या अमोघ बाणांनीं तोडून टाकिले. तेव्हां रामाच्या हातून पराभव पावलेला तो कार्तवीर्य मृत्युमुखीं पडला.

( ७ ) पुढें रामावर क्रुद्ध झालेले कार्तवीर्याचे पुत्र 'भार्गवराम आश्रमांत नाहीं' असें पाहून तेथें आले व जमदग्नि ऋषीवर धांवून गेले. त्या वेळीं तो असहाय महा तपस्वी मुनि युद्ध न करितां एखाद्या अनाथाप्रमाणें 'हे राम, हे राम' असा वारंवार आक्रोश करूं लागला. तथापि त्या कार्तवीर्याच्या पुत्रांनीं त्याला बाणांनीं पीडा देऊन त्याचा वध केला व ते शत्रूंचा नाश करणारे वीर आल्या मार्गानें निघून गेले.

जमदग्नीचा अशा प्रकारें अंत करून ते राजपुत्र निघून गेल्यानंतर हातांत समिधा घेऊन भृगुनंदन राम आश्रमांत आला. तेव्हां हे युधिष्ठिरा, आपला पिता अशा अयोग्य प्रकारें मृत्युवश झालेला पाहून तो वीर अतिशय दुःखानें 'अरे अरे, हा माझा पूज्य पिता भार्यावधाच्या दोषामुळें स्वतःच तशा प्रकारच्या मरणाला प्राप्त झाला आहे' अशा आशयानें विलाप करूं लागला. ३. ७. ११६.

---

## अध्याय ११७ वा.

[ १ रामाचा विलाप. २. पृथ्वी निःक्षत्रिय करण्याची प्रतिज्ञा, क्षत्रियांचा नाश, समंतपंचकांतील डोहांत पितृतर्पण. ३ यज्ञांत देवतर्पण व पृथ्वीचें कश्यपाला दान. ४ रामाचें पांडवांस दर्शन. ]

( १ ) भार्गवराम—हे तात, माझ्या अपराधामुळें कार्तवीर्याच्या मूर्ख व क्षुद्रबुद्धि पुत्रांनीं वनांतील मृगाप्रमाणें बाणांनीं तुझा वध केला. हे भगवन्, कोणाहि प्राण्याची हिंसा न करणाऱ्या व सन्मार्गानें चालणाऱ्या तुझ्यासारख्या धर्मज्ञाला अशा प्रकारें मृत्यु यावा हें कसें युक्त होईल !

ज्या अधमांनीं तुझ्यासारख्या तपोनिष्ठ व युद्धांत प्रवृत्त न होणाऱ्या वृद्धावर शेंकडों तीक्ष्ण शर सोडिले, त्यांनीं कोणतें पाप केलें नाहीं ! ते निर्लज्ज राजपुत्र युद्ध न करणाऱ्या व एकाकी असलेल्या तुजसारख्या धार्मिकाचा प्राण घेऊन आपले सुहृद् व सचिव यांच्यामध्यें बसून आपला कोणता पुरुषार्थ सांगतील ! हे राजा याप्रमाणें त्या रामानें अनेक प्रकारें करुण स्वरानें विलाप केल्यावर आपल्या महातपस्वी पित्याचीं सर्व प्रेतकार्यें केलीं.

( २ ) शत्रूंचीं नगरें उध्वस्त करणाऱ्या त्या रामानें पित्याचें दहन करून पृथ्वीवरील सर्व क्षत्रियांचा वध करण्याची प्रतिज्ञा केली. हे भारता, अंतकासारख्या अतिशय क्रुद्ध झालेल्या त्या अति बलाढ्य जामदग्न्यानें हातांत शस्त्र घेऊन युद्धांत कार्तवीर्याच्या सर्व पुत्रांचा संहार केला आणि त्यांचे जेवढे अनुयायी क्षत्रिय होते, त्या सर्वांचा नाश करून त्या पराक्रमी वीरानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली व त्या भार्गवानें क्षत्रियांच्या रक्तानें समंतपंचक देशांत रक्ताचे पांच डोह निर्माण केले आणि त्यांत पितरांचें तर्पण केलें.

त्या वेळीं ऋचीक महर्षीनें रामाला साक्षात् दर्शन देऊन त्याचें या क्रूर कर्मांपासून निवारण केलें.

( ३ ) त्यानंतर प्रतापवान् भार्गवानें एक मोठा यज्ञ केला. त्यांत त्यानें देवेंद्रास तृप्त करून ऋत्विजांना भूमि दिली. महात्म्या कश्यपाला दहा वांव लांब व नऊ वांव उंच अशी सुवर्णाची वेदी दान दिली. तेव्हां कश्यपाच्या अनुमतीनें ब्राह्मणांनीं त्या भूमीचे खंडशः तुकडे केले. तेव्हांपासून तें स्थान ‘खांडवायन’ या नांवानें प्रसिद्ध झालें.

महात्म्या कश्यपाला पृथ्वीचें दान देऊन तो अमितपराक्रमी भार्गवराम या महेंद्र पर्वतावर येऊन राहिला आहे. युधिष्ठिरा, याप्रमाणें त्या रेणुकानंदनाचें पृथ्वीवरील क्षत्रियांशीं वैर उत्पन्न झालें आणि त्या महातेजस्वी वीरानें अशा प्रकारें सर्व पृथ्वी जिंकली.

( ४ ) **वैशंपायन**—हे जनमेजया, त्यानंतर चतुर्दशीच्या दिवशीं महात्म्या भार्गवानें संकेताप्रमाणें ते सर्व विप्र व अनुजांसह धर्मराज यांस दर्शन दिलें. त्या वेळीं त्या नरश्रेष्ठानें भ्रात्यांसह त्या पराक्रमी वीराची पूजा केली. त्याच-प्रमाणें तेथील सर्व ब्राह्मणांचाहि त्यानें उत्तम प्रकारें सन्मान केला. नंतर सत्कार केलेल्या जामदग्न्याच्या आज्ञेवरून पांडव त्या महेंद्र पर्वतावर एक रात्र राहून दक्षिण दिशेकडे जाण्यास निघाले. ३. ७. ११७.

---

## अध्याय ११८ वा.

[ १ समुद्रतीरावरील विविध तीर्थें पहात पांडवांचें प्रभासतीर्थीं आगमन. २ युधिष्ठिराचें तीव्र तप व वृष्णींशीं समागम. ]

( १ ) **वैशंपायन**—हे जनमेजया, त्या महानुभाव राजा युधिष्ठिरानें समुद्र-तीरावरून तीर्थाटन करीत असतां ब्राह्मणांनीं सुशोभित झालेलीं सर्व पवित्र व रम्य तीर्थें पाहिलीं. त्या सदाचरणसंपन्न युधिष्ठिरानें आपल्या अनुजांसह त्या तीर्थांत स्नानें केलीं व तो कौंतेय समुद्राला जाऊन मिळणाऱ्या पवित्र 'प्रशस्ता'-नदीला गेला. त्या पुण्यप्रद नदींत स्नान करून त्यानें देव व पितर यांचें तर्पण केलें आणि मुख्य मुख्य ब्राह्मणांना धन देऊन तो समुद्रगामिनी गोदावरीच्या तीरावर आला आणि त्या पवित्र नदींत स्नान-तर्पणादि करून निष्पाप झाला.

नंतर तो धर्मात्मा पांडुपुत्र द्रविड देशांतून लोकपावन समुद्रास प्राप्त होऊन तेथून पवित्र अगस्त्य तीर्थावर गेला व त्या वीरानें नारीतीर्थें पाहिलीं. तेथें महा धनुर्धर अर्जुनाचें अति मानुष कर्म ऐकून द्रौपदी व भ्राते यांसह युधिष्ठिराला परम आनंद झाला. तेथें ते ऋषि त्यास म्हणाले—" हे धर्मराजा, मुनिशापा-मुळें पांच अप्सरा या पांच सरोवरांत मकररूपानें राहून तापसांना पीडा देत होत्या. पण तुझ्या महाबाहु भ्रात्यानें तीर्थयात्राप्रसंगीं मोठ्या धैर्यानें त्यांना शापमुक्त केलें. तेव्हांपासून हीं तीर्थें नारीतीर्थें या नांवांनीं प्रसिद्ध झालीं आहेत."

जनमेजया, युधिष्ठिराला तुझ्या प्रपितामहाचा असा अद्भुत पराक्रम सांगून त्या ऋषिसमुदायानें युधिष्ठिराचा मोठा सत्कार केला. अर्जुनाचें हें अद्भुत कर्म ऐकून पांडवांनाहि मोठें कौतुक वाटलें. नंतर युधिष्ठिरानें भ्राते व कृष्णा यांसह त्या तीर्थांत स्नान केलें आणि अर्जुनाच्या पराक्रमाची प्रशंसा करण्यांतच त्यांचें मन रमून गेलें. त्यानंतर त्या समुद्रतीरावरील तीर्थांमध्यें त्यानें सहस्र गायींचें दान दिलें. भ्रात्यांसह हृष्ट झालेल्या त्या राजानें ' मी हें गोप्रदान अर्जुनाच्या कल्याणासाठीं करीत आहें ' असें म्हटलें.

हे राजा, तो कुंतीपुत्र पुढें क्रमाक्रमानें समुद्रतीरावरील दुसरींहि पवित्र तीर्थें पहात ' शूर्पारक '-तीर्थास येऊन पोंचला. तेथें समुद्रतीरापासून कांहीं अंतरावर असलेल्या एका लोकप्रसिद्ध वनास गेला. पूर्वीं देवांनीं तेथें महत्तप आचरिलें होतें व पुण्यवान् नरेंद्रांनीं मोठमोठे यागहि केले होते. त्या वनांत त्यानें महाधनुर्धर परशुरामाची ती पूर्वोक्त वेदी पाहिली. ती ' ऋचीक '-पुत्राची वेदी तपस्वी संघांनीं परिवेष्टित झालेली असून पुण्यवानांना पूजनीय होती.

तेथून तो युधिष्ठिर राजा मरुद्गणांसह वसु, अश्विनिकुमार, यम, आदित्य, कुबेर, इंद्र, विष्णु, प्रजापति, शंकर, चंद्र, समुद्र, साध्यगण, धाता, पितर, गणांसह रुद्र, सरस्वती, सिद्धांचा समुदाय व इतर पुण्यवान् देव यांचीं पवित्र व मनोहर आयतनें पहात तेथें रहाणाऱ्या पंडितांस रत्नें व वस्त्रें अर्पण करीत आणि त्या सर्व तीर्थांत स्नान करीत पुनः शूर्पारकास येऊन पोंचला. तेथून समुद्रतीर-मार्गानेंच तो महात्मा पांडव भ्राते व ब्राह्मण यांसह प्रसिद्ध भूलोकीं असलेल्या ' प्रभास '-तीर्थास प्राप्त झाला.

( २ ) तेथें अनुजांसह स्नान करून त्यानें देव व पितर यांस तृप्त केलें. कृष्णेनेंहि त्यांचेंच अनुकरण केलें. लोमशासह ब्राह्मणांनींहि स्नान-तर्पणादि धर्म-कृत्यें केलीं. धर्मधारण करणारांतील श्रेष्ठ युधिष्ठिरानें बारा दिवस सायं-प्रातः स्नान व जल-वायुभक्षण करून सभोंवार अग्नि प्रदीप्त केले आणि अशा प्रकारें उग्र तप आचरिलें.

युधिष्ठिर प्रभासतीर्थांस येऊन तीव्र तपश्चर्या करीत आहे, असें बलराम व जनार्दन यांनीं ऐकलें. तेव्हां ते दोघेहि वृष्णिवीर सैन्यासह त्यास भेटावयास आले. तेथें ते वीर पांडुपुत्र भूमीवर शयन करीत आहेत व त्यांचीं शरीरें मलीन झालीं आहेत; त्याचप्रमाणें राजकन्या द्रौपदी, तिला सर्वथा अनुचित

असलेल्या अवस्थेचा अनुभव घेत आहे, हें पाहून सर्व वृष्णिवीर अतिशय दुःखी झाले. त्यांनीं आर्तस्वरानें मोठा आक्रोश केला. पण धैर्यापासून कधींहि च्युत न होणाऱ्या युधिष्ठिरानें राम, जनार्दन, प्रद्युम्न, सांब, सात्यकी व इतर वृष्णिवीर यांच्यापाशीं जाऊन त्यांचा यथाविधि सत्कार केला. तेव्हां त्या वृष्णींनींहि सर्व पार्थांचा प्रतिसत्कार केला.

याप्रमाणें परस्परांचा सन्मान केल्यावर हे राजा, इंद्राच्या सभोंवार जसे देवगण बसतात, तसे ते सर्व वृष्णिवीर युधिष्ठिराच्या सभोंवार बसले. तेव्हां त्यांच्या दर्शनानें अतिशय हृष्ट झालेल्या युधिष्ठिरानें त्यांस शत्रूंचें सर्व कपटाचरण, आपला वनवास व अस्त्रांसाठीं पार्थाचें इंद्रलोकीं गमन निवेदन केलें.

युधिष्ठिराच्या मुखानें तो सर्व वृत्तांत ऐकून वृष्णींच्या मनाला कांहींसें समाधान वाटलें. पण ते चारी भ्राते अति दुर्बल व पांचाली अतिशय कृश झाली आहे, असें पाहून महानुभाव वृष्णी अतिशय शोकार्त होऊन दुःखाश्रु ढाळूं लागले. ३. ७. ११८.

---

## अध्याय ११९ वा.

[ १ पांडवांची कष्टकर अवस्था पाहून बलरामाचा विषाद. ]

( १ ) जनमेजय—हे तपोधना, प्रभास तीर्थावर जमलेल्या वृष्णि व पांडव वीरांनीं काय केलें ? तेथें त्यांनीं परस्परांशीं काय संभाषण केलें ! कारण ते सर्व महात्मे, सर्वशास्त्रविशारद व परस्पर सुहृद् होते.

वैशंपायन—हे राजा, सर्व वृष्णिवीर महासागराच्या तीरावरील प्रभास तीर्थास प्राप्त होऊन पांडवांच्या सभोंवार बसले. त्यानंतर गायीचें दूध, कुंद, चंद्र, मृणाल किंवा रजत यांप्रमाणें शुभ्र असलेला हलधर बलराम कमलनयन कृष्णास म्हणाला—" हे कृष्णा, श्रद्धेनें आचरिलेला धर्म जीवाच्या अभ्युदयालाच कारण होतो व अधर्म पराभवाला कारण होतो, असेंच नियमानें म्हणतां येत नाहीं. कारण हा धर्मनिष्ठ युधिष्ठिर जटा-वल्कलें धारण करून वनवासाचे क्लेश भोगीत आहे आणि दुरात्मा दुर्योधन पृथ्वीचें राज्य भोगीत आहे ! ही भूदेवी त्या अधार्मिकाला आपल्या उदरांत सांठविण्यासाठीं विवरहि देत नाहीं. यावरून अल्पबुद्धि पुरुष धर्माचरणापेक्षां अधर्माचरण करणें चांगलें, असेंच निःसंशय मानूं लागेल. दुर्योधनाची वृद्धि होत आहे व युधिष्ठिर आपलें

न्यायानें संपादन केलेलें राज्य घालवून दुःख भोगीत आहे, हें पाहून प्रजांनीं काय करावें! धर्म व अधर्म यांतील श्रेष्ठ काय याची लोकांना शंका येऊं लागली आहे. कारण शास्त्र धर्म श्रेष्ठ आहे असें सांगतें व अनुभव त्याच्या उलट येतो. त्यामुळें सामान्य जनांना असा संशय येणें साहजिक आहे.

अहो, हा धर्मपुत्र धर्मनिष्ठ, सत्यधृति व मोठा दाता आहे. हा पृथापुत्र राज्य व सुख यांचाहि त्याग करील, पण धर्माचा त्याग करणार नाहीं. मग धर्महीन झाल्यानेंच जर उत्कर्ष होणारा असेल तर तो याचा कसा होणार! तो कधींच होणें शक्य नाहीं!!

भीष्म, कृप, द्रोण व कुरुकुलांतील वृद्ध राजा धृतराष्ट्र हे सर्व या पृथापुत्रांना वनांत घालवून स्वतः राज्यसुख भोगीत आहेत. खरोखर त्या पापबुद्धि भरतश्रेष्ठांना धिक्कार असो. हा पापपुरुष अंध भूपाल परलोकीं जाऊन पितरांना भेटल्यावर त्यांना काय सांगेल! या निष्पाप पांडुपुत्रांच्या राज्याचा अपहार करून 'मी माझ्या सर्व पुत्रांशीं समत्वानें वागलों' असें सांगूं शकेल काय? 'मीं पूर्वजन्मीं काय पाप केलें होतें, म्हणून या जन्मीं राजकुलांत असा अंध निपजलों! आणि आतां या कुंतीपुत्रांना राज्यभ्रष्ट करून पुढच्या जन्मीं मला कोणतें फल मिळेल, याचा तो विचार करीत नाहीं. खरोखर हा धृतराष्ट्र आपल्या पुत्रांसह हें निंद्यकर्म करून श्मशानांतील सुवर्णासारखे तेजस्वी, समृद्ध व प्रफुल्ल वृक्ष पहात असेल. कारण हें मरणाचें चिह्न आहे. या विचित्रवीर्याच्या दुष्ट पुत्रानें ज्या अर्थी सशस्त्र भ्रात्यांसह युधिष्ठिराला वनास जावयास लाविलें आहे, त्या अर्थी तो दुरात्मा भीष्मादि महा वीरांना खरोखर अकालीं मरावयास लावील! हा महाबाहु भीम शस्त्ररहित असला तरी शत्रूंच्या समृद्ध सेनेचा नाश करील. याचा नुस्ता शब्द ऐकूनच शत्रुसैन्य चळचळां कापूं लागतें व त्याची गाळण उडते. पण तोच हा वेगवान् वीर आज क्षुधा व तृषा यांचे क्लेश भोगीत आहे. वनसंचाराच्या श्रमानें तो कृश झाला आहे. विविध आयुधें व धनुष्य-बाण यांनीं सज्ज होऊन व या घोर वनवासास स्मरून जेव्हां हा शत्रूवर चालून जाईल, तेव्हां हा एकाहि धृतराष्ट्रपुत्राला जिवंत ठेवणार नाहीं, असें मला निःसंशय वाटतें.

या समग्र पृथ्वीतलावर वीर्य व बल यांत ज्याच्या तुल्य अन्य पुरुष नाहीं, तो आज शीत-वात-उष्ण यांच्या पीडेनें कृश झालेला वृकोदर युद्धांत सर्व शत्रूंचा निःशेष नाश करील. जो बलाढ्य भीमसेन राजसूयप्रसंगीं एका रथानें

पूर्व दिशेंतील नृपांना त्यांच्या अनुचरांसह रणामध्यें जिंकून मोठ्या त्वरेनें सुखरूप परत आला, तोच हा वीर आज वल्कलें धारण करून वनामध्यें क्लेश भोगीत आहे !

त्याचप्रमाणें, ज्या उत्साही सहदेवानें सिंधुतीरावर जमलेल्या दक्षिण देशांतील भूपतींचा पराभव केला, तो हा सहदेव पहा ! कसा तापसवेष धारण करून दुःखानें काल कंठीत आहे !

या युद्धदुर्मद नकुलाकडे पहा ! ज्या शूरानें एका रथानें जाऊन पश्चिम दिशेंतील सर्व नृपालांचा पराजय केला, तोच हा माद्रीपुत्र आज वनामध्यें फल-मूलाशन करून, जटाधारी होऊन, मलीन अंगानें फिरत आहे.

तशीच, अतिरथ द्रुपदराजाच्या समृद्ध यज्ञवेदीपासून उत्पन्न झालेली व केवल ऐश्वर्यांत रहाण्यासच योग्य, अशी ही सुकुमारी कृष्णा वनवासाचें हें दुःसह दुःख कसें सहन करीत आहे !

धर्म, वायु, इंद्र आणि अश्विनिकुमार या देवतांचे हे पुत्र वास्तविक सुखोपभोगांसच योग्य असतां वनांतील या दुःखांत कसे रहात आहेत ! !

अरे, अरे, या धर्मपुत्राला भार्या, भ्राते व अनुचर यांसह जिंकून राज्यांतून घालविलें असतां व दुरात्म्या दुर्योधनाचा उत्कर्ष होत असतां पर्वतासह ही पृथ्वी विदीर्ण कशी होत नाहीं ! ३. ७. ११९.

---

## अध्याय १२० वा.

[ १ सात्यकीनें केलेला कौरवांच्या नाशाचा संकेत. २ वासुदेव व युधिष्ठिर यांनीं केलेलें त्याचें समाधान. ३ पुढील तीर्थयात्रा. ]

( १ ) सात्यकि—हे हलधरा, हा शोकाचा काल नव्हे. तर वेळ निघून जाण्यापूर्वीं योग्य उपाय योजण्याचा हा समय आहे. यास्तव युधिष्ठिर जरी स्वतः आपल्याला सांगत नसला तरी आपण कार्याला आरंभ करूं. या लोकीं जे ऐश्वर्यवान् असतात, ते स्वतः कोणत्याच कार्याचा आरंभ करीत नाहींत. तर ययातीप्रमाणें त्यांचे शिष्यादिकच त्यांचें कार्य साधण्यास समर्थ असतात. त्याचप्रमाणें हे रामा, या लोकीं ज्यांचे समर्थ शिष्यादि स्वमतानेंच कार्यारंभ करितात, ते ऐश्वर्यवान् पुरुष अनाथाप्रमाणें अशा संकटांत पडत नाहींत.

त्रैलोक्याचेंहि रक्षण करण्यास समर्थ असलेला राम, जनार्दन, प्रद्युम्न, सांब व मी—सात्यकि यांची गांठ पडल्यावरहि हे पृथापुत्र आपल्या आप्तांसह अद्यापि वनांत कां रहात आहेत? तरी विविध आयुधें व विचित्र कवचें यांनीं युक्त झालेली दाशार्हसेना आजच्या आज बाहेर निघूं दे आणि वृष्णिसैन्याकडून पराभूत झालेल्या धृतराष्ट्रपुत्राला आपल्या बांधवांसह आजच यमसदनीं जाऊं दे.

हे बलरामा, हा शार्ङ्गधन्वा कृष्णहि राहूं दे. तूं एकटाच क्रुद्ध झाल्यास या पृथ्वीलांहि अजिनाप्रमाणें गुंडाळून ठेवशील, असा तुझा पराक्रम आहे. यास्तव देवेंद्रानें जसें वृत्राला मारिलें त्याप्रमाणें तूं या धार्तराष्ट्राला त्याच्या परिवारासह यमसदनीं पाठीव. माझा भ्राता, सखा व गुरु आणि जनार्दनाला आत्मवत् प्रिय असलेला जो गांडीवधन्वा अर्जुन त्यालाहि स्वस्थ राहूं दे.

मानव ज्यासाठीं सुपुत्र, सच्छिष्य व प्रतिकूल भाषण न करणारा गुरु यांची इच्छा करितात आणि ज्यासाठीं प्राप्त झालेलें दुर्घट कर्महि पार पाडतात, त्याचें मुख्य प्रयोजन हेंच होय. यास्तव हे रामा, मी त्या दुरात्म्या दुर्योधनाचीं सर्व अस्त्रें आपल्या श्रेष्ठ अस्त्रांनीं कुंठित करून समरांगणांत त्याचा पराभव करीन.

हे बलिभद्रा, मी सर्प, विष व अग्नि यांसारख्या प्रखर शरांनीं त्याचें शिर धडापासून वेगळें करीन. संग्रामांत माझ्या तीक्ष्ण खड्गानें अगोदर त्याचें मस्तक तोडून मग त्याच्या सर्व अनुजांनाहि मारीन. हे रौहिणेया, महा वनाला जाळणाऱ्या दावाग्नीप्रमाणें कौरवांच्या मुख्य योद्ध्यांचा संहार करीत असलेल्या मला युद्धामध्यें भयंकर कर्में करणारे वीर आज हृष्ट होऊन पाहोत.

कृप, द्रोण, विकर्ण व कर्ण प्रद्युम्नानें सोडलेल्या तीक्ष्ण बाणांचा वेग सहन करण्यास समर्थ नाहींत. अर्जुनपुत्र अभिमन्यूचें सामर्थ्य मी जाणतों. तो सौभद्र रणामध्यें उभा राहिला म्हणजे साक्षात् प्रद्युम्नाचाच भास होतो. कृष्णपुत्र सांब आपल्या बाहुबलानें सारथि व रथ यांसह दुःशासनाचें मर्दन करील.

समरांगणांत सिंहाप्रमाणें पराक्रम करणाऱ्या जांबवतीपुत्राचा वेग सहन करील असा या जगतांत कोणीच नाहीं व त्याला पराभूत करणाराहि कोणी दिसत नाहीं. या बाल-वीरानें शंबरासुराच्या सैन्याचा एका क्षणांत पराभव केला. या वीरानें ज्याचे बाहु दीर्घ व पुष्ट आहेत व मांड्या वर्तुल आहेत,

अशा अश्वचक्राला संग्रामांत मारिलें. त्या या महारथ सांबाच्या समोर आपला रथ कोण नेईल ! योग्य कालीं अंतकाच्या दाढेंत सांपडलेला मनुष्य जसा परत फिरत नाहीं, तसा संग्रामांत याच्या पुढें आलेला कोणता पुरुष जिवंत सुटेल !

महारथ भीष्म-द्रोण, पुत्रांसह सोमदत्त आणि सर्व सैन्यें यांस हा वासुदेव आपल्या शराग्नीनें दग्ध करील. ज्यानें शस्त्र उचललें आहे, ज्याच्या हातांत बाण आहे व चक्र हें ज्याचें आयुध आहे, अशा युद्धामध्यें अनुपम असलेल्या या कृष्णाला देवादिकांनीं युक्त असलेल्या या त्रिभुवनांत अजिंक्य असें काय आहे ! याज्ञिक यज्ञामध्यें दर्भांनीं वेदीला जसे आच्छादून सोडतात, त्याप्रमाणें हा अनिरुद्धहि हातांत खड्गचर्म धारण करून मस्तकरहित व त्यामुळेंच गतप्राण झालेल्या धृतराष्ट्रपुत्रांच्या योगानें रणभूमि आच्छादित करो.

गद, उल्मुक, बाहुक, भानु, नीथ, शूर, निशठ, रणधुरंधर सारण व चारुदेष्ण हे सर्व यादववीर आपल्या कुलाला उचित असें कर्म करोत. वृष्णि, भोज व अंधक या कुलांतील मुख्य मुख्य योद्धे व त्यांची शूर सात्वतसेना समरांगणांत धार्तराष्ट्रांचा संहार करून जगांत विपुल यश संपादन करोत.

त्यानंतर हा महात्मा युधिष्ठिर द्यूतप्रसंगीं कौरवसभेंत केलेल्या प्रतिज्ञेप्रमाणें आपला वनवासकाल संपवीपर्यंत अभिमन्यु पृथ्वीचें राज्य करो. नंतर आम्हीं सोडलेल्या तीक्ष्ण बाणांनीं ज्याच्या शत्रूंचा नाश झाला आहे, असा हा धर्मराज सर्व परिवारासह धार्तराष्ट्ररहित झालेल्या पृथ्वीचें राज्य भोगील. पांडवांच्या हिताची इच्छा करणाऱ्या आमचें हेंच महत् यशस्कर कर्तव्य आहे.

(२) वासुदेव—हे धैर्यवान् मथुरादेशोत्पन्न माधवा, तुझें म्हणणें खरें आहे. मला तें सर्वथा मान्य आहे. परंतु हा कुरुश्रेष्ठ धर्मराज स्वतःच्या बाहुबलानें न जिंकलेल्या या पृथ्वीचा केव्हांहि स्वीकार करणार नाहीं. हा धर्मनिष्ठ युधिष्ठिर किंवा अतिरथ भीमार्जुन अथवा नकुल-सहदेव आणि ही द्रुपदात्मजा कृष्णा भीतीनें, लोभानें किंवा अन्य कामनेनें स्वधर्माचा त्याग कदापि करणार नाहींत. वृकोदर व धनंजय हे दोघे पृथ्वीवर अप्रतिम योद्धे आहेत. मग हे उभयतां बंधु व माद्रीसुत यांनीं पुरस्कृत केलेला हा युधिष्ठिर समग्र पृथ्वीचें शासन कां करणार नाहीं ! शिवाय महात्मा द्रुपदराजा, केकयराज, चेदिपति आणि आम्ही सर्व समरांगणांत एकदा जमलों म्हणजे सगळ्या शत्रूंचा संहार करून टाकूं.

युधिष्ठिर—हे माधवा, तूं जें बोलत आहेस त्यांत विचित्र कांहींच नाहीं. कारण मला सत्याचें पालन करावयाचें आहे. राज्याचें नव्हे. हे सात्यके, एकटा कृष्णच मला यथार्थ जाणतो आणि मी कृष्णाला तत्त्वतः ओळखितों. ज्या वेळीं पराक्रमाचा काल प्राप्त होईल, त्या वेळीं हे शिनिश्रेष्ठा, तूं आणि केशव दुर्योधनाला रणांत जिंकाल.

आतां हे सर्व यादववीर परत जावोत. मला आज या नरलोकनाथ जनार्दनाचें दर्शन झालेंच आहे. हे वीरहो, तुम्ही धर्माचरणांत केव्हांहि प्रमाद करूं नका. सुखांत असलेल्या तुम्हां सर्वांना मी पुनः भेटेन.

(३) परिक्षिता, असें बोलून त्यांनीं परस्परांचा निरोप घेतला. ते सर्व यदुश्रेष्ठ वृद्धांना वंदन करून व कुमारांना आलिंगन देऊन स्वगृहीं निघून गेले आणि युधिष्ठिर पुढील तीर्थयात्रेला निघाला.

श्रीकृष्णाचा निरोप घेतल्यावर धर्मराज भ्राते, भृत्य व लोमश यांसह विदर्भाधिपतीनें पूजन केलेल्या 'पयोष्णी'-नदीच्या पवित्र तीर्थाला गेला. त्या पुण्यप्रद नदीचें जल यज्ञांतील सोमपानतुल्य आहे. तेथें युधिष्ठिर केवल जलपान करून राहिला असतां संतुष्ट झालेल्या ब्राह्मणांनीं उत्तम स्तोत्रांनीं त्याची स्तुति केली. ३. ७. १२०.

---

## अध्याय १२१ वा.

[ १ गयाच्या यज्ञाचें वर्णन. २ शर्यातीचा यज्ञदेश दाखवून लोमशमुनीनें केलेलें भार्गवांचें वर्णन. ३ त्याविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न. ]

( १ ) लोमश—हे युधिष्ठिरा, या पवित्र प्रदेशीं नृगराजानें यज्ञामध्यें सोमपानानें इंद्राला तृप्त केलें व तो तृप्त झालेला देवेंद्र अतिशय हृष्ट झाला, असें श्रुत आहे. याच ठिकाणीं देवांसह इंद्र व प्रजापति यांनीं विपुल दक्षिणायुक्त अनेक यज्ञ केले.

हे राजन्, गयराजानेंहि येथेंच सात अश्वमेध यज्ञ करून सोमरसानें शक्राला तृप्त केलें. त्याच्या साती यज्ञांत सर्व साहित्य सुवर्णाचें, वनस्पतींचें व मृत्तिकेचें होतें. यज्ञस्तंभ सुवर्णाचे, 'चषाल' म्हणजे यूपावरील कडें, सोमपानाचीं पात्रें, स्रुक्, स्रुवा इत्यादि काष्ठाचें व स्थाल्यादि मृत्तिकेचें होतें. या यज्ञांत त्याचे सात प्रयोग प्रसिद्ध आहेत. एकेका यूपाच्या अग्रभागीं सात चषाल बसविले

होते. त्याच्या त्या यज्ञांतील सुवर्णाचे चकाकणारे यूप इंद्रासह स्वतः देवांनीं उभारिले.

हे युधिष्ठिरा, त्या पृथ्वीपति गयाच्या यज्ञांत इंद्र सोमानें तुष्ट झाला व ब्राह्मण दक्षिणांनीं संतुष्ट झाले. त्या यज्ञांत सुवर्णाच्या मोहरा कुडवांनीं मापून ब्राह्मणांना असंख्य दक्षिणा दिली. हे पांडवा, वाळवंटांतील वाळु, अंतरिक्षांतील तारका किंवा पर्जन्याच्या जलधारा जशा असंख्य असतात, तसें गयराजानें अगणित धन त्या यज्ञांत दक्षिणार्थ दिलें. नक्षत्रादिकांचीहि कदाचित् गणना करितां येईल, पण त्या सात यज्ञांत सदस्यांना दिलेल्या दक्षिणेची गणना करितां येणें शक्य नव्हतें.

हे भरतश्रेष्ठा,. त्या धर्मात्म्या गय नृपतीनें, विश्वकर्म्यानें निर्माण केलेल्या सुवर्णभूषित विपुल धेनु अनेक दिशांतून आलेल्या ब्राह्मणांना अर्पण केल्या. हे राजा, जेथें महात्म्या गयानें चैत्य उभारलेला नाहीं अशी फारच थोडी भूमि या पृथ्वीतलावर अवशिष्ट राहिली आहे.

त्या पुण्यकर्मानें तो प्रतापवान् राजा इंद्रलोकाला प्राप्त झाला आणि हे राजेंद्रा, जो या पयोष्णींत स्नान करितो, तोहि त्या नरश्रेष्ठाच्या सलोकतेला प्राप्त होतो. यास्तव हे कौंतेया, या पवित्र नदींत तूं भ्रात्यांसह स्नान कर. म्हणजे तुझ्या सर्व पातकांचें क्षालन होईल.

**वैशंपायन**—हे राजा, लोमशाचें हें वचन ऐकून त्या निष्पाप युधिष्ठिरानें भ्रात्यांसह त्या पयोष्णींत स्नान केलें आणि तो वैदूर्यपर्वत, नर्मदा व महानदी या प्रदेशांस प्राप्त झाला. तेव्हां भगवान् लोमश-ऋषीनें तीं सर्व रमणीय तीर्थें व पुण्यप्रद देवस्थानें यांचें वर्णन केलें. त्या वेळीं त्या पांडवांनीं मोठ्या संतोषानें हजारों ब्राह्मणांना यथायोग्य दक्षिणा दिली.

**लोमश**—हे कुंतीपुत्रा, या वैदूर्यपर्वताचें दर्शन घेऊन नर्मदेंत स्नान केलें असतां देव आणि नृप यांचें सालोक्य प्राप्त होतें. हे राजा, हा त्रेता आणि द्वापर यांचा संधिकाल आहे. यास प्राप्त होणारा पुरुष सर्व पापांपासून मुक्त होतो.

( २ ) हा पहा, शर्यातीचा यज्ञप्रदेश समोरच दिसत आहे. या ठिकाणीं कौशिकानें साक्षात् अश्विनिकुमारांबरोबर सोमपान केलें. येथेंच महातपस्वी भार्गव महेंद्रावर क्रुद्ध झाला, त्या च्यवनानें वासवाला स्तंभित केलें आणि राजतनया सुकन्या भार्या मिळविली.

(३) युधिष्ठिर—हे भगवन्, महातपस्वी च्यवन-भार्गवाला क्रोध कां आला आणि त्यानें पाकशासन इंद्राला कसें स्तंभित केलें, तसेंच त्या ब्राह्मणानें अश्विनि-कुमरांना 'सोमपान करणारे' कसें केलें ! हा सर्व वृत्तान्त मला यथार्थ सांग. ३. ७. १२१.

---

## अध्याय १२२ वा.

[१ च्यवनाची तपश्चर्या. २ शर्यातीच्या कन्येनें त्याला केलेला वेध. ३ ऋषीच्या कोपानें राजसैन्याचा अवरोध. ४ कन्यादानानें ऋषीचा प्रसाद. ]

( १ ) लोमश—हे धर्मराजा, भृगुमहर्षींचा 'च्यवन'-नामक एक पुत्र होता, ( आदिपर्व अ. ६ पृ. ६१ ) त्या महा तेजस्वी मुनीनें या सरोवराच्या तीरावर तीव्र तप आचरिलें. हे पांडवा, तो महा तपस्वी वीरासन घालून एखाद्या स्थाणूप्रमाणें दीर्घकाल एकाच जागीं बसून राहिला होता. त्याच स्थितींत पुष्कळ काल निघून गेला असतां त्या ऋषीच्या अंगावर वारूळ वाढलें, तें लतांनीं आच्छादित व मुंग्यांनीं व्याप्त झालें. तरीहि मुंग्यांनीं आवृत झाल्यामुळें मातीच्या गोळ्याप्रमाणें दिसणारा तो बुद्धिमान् मुनि उग्र तप आचरूं लागला.

( २ ) हे युधिष्ठिरा, त्यानंतर दीर्घ कालानें एकदा 'शर्याति'-नांवाचा एक भूपाल या रम्य सरोवरावर विहार करावयास आला. त्या राजाला चार हजार स्त्रिया होत्या. परंतु त्याला 'सुकन्या'-नामक एकच रूपवती कन्या झाली. एकदा सखीजनांनीं परिवेष्टित झालेली ती राजनंदिनी दिव्य वस्त्रालंकारांनीं भूषित होऊन मनोरम सृष्टिसौंदर्य पहात व वनस्पति शोधीत फिरत फिरत त्या भार्गवाच्या वारुळासमीप आली. ती सौंदर्यसंपन्न युवती मदनानें व मदानें दृप्त झाली होती. ती राजकन्या त्या वनांतील वृक्षांच्या प्रफुल्लित शाखा सहज लीलेनें तोडूं लागली. नंतर ती राजकुमारी सख्यांचा परिवार सोडून एकटीच फिरूं लागली. त्या वेळीं ती एकच वस्त्र परिधान करून अलंकारांनीं भूषित झाली होती. विद्युल्लतेप्रमाणें चमकणारी ती सुकुमारी भार्गवाच्या दृष्टीं पडली. तिला त्या विजन प्रदेशीं पाहून तपस्तेजानें देदीप्यमान होणाऱ्या त्या मुनीचें मन रमलें आणि त्या तपोनिष्ठ ब्राह्मणानें क्षीण स्वरानें तिला हांक मारिली, परंतु त्या कल्याणीला त्याचा शब्द ऐकूं गेला नाहीं.

त्यानंतर सुकन्येनें त्या वारुळांतून चमकणारे भार्गवाचे दोन नेत्र पाहिले. तेव्हां बुद्धीला मोह पडल्यामुळें तिनें कुतूहलानें 'हें काय बरें चकाकतें आहे!' असें म्हणून काडीनें त्याच्या दोन्ही नेत्रांना टोंचलें. याप्रमाणें नेत्र विद्ध होतांच त्या परम क्रोधी मुनीनें अतिशय क्रुद्ध होऊन शर्यातीच्या सैन्याला सर्व मलद्वारें बंद होण्याचा शाप दिला.

मुनिशापानें मलावरोध झाला असतां तें सर्व सैन्य अतिशय दुःखी होऊन राजापाशीं आलें. तेव्हां सैनिकांची ती क्लेशकर अवस्था पाहून राजानें त्यांस विचारिलें—"हे सैनिकहो, निरंतर तपोनिष्ठ होऊन राहिलेल्या वृद्ध व विशेषतः अतिशय क्रोधी अशा महात्म्या भार्गवाचा कोणी कांहीं अपराध केला आहे काय? आज येथें अज्ञानानें किंवा बुद्धिपुरःसर ज्या कोणीं त्या तपस्व्याला कांहीं अपाय केला असेल, त्यानें तो सत्वर सांगावा."

राजाचें हें भाषण ऐकून सैनिक म्हणाले—आम्हांला तर त्यास कोणत्याच प्रकारचा अपकार केल्याचें ठाऊक नाहीं. यास्तव आपणच आपल्या इच्छेप्रमाणें सर्व उपाय योजून त्याचा शोध करा.

तेव्हां तो राजा स्वतःच सामोपचारानें व उग्र उपायानेंहि आपल्या सुहृद्वर्गाला विचारूं लागला. पण त्यांतील कोणालाच ऋषीला अपकार केल्याचें माहीत नव्हतें. शेवटीं आपलें सैन्य मलावरोधानें आर्त व दुःखी झालें आहे आणि त्यामुळें आपला पिताहि अतिशय दुःखी झाला आहे, असें पाहून सुकन्या त्यास म्हणाली—"हे तात, मीं या सरोवराच्या तीरावरील अरण्यांत फिरत असतां एका वारुळांत काजव्याप्रमाणें चमकत असलेला एक प्राणी पाहिला. तेव्हां जिज्ञासेनें मीं त्याच्या समीप जाऊन त्याला कांट्यानें टोंचलें."

कन्येचें हें वचन ऐकतांच शर्याति सत्वर त्या वारुळापाशीं आला. त्यानें त्या वारुळांत बसलेल्या तपोवृद्ध व वयोवृद्ध भार्गवाला पाहिलें व सैन्याच्या स्वास्थ्यासाठीं हात जोडून 'हे भगवन्, माझ्या कन्येनें अज्ञानानें तुझा जो अपराध केला, त्याची क्षमा कर' अशी प्रार्थना केली.

राजाचें हें वचन ऐकून च्यवन भार्गव म्हणाला—"हे शर्याते, तुझ्या या गर्विष्ठ कन्येनें तिरस्कारानें मला विद्ध केलें. ती उत्कृष्ट रूप व यौवन यांनीं संपन्न असून लोभ-मोहांनीं ग्रस्त झाली आहे. यास्तव हे राजन्, तूं ही कन्या

जर मला अर्पण करशील तर मी तुझ्या सैन्याला क्षमा करीन. हें मी तुला सत्य सांगतों.

लोमश—ऋषीचें वचन ऐकून शर्यातीनें कांहीं विचार न करितां त्या महात्म्या च्यवनाला आपली कन्या अर्पण केली. तेव्हां त्या सुकन्येचें पाणिग्रहण करून तो मुनि प्रसन्न झाला आणि मुनीच्या प्रसादानें क्लेशरहित झालेल्या सैन्यासह तो राजा आपल्या नगरीस परत गेला.

इकडे त्या निष्पाप सुकन्येनें, तपस्वी पतीला प्राप्त झाल्यावर, नित्य तपोनिष्ठ व नियतव्रत होऊन संतुष्ट मनानें त्याची परिचर्या केली आणि त्या असूया न करणाऱ्या साध्वीनें अग्नि व अतिथि यांच्या सेवेनें तत्काल च्यवन मुनीचें प्रेम संपादन केलें. ३. ७. १२२.

---

## अध्याय १२३ वा.

[ १ अश्विनिकुमार व सुकन्या यांचा संवाद. २ च्यवनाला रूप-यौवनप्राप्ति. ]

(१) लोमश— हे युधिष्ठिरा, कांहीं कालानंतर एकदा अश्विनिकुमार-देवांनीं स्नान करून वस्त्ररहित असलेल्या सुकन्येला पाहिलें. देवराजकन्येप्रमाणें दर्शनीय अंगांनीं युक्त असलेल्या तिला पहातांच ते दोघे नासत्य त्वरेनें तिच्यापाशीं आले व तिला म्हणाले—" हे सुंदरि, तूं कोणाची कोण? या वनांत काय करीत आहेस? आम्ही तुला जाणण्याची इच्छा करितों. तूं आपला खरा वृत्तान्त सांग."

तेव्हां लज्जित झालेली सुकन्या त्या दोघां उत्तम देवांस म्हणाली— " भगवन्, मी शर्याति राजाची कन्या व च्यवन भार्गवाची भार्या आहें."

तें ऐकून ते दोघे अश्विनिकुमार उच्च स्वरानें हंसून पुनः तिला म्हणाले— " हे कल्याणि, तुझ्या पित्यानें अशा वृद्धाला तुझें समर्पण कसें केलें? हे भद्रे, तूं या वनांत चमकणाऱ्या विजेप्रमाणें शोभत आहेस. आम्हीं देवतांमध्येंहि तुझ्या इतकी सुंदर स्त्री पाहिली नाहीं. हे भामिनि, तुझ्या अंगावर उत्तम वस्त्राभरणें नाहींत. तथापि तूं या वनाला अतिशय शोभवीत आहेस. पण हे सुंदरि, तूं अशी वस्त्रालंकारशून्य असल्यामुळें तुझें रूप रम्य दिसत नाहीं. तूं सर्वाभरणसंपन्न व उत्तम वस्त्रानें युक्त झालीस तर अधिक शोभशील. या मलीन वेषानें तुझें सर्व सौंदर्य लोपविलें आहे. पण तूं इतकी रमणीय असतांना

काम-भोगानें रहित असलेल्या जराजर्जर पतीची सेवा कां करितेस ? हे शुचिस्मिते, हा तुझा पति तुझें रक्षण व पोषण करण्यास सर्वथा असमर्थ आहे. यास्तव तूं या च्यवन भार्गवाला सोडून आम्हांपैकीं एकाचा पतित्वानें स्वीकार कर. तूं देवकन्येसारखी श्रेष्ठ स्त्री आहेस. यास्तव तूं आपलें तारुण्य वृथा घालवूं नको."

अश्विनिकुमारांचें हें वचन ऐकून ती साध्वी त्या देवांस म्हणाली—हे देवहो, मी आपल्या च्यवनपतीच्या ठिकाणींच सर्वथा रत आहें. यास्तव तुम्ही माझ्याविषयीं अशी भलतीच शंका घेऊं नका.

तिचें हें वचन ऐकून ते देव तिला पुनः म्हणाले—हे प्रमदे, आम्ही दोघे देवांचे वैद्य आहोंत. आम्ही तुझ्या पतीला तरुण व रूपसंपन्न करितों. मग तो तुझा पति व आम्ही दोघे देव यांतील कोणाहि एकाला तूं वर. आतां अगोदर हा संकेत आपल्या पतीला निवेदन करून त्याला येथें घेऊन ये.

हे राजा, अश्विनिकुमारांच्या वचनावरून ती साध्वी च्यवन भार्गवापाशीं आली व तिनें त्यांचें म्हणणें पतीला कथन केलें. तें ऐकून तो भृगुनंदनहि 'ठीक आहे' तूं तसेंच कर, असें आपल्या भार्येस बोलला.

तेव्हां त्या सुकन्येनें आपल्या पतीची अनुमति त्यांस निवेदन केली असतां 'तर मग तुझ्या पतीला जलांत प्रवेश करूं दे' असें ते देव त्या राजपुत्रीला बोलले.

त्याबरोबर दिव्य रूपाची इच्छा करणाऱ्या च्यवनानें सत्वर जलांत प्रवेश केला. अश्विनिकुमारांनींहि त्याच सरोवरांत प्रवेश केला आणि ते तिघेहि दोन घटिका जलामध्यें निमग्न होऊन त्या सरोवरांतून बाहेर आले. तेव्हां ते तिघेहि दिव्य रूप, समान वेष व तेजस्वी कुंडलें धारण करणारे तरुण पुरुष तिचें चित्त आकर्षण करूं लागले. ते तिघेहि एकमतानें तिला म्हणाले—"हे शुभे, आम्हांपैकीं तुला जो इष्ट वाटेल, तो एक पति तूं वर. हे भद्रे, तुला ज्याची कामना असेल त्याचा तू पतित्वानें स्वीकार कर."

तेव्हां ते तिघेहि तुल्यरूपानें स्थित आहेत असें पाहून तिनें आपल्या मनानें व बुद्धीनें निश्चय केला आणि त्यांतील च्यवन भार्गवालाच वरिलें. तेव्हां तो मुनि सुशील भार्या, इष्ट वय व रूप यांस प्राप्त होऊन अतिशय हृष्ट झाला आणि तो तेजस्वी विप्र अश्विनिकुमारांस म्हणाला—"हे देवांनो, मी वृद्ध

असतांना तुम्ही मला रूपसंपन्न व पूर्ववयानें युक्त केलें आहे व तुमच्या कृपेनेंच मला ही भार्याहि प्राप्त झाली आहे. यास्तव मी देवराजासमक्ष तुम्हांस सोमपान करावयास लावीन. म्हणजे मी तुम्हांला इंद्रासमक्ष सोमपानाचा अधिकार प्राप्त करून देईन, हें मी तुम्हांला सत्य सांगत आहें."

च्यवनाचें हें वचन ऐकून अतिशय हृष्ट झालेले अश्विनिकुमार देवलोकीं निघून गेले आणि इकडे च्यवन आणि सुकन्या देवांप्रमाणें विहार करूं लागलीं. ३. ७. १२३.

---

## अध्याय १२४ वा.

[ १ च्यवनानें शर्यातीकडून करविलेला यज्ञ. २ त्याचें अश्विनीकुमारांसाठीं सोमग्रहण, इंद्राचा प्रतिकार. ३ त्याच्या वज्रधर हस्ताचें स्तंभन. ४ कृत्येची उत्पत्ति व शरीरवर्णन. ]

( १ ) लोमश—हे युधिष्ठिरा, त्यानंतर च्यवनाला तारुण्य प्राप्त झाल्याची वार्ता शर्यातीच्या कानीं गेली असतां तो भूपाल अतिशय हृष्ट झाला आणि सैन्यासह भार्गवाच्या आश्रमास आला. तेथें देवांच्या अपत्यासारखा च्यवन आणि सुकन्या यांस पाहून भार्येसह शर्यातीला जणुकाय समग्र पृथ्वी प्राप्त झाल्याप्रमाणें हर्ष झाला.

राजा, त्या वेळीं च्यवनमुनीनें आपल्या श्वशुराचा सन्मान केल्यावर तो भूपाल भार्येसह त्याच्या समीप बसून अनेक मनोरम व बोधप्रद गोष्टी बोलूं लागला.

तेव्हां हे राजन्, भार्गव त्या नृपश्रेष्ठाला प्रसन्न करीत म्हणाला—"हे महाराज, मी तुझ्याकडून एक यज्ञ करवितों. तूं सर्व यज्ञोपकरणाची सिद्धता कर."

महात्म्या जामाताचें हें भाषण ऐकून अवनिपति शर्यातीनें परम संतोषानें त्याचें वचन मान्य केलें आणि त्या नरेश्वरानें यज्ञाला योग्य दिवस पाहून सर्व यज्ञिय साहित्यांनीं समृद्ध असलेला विस्तीर्ण यज्ञमंडप उभारला. नंतर त्या श्रेष्ठ यज्ञमंडपांत च्यवन मुनीनें शर्यातीकडून यज्ञ करविला. त्या यज्ञप्रसंगीं काय काय अद्भुत प्रकार घडले ते मी तुला सांगतों ऐक.

( २ ) हे कुंतीपुत्रा, त्या यज्ञांत भार्गवानें अश्विनिकुमारासाठीं सोमपात्राचें ग्रहण केलें असतां इंद्रानें त्याचें निवारण केलें.

इंद्र—हे दोघे अश्विनिकुमार सोमाचे अधिकारी नाहींत, असें माझें निश्चित मत आहे. ते देवांचे वैद्य आहेत, त्यामुळें सोमपानाला पात्र नाहींत.

च्यवन—हे उत्साही व महात्मे अश्विनिकुमार अत्यंत रूपसंपन्न आहेत. त्या दोघांनीं मला देवांप्रमाणें जरारहित केलें आहे. हे अश्विनिकुमारहि देवच आहेत, असें असतां हे पुरंदरा, 'मी व इतर देव मात्र सोमपानाचे अधिकारी आहेत, व हे नाहींत' असें कां म्हणतोस?

इंद्र—हे विप्रा, हे अश्विनिकुमार देवांचे चिकित्सक व औषधोपचार करणारे असून इच्छेस येईल तें रूप धारण करून मृत्युलोकांत संचार करीत असतात. तेव्हां ते सोमग्रहणाला कसे पात्र होतील!

लोमश—युधिष्ठिरा, तो देवेंद्र हेंच वचन पुनः पुनः बोलूं लागला असतां च्यवनानें त्याचा अनादर करून तें सोमपात्र ग्रहण केलें. तेव्हां हा भार्गव अश्विनिकुमारांसाठीं उत्कृष्ट सोमाचें ग्रहण करीत आहे, हें पाहून इंद्र म्हणाला—"हे ब्रह्मन्, तूं जर या अश्विनिकुमारांसाठीं हा श्रेष्ठ सोमरस घेशील, तर मी या माझ्या घोर वज्रानें तुजवर प्रहार करीन."

( ३ ) इंद्राचें हें वचन ऐकून भार्गवानें स्मित करून अश्विनिकुमारांसाठीं त्या श्रेष्ठ सोमाचें यथाविधि ग्रहण केलें. तेव्हां शचीपतीनें त्यावर प्रहार करण्यासाठीं आपलें घोर वज्र उगारिलें. परंतु भार्गवानें प्रहार करणाऱ्या इंद्राचा बाहु तत्काल स्तंभित केला.

( ४ ) याप्रमाणें इंद्राचा हात स्तंभित करून त्याचा नाश करण्यास उद्युक्त झालेल्या त्या महातेजस्वी च्यवनानें एक कृत्या निर्माण करण्याच्या इच्छेनें अग्नींत मंत्रयुक्त आहुति टाकिली. त्याबरोबर मुनीच्या तपोबलानें एक भयंकर कृत्या उत्पन्न झाली.

तो 'मद'-नांवाचा अतिशय सामर्थ्यवान् धिप्पाड महाराक्षस होता. त्याच्या शरीराचा निर्देश करण्यास सुरासुरहि समर्थ नाहींत. त्याचें विकराल मुख तीक्ष्ण दाढांनीं युक्त असून हनुवटी भूमीला लागली होती व वरचा ओंठ अंतरिक्षाला भिडला होता.

त्याच्या चार दाढा प्रत्येकीं शंभर योजनें लांब असून इतर दांत दहा योजनें लांब, प्रासादशिखराकार व शूलाग्रासारखे भयंकर दिसत होते. त्याचे दोन्ही बाहु पर्वतासारखे पुष्ट, सम व दहा सहस्र योजनें दीर्घ होते. त्याचे नेत्र चंद्र-सूर्यांसारखे असून मुख कालाग्नीसारखें होतें. विद्युल्लतेसारख्या चंचल जिह्वेनें

तो आपलें मुख वारंवार चाटीत होता. त्याची दृष्टि अतिशय उग्र होती. त्यानें आपलें भयंकर मुख पसरलें होतें, त्यामुळें तो समग्र जगताला बलात्कारानें ग्रासून टाकितो कीं काय असा भास झाला. तो क्रुद्ध झालेला असुर आपल्या घनघोर गर्जनेनें त्रैलोक्य निनादित करीत शतक्रतु इंद्राला भक्षण करण्यासाठीं त्याच्या अंगावर धांवून गेला. ३. ७. १२४.

---

## अध्याय १२५ वा.

[ १ इंद्राचें भार्गवाला शरण जाणें. २ अश्विनिकुमारांस सोमप्राप्ति, भार्गवाची प्रसन्नता, मददैत्याचा स्त्रियादिकांत विभाग. ३ युधिष्ठिराचें तीर्थयात्रेसाठीं क्रमानें वाराणसीकडे प्रयाण. ]

( १ ) लोमश—हे युधिष्ठिरा, अंतकासारखें घोर वदन असलेला तो मद दैत्य आपल्याला भक्षण करण्यासाठीं धांवून येत आहे, हें पाहून स्तंभितभुज झालेला तो देवेंद्र भयभीत झाला व आपले शुष्क झालेले ओंठ वारंवार चाटूं लागला.

नंतर तो भयपीडित झालेला देवराज च्यवनाला म्हणाला—हे भार्गवा, आजपासून हे अश्विनिकुमार सोमपानाला पात्र होतील, हें मी सत्यवचन सांगत आहें. तरी हे विप्रर्षे, मजवर प्रसन्न हो. तूं आरंभिलेलें कार्य कदापि मिथ्या होणार नाहीं, हें मी जाणतों. यास्तव हा सोमपानाचा श्रेष्ठ विधि होऊं दे. तूं आपलें वचन केव्हांहि मिथ्या करणार नाहींस, हेंहि मला ठाऊक आहे.

ज्या अर्थी तूं या अश्विनि-कुमारांना आज सोमाचे अधिकारी केलें आहेस, त्या अर्थी हे ब्रह्मन्, तुझें सामर्थ्य उत्तरोत्तर प्रकाशित व्हावें आणि या सुकन्येच्या धर्मात्म्या पित्याची कीर्ति या लोकीं प्रसिद्ध व्हावी यासाठींच मीं तुझ्या सामर्थ्याचें हें प्रकाशन केलें आहे. तस्मात् हे तपोनिष्ठा, मजवर प्रसन्न हो आणि तुझ्या इच्छेप्रमाणें घडूं दे.

( २ ) राजा, इंद्राचें हें वचन ऐकतांच महात्म्या भार्गवाचा क्रोध शांत झाला ! आणि त्यानें शक्राला तत्काल मुक्त केलें. नंतर हे राजन्, त्या महर्षीनें 'मद'-दैत्याचा स्त्रिया, मद्यपान, द्यूत व मृगया यांत विभाग करून दिला. यास्तव मदापासून उत्पन्न होणारीं हीं मद्यपानादि व्यसनें त्याज्य होत. याप्रमाणें पूर्वीं निर्माण केलेल्या त्या मदाची विभागणी करून भार्गवानें

इंद्राला सोमरसानें तृप्त केलें. अश्विनि-कुमारांसह देवांकडूनहि सोमपान करविलें आणि शर्यातिराजाकडून यज्ञ करवून सर्व लोकांमध्यें आपलें सामर्थ्य प्रकट केलें. नंतर तो वक्त्यांतील श्रेष्ठ च्यवन मुनि याप्रमाणें आपल्या अतुल सामर्थ्याची कीर्ति त्रिभुवनांत पसरून सर्वथा अनुकूल असलेल्या 'सुकन्या'-भार्येसह त्या अरण्यांत सुखानें राहूं लागला.

( ३ ) युधिष्ठिरा, पक्ष्यांनीं गजबजलेलें हेंच तें सरोवर होय. येथें तूं भ्रात्यांसह पितर व देव यांचें तर्पण कर. हे भारता, हें सरोवर व 'सिकताक्ष'-तीर्थ पाहून तूं सैंधवारण्यांत जाऊन तेथील कालव्यांचें दर्शन घे. तेथील सर्व पुष्कर-तीर्थांत स्नान करून श्रीशंकराच्या मंत्राचा जप कर म्हणजे तुला सर्व सिद्धि प्राप्त होतील.

हे पृथापुत्रा, सांप्रत कलि व द्वापर यांचा संधि असतांहि या तीर्थांच्या ठिकाणीं हा काल त्रेता व द्वापर यांच्या संधितुल्य आहे. या तीर्थांत स्नानादि केल्यानें कलिस्पर्श होत नाहीं. यास्तव हे पांडवा, तूं या सर्व पापहारक तीर्थांत स्नान करून पावन हो.

हे राजा, हा आर्चीक पर्वत पहा. हा सर्वदा फलांनीं समृद्ध असतो. निरंतर जलप्रवाहांनीं युक्त असलेला हा उत्तम प्रदेश देवांचें व ज्ञानी लोकांचें निवासस्थान आहे. हे युधिष्ठिरा, येथें देवांनीं उभारलेले बहुविध चैत्य आहेत.

या 'चंद्रमस'-तीर्थाची ऋषि उपासना करितात. येथें अग्नीप्रमाणें देदीप्यमान असलेले व वायुभक्षण करून रहाणारे वानप्रस्थ वालखिल्य रहात असतात. राजा, यांचें दर्शन घेऊन 'त्रिणी शृंगाणि' या नांवानें प्रख्यात असलेल्या त्रिकोणाकृति वाराणसीक्षेत्रीं जा. तेथें गंगा, यमुना आणि सरस्वती या तीन नद्यांचा संगम होतो. त्या प्रयागतीर्थांत प्रदक्षिणा व स्नानादि कर.

हे नराधिपा, येथें पूर्वी शांतनु, शुनक व नर-नारायण यांस सनातन स्थान प्राप्त झालें. या ठिकाणीं देव, पितर व महर्षि नित्य संनिहित असतात. त्यांनीं या 'आर्चीक'-पर्वतावर पूर्वी महत्तप आचरिलें. हे युधिष्ठिरा, तूं त्या सर्वांचें पूजन कर. हे राजा, त्या ऋषींनीं येथेंच चरूंचें प्राशन केलें.

येथें यमुनानदी अविच्छिन्न वहात असते. येथेंच कृष्णहि तपोरत होऊन राहिला होता. हे पांडवा, नकुल, सहदेव, भीम, कृष्णा व हे सर्व ब्राह्मण यांसह आपण तेथें जाऊं. हे नरेंद्रा, हें इंद्राचें पवित्र 'प्रस्रवण' आहे. येथेंच

धाता, विधाता व वरुण यांचा उत्कर्ष झाला. ते परम धार्मिक क्षमाशील देवहि येथें राहिले होते. सर्वांशीं मित्रत्वानें वागणाऱ्या सरळ मनाच्या पुरुषांना हा श्रेष्ठ गिरि शुभावह होतो. हे राजा, हीच ती महर्षिगणसेवित यमुना होय. ही नदी पापभयाचें निवारण करणारी व पवित्र असून हिच्या तीरावर आजपर्यंत अनेक यज्ञ झाले आहेत. येथें महा धनुर्धर 'मांधाता'-राजानें स्वतः याग केला व दात्यांतील श्रेष्ठ साहदेवि सोमकानेंहि येथेंच याग केला. १. ७. १२५.

---

## अध्याय १२६ वा.

[ १ युवनाश्वाची तपश्चर्या. २ मांधात्याचा अद्भुत जन्म. ३ त्याचा अतुल प्रभाव. ]

(१) युधिष्ठिर—हे महाब्राह्मणा, राजश्रेष्ठ मांधाता त्रिभुवनांत प्रसिद्ध आहे. तो यौवनाश्व नृपश्रेष्ठ कसा उत्पन्न झाला, तो अतितेजस्वी राजा स्वर्गांतील अति श्रेष्ठ स्थानास कसा प्राप्त झाला व हें त्रैलोक्य विष्णूप्रमाणें त्या महात्म्याच्या अधीन होऊन कसें राहिलें ! त्या बुद्धिमान् राजाचें सर्व चरित्र ऐकण्याची माझी इच्छा आहे. हे मुने, इंद्रतुल्य तेजस्वी असलेल्या त्या युवनाश्व पुत्राला 'मांधाता' हें नांव कसें प्राप्त झालें ? त्याचा जन्म कसा झाला ? तें मला सांग. तूं पूर्वैतिहास सांगण्यांत फार कुशल आहेस.

लोमश—हे राजा, त्या महात्म्या युवनाश्वपुत्राचें 'मांधाता' हें नांव लोकांत कसें प्रसिद्ध झालें, तें मी तुला प्रथम सांगतों, सावधान चित्तानें ऐक.

इक्ष्वाकुवंशांत 'युवनाश्व'-नांवाचा एक राजा झाला. त्या भूपालानें विपुल दक्षिणांनीं युक्त असे सहस्र अश्वमेध याग केले. इतरहि दक्षिणायुक्त मुख्य मुख्य क्रतु त्यानें संपादन केले होते. पण तो महात्मा राजर्षि अपत्यरहित होता. त्यामुळें राज्यभार मंत्र्यांवर टाकून तो वनांत गेला व ज्यानें आपल्या चित्ताचा निरोध केला आहे, अशा त्या युवनाश्वानें आपलें चित्त शास्त्रोक्त विधीनें इष्ट देवतेमध्यें एकरूप करून दीर्घकाल अनेक व्रतें आचरीत तेथेंच वास केला.

हे राजा, एकदा उपवासानें दुःखित व तृषेनें आर्त झालेला तो राजा भृगूच्या आश्रमास गेला. त्याच रात्रीं महात्म्या भृगुनंदनानें युवनाश्वाच्या पुत्रप्राप्तीसाठीं इष्टि केली होती. त्या महर्षीनें मंत्रपूतजलानें युक्त असा एक मोठा घट संपादन केला व 'यांतील जल प्राशन करून राजपत्नीला इंद्रतुल्य

पराक्रमी पुत्र होईल ' असा संकल्प पूर्वीच करून ठेविला होता. त्यानंतर तो कलश वेदीवर ठेवून रात्रभर जागरणानें श्रांत झालेले ते सर्व महर्षि निद्रावश झाले.

इतक्यांत तृषार्त व शुष्ककंठ झालेला तो जलार्थी राजा तेथें आला व त्यानें त्या आश्रमांत प्रवेश करून जलाची याचना केली. पण श्रांत झालेल्या त्या राजाचा कंठ शुष्क झाल्यामुळें जलासाठीं याचना करणाऱ्या त्याचा शब्द आक्रोश करणाऱ्या पक्ष्याच्या शब्दाप्रमाणें कोणीच ऐकिला नाहीं. इतक्यांत वेदीवर ठेवलेला जलपूर्ण कुंभ त्याच्या दृष्टीं पडला. तेव्हां तो तृषार्त राजा त्या कलशापाशीं वेगानें धांवत गेला व त्यांतील जल प्राशन करून त्यानें तो घट रिकामा करून ठेविला. तृषेनें व्याकुळ झालेला तो राजा शीतल जल प्राशन करून शांत झाला. त्या बुद्धिमान् राजाला त्याच्या तपश्चर्येचें फल मिळालें व तो परम सुखी झाला.

कांहीं वेळानें ते तपोधन मुनि जागे झाले असतां त्या सर्वांनीं वेदीवरील कलश जलरहित आहे असें पाहिलें आणि ते सर्व ' हें कोणाचें कर्म आहे ' असें परस्परांस विचारूं लागले. तेव्हां ' तृषार्त झालेल्या मीं या घटांतील जल प्राशन केलें ' असें सत्य वृत्त युवनाश्वानें त्यांस कथन केलें.

( २ ) तें ऐकून भगवान् भार्गव त्यास म्हणाला—' तूं हें सर्वथा अयुक्त आचरण केलें आहेस. हे महा पराक्रमी राजा, तुझ्या पुत्रासाठीं तपःसामर्थ्यानें संपादन केलेलें जल मीं यांत ठेविलें होतें व दारुण तपश्चर्या करून यांत ब्रह्माचें आवान केलें होतें. हे नरश्रेष्ठा, हें जल मीं अशाच विधीनें संपादन केलें आहे कीं तें प्राशन केलें असतां अति बलाढ्य, महा वीर्यवान् व तपोबलयुक्त असा पुत्र उत्पन्न होईल आणि तो स्वपराक्रमानें साक्षात् इंद्रालाहि यमसदन दाखवील. यास्तव हे राजन्, तूं जल प्राशन केलेंस हें योग्य झालें नाहीं. आम्हांला आतां यांत कांहींच बदल करतां येणें शक्य नाहीं.

खरोखर दैवामुळेंच तुझ्याकडून असें आचरण घडलें. हे महाराजा, माझ्या तपःसामर्थ्यानें युक्त असलेलें व विधिवत् अभिमंत्रण केलेलें हें जल ज्या अर्थी तूं तृषाक्रांत होऊन प्राशन केलें आहेस, त्या अर्थी त्या जलप्रभावानें अशा प्रकारचा पुत्र तुझ्याच देहापासून उत्पन्न होईल. हे राजश्रेष्ठा, आम्हीहि तुझ्यासाठीं परम अद्भुत इष्टि करितों. त्यायोगें तूं इंद्रासारखा पराक्रमी पुत्र प्रसवशील आणि तुला गर्भधारणेचे क्लेशहि भोगावे लागणार नाहींत.

राजा युधिष्ठिरा, पुढें शंभर वर्षें पूर्ण झाल्यानंतर त्या महात्म्या राजाच्या डाव्या कुशीचा भेद करून सूर्याप्रमाणें तेजस्वी बालक बाहेर पडला. परन्तु त्यायोगें युवनाश्व नृपति मरण पावला नाहीं, हें एक मोठें आश्चर्यच घडलें.

नंतर महातेजस्वी इंद्र या बालकाला पहाण्यासाठीं आला असतां देव त्याला म्हणाले—“हे महेंद्रा, तूं या बालकाचें पोषण कसें करणार ! मातेच्या अभावीं त्याला स्तनपानाचा लाभ होणें शक्य नाहीं.”

तें ऐकून इंद्रानें आपली तर्जनी त्या अर्भकाच्या मुखांत घालून म्हटलें—“हा बालक ‘मां’—मला, ‘धाता’—प्राशन करील. तेव्हां वज्रधर शक्रासह देवांनीं त्या पुत्राचें नांव ‘मांधाता’ असें ठेविलें.”

हे राजा, इंद्राची तर्जनी प्राशन करून तो महा तेजस्वी शिशु तेरा विती वाढला. नंतर महात्म्या इंद्रानें केवल संकल्प करितांच सर्व वेद व धनुर्वेदासह दिव्य अस्त्रें त्या प्रभावशाली मांधात्याच्या पूर्णपणें हस्तगत झालीं. ‘आजगव’-नामक धनुष्य, स्वर्गांतील दिव्य बाण व अभेद्य कवच हीं सर्व शस्त्रें त्यास सहज प्राप्त झालीं.

( ३ ) हे भरतश्रेष्ठा, त्या पराक्रमी नृपालास इंद्रानें स्वतः राज्याभिषेक केला. नंतर तीन पावलांनीं त्रिभुवन जिंकणाऱ्या विष्णूप्रमाणें पराक्रमी मांधाता-राजानें धर्मानें सर्व त्रैलोक्य जिंकून घेतलें. त्या महात्म्याची आज्ञा सर्वत्र अप्रतिहत मान्य होत असे. रत्नें स्वतःच त्या राजेंद्राच्या स्वाधीन झालीं होतीं. हे राजेंद्रा, ही धनसंपन्न पृथ्वी त्या महीपतीचीच आहे.

त्या पृथ्वीपतीनें विपुल दक्षिणायुक्त अनेक यज्ञ केले. त्या महातेजस्वी भूपालानें विविध प्रकारचे चयनक्रतु करून पुष्कळ धर्मसंचय केल्यामुळें त्याला इंद्राचें अर्धें आसन प्राप्त झालें.

हे पांडुपुत्रा, त्या धर्मनिष्ठ बुद्धिमान् महीपालानें एका दिवसांत केवल आपल्या आज्ञेनें समुद्रवलयांकित पृथ्वी तिच्यावरील नगरांसह जिंकिली. त्या नृपतीनें जे विपुल दक्षिणायुक्त अगणित यज्ञ केले होते, त्यांच्या चैत्यांनीं चारी समुद्रांनीं वेष्टिलेली ही सर्व पृथ्वी व्यापून गेली होती. एकहि स्थान चैत्यरहित राहिलें नव्हतें. हे महाराज, त्या महात्म्यानें दहा सहस्र पद्म धेनूंचें ब्राह्मणांना दान दिलें, असें म्हणतात.

ज्यावेळीं बारा वर्षें अवर्षण पडलें होतें, त्याच वेळीं त्या महात्म्यानें वज्रपाणि इंद्राच्या समक्ष धान्याच्या वृद्धीसाठीं स्वतः पर्जन्यवृष्टि केली. त्या वीरानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं महा मेघाप्रमाणें गर्जना करणाऱ्या सोमकुलोत्पन्न गांधाराधिपतीला जर्जर करून युद्धांत मारिलें. त्या कृतार्थ झालेल्या राजानें चतुर्विध प्रजेचें रक्षण केलें.

त्या मांधात्यानें आपल्या उग्र तपानें सर्व लोकांना संतप्त केलें होतें. हे राजन्, त्या आदित्यतुल्य तेजस्वी राजाचें कुरुक्षेत्राच्या मध्यभागीं व अतिपुण्य प्रदेशीं हें देवयजन स्थान आहे.

युधिष्ठिरा, तूं ज्याविषयीं मला प्रश्न केला होतास, तें मांधात्याचें विचित्र चरित्र व अद्भुत जन्म मीं तुला सांगितलें आहे.

राजा जनमेजया, 'लोमश'-ऋषीनें असें सांगितलें असतां कुंतीपुत्र युधिष्ठिरानें पुनः सोमकाच्या चरित्राविषयीं त्याला प्रश्न केला. ३. ७. १२६.

---

## अध्याय १२७ वा.

[ १ जंतुपाख्यानाचा उपक्रम, सोमकापासून त्याची उत्पत्ति. २ सोमकाचा एकपुत्रत्वाविषयीं शोक. ३ त्याविषयीं उपायचिंतन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे वक्त्यांतील श्रेष्ठ विप्रर्षे, त्या सोमकराजाचें सामर्थ्य किती होतें ! त्या नृपतीचें कर्म व प्रभाव तत्त्वतः ऐकण्याची माझी इच्छा आहे.

**लोमश**—हे युधिष्ठिरा, 'सोमक'-नांवाचा एक धार्मिक नृपति होता. त्याला शंभर भार्या होत्या. त्या सर्वहि रूपगुणांनीं तुल्य होत्या. त्या राजानें अनेक उपाय केले तरीहि दीर्घ कालपर्यंत त्यांतील कोणा एकीलाहि पुत्र झाला नाहीं. पुढें पुत्रासाठीं दीर्घ प्रयत्न करणाऱ्या त्या वृद्ध भूपालास शंभर भार्यांतील एकीला 'जंतु'-नांवाचा एक पुत्र झाला. तेव्हां त्या सर्व स्त्रिया विषयोपभोगापासून परावृत्त होऊन त्या जन्मलेल्या बालकाच्या सभोंवार सतत बसूं लागल्या.

एकदा त्या बालकाच्या कमरेला एक मुंगी चावली असतां त्या अर्भकानें दुःखानें टाहो फोडिला. तेव्हां त्याच्या सभोंवार बसलेल्या त्या सर्व मातांहि अतिशय व्यथित होऊन आक्रोश करूं लागल्या. त्यामुळ फार मोठा शब्द झाला.

कौंतेया, त्यावेळीं तो भूपाल ऋत्विज व अमात्य यांसह राजसभेंत बसला होता. त्यानें तो आर्तध्वनि ऐकून 'हा काय प्रकार आहे!' याचा शोध करण्यासाठीं द्वारपालास पाठविलें. तेव्हां त्यानें परत येऊन घडलेला सर्व वृत्तान्त राजाला निवेदन केला. तो ऐकतांच शत्रुनाशक सोमक अमात्यांसह सभेंतून उठून त्वरेनें अंतःपुरांत आला आणि पुत्राचें सांत्वन करून पुनः सभेंत परत गेला.

(२) नंतर ऋत्विज व अमात्य यांसह मंत्रिसभेंत बसून तो नरश्रेष्ठ म्हणाला—"धिक्कार असो, या एकपुत्रत्वाला. यापेक्षां पुत्रराहित्यहि पत्करलें. भूतांना क्षणिकत्व असल्यामुळें एकपुत्रता हा मूर्तिमंत शोकच आहे. हे ब्रह्मन्, पुत्रेच्छेनें मीं परीक्षा करून समान योग्यतेच्या शंभर स्त्रिया वरिल्या, तथापि त्यांपैकीं एकीलाहि अपत्य झालें नाहीं. त्या सर्वजणी संततीसाठीं अतिशय प्रयत्न करीत असूनहि मला हा एकच जंतु-पुत्र झाला. याहून अधिक दुःखकर काय आहे!

(३) हे द्विजश्रेष्ठहो, मी आतां भार्यांसह वयातीत झालों आहें. आम्हां सर्वांचे प्राण या एकुलत्या एक पुत्रामध्यें गुतून गेले आहेत. तरी ज्यायोगें शंभर पुत्र होतील असें एखादें कर्म आहे काय? तें कर्म अगदीं क्षुल्लक असो किंवा अतिशय दुर्घट असो, आपण मला तें कथन करा."

ऋत्विज म्हणाला—हे सोमकराजा, ज्यायोगें शंभर पुत्र होतील असें एक कर्म आहे. तूं जर तें करण्यास समर्थ असशील तर मी तें तुला सांगेन.

सोमक—हे भगवन्, शंभर पुत्रांची प्राप्ति होणारें कर्म सुकर असो किंवा दुष्कर असो, मीं तें केलेंच म्हणून समज. आपण मला तें सांगावें.

ऋत्विज—हे राजन्, मी एक यज्ञ आरंभितों, त्यांत तूं या जंतूचा होम कर. म्हणजे तुला सत्वर शंभर तेजस्वी पुत्र होतील. हे राजा, त्याच्या सर्व मातांनीं त्या आहुति दिलेल्या वपेच्या धूमाचें अवघ्राण केलें असतां त्या सर्वजणी महा वीर्यवान् पुत्र प्रसवतील, आणि हे विभो, तुझ्या ज्या भार्येच्या

१ 'तो वरुण राजापाशीं गेला आणि मला पुत्र होऊं दे, म्हणजे मी त्याचाच याग करीन' असा पुत्राला पशुरूपानें यज्ञांत अर्पण केल्याचा बह्वृच ब्राह्मणांत उल्लेख आहे. यास्तव पुत्राचा होम करण्यांत शास्त्रविरोध नाहीं, असें नीलकंठानें टीकेंत म्हटलें आहे.

ठिकाणीं जंतु उत्पन्न झाला होता, तिच्याच ठिकाणीं तो पुनः जन्म घेईल व त्याच्या डाव्या कुशीवर सुवर्णचिह्न असेल. ३.७.१२७.

---

## अध्याय १२८ वा.

[ १ सोमकाचा याग, जंतूची आहुति. २ सोमकाला शंभर स्त्रियांच्या ठिकाणीं शंभर पुत्रांची प्राप्ति, जंतूचा पूर्वमातेच्या ठिकाणींच पुनर्जन्म. ३ सोमकाचा ऋत्विजासह नरकवास व स्वर्गवास. ]

( १ ) **सोमक**—हे ब्रह्मन्, जें जें करणें इष्ट असेल, तें तें सर्व तूं कर. पुत्रेच्छेनें मी तुझें सर्व वचन मान्य करीन.

**लोमश**—राजा युधिष्ठिरा, त्यानंतर त्या ऋत्विजानें सोमकाकडून 'जंतु' याच द्रव्यानें याग करविला. त्या वेळीं त्याच्या सर्व माता अतिशय शोकाकुल झाल्या होत्या. त्या सर्वजणी 'हाय, आमचा घात झाला' असा विलाप करीत आक्रोश करूं लागल्या आणि करुणेनें आर्त होऊन रडत रडत त्या बालकाचा उजवा हात धरून त्याला बलात्कारानें ओढूं लागल्या.

तेव्हां तो याजकहि त्या पुत्राचा डावा हात धरून त्याला ओढूं लागला आणि दुःखार्त होऊन टिटवीप्रमाणें आक्रोश करणाऱ्या त्या स्त्रियांच्या हातून त्या अज्ञ बालकाला ओढून त्यानें त्याची हिंसा केली व त्याच्या वपेची विधिवत् आहुति दिली. त्या वेळीं हे कुरुनंदना, त्या सर्व शोकार्त झालेल्या माता होम केलेल्या त्या वपेचें अवघ्राण करून एकदम भूमीवर निश्चेष्ट होऊन पडल्या.

( २ ) त्यानंतर त्या सर्व श्रेष्ठ स्त्रियांनीं गर्भ धारण केले आणि दहाव्या महिन्यांत त्या सर्व स्त्रियांच्या ठिकाणीं सोमकाला शंभर पुत्र झाले. हे राजा, त्यांतील 'जंतु'-ज्येष्ठ पुत्र असून तो पूर्वजननीच्याच ठिकाणीं उत्पन्न झाला. इतर सर्व सापत्न मातांनाहि तो स्वतःच्या पुत्रांहून अधिक प्रिय होता. त्याच्या डाव्या कुशींत सुवर्णाचें चिह्न असून तो जसा वयानें ज्येष्ठ तसा गुणांनींहि श्रेष्ठ होता.

( ३ ) हे पांडवा, पुढें सोमकाचा गुरु परलोकीं गेला व कांहीं कालानें सोमकालाहि परमगति प्राप्त झाली. त्या वेळीं त्या धर्मज्ञ राजानें आपला ऋत्विज घोर नरकांत संतप्त होत आहे, असें पाहून 'हे ब्राह्मणा, तूं या नरकांत क्लेश

कां भोगीत आहेस!' असें विचारिलें. तेव्हां तो अग्नीनें होरपळणारा गुरु म्हणाला—"हे राजन्, मी तुजकडून जो याग करविला, त्या कर्माचें हें फल आहे."

ब्राह्मणाचें हें वचन ऐकून तो राजर्षि यमधर्माला म्हणाला—"मी या अग्नींत प्रवेश करितों, माझ्या या ऋत्विजाला सोडून द्या. कारण हा महाभाग माझ्यासाठीं या नरकयातना भोगीत आहे."

धर्म—हे राजा, कर्माचें फल कर्त्यावांचून अन्य कोणालाहि भोगतां येत नाहीं. हीं पहा, तुझ्या कर्माचीं फलें येथें दिसत आहेत.

सोमक—हे धर्मराजा, या ब्रह्मवादी विप्रावांचून मी पुण्यलोकांतील भोगांची इच्छा करीत नाहीं. मी स्वर्गलोकीं याच्यासहच सुखोपभोग घेईन किंवा नरकांत याच्याबरोबरच क्लेश भोगीन. कारण हे यमधर्मा, याचें व माझें कर्म समान आहे. यास्तव पुण्य आणि पाप या दोहोंचेंहि फल आम्हां दोघांना सम मिळालें पाहिजे.

धर्म—हे राजा, तुझी जर अशीच इच्छा असेल तर तूं याच्याबरोबर हें कर्म-फल भोग. त्याच्याच बरोबर तुलाहि सद्गति प्राप्त होईल.

लोमश—युधिष्ठिरा, त्यानंतर तो धर्मनिष्ठ भूपति त्याप्रमाणें वागून पाप क्षीण झाल्यावर गुरूसह नरकांतून मुक्त होऊन गेला. तेव्हां हे राजन्, त्या गुरुप्रिय राजानें स्वकर्मानें संपादिलेल्या शुभलोकाला प्राप्त होऊन श्रेष्ठ गुरूसह स्वर्गीय भोग भोगिले.

हा समोर दिसत असलेला त्याचाच पुण्यप्रद आश्रम आहे. तेथें शांत चित्तानें सहा रात्रीं निवास करणारा पुरुष सद्गतीला प्राप्त होतो. यास्तव हे राजेंद्रा, आपणहि नियतव्रत व शांतचित्त होऊन येथें सहा रात्रीं राहूं या. ३.७. १२८.

---

१ या अध्यायाचें तात्पर्य—वस्तुतः अभिचार कर्माचें फल कुमार्गाचा उपदेश करणाऱ्या याजकालाच प्राप्त होतें. यजमानाला तें भोगावें लागत नाहीं. पण सोमकराजानें आपल्या गुरूबरोबर जे नरकक्लेश भोगले ते त्या गुरुविषयींच्या करुणेनें होत, असें आहे.

## अध्याय १२९ वा.

[ १ सोमकाश्रमादिकांचें वर्णन. २ त्या प्रसंगानें एक आख्यायिका. ३ प्लक्षावरणाचें वर्णन. ]

( १ ) लोमश—हे पांडुपुत्रा, पूर्वी प्रजापतीनें येथेंच 'इष्टीकृत'-नामक सहस्र वर्षे चालणारें सत्र केलें होतें. त्याचप्रमाणें नाभागपुत्र अंबरीषराजानेंहि याच यमुनातीरावर यज्ञ करून सदस्यांना दहा पद्में धेनु अर्पण केल्या. तो महात्मा यज्ञ व तप यांच्यायोगानें परम सिद्धीला प्राप्त झाला.

हे कौंतेया, पुण्य कर्मे व यज्ञ करणाऱ्या अमित तेजस्वी सार्वभौम ययातीचा हा यज्ञप्रदेश आहे. इंद्राशीं स्पर्धा करणाऱ्या त्या नाहुषानें येथेंच यज्ञ केला होता. हे विशांपते, ही भूमि पहा. ती ययातीनें केलेल्या यज्ञ कर्मांनीं नानाविध आकाराच्या स्थंडिलांनीं जणुकाय आच्छादित झाली आहे. पूर्वी दधि उत्पन्न करण्यासाठीं आणलेली जी शमीची एकपत्रा शाखा तीच आतां येथें उपवेषरूपानें अवशिष्ट आहे, ती पहा. हें उत्कृष्ट सुरापात्र, हे परशुरामाचे डोह आणि हा नारायणाश्रम पहा.

हे महीपाला, योगबलानें पृथ्वीवर संचार करणाऱ्या अतुल सामर्थ्यवान् ऋचीकपुत्राचा हा रौप्याप्रमाणें श्वेतवर्ण असलेला संचार मार्ग पहा. नदीच्या सामीप्यामुळें याची तीर्थांत गणना होते. हे कुरुश्रेष्ठा, आतां परंपरेनें श्रुत असलेलें एक आख्यान मी तुला सांगतों, तें ऐक.

( २ ) उखळ-मुसळांच्या आकाराचीं कर्णभूषणें धारण केलेली एक पिशाची एकदा या तीर्थांत स्नान करण्यासाठीं पुत्रासह आलेल्या एका ब्राह्मणीला म्हणाली—"तूं युगंधर पर्वतावर दहीं प्राशन केलेंस, पण त्या प्रदेशांत उंटीण व गर्दभी यांच्या दुधाचें दहीं करितात. तसेंच संकर जातीच्या 'अच्युतस्थल'-नामक गांवांत वास्तव्य केलेंस. त्याचप्रमाणें दस्यूंच्या 'भूतलय'-संज्ञक ग्रामांतील ज्या नदींत मृतदेह टाकितात, त्या जलांत स्नान केलेंस. असे हे तीन दोष करून तूं या पवित्र प्रदेशांत रहाण्याची इच्छा कशी करितेस! कारण दोषयुक्त माणसाला तीर्थवास दुर्लभ आहे. एक खुर असलेल्या उंटासारख्या प्राण्याचें दुध सुरातुल्य होय. संकर जातीशीं संसर्ग केला असतां सर्वप्राजापत्य व्रत सांगितलें आहे. भूतलयांत गेल्यानें ब्राह्मणानें प्राजापत्यव्रत करावें असें विधान आहे. पण तुझ्या हातून वरील दोष घडले असूनहि तूं प्रायश्चित्त केलें नाहींस. त्यामुळें तुला येथें रहाण्याचा अधिकार नाहीं."

पिशाचीचें हें वचन ऐकूनहि त्या ब्राह्मणीनें तेथें स्नानादिक केलें. तेव्हां त्या राक्षसीनें तिच्या घट-स्थाल्यादिकांचा नाश केला व 'दिवसा माझ्या सांगण्याप्रमाणें न वागण्याचा हा परिणाम झाला आहे. आतां रात्रींहि जर तूं येथें रहाशील तर मी तुझ्या पुत्राचाहि नाश करीन आणि दुसऱ्या दिवशीं जर येथें रहाण्याची इच्छा करशील तर मी तुला माझ्या सारखीच पिशाची करीन. तूं ब्रह्मज्ञ नाहींस, यास्तव तुला येथें एक रात्रच रहातां येईल. अधिक रहातां येणार नाहीं. दुसऱ्या रात्रीं जर तूं येथें रहाशील, तर अहल्येप्रमाणें तुला शिलाभाव प्राप्त होईल, असें म्हटलें.

दुसऱ्या दिवशीं राहिल्यानें तुला पिशाचभाव प्राप्त होऊन या तीर्थांत स्नान करतां येणार नाहीं, व दुसऱ्या रात्रीं राहिल्यानें शिलाभाव प्राप्त होऊन तुला तीर्थाचें दर्शनहि घडणार नाहीं. यास्तव हे राजा, आपण आज येथें रात्रभर निवास करूं आणि प्रातःकालीं येथून निघून जाऊं.

( ३ ) हे कौंतेया, हें कुरुक्षेत्राचें द्वार आहे. नहुषपुत्र ययातीनें येथेंच अनेक रत्नौघांचा व्यय करून विविध क्रतु केले व त्यामुळें इंद्राला परम संतोष झाला. हें 'प्लक्षावतरण'-नामक उत्तम यमुना तीर्थ आहे. हें स्वर्गाचें द्वार आहे, असें विद्वान् लोक सांगतात. येथें सारस्वत ऋत्विजांकडून देवांची पूजा करणारे, यूपोलूखलिक[1] परम ऋषि अवभृत स्नान करितात.

हे राजन्, येथेंच भरत राजानें अनेक क्रतु केले व अश्वमेध करण्याच्या इच्छेनें येथूनच श्यामकर्ण मेध्य अश्वाला सोडिलें व त्यानें सर्व पृथ्वीचें राज्य धर्मानें संपादन केलें. हे नरेंद्रा, संवर्त-नांवाच्या मुख्य ऋषींनीं ज्याचें सर्वथा रक्षण केलें आहे, अशा मरुत्तानें उत्तम सत्र केलें. हे राजश्रेष्ठा, या तीर्थांत स्नान करणारा पुरुष सर्व लोकांस पहातो व सर्व पापांपासून मुक्त होतो. यास्तव तूंहि या तीर्थांत स्नान कर.

वैशंपायन—जनमेजया, युधिष्ठिरानें भ्रात्यांसह त्या तीर्थांत स्नान केलें असतां महर्षि त्याची स्तुति करूं लागले. तेव्हां तो पांडवश्रेष्ठ लोमशाला म्हणाला—"हे सत्यविक्रम महर्षे, तपःसामर्थ्यानें मी सर्व लोक पहात आहें.

---

१ यूप, उलखल इत्यादि यज्ञसाधनें संपादन करणाऱ्या ऋषींना 'यूपोलुखलिक' असें म्हटलें आहे. त्या महर्षींनीं पशु व पुरोडाश यांनीं याग केले, असा याचा भावार्थ.

मी या प्लक्षावतरणामध्यें स्थित होऊन माझ्या प्रिय श्वेतवाहन अर्जुनालाहि पहात आहें.'"

तें ऐकून लोमश म्हणाला—हे धर्मात्म्या, तूं म्हणतोस तें खरें आहे, महर्षिहि येथून असेच सर्व लोक पहात असतात. राजा, हें पवित्र सरस्वतीतीर्थ आहे. केवल पुण्याचरण करणारेच येथें रहातात. हे नरश्रेष्ठा, या सरस्वती तीर्थांत स्नान करून तूं निष्पाप होशील. तेथें देवर्षि, ब्रह्मर्षि व राजर्षि यांनीं सारस्वत ब्राह्मणांकडून मोठमोठे याग करविले आहेत. ही प्रजापतीची समंततः पांच योजनें विस्तीर्ण असलेली वेदी आहे. हें महात्म्या कुरूचें क्षेत्र आहे. ३. ७. १२९.

---

## अध्याय १३० वा.

[ १ विविध तीर्थांचें वर्णन. २ श्येन-कपोतीयाख्यानाचा आरंभ. ]

(१) लोमश—हे भरतश्रेष्ठा, या तीर्थांत देहत्याग करणारे मानव स्वर्गाला जातात. हे राजा, हजारों मुमुर्षु पुरुष येथें येत असतात. पूर्वी दक्षानें जेव्हां येथें यज्ञ केला तेव्हां त्यानें 'या प्रदेशांत मृत्यु पावणारे नर स्वर्गी जातील' असा आशीर्वाद दिला होता. हे राजा, ही दिव्य, रम्य आणि ओघवती सरस्वती नदी आहे. हें सरस्वतीच्या तीरावरील 'विनशन'-नामक तीर्थ आहे.

हे वीरा, हें निषादराष्ट्राचें द्वार असून त्याच्या दोषामुळेंच सरस्वतीनें 'या निषादांनीं मला जाणूं नये' या आशयानें पृथ्वींत प्रवेश केला. हा चमसभेद पहा, येथेंच सरस्वती प्रकट झाली. याच ठिकाणीं सर्व समुद्रगामी पुण्यप्रद नद्या तिला येऊन मिळतात.

हे अरिंदमा, हें सिंधूचें महातीर्थ आहे. येथेंच पूर्वी लोपामुद्रेची अगस्त्य-मुनीशीं भेट होऊन तिनें त्याला पति वरिलें. हें समोर पुण्यप्रद प्रभास तीर्थ झळकत आहे, पहा. तें इंद्राला प्रिय असून पवित्र व पापनाशक आहे. हें पहा 'विष्णुपद'-नांवाचें श्रेष्ठ तीर्थ दिसत आहे.

हे पांडवा, ही परम पावन रम्य विपाशा नदी होय. येथेंच पुत्रशोकानें दुःखार्त झालेल्या भगवान् वसिष्ठ महर्षीनें स्वतःला बांधून नदींत उडी टाकिली असतां तो पाशमुक्त होऊन वर आला. (हें सविस्तर कथानक खं. २. आदिपर्व अ. १७६ पृ. ३० वर आहे.)

हे राजा, तूं भ्रात्यांसह हें पुण्यप्रद काश्मीर राष्ट्र पहा. यांत महर्षी वास करितात. येथेंच उत्तरेकडील सर्व ऋषि, नहुषपुत्र ययाति, अग्नि आणि कश्यप यांचा संवाद झाला.

हे महाराज, हें मानस सरोवराचें द्वार दिसत आहे, पहा. श्रीमान् रामचंद्रानें या गिरीमध्यें निवास केला होता. विदेह देशाच्या उत्तरेला हें द्वार असून तेथें वायूचाहि प्रवेश होणें शक्य नाहीं, मग इतरांचा कोठून होणार! वायूनें आणलेल्या पद्मादिकांसहि त्याचें अतिक्रमण करितां येत नाहीं, परंतु श्रीरामानें मात्र तेथें प्रवेश केला. रघुनाथाचें हें सामर्थ्य केवढें आश्चर्यकारक आहे!

हे नरश्रेष्ठा, या प्रदेशांतील दुसरें एक आश्चर्य पहा. येथें प्रतिपंचवर्षसमाप्तीनंतर चैत्र प्रतिपदेला सर्व पार्षद व उमा यांसह कामरूपी महादेवाचें दर्शन होतें. याच सरोवरावर शुभाची इच्छा करणारे याजक सर्व परिवारासह चैत्र मासभर पिनाकीला उद्देशून सत्रें करितात. या सरोवरांत स्नान करणारा श्रद्धावान् जितेंद्रिय पुरुष पापरहित होऊन शुभ लोकांना प्राप्त होतो, यांत संशय नाहीं.

हें 'उज्जानक'-नांवाचें तीर्थ आहे. येथें कार्तिकेय आणि अरुंधतीसह वसिष्ठमुनि शांतीला प्राप्त झाले. हा जलपूर्ण डोह पहा. येथें 'कुशेशय पद्म'-नांवाचें तीर्थ व रुक्मिणीचा आश्रम आहे. याच आश्रमांत रुक्मिणीनें क्रोधाला जिंकिलें. ज्याच्या दर्शनानें समाधिफल प्राप्त होतें, असें तूं ऐकलेंस, तो हा भृगुतुंग महापर्वत पहा. हे राजेंद्रा, महर्षींचें निवासस्थान असलेली, सर्व पापाचें क्षालन करणारी, शीतल व निर्मल जलानें युक्त असलेली ही 'वितस्ता'-नदी होय. यमुनेच्या समीपच जला व उपजला या नद्या आहेत. यांच्या तीरावर यज्ञ करून 'उशीनर'-राजानें इंद्राचेंहि अतिक्रमण केलें.

( २ ) हे विशांपते, या महात्म्या उशीनराच्याच राजसभेंत वरद इंद्र व अग्नि त्या नृपतीचें सत्त्व पहाण्याच्या इच्छेनें गेले. त्या राजाचा यज्ञ चालला असतां इंद्र श्येनरूप धारण करून व अग्नि कपोत होऊन तेथें गेला व श्येनाच्या भीतीनें भयपीडित झालेला शरणार्थी कपोत त्या भूपालाच्या मांडीजवळ जाऊन लपून बसला. ३. ७. १३०.

## अध्याय १३१ वा.

[ १ श्येन-उशीनरसंवाद. २ राजाचें श्येनाला स्वमांसार्पण. ३ श्येनरूपी इंद्राची प्रसन्नता. ४ राजाचें स्वर्गलोकीं गमन. ]

( १ ) **श्येन**—हे राजन्, सर्व भूपाल 'तूं एकच धर्मात्मा आहेस,' असें म्हणतात. असें असतां तूं हें सर्वधर्मविरुद्ध कर्म कां करीत आहेस ! क्षुधेनें पीडित झालेल्या माझें हें विहित भक्ष्य आहे. हे राजन्, त्याचें तूं धर्मलोभानें रक्षण करूं नको. कारण त्या योगें तूं धर्मापासून च्युत होशील.

**उशीनर**—हे पक्षिश्रेष्ठा, तुझ्या भीतीनें त्रस्त झालेला हा खग प्राणांच्या लोभानें स्वसंरक्षणासाठीं माझ्या समीप आला आहे. अशाप्रकारें माझ्या आश्रयास आलेल्या या शरणाकांक्षी कपोताला तुझ्या स्वाधीन न करण्यांतच परम धर्म आहे. हे श्येना, तुला हें कसें कळत नाहीं.

हा कपोत भ्रांत झाला असून तो थरथर कांपत आहे. तो जीविताच्या आशेनें मजपाशीं आला आहे, त्याचा त्याग करणें सर्वथा निंद्य होय. हे श्येना, जो मानव ब्रह्महत्या करितो, किंवा लोकांची केवल माताच अशी जी धेनु तिची हत्या करितो, किंवा शरण आलेल्याचा त्याग करितो, त्या तिघांचेंहि पातक तुल्य आहे.

**श्येन**—हे महीपते, आहारानेंच ( अन्नापासूनच ) सर्व प्राणी उत्पन्न होतात, आहारावरच वाढतात, आणि त्यायोगेंच जीव जिवंत रहातात. एखाद्या अत्याज्य वस्तूवांचूनहि दीर्घ काल जिवंत रहाणें शक्य आहे, परंतु आहारावांचून फार दिवस जगणें शक्य नाहीं. यास्तव हे नृपाला, तूं माझें हें भक्ष्य मला न दिल्यास माझे प्राण या देहाचा त्याग करून निर्भय मार्गानें निघून जातील.

हे धर्मात्म्या, मी मृत झालों असतां माझा भार्या-पुत्रादि परिवारहि नाश पावेल. यास्तव हे राजा, तूं एका कपोताचें संरक्षण करूं लागलास, तर तुझ्या हातून अनेकांच्या प्राणांचें रक्षण न होतां उलट त्यांची हिंसा घडेल.

तस्मात् हे धर्मज्ञा, ज्या एका धर्माचरणानें दुसऱ्या धर्माला बाध येतो; तो सद्धर्म नव्हे, तो कुमार्ग आहे. हे सत्यविक्रम राजा, जो धर्म दुसऱ्या धर्माशीं विरोध न येतां आचरिला जातो, तोच खरा धर्म होय. परस्परविरोधी धर्मामध्यें गौरव-लाघवाचा विचार करून, ज्यांत बाध नसेल त्याच धर्माचें आचरण करावें. यास्तव हे राजन्, या प्रसंगीं तूं धर्माचें गौरव-लाघव लक्षांत घेऊन धर्म आणि अधर्म यांचा विचार कर आणि ज्यांत अधिक पुण्य असेल त्याच धर्माचा तूं निश्चय कर.

राजा—हे विहगोत्तमा, तूं अतिशय कल्याणप्रद उत्तम भाषण केलेंस. तूं पक्षिराज गरुड तर नव्हेस! तूं धर्मज्ञ आहेस, यांत तर संशयच नाहीं. त्याचप्रमाणें तूं अति विलक्षण धर्मयुक्त भाषण करीत आहेस. यावरून तुला कांहीं अज्ञात आहे असें मला वाटत नाहीं. असें असतां हे विहंगमा, शरणार्थी जीवाचा त्याग करणें तुला योग्य कसें वाटतें!

शिवाय तुझा हा उद्योग केवल आहारासाठीं आहे. तो आहार तुला अन्यप्रकारें याहिपेक्षां अधिक मिळूं शकेल. तूं वृषभ, वराह, मृग, महिष किंवा ज्या अन्य पशूची आहारार्थ इच्छा करीत असशील, त्या पश्वादिकांचा आहार मी आज तुला देईन.

श्येन—हे महाराज, मी वृषभ, वराह किंवा इतर विविध पशु, यांना केव्हांहि भक्षण करीत नाहीं. मग मला अन्य पशु घेऊन काय करावयाचे आहेत! हे क्षत्रियश्रेष्ठा, कपोतच माझें देवविहित भक्ष्य आहे. यास्तव त्याला सोडून दे. कारण हे राजन्, श्येन कपोतांना भक्षण करितात ही सनातन सृष्टिमर्यादा आहे. यास्तव कदलीस्कंधतुल्य असलेल्या या निःसार धर्मात तूं प्रवृत्त होऊं नको.

राजा—हे श्येना, हें शिबीचें समृद्ध राष्ट्र मी तुला देतों किंवा हे पक्षिसत्तमा, या शरणार्थी कपोतावांचून तुला जें कांहीं इष्ट असेल तें सर्व मी तुला देईन. अथवा जें कर्म केलें असतां तूं या जीवितार्थी पक्ष्याला सोडून देशील, तें मला सांग म्हणजे मी तें करीन. परंतु हा कपोत तुला देणार नाहीं.

श्येन—हे उशीनर राजा, या कपोतावर जर तुझें एवढें प्रेम आहे तर तूं स्वतःच्या शरीराचें मांस काढून त्याचें वजन कर आणि तें जेव्हां कपोताच्या भारंभार भरेल, तेव्हां मला दे. म्हणजे मी संतुष्ट होईन.

राजा—हे श्येना, तूं मजपाशीं अशी याचना करीत आहेस, हा तुझा मजवर मोठा अनुग्रहच आहे, असें मी समजतों. आज मी तुझ्या अपेक्षेप्रमाणें आपलें मांस या पक्ष्याच्या भारंभार तागडींत वजन करून तुला देतों.

( २ ) लोमश—हे युधिष्ठिरा, असें बोलून त्या परम धर्मवेत्त्या राजानें स्वदेहाचें मांस काढून त्याचें कपोतावरोबर वजन केलें. परंतु तागडींत बसलेल्या कपोताचें वजन अधिक भरलें. तेव्हां उशीनर भूपतीनें पुनः पुनः आपल्या शरीराचें मांस काढून तें तागडींत घातलें. परंतु कितीहि मांस घातलें तरी तें

कपोताच्या भारंभार भरेना. तेव्हां शेवटीं ज्याच्या देहावरील सर्व मांस तोडिलें आहे असा तो केवळ अस्थिमात्र राहिलेला राजा स्वतः त्या तागडींत बसला.

( ३ ) तें पाहून श्येन म्हणाला—हे धर्मज्ञा, मी इंद्र असून हा कपोत अग्नि आहे. तुझ्या धार्मिकतेची परीक्षा पहाण्याच्या इच्छेनें आम्ही दोघे तुझ्या या यज्ञमंडपांत आलों आहों. हे विशांपते, ज्याअर्थी तूं आपल्या अंगा॰ वरील मांस तोडून काढिलें स त्याअर्थी तुझी उज्ज्वल कीर्ति लोकांत पसरेल आणि हे नृपश्रेष्ठा, जोंवर मानव या लोकीं तुझें नांव गात राहतील तोंवर तुझी अक्षय्य कीर्ति व यश स्थिर राहील.

( ४ ) राजाला असें सांगून इंद्र स्वर्गलोकीं निघून गेला आणि देदीप्यमान कांतीनें शोभणारा धर्मात्मा उशीनरहि आपल्या धर्माचरणानें द्यावा-पृथ्वीला व्यापून स्वर्गीं गेला.

राजा युधिष्ठिरा, त्या महात्म्या नृपतीचें हें पवित्र निवासस्थान आहे. तें मजबरोबर पहा. राजा, या पापनाशक प्रदेशीं पुण्यवान् महात्म्यांना देव आणि सनातन मुनि यांचें सतत दर्शन होतें. ३. ७. १३१.

---

## अध्याय १३२ वा.

[ १ अष्टावक्राच्या उपाख्यानाचा उपक्रम. २ त्याला गर्भावस्थेंतच पित्याचा शाप. ३ त्याच्या जन्मापूर्वीच कहोड पित्याचें जलनिमज्जन. ४ अष्टावक्राचें श्वेतकेतूसह जनकयज्ञांत प्रयाण. ]

( १ ) लोमश—हे धर्मराजा, ज्याची बुद्धि मंत्रांनीं शुद्ध झाली आहे अशा उद्दालकपुत्राला या भूलोकीं 'श्वेतकेतु' असें म्हटलें जातें. त्या औद्दालकीचा हा आश्रम पहा ! हा सर्वदा फळें देणाऱ्या वृक्षांनीं युक्त असतो. येथेंच श्वेतकेतूला मनुष्यदेहधारी सरस्वतीचें साक्षात् दर्शन झालें. त्या वेळीं श्वेतकेतु वरद सरस्वतीला 'मला वाङ्मयज्ञान व्हावें' असें म्हणाला.

या युगामध्यें पृथ्वीवर श्वेतकेतु व त्याचा भगिनीपुत्र अष्टावक्र हे दोघे मुनि ब्रह्मवेत्त्यांत वरिष्ठ होते. एकदा ते दोघे मातुल व भागिनेय विदेहराजाच्या यज्ञशाळेंत गेले आणि त्या अप्रमेय ज्ञानी विप्रांनीं बंदीला वादांत जिंकिलें.

---

१ स्वदेहाचा त्याग करूनहि शरणागताचें रक्षण करावें, असें या अध्यायाचें तात्पर्य आहे.

हे युधिष्ठिरा, तो महातेजस्वी मुनि अष्टावक्र ज्या महर्षीचा पौत्र होता त्या उद्दालकाच्या या पवित्र आश्रमांत तूं अनुजांसह जाऊन त्याची उपासना कर. हे पांडवा, विप्रांत अग्रेसर असलेल्या त्या वादकुशल मुनीनें बालपणींच जनकाच्या यज्ञांत (वादांत) बंदीचा पराभव करून त्याला नदींत बुडविलें.

युधिष्ठिर—हे लोमशमुने, ज्यानें बंदीला पराभूत केलें, त्या विप्राचा प्रभाव कसा होता, तो अष्टावक्र कशामुळें झाला, तें सर्व मला तत्त्वतः सांग.

लोमश—हे महाराज, उद्दालकाचा 'कहोड'-नांवानें प्रसिद्ध असलेला एक नियत व्रत शिष्य होता. त्यानें दीर्घकाल आचार्यांच्या आज्ञेंत राहून गुरु-शुश्रूषा करीत अध्ययन केलें. तेव्हां त्या शिष्यानें केलेली परिचर्या जाणून उद्दालकानें त्याला विद्यासंपन्न केलें आणि आपली 'सुजाता'-नांवाची दुहिता विवाहांत अर्पण केली.

( २ ) कांहीं कालानें त्या 'कहोड'-विप्राच्या पत्नीला अग्नीसारखा तेजस्वी गर्भ राहिला. तो एकदा आपल्या अध्ययन करणाऱ्या पित्याला गर्भांतूनच म्हणाला—"हे तात, तूं सर्व रात्रभर अध्ययन करितोस, परंतु तें योग्यप्रकारें होत नाहीं."

तेव्हां त्या महर्षीनें आपल्या शिष्यांसमक्ष केलेली ही निंदा ऐकून क्रोधानें त्या गर्भस्थ बालकास शाप दिला—"ज्या अर्थी तूं मातेच्या उदरांत असतां-नाच बोलूं लागला आहेस, त्या अर्थी तुझें शरीर आठ ठिकाणीं वक्र होईल."

पित्याच्या या शापाप्रमाणें तो बालक आठ जागीं वक्र होऊन जन्म पावला आणि 'अष्टावक्र' या नांवानेंच प्रसिद्ध महर्षि झाला. अष्टावक्राचा 'श्वेतकेतु'-नामक मातुल असून तो त्याच्याच वयाचा होता.

( ३ ) राजा, हा अष्टावक्र गर्भांत वाढत असतांना त्याच्या मातेला अतिशय पीडा होऊं लागली. तेव्हां ती द्रव्येच्छेनें आपल्या निर्धन पतीला एकांतांत प्रसन्न करून म्हणाली—"हे महर्षे, मला हा दहावा महिना चालू आहे. परंतु मी द्रव्यावांचून काय करूं ? प्रसूतीनंतर ज्याच्या योगानें आपल्याला या आपत्तींतून पार पडतां येईल असें अल्प धनहि आपणापाशीं नाहीं."

भार्येचें हें वचन ऐकून तो 'कहोड'-महर्षि वित्ताच्या इच्छेनें जनकराजाच्या सभेंत गेला. तेथें बंदीनें वाद-विवादांत त्याचा पराजय करून त्याला नदींत

बुडविलें. पुढें जनकाच्या त्या सूतानें या विप्राला नदींत बुडविल्याचें वृत्त उद्दालकानें जेव्हां ऐकलें, तेव्हां तो सुजातेला म्हणाला—" हे वत्से, तूं ही वार्ता अष्टावक्रापासून गुप्त ठेव. "

पित्याच्या आज्ञेप्रमाणें सुजातेनेंहि तें वृत्त पुत्रापासून गुप्त राखिलें, त्यामुळें अष्टावक्राचा जन्म झाल्यावर पित्याचा वृत्तान्त त्याच्या कानीं गेला नाहीं. आपल्या पित्याविषयीं अनभिज्ञ असलेला अष्टावक्र उद्दालकासच आपला पिता व श्वेतकेतूस आपला भ्राता मानूं लागला.

पुढें अष्टावक्र बारा वर्षांचा झाला. नंतर एकदा तो उद्दालक-पित्याच्या अंकावर निजला असतां श्वेतकेतूनें त्याला हातांनीं धरून ओढिलें आणि ' ही तुझ्या पित्याची मांडी नव्हे ' असें म्हटलें.

श्वेतकेतूची ही दुरुक्ति अष्टावक्राच्या हृदयाला झोंबली. तो अतिशय खिन्न होऊन घरीं गेला व आपल्या मातेपाशीं जाऊन म्हणाला—" हे माते, माझा पिता कोठें आहे ! "

( ४ ) पुत्राचा हा प्रश्न ऐकून सुजाता परम दुःखार्त झाली व शापाच्या भीतीनें तिनें सर्व पूर्ववृत्त त्याला कथन केलें. तो सर्व यथार्थ वृत्तांत ऐकल्यावर रात्रीं अष्टावक्र श्वेतकेतूला म्हणाला—" हे मातुला, आपण दोघे जनकराजाच्या यज्ञाला जाऊं या. तो यज्ञ अतिशय आश्चर्यकारक आहे, असें म्हणतात. आपण तेथें ब्राह्मणांचा वाद-विवाद ऐकूं. विविध पदार्थांचा उपभोग घेऊं. तेथें आपल्याला विद्वत्ता आणि कल्याणकारक व सौम्य ब्रह्मघोष यांचाहि लाभ होईल. "

राजा, अष्टावक्राचें हें म्हणणें श्वेतकेतूलाहि मान्य झालें व ते दोघे मातुल-भागिनेय जनकाचा समृद्ध यज्ञ पहावयास निघाले. जनकाच्या नगरींत येऊन पोंचल्यावर यदृच्छेनें समोरून येणाऱ्या राजाचे भृत्य त्याला मार्ग सोडून दूर व्हावयास सांगत असतां तो अष्टावक्र—ब्राह्मण-बालक त्या राजास असें बोलला. ३. ७. १३२.

---

## अध्याय १३३ वा.

[१ मार्गांत अष्टावक्राचा राजाशीं संवाद. २ अष्टावक्र व द्वारपाल यांचा संवाद. ३ अष्टावक्र व जनकराजा यांचीं प्रश्नोत्तरें. ]

(१) अष्टावक्र—हे राजा, अंध, बधिर, स्त्रिया व भारवाहक यांना मार्ग द्यावा, ब्राह्मणावांचून इतर सर्वांनीं राजालाहि प्रथम मार्ग द्यावा. परंतु ब्राह्मण समीप आला असतां राजानेंच विप्राला मार्ग दिला पाहिजे.

राजा—विप्रा, हा मीं तुला मार्ग दिला आहे. तुझी इच्छा असेल तेथून जा. अग्नि केव्हांहि सामर्थ्यहीन नसतो. इंद्रहि ब्राह्मणांना नित्य वंदन करितो.

अष्टावक्र—हे जनका, आम्ही दोघे, तुझा यज्ञ पहाण्यासाठीं आलों आहों. हे नरेंद्रा, आम्हांला या यज्ञाचें अतिशय कौतुक वाटत आहे. आम्ही अतिथि असून तुझ्या यज्ञमंडपांत प्रवेश करण्यास उत्सुक झालों आहों. यास्तव हे नृपते, तुझ्या द्वारपालाला आम्हांला आंत घेण्याची आज्ञा कर. आम्ही यज्ञ पहाण्यासाठीं व तुझ्या दर्शनासाठीं या यज्ञमंडपांत येण्याची इच्छा करीत आहों. आम्ही क्रोधरूपी व्याधीनें पीडिलों आहों. परंतु हा द्वारपाल आम्हांला आंत येण्यास प्रतिबंध करीत आहे.

(२) द्वारपाल—हे विप्रहो, मी तुम्हांला नमस्कार करितों. आम्ही राजाज्ञेंत वागणारे सेवक आहों. राजाज्ञा काय आहे, तीहि मी तुम्हांला सांगतों, ऐका. "जन्मतः ब्राह्मण असलेल्याहि बालांना यज्ञमंडपांत सोडूं नका. तर जे वृद्ध व विद्वान् ब्राह्मण असतील त्यांनाच आंत सोडा," अशी आम्हांला राजाची आज्ञा आहे.

अष्टावक्र—हे द्वारपाला, जर या यज्ञमंडपांत वृद्धांना प्रवेश करितां येत असेल तर आम्हीहि वृद्ध, व्रताचरणी, वेदप्रभावानें युक्त, श्रवणेच्छु, जितेंद्रिय व ज्ञाननिष्ठ आहों. यास्तव केवल 'बाल' एवढ्याच कारणानें तूं आमची उपेक्षा करूं नको. कारण अग्नि बाल जरी असला तरी तो स्पर्श करणाराला दग्ध करितोच.

द्वारपाल—हे ब्राह्मणपुत्रा, मुनिसेवित एका ब्रह्माचेंच प्रतिपादन करणारी, मंत्रार्थवादरूप, कर्मकांडादिकांनीं शोभणारी जी वेदवाणी तिचेंच ज्ञान संपादन कर, व्यर्थ आत्मश्लाघा कशाला करितोस ! अरे बाबा, ज्ञानी पुरुष फार दुर्लभ आहे.

अष्टावक्र—हे द्वाररक्षका, सांवरीच्या फळांतील ग्रंथि कितीहि वृद्धि पावली तरी केवल तूलमयत्वामुळें—कापसानेंच भरलेली असल्यामुळें ती जशी निःसार असते, त्याचप्रमाणें मनुष्याची केवल देहवृद्धि झाल्यानेंच तो वृद्ध आहे, असें मानितां येत नाहीं. कोणीहि मनुष्य अल्पवयी जरी असला व त्याचें शरीर कृश असलें, तरी तो जर ज्ञानसमृद्ध असेल तर तो वृद्धच होय. पण जो ज्ञानरहित असतो, त्याचें वृद्धत्व केव्हांच संभवत नाहीं.

द्वारपाल—हे बालका, शिशु नेहमीं वृद्धापासून ज्ञान संपादन करितात आणि कालानें ते वृद्ध होतात. अल्पकालांत ज्ञान प्राप्त होणें शक्य नाहीं. असें असतां व्यर्थ वृद्धासारखें भाषण कशाला करितोस!

अष्टावक्र—केंस पिकून मस्तक पांढरें झालें म्हणजे कांहीं तो खरा वृद्ध होत नाहीं. देव ज्ञानसंपन्न बालासहि वृद्धच समजतात. वृद्धत्व वयावर, शुभ्र केसांवर, धनावर किंवा बांधवांवर अवलंबून आहे, हें म्हणणें ऋषि धर्म्य मानीत नाहींत. सांग वेदाध्यन करणाराच श्रेष्ठ होय.

हे द्वारपाला, मी राजसभेंत बसलेल्या बंदीला पहाण्याचा इच्छेनें येथें आलों आहें. यास्तव सुवर्णमाला धारण करणाऱ्या राजाला मी आल्याची वार्ता निवेदन कर. म्हणजे तूं आज आम्हांला विद्वानांच्या बरोबर वाद करीत असलेलें पाहशील आणि आमचा वाद-विवाद वाढला असतां आम्ही बंदीचा पराजय केलेलाहि तुझ्या दृष्टीं पडेल. त्या वेळीं वादांत पराभव होऊन सर्व लोक स्तब्ध बसले असतां आम्ही उच्च आहोंत कीं हीन आहोंत, बाल आहों कीं वृद्ध आहों, याचा विद्येंत परिपूर्ण असलेले ब्राह्मण, राजा व मुख्य पुरोहित यांसह निर्णय करोत.

---

१ न ज्ञायते कायवृद्धया विवृद्धिर्यथाष्ठीला शाल्मलेः संप्रवृद्धा ।
ह्रस्वोल्पकायः फलितो विवृद्धो यश्चाफलस्तस्य न वृद्धभावः ॥

२ वृद्धेभ्य एवेह मतिं स्म बाला गृह्णन्ति कालेन भवन्ति वृद्धाः ।
न हि ज्ञानमल्पकालेन शक्यं कस्माद्बालः स्थविर इव प्रभाषसे ॥

३ न तेन स्थविरो भवति येनास्य पलितं शिरः ।
बालोऽपि यः प्रजानाति तं देवाः स्थविरं विदुः ॥
न हायनैर्न पलितैर्न वित्तेन न बन्धुभिः ।
ऋषयश्चक्रिरे धर्मं योऽनूचानः स नो महान् ॥

द्वारपाल—हे ब्राह्मणा, ज्या यज्ञांत सुविद्य विद्वानांनाच जातां येतें, तेथें तुझ्यासारख्या दहा वर्षांच्या अज्ञ बालकाचा प्रवेश कसा होणार! तथापि मी तुला आंत सोडण्याचा प्रयत्न करून पहातों. तूंहि राजाच्या समीप आपलें ज्ञान प्रकट कर.

(३) युधिष्ठिरा, असें बोलून त्या द्वारपालानें यज्ञमंडपाहून अन्यस्थलीं त्यास राजदर्शन करविलें. तेव्हां राजाकडे पाहून अष्टावक्र म्हणाला—" हे श्रेष्ठ जनकराजा, तूं सम्राट् असून सर्वप्रकारें समृद्ध आहेस. प्राचीन 'ययाति'-नृपालाप्रमाणें तूं यज्ञ करणारा आहेस. हे सार्वभौम भूपाला, तुझ्या राजसभेंत असलेला बंदी वाद-विवादांत पराभूत झालेल्या सर्व वृद्धांना ते आपला पुनः पराजय करतील, या भीतीनें तुझ्या विश्वासु सेवकांकडून जलांत बुडवीत असतो, असें आम्हीं ऐकिलें आहे. ही वार्ता ऐकूनच मी ब्राह्मणांच्या पुढें अद्वैत ब्रह्माचें प्रतिपादन करण्यासाठीं आलों आहें. हे राजन्, तो बंदी कोठें आहे, तें मला सांग. म्हणजे सूर्य जसा नक्षत्रांना लोपवितो तसा मी आज त्या बंदीला भेटून त्याचा नाश करितों.

राजा—हे बालका, त्या बंदीचें वाक्यबल न जाणतां तूं त्याला जिंकण्याची इच्छा करीत आहेस. पण ज्यांनीं त्याचें सामर्थ्य अनुभविलें आहे, त्यांनींच असें बोलणें उचित होय. वेदवेत्त्या ब्राह्मणांनीं त्याचा प्रभाव जाणला आहे. हे वत्सा, तूं या बंदीचें वादकौशल्य न जाणतांच त्याला जिंकण्याची इच्छा करीत आहेस. पण बाळा, या पूर्वीं अनेक विद्वान् ब्राह्मण त्याच्याशीं वाद करावयास येऊन सूर्यापुढील तारकांप्रमाणें निस्तेज झालेले मीं पाहिले आहेत. तुजप्रमाणेंच आजपर्यंत मोठ-मोठे विद्वान् बंदीला जिंकण्यासाठीं येथें आले. पण त्याच्या समोर जातांच ते दिपून गेले. आपल्या विज्ञानाचा अतिशय गर्व वहाणारेहि ब्राह्मण पराभव पावून सभेंतून निघून गेले. कारण हे वत्सा, त्या बंदीच्या वचनाला प्रतिवचन देऊन त्याचें उल्लंघन करण्यास कोण समर्थ आहे!

अष्टावक्र—हे राजा, त्या बंदीनें अद्यापि माझ्यासारख्याशीं विवाद केला नाहीं. त्यामुळें तो निर्भय होऊन सिंहासारखी गर्जना करीत आहे व तूंहि मला त्याचें मोठें कौतुक सांगत आहेस. पण माझ्याशीं गांठ पडून त्याचा एकदा पराभव झाला म्हणजे तो एखाद्या निजलेल्या पुरुषाप्रमाणें जड होईल. हे राजा, मार्गामध्यें कणा तुटल्यामुळें शकट जसा निश्चल होऊन पडतो, तशीच त्याची अवस्था होईल!

**हे पांडवा, 'मी अद्वैत ब्रह्म सांगावयास आलों आहें' अशी प्रतिज्ञा करणाऱ्या अष्टावक्रास जनकराजा म्हणाला—तीस पदार्थांचा एक, असे ज्याचे बारा अंश आहेत, ज्याला चोवीस पर्वें आहेत व ज्याला तीनशें साठ आरा आहेत, अशा चक्राला जो जाणतो तोच श्रेष्ठ विद्वान् होय.**

**अष्टावक्र—हे राजा, ज्याला पौर्णिमा व अमावास्या एतद्रूप चोवीस पर्वें आहेत, ऋतुरूपी सहा नाभि आहेत, बारा मास किंवा मेषादि बारा राशी, याच धांवा आहेत व त्या प्रत्येक धांवेमध्यें तीस अहोरात्र याच आरा बसविल्या आहेत, असें हें सतत गमन करणारें कालचक्र तुझें रक्षण करो.**

---

१ ज्याचीं दोन्ही टोंकें तीक्ष्ण आहेत, अशा सहा शलाका एका शंकूमध्यें मधोमध टोंचून बसविल्या असतां त्यांचीं दोन्ही बाजूंचीं मिळून बारा टोंकें होतात. त्यामुळें ज्याला बारा आरा आहेत व सहा नाभि आहेत असें एक चक्र बनतें. बारा राशी याच आरा व राशिद्वयात्मक एक ऋतु, असे सहा ऋतु याच नाभि, एकेका राशीमध्यें तीस तीस अंश, असें हें नक्षत्रचक्र साठ घटकांनीं परिवर्तन पावतें. याच्या तीनशें साठ परिवर्तनांनीं एक सावर्ण संवत्सर होतो. हें चक्र कुलालचक्राप्रमाणें प्रदक्षिण मार्गानें सतत जरी फिरत असलें, तरी वेगानें भ्रमण करणाऱ्या कुलालचक्रावर पिपीलिकेची पंक्ति उलट दिशेनें जशी फिरत असते, त्याप्रमाणें प्रदक्षिण मार्गानें फिरणाऱ्या या नक्षत्रचक्रावर सूर्यादि ग्रह अप्रदक्षिण मार्गानें भ्रमण करितात. त्यांतील चंद्र सत्तावीस अहोरात्रांनीं नक्षत्रांचा भोग घेतो व सूर्य तीनशें सव्वा पासष्ट दिवसांनीं त्याच नक्षत्रगणाचा भोग घेतो. यालाच सौर संवत्सर म्हणतात.

याच चक्रामध्यें आपापल्या मार्गानें गमन करणारे सूर्य-चंद्र जेव्हां एकमेकांपासून फार दूर अंतरावर असतात, तेव्हां पौर्णमास व जेव्हां अगदीं समीप येतात तेव्हां दर्श, अशीं एका महिन्यांत दोन पर्वें होतात. चोवीस पर्वें म्हणजेच तीनशें चौपन्न दिवस होतात. यालाच चांद्र संवत्सर म्हणतात.

या तीन्ही संवत्सरांचा तीनप्रकारच्या कर्मांमध्यें विनियोग केलेला असल्यामुळें जनक अष्टावक्राला या त्रिविध कालचक्राचें प्रयोजन विचारीत आहे.

२ केवल कालाचें ज्ञान पुरुषार्थोपयोगी नाहीं. म्हणून त्या त्या कालीं विहित असलेला धर्म तुझें रक्षण करो. तिलकादि व्रतादिकांमध्यें चांद्र संवत्सर, सुजन्मादि व्रतामध्यें सौर संवत्सर आणि गोसत्रादिकांमध्यें सावन संवत्सर विनियुक्त आहे.

जनकराजा—हे विप्रा, श्येनाप्रमाणें वेगानें धांवणाऱ्या व रथाला जोडलेल्या दोन वडवां-(घोड्यां)-प्रमाणें एकाच वेळीं संचार करणाऱ्या ज्या कोणी दोघी आहेत, त्या दोघी देवी, या देवांतील कोणत्या देवाचीं अपत्यें आहेत व त्या स्वतः कोणाला जन्म देतात!

अष्टावक्र—हे राजा, त्यांचें नांवहि अमंगल आहे. कारण देवतांतील विद्युत् व अशनि आणि शरीरांतील दुःख व मृत्यु याच त्या दोन वडवा (घोड्या) होत. विद्युत् व अशनि या आकाशरूपी रथाला नित्य जोडलेल्या असून दुःख व मृत्यु देहाशीं नित्य संबद्ध आहेत. याच दोन वडवा श्येनाप्रमाणें नित्य धांवत असतात. त्या अत्यंत अमंगल असल्यामुळें तुझ्या किंवा तुझ्या शत्रूच्याहि गृहामध्यें प्रवृत्त न होवोत.

वायु ज्याचा सारथि आहे असा मेघ, आकाशापासून वृष्टीसाठीं उदय पावतो व तोच विद्युत् व अशनि यांना आपल्या उदरांत धारण करितो. तसेंच मन सषुप्तिसञ्ज्ञक कारणापासून कर्मफलभोगासाठीं उदय पावतें व तें दुःख व मृत्यु यांना आपल्या उदरांत धारण करितें. राजा, हें तुझ्या पहिल्या प्रश्नाचें उत्तर झालें.

आतां विद्युत् व अशनि या वडवा वातसारथि जो विद्युदग्नि त्याला जन्म देतात आणि दुःख व मृत्यु ह्या वडवा मनाला प्रसवतात. ज्याप्रमाणें मेघ धूम व अग्निज्योति यांच्या संयोगरूप असल्यामुळें तो स्वतः अग्निरूप आहे व तो विद्युदादिद्वारा अग्नीलाच प्रसवतो, त्याचप्रमाणें मनापासून उत्पन्न झालेलें दुःख व मृत्यु आपल्या वासनारूपानें मनाचें कारण होतात. अर्थात् बीजांकुरन्यायानें मन व दुःखादि यांना परस्पर कार्य-कारणभाव आहे. यास्तव दुःखाचा नाश होण्यासाठीं मनोनिग्रहाचा अभ्यास करावा.

जनक—हे बटो, झोपेमध्येंहि कोणाचे नेत्र मिटत नाहींत, जन्मानंतरहि कोण हालचाल करीत नाहीं, हृदय कोणाला नसतें व वेगानें वृद्धि कोण पावतें?

अष्टावक्र—मूढ बंदीलाच सर्वज्ञ मानणाऱ्या हे नराधिपा, निद्रित मत्स्याचे नेत्र मिटत नाहींत. उत्पन्न झालेलें अंडें यत्किंचित्हि हाल-चाल करीत नाहीं. पाषाणाला हृदय नसतें व नदी वेगानें वहाते. राजा, तुझ्या प्रश्नाचा हा स्थूल अर्थ झाला. बंदीनें तुला एवढेंच उत्तर दिलें असतें! पण मी तुला याचें श्रुतिसिद्ध तात्त्विक उत्तरहि देतों, तें ऐक.

ज्याप्रमाणें एखादा महामत्स्य महानदीच्या दोन्ही तीरांवरून यथेष्ट संचार करितो, त्याप्रमाणें मत्स्यस्थानीं असलेला हा चिद्रूप पुरुष जाग्रत् व स्वप्न आणि इहलोक व परलोक यांतील संचारानें श्रांत होऊन सुषुप्ति व प्रलय या दोन अवस्थांमध्यें शरीरेंद्रियसंघाताच्या प्राणनादि सर्व शक्तींचा जरी लय झाला, तरी दृक्-शक्तिस्वभावानें अवस्थित होतो. त्याच्या ज्ञानशक्तीचा त्या अवस्थांमध्येंहि लोप होत नाहीं. कार्य-करणसंघात जरी लीन झाला तरी आपल्या अविनाशी स्वरूपानें लीन न होणारा, असा हा आत्मा आहे. हें तुझ्या पहिल्या प्रश्नाचें उत्तर झालें.

उत्पन्न झालेलेंहि हें भूत-भौतिकात्मक ब्रह्मांड स्वतः जड असल्यामुळें यत्किंचित्हि हाल-चाल करूं शकत नाहीं. तर हा चिदात्माच त्याच्या सर्व हालचालीचें निमित्त आहे. हें दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर.

ज्याला शरीर नाहीं त्याला शोकायतन हृदयहि नाहीं. निरुक्तामध्यें 'श्मन्' हा शब्द शरीर या अर्थी पठित आहे. 'अश्मन्' म्ह० अशरीर 'शरीररहित झालेल्या आत्म्याला सुखदुःखांचा स्पर्श होत नाहीं.' 'देहाभिमानरहित पुरुष हृदयाच्या सर्व शोकांचें उल्लंघन करितो' अशा अर्थाच्या दोन श्रुति आहेत. त्यांवरून देहादिकांवर आसक्ति न ठेवणारा योगी मनोरहित जीवन्मुक्त होतो. राजा, याप्रमाणें तुझ्या तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर झालें.

समाधींतून उठलेल्या योग्याची चित्तनदी तत्काल सर्व प्रपंचरूपानें मोठ्या वेगानें वहाते. स्वाप्न प्रपंचाप्रमाणें हा व्यावहारिक प्रपंचहि, योग्याच्या दृष्टीनें, तो जेव्हां बहिर्मुख होतो, तेव्हांच उत्पन्न होणारा आहे. हें चवथ्या प्रश्नाचें उत्तर झालें.

हे जनाधिपा, याप्रमाणें मीं दृग्रूप आत्म्याचा अलोप, सर्व दृश्याचें जाड्य, देहावर आसक्ति न ठेवणाराची मुक्ति व संसाराचें मनोमात्रत्व या उत्तरानें प्रकट केलें आहे.

राजा—हे विद्वन्, तूं सामान्य मनुष्य नाहींस तुझी. बुद्धि देवांसारखी अलौकिक आहे. तूं बाल नसून वृद्ध आहेस. संभाषणांत तुझ्या बरोबरीचा कोणी नाहीं. मी तुला यज्ञमंडपांत प्रवेश करण्याची अनुज्ञा देतों. हा पहा बंदी येथें बसला आहे. ३. ७. १३३.

## अध्याय १३४ वा.

[ १ अष्टावक्र व बंदी यांचा वाद. २ बंदीचा पराभव. ३ पूर्वी जलांत बुडविलेल्या ब्राह्मणांचा प्रादुर्भाव. ४ 'कहोड'-पित्याच्या प्रसादानें अष्टावक्राच्या शरीरदोषाचें निवारण. ]

( १ ) अष्टावक्र—हे राजा, उग्र सैन्यानें युक्त असलेल्या या अप्रतिम राजसमूहांत मी वाद्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या या बंदीला तृणाइतकाहि मान देत नाहीं. तर अगाध जलांतील हंसाला जसें पाशबद्ध करितात, त्याचप्रमाणें मी आज या बंदीला आपल्या वाग्जालांत बद्ध करितों, पहा.

हे बंदिन्, 'पराभूत झालेल्या ब्राह्मणाला जलामध्यें बुडविणें' हा पण ज्यानें मान्य केला आहे, असा तूं आज मजपुढें एक अक्षरहि बोलूं शकणार नाहींस. तूं आपल्याला मोठा अतिवादी समजत आहेस. पण प्रलयकालच्या प्रदीप्त अग्नीमुळें एकाकार झालेला समुद्र जसा शुष्क होतो, तसा तूं आज माझ्या तेजानें शुष्क होऊन जाशील. हे मूढा, तूं आतां माझ्याशीं वाद करण्यास सज्ज हो.

पण हे दुर्बुद्धे, तूं निजलेल्या व्याघ्राला जागें करूं नको. किंवा जिभल्या चाटीत असलेल्या विषारी सर्पाला डंवचूं नको. त्याच्या मस्तकावर लत्ताप्रहार केल्यास तो दंश केल्यावांचून रहाणार नाहीं, हें लक्षांत ठेव. हे वादिन्, वस्तुतः अतिशय दुर्बल असलेला जो पुरुष गर्वानें 'मी सुदृढ शरीरानें युक्त आहें' असें समजून पर्वतावर नखांचा प्रहार करितो त्याचा हात नखांसह विदीर्ण होतो. पण पर्वताला यत्किंचित्हि व्यथा होत नाहीं.

मैनाकपर्वताहून इतर सर्व पर्वत, किंवा धुरंधर वृषभाहून इतर सर्व गोवत्स जसे निकृष्ट, तसे सर्व राजे या मैथिल-नृपालाहून निकृष्ट आहेत. सर्व देवांमध्यें महेंद्र व सर्व नद्यांमध्यें गंगा जशी श्रेष्ठ, त्याप्रमाणें हे जनका, तूं सर्व भूपालांमध्यें श्रेष्ठ आहेस. यास्तव तूं बंदीला माझ्यासमोर घेऊन ये व त्याला माझ्याशीं वाद करूं दे.

लोमश—हे कौंतेया, त्या राजसभेंत अशी गर्जना करणारा व क्रुद्ध झालेला तो अष्टावक्र बंदीस म्हणाला—"हे वादिन्, तूं माझ्या प्रश्नाचें उत्तर दे व मी तुझ्या प्रश्नाचें उत्तर देतों. याप्रमाणें तुझा व माझा वाद चालूं दे.

हे राजन्, अष्टावक्राचें हें भाषण ऐकून बंदी बौद्धपक्षाचें उत्थापन करून ब्रह्माद्वैताची प्रतिज्ञा करणाऱ्या अष्टावक्राला म्हणाला—"ज्याप्रमाणें एकच अग्नि किंवा सूर्य दुसऱ्या कोणाकडूनहि प्रकाशित न होतां इतरांस प्रकाशित करणारा आहे, किंवा शत्रूंचा नाश करणारा देवराज इंद्रच जसा एक वीर आहे, किंवा पितरांचा ईश्वर जसा एक यमच आहे, त्याप्रमाणें स्वयंप्रकाश बुद्धि ( क्षणिक विज्ञान ) इतर कोणाकडून प्रकाशित न होतां इतर सर्वांस प्रकाशित करणारी आहे. ती सर्व इंद्रियांचा राजा आहे. तीच 'अहं' व 'इदं' या आकारानें प्रकाश पावणारी महावीर आहे. इतर वाद्यांनीं मानलेल्या सर्व तत्त्वांचा पराभव करणारी आहे. इंद्रियांचें नियमन करणारी आहे. विषयसमर्पण करणाऱ्या इंद्रियांचा ईश्वर आहे. अर्थात् प्रधानभूत कर्ता-भोक्ता एक बुद्धीच आहे. स्वयंप्रकाश बुद्धितत्त्वाहून अन्य तत्त्व नाहीं. कारण स्वप्नामध्यें क्रिया-कारक-फलादि सर्व वस्तु केवल बुद्धिमात्र आहेत, असा अनुभव येतो.

यास्तव बुद्धीच देवेंद्र व अग्नि यांप्रमाणें आहे. तीच अहं व इदं अशा रूपानें विविध आकारांनीं व्यक्त होते. आपल्याला व इतरांना तीच सूर्याग्नींप्रमाणें प्रकाशित करिते. तीच श्रोत्रादि इंद्रियांना प्रेरणा करिते. यास्तव स्वप्नांतील पदार्थांप्रमाणें जगांतील हें सर्व बुद्धिमय आहे."

याप्रमाणें बंदीनें तर्कदृष्ट्या बौद्धपक्ष स्वीकारला असतां अष्टावक्रानें 'द्वा सुपर्णा॰' या मंत्राच्या आधारानें त्यास म्हटलें—"हे बंदिन्, इंद्र व अग्नि हे दोघे मित्र जसे सहसंचार करितात, नारद व पर्वत हे दोघे देवर्षि, दोन अश्विनिकुमार, रथाचीं दोन चाकें आणि पति-पत्नी यांनाहि विधात्यानें सहसंचार करण्यासाठींच जसें निर्माण केलें आहे त्याप्रमाणें बुद्धि व चैतन्य हीं दोघें सहचर आहेत.

हे वादिन्, 'द्वा सुपर्णा॰' या मंत्राचें व्याख्यान पैंगिरहस्यांत केलें आहे. त्यांत 'मधुर कर्मफल भोगणारें सत्त्व—बुद्धि व कर्मफल न भोगतां केवल पहाणारें चैतन्य आहे,' असें म्हटलें आहे. त्या दोघांना 'सखायौ'-परस्परांचे मित्र असें म्हटलें असल्यामुळें इंद्र व अग्नि इत्यादिकांप्रमाणें तीं दोघें सहसंचारी करितात. पण दृश्य असलेल्या बुद्धीला द्रष्टृत्व संभवत नाहीं. 'ज्ञातृत्व' हा जड बुद्धीचा धर्म कसा असूं शकेल! प्रकाशाचा विषय होणाऱ्या घटादि पदार्थांना प्रकाशत्व नसतें, हें प्रसिद्ध आहे.

यास्तव हे बंदिन्, जडबुद्धीला प्रकाशत्व केव्हांहि संभवत नाहीं. स्वप्नामध्येंहि बाधित झालेल्या विषयांहून अबाधित स्वप्नद्रष्टा भिन्न आहे. तो स्वतंत्र आहे व बुद्धि पराधीन आहे. त्या दोघांच्या आरोपित संयोगावांचून कोणतेंहि कार्य संभवत नाहीं. तस्मात् हे वादिन्, तुझा बौद्धपक्ष खंडित होतो."

अष्टावक्रानें आपल्या बौद्धपक्षाचें खंडन केलें आहे असें पाहून 'चेतन ज्ञाता कर्माधीन आहे' असें मीमांसकांचें मत स्वीकारून बंदी म्हणाला—"हे अष्टावक्रा, ज्ञाता जीव कर्माधीन आहे. तो पुण्यकर्मांच्या योगानें देव-स्थावर-मानुषरूप जन्मत्रयास व पापानें नारक-स्थावर-तिर्यग्रूप जन्मत्रयास प्राप्त होतो. कारण स्वर्गांतून किंवा नरकांतून मुक्त झालेला जीव प्रथम ओषधि-वनस्पतिरूप होतो व अन्नद्वारा पितृ-मातृशरीरांतून मनुष्य, पशु व तिर्यग्योनि यांमध्यें त्याचा जन्म होतो, असें पंचाग्निविद्येंत सांगितलें आहे. (छां. भा. अ.५ खं. ८-९ पृ. ३४९-५१.)

तीन वेद मुख्यतः वाजपेयोपलक्षित, आश्रम-त्रयोचित सर्व कर्मजात सांगतात. अर्थात् वेदांना कर्मपरत्व आहे. यज्ञ करणारे त्रैवर्णिक प्रातःसवनादि तीन सवनें आचरितात व यथाकालीं केलेल्या कर्माचें फल कालानुरोधानें अनुभवितात.

स्वर्ग, नरक व पृथ्वी, अशीं हीं तीनच फलोपभोगाचीं स्थानें आहेत. जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या तीनच सुखमार्गप्रकाशक ज्योति वेदांत सांगितल्या आहेत. अर्थात् वेदोक्त कर्म व त्याचें फल यांहून अन्य तत्त्व कांहीं नाहीं."

बंदीनें स्वीकारिलेला हा मीमांसकांचा पक्ष ऐकून अष्टावक्र म्हणाला—हे कर्मजडा, ब्रह्मवेत्त्यांना ज्ञानानें प्राप्त होणारें मोक्षाख्य चवथें स्थान वेदानें सांगितलें आहे. 'ज्या दिवशीं विरक्ति येईल, त्या क्षणींच संन्यास करावा' असा जाबाल श्रुतीवरून सिद्ध होणारा व ब्रह्मचर्यादि तीन आश्रमांहून विलक्षण असलेला हा चवथा आश्रम आहे. (सु. उ. पृ. ९७८.)

वर्ण तीनच नसून चार आहेत. शूद्र हा एकजाति चतुर्थ वर्ण असून त्याचा ज्ञानयज्ञामध्यें अधिकार आहे. विराट्, सूत्रात्मा, अंतर्यामी व तुर्य अशा चार अवस्था वेदांत सांगितल्या आहेत. त्या विश्व, तैजस व प्राज्ञ या सर्व प्राणिप्रसिद्ध तीन अवस्थांहून भिन्न आहेत. अकार, उकार, मकार व अर्धमात्रा हे त्यांचे वाचक वर्ण मांडूक्योपनिषदांत प्रसिद्ध आहेत. (मां. भा. मंत्र ८ पृ. ७८)

'अर्धमात्रेचें वाच्य जें तुर्य तें अप्रसिद्ध आहे' असें जर तूं म्हणशील तर तेंहि बरोबर नाहीं. कारण परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी अशी चतुष्पदा वाक् सर्वदा बोलली जाते. त्यावरून 'तुर्य'-पद सिद्ध होतें.

अष्टावक्राचें हें भाषण ऐकून त्यांतील 'तुरीय'-पदाला न मानणारा बंदी पुनः म्हणाला—“ गार्हपत्य, दक्षिण, आहवनीय, सभ्य व आवसथ्य असे पांच अग्नि, आठ अक्षरांचा एक अशा पांच पादांनीं युक्त असलेला पंक्ति-छंद, अग्निहोत्र, दर्शपूर्णमास, चातुर्मास्य, पशु व सोम हे पांच यज्ञ जसे वेदांत सांगितले आहेत, त्याचप्रमाणें शब्दादि पांच विषयांचें ग्रहण करणारीं पांचच इंद्रियें सांगितलीं आहेत, सहावा विषय किंवा सहावें इंद्रिय सांगितलेलें नाहीं.

त्याचप्रमाणें वेदांत शरीराकारानें परिणत झालेल्या जलप्रधान पंचभूतांमध्यें व्याप्त असलेली चिति उपलब्ध होते. प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा व स्मृति या पांच वृत्तींशीं तादात्म्य पावत असल्यामुळें त्या चेतनेला पंचचूडा असें म्हटलें आहे. वृत्तिनिरोधरूप समाधीचाहि निद्रेंतच अंतर्भाव होतो. व्यवहारांतहि पांच विषयप्रवाहाचा समूह प्रसिद्ध असून त्यालाच 'पंचनद' असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें सर्व शरीरांत व्याप्त असलेल्या चितिशक्तीलाच कर्तृत्व-भोक्तृत्व आहे. अर्थात् तुर्यपद हेंच तत्त्व नव्हे.”

बंदीचें हें वचन ऐकून अष्टावक्र म्हणाला—अरे वेदनास्तिका, कर्तृत्वादि धर्मांनीं युक्त असलेलें मन हें सहावें इंद्रिय आहे. कारण सुषुप्तींत श्रोत्रादि इतर इंद्रियांप्रमाणें त्याचाहि लय होत असलेला अनुभवास येतो. त्याचप्रमाणें कर्तृत्वादि धर्म नियमानें मनाच्याच साहचर्यानें रहातात, हें प्रसिद्ध आहे. पण त्या चित्ताच्या अभावाचा साक्षी आत्मा त्याहून निराळा आहे, अग्न्याधाना-मध्यें दक्षणा सहावी आहे, सहा ऋतूंचें एक कालचक्र होतें, कृत्तिका सहा आहेत, वेदामध्यें सहा साद्यस्क यज्ञ सांगितले आहेत, त्याचप्रमाणें चित्तासह इंद्रियेंहि सहा आहेत.

त्यावर बंदी पुनः तर्कमताचा आश्रय करून म्हणाला—हे अष्टावक्र अस-लेल्या ब्राह्मणा, आत्मगुणभूत बुद्धि, मन व श्रोत्रादि पांच इंद्रियें, यांनीं सम-र्पण केलेल्या बोधव्य, मंतव्य, श्रोतव्य इत्यादि सात विषयांतील एकेका विषयांत आसक्त होणारा हा पुरुषपशु सातप्रकारचा होतो. तेच सात ग्राम्य-पशु होत.

तसेंच, त्याच पारलौकिक सात विषयांमध्यें आसक्त होणारा हा पुरुषहि सात प्रकारचा होतो व तेच सात वन्य पशु आहेत. हे सात विषय पुरुषाला आपल्या स्वरूपाचें समर्पण केल्यामुळें उत्पन्न झालेल्या सुखलेशानें परमात्म्याला झांकून टाकितात. म्हणूनच ते सात छंद होत. ते प्राणरूप सात ऋषि एका कर्त्या आत्म्याला बोद्धृत्यादि सात विषय प्राप्त करून देतात. त्यामुळें सात प्रकारचीं सुखें उद्भवतात.

ज्याप्रमाणें सात तारांनीं वाजविलेली एक विणा शब्द उत्पन्न करिते, त्याप्रमाणें या सात इंद्रियांच्या द्वारा एक आत्मा सुखाचा अनुभव घेतो. सुषुप्तींत इंद्रियांच्या अभावीं आत्मा साधनहीन झाल्यामुळें जड होऊन रहातो. ज्यानें आपलीं हत्यारें टाकिलीं आहेत अशा सुताराप्रमाणें, किंवा न वाजविलेल्या विणेप्रमाणें तो निष्क्रिय होतो. पण त्यामुळें त्याच्या स्वाभाविक कर्तृत्वाची निवृत्ति होत नाहीं.

अष्टावक्र—अरे मूढा, शुद्ध आत्मा कर्तृत्वादि धर्मवान् नाहीं, तर अहंकार कर्तृत्वादि धर्मवान् आहे. अर्थात् श्रोत्रादि पांच ज्ञानेंद्रियें, मन, बुद्धि, अहंकार व आत्मा असे आठ पदार्थ आहेत. म्हणूनच बृहदारण्यकांत आठ ग्रह म्ह० इंद्रियें व आठ अतिग्रह म्हणजे विषय, असें आठ प्रकारचें ग्रहातिग्रहरूप बंधन सांगून आत्म्याला त्याहून पृथक् केलें आहे. ( बृ. भा. अ. ३-२-४४ )

आठ पोतीं हें धान्याचें एक माप आहे. तें शणसूत्रानें—सणाच्या दोरीनें बनविलेलें असतें. तें धान्य भरून ठेवण्यास योग्य असतें. त्याप्रमाणेंच इंद्रियप्रवेशास योग्य असे आठ विषय आहेत. ते संक्षेपतः आठ जरी असले, तरी उपाधीमुळें अनंत प्रमाण धारण करितात. ज्याला विषयप्रदेशीं जाण्यासाठीं पूर्वोक्त आठ साधनें आहेत, असा हा परमानंदरूप शरभसंज्ञक परमात्मा ज्ञात झाला असतां दुःख देणाऱ्या द्वैतरूपी सिंहाचा नाश करितो.

ज्याच्यापासून ‘ शं ’—सुख प्राप्त होतें, तो शरभ म्हणजे परमात्माच होय. कारण ‘याच आनंदाच्या लेशावर सर्व भूतें उपजीविका करितात,’ अशी बृहदारण्यक श्रुति आहे. [ बृ. भा. २ अ. ४ ब्रा. ३ पृ. २१३. ] तुझ्या म्हणण्याप्रमाणें सुषुप्तींत आत्मा जर जड असता तर झोपेंतून उठलेल्या पुरुषाला ‘ मी सुखानें निजलों होतों ’ असें स्मरण झालें नसतें. ‘ केवल दुःखाभावाचेंच तें स्मरण आहे, ’ असें म्हणतां येत नाहीं. कारण त्या दुःखाभावाचा प्रकाशक साक्षी

आत्मा असतो, म्हणूनच उठल्यावर त्याचें स्मरण होतें. त्यामुळें 'सुषुप्तीमध्यें आत्मा जड असतो' हें म्हणणें अयुक्त आहे. यासाठींच वेदामध्यें आठ वासना त्या त्या इंद्रियांच्या अधिष्ठातृ-देवतांमध्यें म्ह० लिंगात्म्यांत रहातात, असें सांगितलें आहे. त्या आत्म्यामध्यें रहातात असें कोठेंहि सांगितलेलें नाहीं.

या नरपशूला मोहित करणारें अज्ञान हेंच यज्ञांतील यूपासारखें त्याचें बंधनस्थान आहे व तेंच ग्रहातिग्रहरूप विषयेंद्रियसंयमामध्यें रहातें. सर्व यज्ञामध्यें अष्टकोनी यूप जसा विहित आहे, त्याचप्रमाणें आठ इंद्रियें व आठ विषय यांनीं युक्त असलेला हा अज्ञानरूप यूप पुरुषपशूचें बंधनस्थान आहे.

त्यावर बंदी 'ज्ञात परमात्म्याचें म्ह० शरभाचें द्वैतघातित्व अयुक्त आहे. कारण आत्मज्ञानानें द्वैतरूपी सिंहाचा जर घात केला असता तर सर्व जीवांच्या संसाराचा एकाच वेळीं उच्छेद झाला असता' अशा आशयानें आक्षेप घेतो.

बंदी—'उशंतस्त्वा०' ही एकच ऋचा तीन वेळ म्हणून तीन तीन समिधांचें अभिमंत्रण केलें असतां अग्नीच्या प्रज्वलनासाठीं जशा नऊ सामधेनी ऋचा होतात, त्याप्रमाणें एकाच प्रकृतीचे तीन गुण गुण-प्रधान भावानें त्रिविध होऊन आपल्या नऊ अंशांनीं विविध सृष्टि करितात.

किंवा ज्याप्रमाणें नऊ अक्षरांचा एक अशा चार पादांनीं 'बृहती'-संज्ञक छंद होतो, अथवा ज्याप्रमाणें नऊ अंक भिन्न क्रमानें स्थापिले असतां ते वाटेल त्या संख्येचे वाचक होतात, तसेच पूर्वोक्त प्रकारें नऊ अंशांनीं युक्त असलेले गुण विविध पदार्थाकार होतात. यास्तव गुणाधारभूत प्रधान नित्य आहे, असें मानणें अवश्य आहे. त्यामुळें द्वैत सत्यच आहे.

बंदीनें सांख्यप्रक्रियेच्या आधारानें केलेला हा आक्षेप ऐकून 'इंद्रो मायाभिः पुरुरूप ईयते' (बृ. अ. २. ५. १९.) इत्यादि श्रुतींच्या अनुसार ज्याला अनिर्वचनीय मायेचें साह्य आहे, अशा ब्रह्मामध्येंच द्वैताचें भान होत असल्यामुळें प्रकृतीला सत्य मानितां येत नाहीं, अशा आशयानें सांख्यपक्षाचा परिहार करीत अष्टावक्र म्हणाला—

"कौषीतकि व ऐतरेय या उपनिषदांमध्यें वागादि दहा प्रज्ञामात्रा अग्न्यादि हेतुमात्रांना उत्पन्न करितात, असें सांगितलें आहे. विषयस्वरूपांना प्रकट करणारीं वागादि दहाच इंद्रियें पुरुषाच्या 'देहाख्य'-नगरांत रहातात. 'पूर्ण परब्रह्मच आपल्या मायाशक्तीनें बहुरूप झालें आहे' असें वेद स्पष्ट वर्णन करितात.

ज्याप्रमाणें स्त्रिया आपल्या गर्भाशयांत गर्भाला दहा महिने धारण करितात व त्यांचा त्या गर्भाशीं अनित्य संबंध असतो, त्याप्रमाणें असंग चिदात्म्याचा अहंकाराशीं अनित्य संबंध होतो. दहा तत्त्वांचें आधान करणारे व दहा तत्त्वविद्याधिकारी तत्त्वद्रष्टे उपदेशक तत्त्वाचा असाच उपदेश करितात. हे बंदिन्, हें अशाप्रकारचें श्रुतिसिद्ध ब्रह्माद्वैत तत्त्वज्ञांच्या अनुभवानें सिद्ध आहे. ते जरी मूढांच्या द्वेषाला पात्र होत असले, तरी चित्तशुद्धीनें युक्त असलेल्या पुरुषांना सर्वथा श्रद्धेय आहे.

त्यावर बंदी म्हणाला—प्राण धारण करणाऱ्या जीव पशूंचे एकादश इंद्रियांनीं प्रकाशित होणारे शब्दादि अकराच विषय असुन त्यांतील प्रत्येक विषय जीवपशूला रागादिकांच्या द्वारा यज्ञांतील यूपाप्रमाणें बद्ध करणारा आहे. शब्दादिकांच्या ग्रहणानें उत्पन्न होणारे हर्ष व विषाद हे विकारहि अकराच आहेत. ते स्वर्गलोकांतील देवादिकांनाहि रडविणारे असल्यामुळें अकरा रुद्र होत.

बंदीचें हें वचन ऐकून दृष्टान्तद्वाराच दार्ष्टांतिकाचा निर्देश करणारा अष्टावक्र बंदीच्या सिद्धांताचा परिहार करीत त्यास म्हणाला—हे वादिन्, संवत्सर व जगती छंद हीं दोन्हीं बारा मास व बारा अक्षरांचा एकेक पाद यांहून पृथक् नाहींत. त्याचप्रमाणें मूढांनाहि शुद्ध चेतन आत्मा पृथक् नाहीं, असें वाटतें. पण 'आनंदापासूनच हीं सर्व भूतें उत्पन्न होतात' (तैत्ति.३. ६.) या श्रुतीवरून सर्व भूतांचें कारण आनंद, त्याहून पृथक् आहे. अहर्गणांचा 'द्वादशाह' याग ही जशी प्रकृति त्याप्रमाणें सर्व संघाताचें 'शुद्ध ब्रह्म' ही प्रकृति आहे.

'हें कशावरून' असं जर विचारशील तर बाबारे, हा परमार्थ चित्तशुद्धीनेंच अवगत होत असतो. शुष्क तर्कानें ज्ञान होत नाहीं. ध्यान करणारे योगी बुद्धीसह बारा इंद्रियांना त्यांच्या त्यांच्या विषयांपासून परतवितात व त्या बारा इंद्रियांच्या निरोधद्वारा प्रत्यक् तत्त्वाला जाणतात. धर्म, सत्य, दम, तप, अमात्सर्य, ह्री, तितिक्षा, अनसूया, यज्ञ, दान, धृति व यम हीं ब्राह्मणांचीं बारा महान् व्रतें आहेत.

अष्टावक्राचें हें वचन ऐकून बंदी पुनः म्हणाला—ब्रह्मलोकीं गेलेल्या उपासकांनाच ज्ञान होतें. शिवाय या लोकीं जरी ज्ञान झालें तरी तें कलियुगांत होत नाहीं. कृतयुगादिकांतच होतें. त्रयोदशी तिथि व तेरा द्विपांनीं युक्त अस-

केली पृथ्वी हीं दोन्ही प्रशस्त आहेत. त्यामुळें प्रशस्त देश आणि काल यांच्या अपेक्षेनेंच चित्तशुद्धि होते, ती पुरुषप्रयत्नानें साध्य होणारी नाहीं.

लोमश—युधिष्ठिरा, इतकें बोलून बंदीला पुढें काय बोलावें हें सुचेनासें झालें. तें पाहून वादप्रगल्भ अष्टावक्रानें तत्काल बंदीनें आरंभिलेल्या श्लोकाचा उत्तरार्ध पुरा केला.

अष्टावक्र—केशी आत्मा अग्न्यादिकाप्रमाणें असंग आहे, तो त्रयोदश संख्येनें युक्त असलेल्या विषयेंद्रियसंयोगरूप भोगांमध्यें प्रवृत्त होतो. असंग आत्म्याचाहि बुद्ध्यादिकांशीं मायिक संबंध संभवतो, असें 'आत्मा निर्विकार असूनहि बुद्धि ध्यान करूं लागली असतां ध्यान करूं लागतो व बुद्धि चंचल झाली असतां जणुंकाय चंचल होतो' या बृहदारण्यक श्रुतीवरून निश्चित होतें. (बृ. अ. ४. ब्रा. ३. कं. ७) यास्तव विवेकबुद्धीनें बुद्ध्यादिकांना आत्म्याहून पृथक्त्वानें जाणावें. त्याविषयीं उदासीन होऊं नये.

'आत्मज्ञ पुरुषाचे प्राण उत्क्रांत होत नाहींत.' (बृ. अ. ४. ब्रा. ४. कं. ६.) इत्यादि श्रुति देश-कालाची अपेक्षा न करतां येथेंच मुक्ति मिळते, असें सांगते. कारण अधर्मादि बारा प्रतिबंधांना निवृत्त करणें हाच ज्याचा स्वभाव आहे, असें ज्ञान धर्मादिकांच्या बलानेंच उत्पन्न झालें असतां बुद्ध्यादिकांची निवृत्ति होते आणि ज्ञानाला आच्छादित करणाऱ्या बुद्ध्यादिकांची निवृत्ति झाली असतां ब्रह्माद्वैताची सिद्धि होते.

( २ ) याप्रमाणें सूतपुत्र बंदी कांहीं न बोलतां अधोमुख होऊन चिंतन करीत स्वस्थ बसला आहे व अष्टावक्राचा विजयानें उत्कर्ष झाला आहे, असें पाहून त्या यज्ञमंडपांत फार मोठा कोलाहल उत्पन्न झाला. हे राजा, त्या जनकाच्या विस्तीर्ण यज्ञमंडपांत असा मोठा शब्द झाला असतां संतुष्ट झालेले सर्व ब्राह्मण हात जोडून अष्टावक्राचा सत्कार करीत त्याच्या समीप आले.

तेव्हां विजयी अष्टावक्र सिंहासारखी गर्जना करीत राजास म्हणाला—"हे राजन्, याच सूतपुत्रानें पूर्वी अनेक विद्वान् ब्राह्मणांना वादांत जिंकून जलांत बुडविलें. यास्तव आतां या बंदीलाहि तीच गति प्राप्त होवो. हे नृपश्रेष्ठा, याला धरून सत्वर जलांत बुडीव."

बंदी—मी वरुणराजाचा पुत्र आहें. हे जनकराजा, तुझ्या या सत्राच्या वेळींच वरुणाचेंहि द्वादश वार्षिक सत्र सुरू झालें. त्यासाठीं मीं श्रेष्ठ द्विजांना

वादांत जिंकून वरुणलोकीं पाठविलें. ते सर्व ब्राह्मण वरुणाचा स्तुत्य यज्ञ पहा-ण्यास गेले आहेत. ते आतां पुनः परत येतील. हे जनका, पूज्य असलेल्या या अष्टावक्राची मी पूजा करितों. कारण त्याच्याच कृपेनें मी आपल्या वरुण पित्यापाशीं जाईन.

अष्टावक्र—या बंदीनें आपल्या ऊहापोहकुशल वाणीनें आजवर अनेक विद्वान् वेदवेत्त्या ब्राह्मणांना वादांत जिंकून समुद्रांत बुडविलें. पण यानें ज्या वेदमयी वाणीलाहि आपल्या कुतर्कसागरांत बुडविलें होतें तिचा मीं आज तसाच कौशल्ययुक्त वाणीनें उद्धार केला आहे. याचा सदसद्विवेचनकुशल पंडितांनीं विचार करावा.

यावर कदाचित् तुम्ही असें म्हणाल कीं, बंदीनें ज्या वाणीचा उद्धार केला होता, त्या वाणीला तूंच कुतर्कसागरांत बुडविलें आहेस, त्यांत विचार करण्या-सारखें काय आहे! तर तसें समजूं नका. अग्नि स्वभावतःच जरी दाहक असला तरी तो सज्जनांचें सद्वर्तन व दुर्जनांचें दुराचरण जाणतो, म्हणूनच त्याला जातवेद असें म्हणतात. तो दिव्याच्या वेळीं सत्यप्रतिज्ञ सज्जनांच्या शरी-रांना वर्ज्य करून मिथ्याप्रतिज्ञ चोरादिकांच्या शरीराला जसा जाळितो, ( छा. अ. ६ खं. १६ ) त्याप्रमाणें सत्पुरुषहि बाल, पुत्र इत्यादिकांच्या भाषणादिकां-तील सार ग्रहण करितात. दिव्याच्या वेळीं अग्नि दिव्य करणाऱ्या मनुष्याची जाति, वय, विद्या इत्यादिकांची उपेक्षा करून सत्यपक्षपातीच जसा होतो, त्याप्रमाणें सज्जनहि हा वक्ता बाल आहे, असें म्हणून त्याचा अवमान करीत नाहींत.

अरे जनका, भोंकरीच्या पानांवर भोजन केल्यानें किंवा तिचीं फळें खाल्ल्यानें मोठा दोष लागतो व बुद्धीचा भ्रंश होतो, हें प्रसिद्ध आहे. त्याप्रमाणें भोंक-रीचीं पानें व फळें यांच्या संसर्गानें तुझा बुद्धिभ्रंश झाला आहे कीं काय ?

किंवा या परपिंडलोलुप भृत्यांच्या स्तुतीनें तूं मत्त झाला आहेस, म्हणून माझें म्हणणें ऐकत नाहींस! हे राजन्, मी 'या बंदीला इतर ब्राह्मणां-प्रमाणें जलामध्यें बुडीव' असें सांगत असतांना तूं एखाद्या मदोन्मत्त हत्ती-प्रमाणें तिकडे लक्ष कां देत नाहींस ?

जनक—हे पूज्य विप्रा, मी तुझी दिव्य व अलौकिक वाणी ऐकत आहें. ज्याअर्थी तूं या विवादांत बंदीला जिंकलें आहेस, त्याअर्थी तूं अलौकिक पुरुष आहेस. तुझा मनोरथ मी पूर्ण करितों. हा बंदी आहे पहा.

अष्टावक्र—हे राजा, हा बंदी जिवंत राहिल्यानें माझा कोणताहि अर्थ साध्य होणारा नाहीं. शिवाय वरुण जर याचा पिता आहे, तर तूं याला निःशंकपणें जलांत बुडीव.

बंदी—मी प्रसिद्ध वरुणराजाचा पुत्र आहें. त्यामुळें मला जरी जलांत बुडविलें तरी कांहीं भय वाटत नाहीं. हा अष्टावक्र फार दिवसांपासून नष्ट झालेल्या आपल्या 'कहोड'-पित्यास आतां एका घटकेच्या आंत पाहील.

(३) लोमश—राजा युधिष्ठिरा, त्यानंतर महात्म्या वरुणानें ज्यांची पूजा केली आहे, असे सर्व ब्राह्मण जनकाच्या समीपच प्रकट झाले व कहोड म्हणाला—यासाठींच लोक स्त्रीपरिग्रहादि संस्कारकर्मांनीं पुत्राची इच्छा करितात. जें कार्य मी करूं शकलों नाहीं, तें माझ्या या पुत्रानें केलें. हे जनका, दुर्बलालाहि बलवान्, मूर्खालाहि पंडित व अविद्वानालाहि विद्वान् पुत्र होतो.

राजा, तुझें कल्याण असो. साक्षात् यम आपल्या तीक्ष्ण परशूनें संग्रामांत तुझ्या शत्रूंचीं मस्तकें तोडितो. तुझी शत्रुसंहरणशक्ति यमाहूनहि अधिक आहे. जनकाच्या महदौक्थ्य-नांवाच्या यज्ञांत श्रेष्ठ साम गाइलें जातें. या नरश्रेष्ठाच्या सत्रांत सोमाचें आकंठ पान केलें जातें व हृष्ट झालेले देव त्याच्या यज्ञांत प्रत्यक्ष येऊन पवित्र भागांचा स्वीकार करितात.

(४) युधिष्ठिरा, याप्रमाणें बंदीनें समुद्रजलांत बुडविलेले ब्राह्मण पूर्वीपेक्षां अधिक तेजस्वी होऊन प्रकट झाले. तेव्हां जनकराजानें ज्याला अनुज्ञा दिली आहे, असा बंदी स्वतःच समुद्रजलांत शिरला. त्यानंतर अष्टावक्रानें आपल्या पित्याचा योग्य सत्कार केला व इतर ब्राह्मणांनींहि त्याची पूजा केली.

राजन्, बंदीचा याप्रमाणें वादांत पराभव करून अष्टावक्र मातुलासह आपल्या आश्रमांत परत आला. स्वाश्रमांत परत आल्यावर अष्टावक्राच्या मातेसमक्ष त्याचा पिता त्यास म्हणाला—"वत्सा, तूं या पवित्र नदींत प्रवेश कर."

पित्याचें हें वचन ऐकतांच अष्टावक्रानें तत्काल त्या नदींत प्रवेश केला व त्यामुळें त्याचीं सर्व अंगें सरळ झालीं. त्या दिवसापासून ही पवित्र नदी

---

१ उताबलस्य बलवानुत बालस्य पंडितः। उत वाऽविदुषो विद्वान्पुत्रो जनक जायते ॥

'अष्टावक्राचीं अंगें सरळ करणारी' म्हणून 'समंगा' या नांवानें प्रसिद्ध झाली. या नदींत स्नान करणारा पुरुष सर्व पापांपासून मुक्त होतो. युधिष्ठिरा, तूंहि भ्राते व भार्या यांसह या नदींत प्रवेश कर व स्नान, पान, आणि अवगाहन यांच्या योगें निष्पाप हो. हे आजमिढा, शुभकर्मांतच तुझी अतिशय भक्ति आहे. यास्तव तूं आपले भ्राते व विप्र यांसह या नदीतीरावर कांहीं काल निःशंकपणें सुखानें वास कर. त्यानंतर आपण दुसऱ्या पवित्र तीर्थांस जाऊं. ३. ७. १३४.

---

## अध्याय १३५ वा.

[ १ लोमशानें केलेलें विविध तीर्थाचें वर्णन. २ यवक्रीताच्या आख्यानाचा आरंभ. ३ वेदप्राप्तीसाठीं यवक्रीताचें उग्र तप, इंद्रदर्शन, संवाद व वरप्राप्ति. ४ भरद्वाजाशीं संवाद. ५ त्यानें सांगितलेली वालधीची कथा व गाथा. ]

(१) लोमश—हे राजन्, अष्टावक्राचें अंग सरळ होण्यापूर्वी 'मधुविला'-नांवानें प्रसिद्ध असलेली ही 'समंगा'-नदी दिसत आहे, आणि हें कर्दमिल तीर्थ आहे. येथें भरत राजा स्नान करीत असे. हे कौंतेया, वृत्राचा वध करून दूषित झालेला इंद्र या 'समंगा'-तीर्थांत स्नान करून सर्व पापांपासून मुक्त झाला.

हे नरश्रेष्ठा, मैनाक पर्वताच्या दरींतील हें 'विनशन'-तीर्थ पहा. येथें पूर्वी अदितीनें पुत्रप्राप्तीच्या इच्छेनें साध्य आणि देव यांच्यासाठीं ब्रह्मौदन शिजविलें. हे भरतर्षभहो, तुम्ही या श्रेष्ठ पर्वतावर चढून अयशस्क, अकीर्तिकर व अवाच्य पातकाचा नाश कराल.

हे युधिष्ठिरा, ऋषींना प्रिय असलेले हे कनखल पर्वत आहेत. ही महानदी गंगा कशी शोभत आहे, पहा. येथेंच पूर्वी भगवान् सनत्कुमार सिद्धीला प्राप्त झाला. हे आजमीढा, तूं या नदींत स्नान करून सर्व पापांपासून मुक्त होशील. राजा, हा जलपूर्ण डोह आहे व हा पुण्यप्रद भृगुतुंग पर्वत आहे. या पर्वतावरील गंगानदीच्या जलांत तूं आपल्या परिवारासह कांहीं न बोलतां स्नान कर. हा 'स्थूलशिरस'-मुनीचा रमणीय आश्रम दिसत आहे. येथें हे कौंतेया, क्रोध व मान यांचा तूं त्याग कर. याच्या समीपच हा रैभ्याचा आश्रम आहे येथें विद्वान् भरद्वाजपुत्र यवक्रीत नाश पावला.

युधिष्ठिर—हे विप्रश्रेष्ठा, प्रतापवान् भरद्वाज-ऋषि योगयुक्त कसा झाला व त्या मुनीचा पुत्र यवक्रीत कशासाठीं नाश पावला ? हें सर्व तत्त्वतः ऐकण्याची माझी इच्छा आहे. हे ब्रह्मन्, तूं प्राचीन महात्म्यांची देवतुल्य कर्मे सांगूं लागलास म्हणजे माझें मन त्यांत अतिशय रमतें.

( २ ) लोमश—हे युधिष्ठिरा, भरद्वाज आणि रैभ्य या दोघांची फार मैत्री होती. ते परस्परांना अत्यंत प्रिय असलेले दोघे विप्र येथें रहात होते. रैभ्याला अर्वावसु व परावसु या नांवाचे दोन पुत्र होते; आणि भरद्वाजाला 'यवक्रीत'-नामक एकच पुत्र होता. रैभ्य विद्वान् असून अपत्यें व शिष्य यांनीं संपन्न होता. परंतु भरद्वाज केवल तपस्वी होता. त्याच्याजवळ त्याच्या एका पुत्रा-वांचून शिष्यादि इतर परिवार नव्हता. त्या दोघांहि मुनींची बालपणापासूनच अतुल कीर्ति पसरली होती.

हे राजा, पुढें ब्राह्मण रैभ्याचा पुत्रांसह सत्कार करितात व आपल्या तपस्वी पित्याचा मात्र सन्मान करीत नाहींत, असें पाहून तेजस्वी यवक्रीत क्रोधसंतप्त झाला व त्यानें वेदाचें ज्ञान प्राप्त होण्यासाठीं घोर तप आरंभिलें. त्या महा-तपस्व्यानें प्रदीप्त पंचाग्नीमध्यें शरीराला अतिशय क्लेश देऊन इंद्राला संतप्त केलें.

( ३ ) तेव्हां इंद्र यवक्रीतापाशीं येऊन म्हणाला—तूं हें तीव्र तप कोणत्या हेतूनें आरंभिलें आहेस?

यवक्रीत—हे सुरगणार्चित देवेंद्रा, ब्राह्मणांनीं ज्या वेदांचें अध्ययन केलेलें नाहीं ते वेद मला स्फुरोत. त्यासाठीं मी हें श्रेष्ठ तप आचरीत आहें. हे पाक-शासना, स्वाध्यायासाठीं माझा हा प्रयत्न आहे. मी तपाच्या योगानें सर्व शास्त्रें जाणण्याची इच्छा करीत आहें. 'हे विभो, गुरुमुखानें वेदाध्ययय केल्यास तें दीर्घ कालानें साध्य होतें. यास्तव त्यांच्या प्राप्तीसाठीं मीं हा परम प्रयत्न आरंभिला आहे.

इंद्र—हे विप्रश्रेष्ठा, तूं ज्या मार्गानें जाऊं इच्छितोस तो अमार्ग आहे. तूं असा आत्मनाश कां करीत आहेस ! बाबारे, जा आणि गुरुमुखानें वेदाध्ययन कर.

लोमश—युधिष्ठिरा, असें हितवचन सांगून तो इंद्र निघून गेला असतां अमित पराक्रमी यवक्रीतानें पुनः तपश्चर्या करण्याचा यत्न आरंभिला. त्या महा

तपस्वी विप्रानें घोर तप करून देवेंद्राला पुनः संतप्त केलें, असें आम्हीं ऐकलें आहे. तेव्हां त्या पाकशासन देवानें तीव्र तप करण्याऱ्या त्या महातपस्व्याजवळ येऊन पुनरपि त्याचें निवारण केलें.

इंद्र—हे तापसा, तूं अविचारानें आरंभिलेला हा यत्न व्यर्थ आहे. तुला आणि तुझ्या पित्याला तपानें वेद स्फुरणें अशक्य आहे.

यवक्रीत—हे देवराज, तूं जर माझी ही इच्छा पूर्ण केली नाहींस तर मी आणखीहि उग्र नियमांनीं बद्ध होऊन अतिशय घोर तप आचरीन. हे मघवन्, माझी ही मनःकामना तूं जर पुरविली नाहींस, तर मी माझ्या शरीरावयवाचे तुकडे करून त्यांचा प्रदीप्त अग्नींत होम करीन, हें लक्षांत ठेव.

लोमश—हे धर्मराजा, त्या महात्म्या मुनीचा निश्चय जाणून बुद्धिमान् इंद्रानें त्याचें निवारण करण्याचा एक उपाय मनांत योजिला. तो देवेंद्र एका क्षयानें पीडिलेल्या दुर्बल व अतिशय वृद्ध तपस्वी ब्राह्मणाचें रूप घेऊन यवक्रीत जेथें स्नान-संध्यादि नित्य कर्म करीत असे, त्या तीर्थावर गेला व तेथें भागीरथीवर वाळूचा सेतु बांधीत बसला.

त्या द्विजश्रेष्ठ यवक्रीतानें जेव्हां इंद्राचें वचन ऐकलें नाहीं, तेव्हां त्या शक्रानें गंगानदीला वाळूनें अडविण्याचा प्रयत्न आरंभिला. तो ब्राह्मणवेषधारी इंद्र वाळूच्या मुठी भर-भरून नदींत टाकूं लागला. पण तो वृद्ध ब्राह्मण यवक्रीताच्या समक्ष अशा प्रकारें नदीवर वाळूचा पूल बांधूं लागला असतां तो मुनिश्रेष्ठ यवक्रीत त्यास हंसून म्हणाला—हे ब्रह्मन्, हें काय चाललें आहे? तुझी काय करण्याची इच्छा आहे? तूं आरंभिलेला हा फार मोठा यत्न व्यर्थ आहे.

इंद्र—हे मुने, मी गंगेवर सेतु बांधीत आहें. याच्या योगानें ही नदी सुखानें तरून जातां येईल. लोकांना ही नदी तरून जाण्यास अतिशय क्लेश होतात.

यवक्रीत—हे तपोधना, नदीचा हा महान् ओघ तुला वाळूनें अडवितां येणें शक्य नाहीं. यास्तव या अशक्य यत्नापासून परत फिर आणि शक्य असलेला प्रयत्न कर.

इंद्र—हे ब्रह्मन्, तूं जसें अशक्य वेदप्राप्तीसाठीं हें तप आरंभिलें आहेस, तसाच मींहि हा भार आपल्या शिरावर घेतला आहे.

राजा, ब्राह्मणाचें हें वचन ऐकतांच यवक्रीतानें त्याला ओळखून म्हटलें—हे पाकशासन इंद्रा, हा तुझा उद्योग जसा निरर्थक आहे, तसाच माझाहि आहे,

असें जर तूं मानीत असशील, तर जें शक्य असेल तेंच कर. हे देवेंद्रा, ज्यायोगें माझी योग्यता इतरांहून अधिक होईल असे अन्य वर मला दे.

लोमश—हे युधिष्ठिरा, त्यानंतर इंद्रानें त्या महातपस्वी मुनीनें जे जे वर मागितले, ते ते सर्व दिले. इंद्र म्हणाला—" हे तपोनिष्ठा, तुझ्या इच्छेप्रमाणें तुलां तुझ्या पित्यासह वेद स्फुरतील आणि तुझे दुसरेहि इष्ट हेतु पूर्ण होतील. यास्तव तूं आतां जा. "

( ४ ) इंद्राचा हा वर ऐकून कृतार्थ झालेला यवक्रीत आपल्या भरद्वाज-पित्यापाशीं येऊन म्हणाला—हे तात, आतां तुला व मला वेद स्वभावतःच स्फुरतील. त्यामुळें आपण दोघे इतरांहून श्रेष्ठ होऊं. मीं अशा प्रकारचे वर मिळविले आहेत.

पुत्राची ही दर्पोक्ति ऐकून भरद्वाज म्हणाला—हे वत्सा, इष्ट वरांची प्राप्ति झाल्यामुळें तूं दर्पयुक्त होशील आणि गर्वामुळें विवेकहीन झालेला तूं सत्वरच नाश पावशील. हे पुत्रा, दर्पामुळें नाश कसा होतो, याविषयीं एक दृष्टान्त-भूत गाथा देवांनीं गाइली आहे, ती मी तुला सांगतों, ऐक.

( ५ ) पूर्वीं 'वालधि'-नामक एक सामर्थ्यवान् मुनि होता. त्यानें पुत्रशोकानें उद्विग्न होऊन अतिशय दुष्कर तप आरंभिलें व ' मला अमर पुत्र व्हावा ' असा वर मागितला आणि तो प्राप्त करून घेतला. देव त्याच्यावर प्रसन्न झाले. परंतु वस्तुतः त्यांनीं त्याला ' अमर पुत्र ' दिला नाहीं. कारण मर्त्य मानव केव्हांहि अमर होत नसतात. यास्तव देव म्हणाले—वालधे, ज्याचें आयुष्य कांहीं निमित्तावर अवलंबून आहे असा दीर्घायु पुत्र तुला होईल.

तें ऐकून वालधि म्हणाला—हे श्रेष्ठ देवहो, हे शाश्वत स्थित असलेले अक्षय पर्वतच माझ्या पुत्राच्या आयुर्मर्यादेचें निमित्त होवोत. (जोंवर पर्वतांचा नाश झाला नाहीं, तोंवर माझ्या पुत्राचें आयुष्य असावें. )

भरद्वाज—पुत्रा, वालधीला हा वर मिळाल्यानंतर कांहीं दिवसांनीं त्याला ' मेधावी '-नांवाचा मोठा क्रोधी पुत्र झाला. पुढें तरुण झाल्यावर त्याला हा वर कळला. त्याच्या योगानें तो कुपुत्र अतिशय गर्विष्ठ झाला व ऋषींचा अवमान करूं लागला. एकदा तो मुनिजनांना पीडा देत या पृथ्वीवर संचार करीत असतां त्याची महान्प्रभावशाली विद्वान् धनुषाक्षमुनीशीं गांठ पडली. तो त्या मुनिश्रेष्ठास अपकार करूं लागला असतां त्या तापसानें ' तुझें भस्म

होवो' असा मेधावीला शाप दिला. परंतु त्याचें भस्म झालें नाहीं. तेव्हां 'मेधावीला कांहीं अपाय न होतां तो सुरक्षित आहे' असें पाहून ऋषीनें त्या दस ऋषीच्या आयुष्याचें निमित्त असलेले जे पर्वत त्यांचा महिषांकडून भंग करविला, तेव्हां तें निमित्त नष्ट होतांच तो मेधावीहि गतप्राण होऊन पडला.

त्यावेळीं पुत्र मृत झालेला पहातांच त्याचा पिता परम आर्त होऊन विलाप करूं लागला. तें पाहून सर्व वेदवेत्या मुनींनीं जी गाथा म्हटली ती मी तुला सांगतों, ऐक—" मर्त्य दैवविहित अर्थाचें उल्लंघन करण्यास कोणत्याहि प्रकारें समर्थ नाहींत. धनुषाक्षमुनीनें रेड्यांकडून प्रचंड पर्वतांचा भेद करविला."

याप्रमाणें वरप्राप्तीमुळें दर्पयुक्त झालेले मूढ तपस्वी जसे त्वरच नाश पावतात, तसा हे वत्सा, तूं नष्ट होऊं नको. हा रैभ्य महा वीर्यवान् असून त्याचे दोघे पुत्रहि तत्तुल्य आहेत. यास्तव त्यांची गांठ पडणार नाहीं याविषयीं सावध रहा. कारण तो महातपस्वी व क्रोधी रैभ्य जर क्रुद्ध झाला तर तो तुझा नाश करण्यास समर्थ आहे.

पित्याचें हें हितवचन ऐकून यवक्रीत म्हणाला—हे तात, मी आपल्या आज्ञेप्रमाणेंच वागेन. आपण यत्किंचित्हि संतप्त होऊं नका. आपण जसे मला पूज्य अहां, तसाच रैभ्यहि मला सर्वथा वंदनीय आहे.

लोमश—हे राजा, पित्याशीं असें मधुर भाषण करून तो निर्भय झालेला यवक्रीत इतर मुनींना पीडा देण्यांत परम संतोष मानूं लागला. ३. ७. १३५.

---

## अध्याय १३६ वा.

[ १ यवक्रीताचें रैभ्याश्रमांत आगमन व दुराचरण. २ क्रुद्ध रैभ्यानें त्याच्या नाशासाठीं निर्माण केलेली एक कृत्या व राक्षस. ३ राक्षसाच्या हातून रैभ्याचा नाश. ]

( १ ) लोमश—राजेंद्रा, त्यानंतर निर्भयपणें पर्यटन करणारा यवक्रीत एकदा वैशाख महिन्यांत रैभ्याच्या आश्रमासमीप आला. तेथें प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त असलेल्या त्या रम्य आश्रमापाशीं एखाद्या किन्नरीप्रमाणें फिरत असलेली रैभ्याची रूपवती स्नुषा त्याच्या दृष्टीं पडली.

तेव्हां तिला पाहून काममोहित झालेला तो निर्लज्ज यवक्रीत त्या लज्जित झालेल्या तरुणीस ' हे सुंदरि, मजपाशीं ये ' असें म्हणाला.

तें ऐकून त्या स्त्रीनें मुनीचा आशय जाणला व याची अवज्ञा केल्यास हा आपल्याला शाप देईल, या भीतीनें 'ठीक आहे' असें म्हणून ती त्याच्या समीप गेली. कारण त्याला योग्य शासन करण्यास आपला श्वशुर रैभ्य समर्थ आहे, हें ती जाणत होती. तेव्हां यवक्रीत एकांतांत ग्राम्य धर्मांत प्रवृत्त झाला व आपलें कार्य साधल्यावर तिला शोकसागरांत टाकून निघून गेला.

हे राजा, इतक्यांत रैभ्य आपल्या आश्रमास परत आला व त्यानें आपली स्नुषा दुःखाकुल होऊन रडत आहे असें पाहिलें. तेव्हां हे युधिष्ठिरा, त्या तपोनिष्ठ ऋषीनें परावसूच्या आर्तभार्येचें मृदुशब्दानें सान्त्वन करून तिला शोकाचें कारण विचारलें.

( २ ) तेव्हां त्या शुभेनें यवक्रीताचें सर्व भाषण व आचरण त्यास कथन करून ' मी प्रतीकार करीत असतां त्या दुष्टानें मजवर बलात्कार केला ' असें सांगितलें. तेव्हां यवक्रीताचें हें दुराचरण ऐकून रैभ्य अतिशय क्रुद्ध झाला. त्याचें चित्त क्रोधानें जणुं काय दग्ध होऊं लागलें. याप्रमाणें क्रोधसंतप्त झालेल्या त्या तपोनिष्ठानें आपल्या मस्तकावरील एक जटा उपटली व तिचा अग्नीमध्यें मंत्रयुक्त होम केला.

तेव्हां हे भारता, त्यांतून एक रूपसंपन्न कृत्या उत्पन्न झाली. नंतर त्या महर्षीनें पुनः दुसरी एक जटा उपटून तिचाहि अग्नींत होम केला. तेव्हां एक भयंकर नेत्राचा घोर राक्षस निर्माण झाला. त्या उभयतांनीं ' हे ब्रह्मन्, आम्हीं तुझें कोणतें कार्य करावें तें सांग ' असें त्या महर्षीस म्हटलें. तेव्हां त्या क्रुद्ध रैभ्यानें ' हे दैत्यहो, तुम्ही यवक्रीताचा नाश करा ' अशी त्यांस आज्ञा केली.

त्यावर 'ठीक आहे' असें बोलून ते दोघे राक्षस यवक्रीताचा वध करण्याच्या इच्छेनें त्वरेनें निघून गेले. हे पांडवा, त्या कृत्येनें यवक्रीताकडे जाऊन त्याला मोहित केलें व त्याचा कमंडलु काढून घेतला. याप्रमाणें त्या राक्षसीनें कमंडलूचें हरण केलें असतां भोजन करीत असलेला यवक्रीत तसाच वर उठला. इतक्यांत उच्छिष्ट असलेल्या यवक्रीतावर तो राक्षस शूल उगारून धांवून गेला. तेव्हां हातांत शूल घेऊन हा राक्षस आपल्या वधाच्या इच्छेनें धांवून येत आहे, हें पाहून यवक्रीत समीप असलेल्या एका सरोवराकडे धांवत

गेला. पण तें जलरहित असलेलें पाहून तो क्रमानें सर्व नद्यांकडे धांवत सुटला. परंतु त्या सर्व नद्याहि शुष्क झाल्या.

( ३ ) अशाप्रकारें त्या शूलधारण करणाऱ्या घोर राक्षसानें सर्वतः त्याचा निरोध केल्यामुळें यवक्रीत भयभीत होऊन पित्याच्या अग्निहोत्र-शालेंत एकदम प्रवेश करूं लागला. परंतु त्या आश्रमाचें रक्षण करणाऱ्या एका अंध शूद्रानें त्याला प्रतिबंध केला. त्या द्वारपालानें बलात्कारानें प्रतीकार केल्यामुळें यवक्रीत द्वाराबाहेरच उभा राहिला. तेव्हां राक्षसानें त्याच्या हृदयावर शूलाचा प्रहार करून त्याला गतप्राण केलें.

याप्रमाणें हे राजा, यवक्रीताचा प्राण घेऊन तो राक्षस रैभ्याकडे परत आला व त्याच्या अनुज्ञेनें त्या कृत्येसह तेथेंच राहिला. ३. ७. १३६.

## अध्याय १३७ वा.

[ १ भरद्वाजाचें आश्रमास परत येणें, अग्नि प्रज्वलित न झाल्यामुळें त्याला आलेला संशय. २ शूद्रमुखानें पुत्रमरणाचें वृत्त ऐकून विलाप. ३ रैभ्याला शाप व अग्निप्रवेश. ]

(१) लोमश—हे कौंतेया, इकडे भरद्वाज ऋषि आपलें ब्रह्मयज्ञादि आह्निक उरकून, हातांत समिधा घेऊन, आपल्या आश्रमास परत आला. त्याला पहातांच प्रति दिवशीं अग्नि प्रदीप्त होत असत. परंतु त्या दिवशीं भरद्वाज पुत्र-मरणाच्या आशौच्यानें युक्त असल्यामुळें ते अग्नि प्रज्वलित झाले नाहींत. तेव्हां त्या महातपस्वी ब्राह्मणानें आपल्या अग्निहोत्राच्या होमशालेंत कांहीं तरी विपरीत प्रकार घडला असावा, असें समजून आश्रमाचें रक्षण करणाऱ्या त्या अंध द्वारपालास म्हटलें—"हे शूद्रा, आज अग्नि माझ्या आगमनानें प्रसन्न कां दिसत नाहींत? त्याचप्रमाणें तूंहि नित्याप्रमाणें कां दिसत नाहींस? आश्रमांत सर्व क्षेम आहेना ? माझा मतिमंद पुत्र रैभ्याकडे तर गेला नाहींना ? मला सर्व वृत्तान्त सत्वर सांग, त्यावांचून माझें मन निःसंदेह होणार नाहीं."

( २ ) भरद्वाजमुनींचें हें वचन ऐकून शूद्र म्हणाला—हे भगवन्, तुझा अविचारी पुत्र खरोखरच रैभ्याकडे गेला होता व त्यामुळेंच तो बलाढ्य राक्षसाच्या प्रहारानें येथें गतप्राण होऊन पडला आहे. हातांत शूल धारण केलेल्या त्या राक्षसानें त्याचा निरोध केला. तेव्हां अग्निशालेंत प्रवेश करणारास राक्षसांचें

भय नसतें, या आशयानें तो या अग्निगृहापाशीं आला. त्या वेळीं अशुचि असलेला तो जलाची इच्छा करीत होता; परंतु मीं अग्निशालेच्या दोन्ही द्वारांवर हात ठेवून त्यास आंत जाण्यास प्रतिकार केला, तेव्हां तत्काल निराश झालेल्या त्याचा शूल धारण करणाऱ्या राक्षसानें अतिवेगानें वध केला.

राजा, शूद्रानें पुत्राचा निरोध केल्यामुळें घडलेली ही अतिशय अप्रिय वार्ता एकतांच भरद्वाज मृत पुत्राला जवळ घेऊन मोठ्या दुःखानें शोक करूं लागला.

भरद्वाज—हे वत्सा, ब्राह्मणांनीं ज्यांचें अध्ययन केलें नाहीं त्या वेदांची स्फूर्ति व्हावी या हेतूनें ब्राह्मणांच्या हितासाठीं तूं तीव्र तप आचरिलेंस, त्याचप्रमाणें महात्म्या ब्राह्मणांचें कल्याण करण्यांत तत्पर असलेल्या तूं कोणत्याहि प्राण्याला अपाय करीत नव्हतास. तथापि हे बाळा, पुढें तूं क्रूर बनलास आणि मी प्रतिकार केलेला असतांहि तूं त्या कालांतक यमासारख्या उग्र रैभ्याच्या दर्शनास गेलास.

( ३ ) तोहि परम दुर्मति रैभ्य ‘ मज वृद्धाला हें एकच अपत्य आहे ’ हें जाणत असूनहि क्रोधवश झाला. महातेजस्वी रैभ्याच्या या कृतीमुळें मला आज पुत्रशोक प्राप्त झाला आहे. हे पुत्रा, तुझ्यावांचून मी जिवंत रहाणार नाहीं. या लोकीं अतिशय प्रिय असलेल्या प्राणांचाहि मी त्याग करीन. ज्याअर्थीं मी पुत्रशोकानें दुःखविह्वल होऊन प्राणत्याग करीत आहें, त्याअर्थीं रैभ्याचा ज्येष्ठपुत्र अपराधावांचूनच त्याचा सत्वर वध करील.

ज्या पुरुषांना अपत्यच नसतें व जे पुत्रशोकाला प्राप्त न होतां भूलोकीं सुखानें रहात असतात ते खरोखर भाग्यवान् होत. परंतु जे अभागी नर पुत्रशोकानें व्याकुल व अतिशय दुःखार्त होऊन आपल्या आप्तेष्टांस व मित्रांस शाप देतात; त्यांच्याहून अधिक पातकी कोण आहे ! मीं पुत्राला गतप्राण झालेला पाहून माझ्या प्रिय मित्राला शाप दिला, अशाप्रकारची आपत्ति मजवांचून दुसऱ्या कोणी अनुभविली नसेल !

लोमश—हे युधिष्ठिरा, असा अनेक प्रकारें विलाप करून भरद्वाजानें पुत्राचें दहन केलें आणि स्वतः प्रदीप्त अग्नींत प्रवेश केला. ३. ७. १३७.

---

## अध्याय १३८ वा.

[ १ यज्ञांत नियुक्त केलेल्या रैभ्यपुत्रानें हरिण समजून केलेला पित्याचा वध. २ बृहद्युम्नाच्या यज्ञांत परत येऊन भ्रात्याला पितृवधाचें कथन. ३ पितृहत्येच्या पातकापासून निवृत्त होण्यासाठीं भ्रात्याची तपश्चर्येकडे योजना व त्याची दीक्षा. ४ भ्रात्याचें तपश्चर्या संपवून यज्ञमंडपांत परत येणें. ५ त्याला ब्रह्मघातकी म्हणून केलेला प्रतिबंध, त्याची पुनः तपश्चर्या. ६ सूर्याची प्रसन्नता व वरप्राप्ति. ७ रैभ्यादिकांचें पुनरुज्जीवन. ]

( १ ) लोमश—हे धर्मराजा, याच वेळीं रैभ्याचा प्रतापवान् यजमान पृथिवीपति बृहद्युम्न राजा यज्ञ करीत होता. त्या बुद्धिमान् बृहद्युम्नानें आपल्या सत्रांत साह्य करण्यासाठीं अर्वावसु व परावसु या दोघांहि रैभ्यपुत्रांस नियुक्त केलें. तेथें ते दोघेहि भ्राते पित्याच्या आज्ञेनें गेले असतां आश्रमांत रैभ्य व परावसूची भार्या हीं दोघेंच रहात होतीं.

एकदा परावसु पत्नीला भेटण्यासाठीं आपल्या आश्रमाकडे येत असतां मार्गांत कृष्णाजिनानें आच्छादिलेला त्याचा पिता त्याच्या दृष्टीं पडला. ती पहांटेची वेळ असल्यामुळें रात्रींचा अंधकार निःशेष गेला नव्हता व परावसूच्या नेत्रांनाहि निद्रेनें घेरलें होतें. त्यामुळें गहन अरण्यांत संचार करणाऱ्या आपल्या पित्याला तो मृग समजला आणि त्यानें स्वतःच्या देहरक्षणासाठीं अज्ञानानें त्याचा वध केला.

( २ ) परंतु तो मृग नसून आपला पिता आहे, हें तत्काल त्याच्या लक्षांत आलें. तेव्हां तो त्याचीं सर्व प्रेतकार्यें करून सत्रांत परत आला व आपल्या भ्रात्याला म्हणाला—"हे मुने, मृगाच्या भ्रांतीनें माझ्या हातून पितृवध घडला आहे आणि तूं एकटा हें यज्ञकर्म केव्हांहि पार पाडूं शकणार नाहींस. यास्तव वत्सा, तूं माझ्या या ब्रह्महिंसेच्या क्षालनार्थ व्रताचरण कर. मी एकटा हें सत्रांतील कर्म चालविण्यास समर्थ आहें."

( ३ ) अर्वावसु—ठीक आहे, बुद्धिमान् बृहद्युम्नराजाचें सत्रकर्म तूं कर. तोंवर मी जितेंद्रिय होऊन तुझ्यासाठीं ब्रह्मवधाचा दोष घालविणारें तीव्र तप आचरितों.

( ४ ) लोमश—युधिष्ठिरा, त्यानंतर अर्वावसुमुनि तपानें ब्रह्मवधाच्या दोषाची निवृत्ति करून पुनः त्या सत्रांत परत आला. त्या वेळीं आपला भ्राता

परत येऊन उभा आहे, हें पाहून परावसु बृहद्युम्नराजास असें हर्षगद्गद वचन बोलला—" हे राजन्, हा ब्रह्मघात करणारा अर्वावसु तुझा यज्ञ पहाण्यास आला आहे. त्याला येथें प्रवेश करूं देऊं नको. कारण या ब्रह्महत्या करणाऱ्या दुष्टाच्या नुसत्या दृष्टिक्षेपानेंहि तुला निःसंशय पीडा होईल."

(५) धर्मराजा, परावसूचें हें वचन ऐकून राजा बृहद्युम्न आपल्या भृत्यांस म्हणाला—'या ब्रह्मघातकी विप्रास येथून घालवून द्या.'

तेव्हां ते राजाज्ञेप्रमाणें त्यास घालवूं लागले असतां अर्वावसु 'मीं ब्रह्महत्या कली नाहीं' असें त्यांस पुनः पुनः सांगूं लागला. परंतु त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून ते राजसेवक त्याला वारंवार 'ब्रह्मघातकी' बोलूं लागले. तेव्हां अर्वावसु त्यांस म्हणाला—"मीं ब्रह्महत्या केलेली नाहीं. खरा प्रकार तुम्हांला ठाऊक नाहीं. माझ्या भ्रात्याच्या हातून हें पातक घडलें असतां मींच व्रत आचरून त्याला पितृवधाच्या दोषापासून मुक्त केलें आहे."

(६) राजा, तो सत्यप्रतिज्ञ मुनि असें अनेकदा सांगत असतांहि राजभृत्य त्याला 'तूं मिथ्यावादी आहेस' असें क्रोधानें बोलूं लागले. तेव्हां तो महा-तपस्वी ब्रह्मर्षि अधिक भाषण न करितां वनांत निघून गेला. तेथें त्या ब्राह्मण-श्रेष्ठानें उग्र तप आचरून सूर्याची आराधना केली आणि त्या तापसानें सूर्याचा रहस्यवेद म्ह० काठक ब्राह्मण संपादिलें. त्या वेळीं मूर्तिमंत सूर्यानें त्या ब्राह्मणाला दर्शन दिलें. अर्वावसूच्या तीव्र तपानें देव प्रसन्न झाले व त्यांनीं त्याला वर देऊन परावसूचें यज्ञापासून निराकरण केलें.

(७) अग्निप्रभृति देव वर देऊं लागले असतां अर्वावसूनें 'आपल्या पित्याचें पुनरुज्जीवन, भ्राता पितृवधाच्या दोषानें लिप्त न व्हावा, त्याला पितृ-हत्येची विस्मृति व्हावी, भरद्वाज व यवक्रीत या दोघांनीं सजीव व्हावें व स्वतःला सूर्यमंत्रप्रकाशक वेदाचें संप्रदायप्रवर्तकत्व प्राप्त व्हावें' इतके वर मागितले. तेव्हां देवांनीं 'तथास्तु' असें म्हणून ते सर्व वर त्यास दिले.

त्यानंतर हे युधिष्ठिरा, ते रैभ्यादि सर्व मुनि तेथें प्रकट झाले असतां यव-क्रीत अग्न्यादि देवतांस म्हणाला—" हे देवहो, मीं वेद उत्तम प्रकारें जाणत असून व्रतेंहि आचरिलीं आहेत, असें असतां मजसारख्या वेदाध्ययन करणाऱ्या तपस्वी ब्राह्मणाचा अशाप्रकारें नाश करण्यास हा रैभ्य कसा समर्थ झाला?"

देव—हे यवक्रीता, तूं जें बोलत आहेस, तें तसेंच खरें समजूं नको. तूं पूर्वीं गुरूवांचून सुखानें वेदाध्ययन केलें आहेस, आणि या रैभ्यानें अनेक क्लेश सहन करून, दुःख भोगून व आपल्या सेवेनें गुरूला संतुष्ट करून दीर्घ कालानें वेदाध्ययन केलें आहे.

लोमश—यवक्रीतास असें बोलून इंद्रादि देवांनीं त्या सर्वांस सजीव केलें व ते स्वर्गलोकीं परत गेले. राजा, हा पुण्यप्रद आश्रम त्याच महर्षींचा आहे. यांतील वृक्ष सर्वदा फल-पुष्पांनीं युक्त असतात. येथें वास्तव्य केल्यानें तूं सर्व पापांपासून मुक्त होशील. ३. ७. १३८.

---

## अध्याय १३९ वा.

[ १ पांडवांना मैनाकादि पर्वतांचें दर्शन व त्यांचें वर्णन. २ त्या प्रदेशांचें दुर्गमत्व. ३ युधिष्ठिराची भ्रात्यांस सावध राहून द्रौपदीचें रक्षण करण्याची आज्ञा. ]

( १ ) लोमश—युधिष्ठिरा, तूं आतां उशीरबीज, मैनाक, श्वेतगिरि व कालशैल यांचें उल्लंघन केलें आहेस. ही सात प्रवाहानें वहाणारी गंगा कशी शोभत आहे ती पहा. या पापरहित व पुण्यप्रद प्रदेशीं अग्नि नित्य प्रज्वलित असतो. हरिद्वाराच्या पलीकडे 'त्रियोगीनारायण'-नांवाचें हें पवित्र स्थान आहे. हें अद्भुत स्थान मानवांच्या दृष्टीं पडणें शक्य नाहीं. यास्तव हे पांडवहो, तुम्ही चित्तैकाग्र्य करून या पवित्र तीर्थाचें दर्शन घ्या.

हे भारतश्रेष्ठा, तूं कालशैल पर्वताचें उल्लंघन केलें आहेस, यास्तव तुला आतां देवांचीं पावलें उमटलेलें त्यांचें दिव्य क्रिडास्थान येथें दिसेल. हे राजन्, आपण आतां श्वेतगिरि व मंदर या पर्वतांवर जाऊं या. तेथें माणिभद्र यक्ष व यक्षराज कुबेर यांचें वास्तव्य आहे. हे पुरुषश्रेष्ठा, शीघ्र गमन करणारे ऐशीं हजार गंधर्व, त्याचप्रमाणें त्यांच्या चौपट किंपुरुष आणि अनेक रूपें धारण करणारे व विविध आयुधांनीं युक्त असलेले यक्ष माणिभद्र यक्षेंद्राची उपासना करितात. त्यांची ऋद्धि असामान्य असून ते सर्व वायूसारखे गतिमान् आहेत. ते स्वस्थानीं निश्चल असलेल्या इंद्रालाहि स्थानभ्रष्ट करण्यास समर्थ आहेत. अशा बलवानांनीं व राक्षसांनीं रक्षण केलेले हे पर्वत अतिशय दुर्गम आहेत. यास्तव बाबांनो, चित्त अतिशय स्थिर करा.

(२) हे पांडुपुत्रा, आपल्याला येथें कुबेराचे दुसरेहि सचिव भेटतील. त्यांतील कांहीं राक्षस भयंकर असून कांहीं सौम्य आहेत. यास्तव तूं पराक्रमानें त्यांचा प्रतिकार करण्यास सज्ज हो.

हे राजन्, हा पहा सहा योजनें उंच असलेला कैलासपर्वत! या गिरिशिखरावर सर्व देव जमतात. येथेंच 'बदरी'-नांवाचा 'विशाला' वृक्ष आहे. हे कौंतेया, याच प्रदेशीं कुबेराचें मंदिर असून तेथें असंख्य यक्ष, राक्षस, किन्नर, नाग, पक्षी व गंधर्व येत असतात. यास्तव हे धर्मज्ञा, तूं तप आणि इंद्रियनिग्रह यांनीं युक्त होऊन त्या पवित्र क्षेत्रांत प्रवेश कर.

हे पृथापुत्रा, या वेळीं मी आणि भीमसेनाचें बल तुझें संरक्षण करील. शिवाय वरुण, समितिंजय यम, गंगा, यमुना-पर्वत, मरुत्, अश्विनिकुमार, नद्या व सरोवरें हीं सर्व तुला स्वास्थ्य देतील!

इतकें बोलून लोमशानें भागीरथीचें स्तवन आरंभिलें. तो म्हणाला—"हे देवि गंगे, आजमीढवंशांत श्रेष्ठ असलेल्या या नरेंद्राचें पर्वतापासून रक्षण कर. हे शैलकन्ये, या पर्वतांत प्रवेश करण्याची इच्छा करणाऱ्या नृपाचें कल्याण कर."

सागरगामिनी गंगेची अशी प्रार्थना करून लोमश महर्षीनें युधिष्ठिराला असें म्हटलें, "हे राजन्, आतां सज्ज हो."

( ३ ) मुनीचें हें वचन ऐकून युधिष्ठिर आपल्या भ्रात्यांस म्हणाला—हे वीरांनो, लोमशाची ही भीति अपूर्व आहे. यास्तव तुम्ही सर्व मिळून कृष्णेचें रक्षण करा. त्यांत चुकूं नका. हा प्रदेश अतिशय दुर्गम आहे, असें या मुनीचें मत आहे. तस्मात् तुम्ही येथें वाणी, मन व शरीर यांना शुद्ध ठेवून अतिशय शुचिर्भूतपणानें रहा.

वैशंपायन—राजा जनमेजया, नंतर धर्मराजा अतुल पराक्रमी वृकोदराकडे वळून म्हणाला—"हे भीमसेना, तूं दक्ष राहून कृष्णेचें रक्षण कर. कारण हे वीरा, या निर्जन प्रदेशीं अर्जुनाच्या अभावीं ही पांचाली भयप्रसंगीं तुझाच आश्रय करीत असते."

इतकें बोलून त्या ज्येष्ठ पांडवानें नकुल-सहदेवांस जवळ घेतलें व त्यांच्या मस्तकांचें अवघ्राण करून व त्यांच्या अंगावरून हात फिरवून सद्गदित स्वरानें म्हटलें—"वत्सांनो, भिऊं नका, सावधपणानें चला." ३. ७. १३९

---

## अध्याय १४० वा.

[ १ युधिष्ठिराचा भीमसेनाला पांचाली व इतर परिवार, यांसह गंगाद्वारीं रहाण्याचा उपदेश. २ भीमसेनाचें युधिष्ठिराला दुर्गमप्रदेशीं सोडून परत न जाण्याचें प्रतिवचन. ३ सर्व परिवार सुबाहूच्या राज्यांत ठेवून चौघे पांडुपुत्र, द्रौपदी व लोमश यांचें पायांनींच हिमायलपर्वताकडे गमन. ]

**( १ ) युधिष्ठिर**—हे वृकोदरा, या प्रदेशांत महाबलवान् भूतें गुप्तपणें वास करीत असतात. त्यामुळें केवळ तप व अग्नि यांच्या साहाय्यानेंच आपण तेथें जाण्यास समर्थ होऊं. भीमसेना, तूं आपल्या बलाचा आश्रय करून क्षुधा व तृषा यांचें नियमन कर व सामर्थ्य आणि दक्षता धारण कर. कैलासपर्वत किती दुर्गम आहे, हें तूं या ऋषीच्या मुखानें आतां ऐकिलेंच आहेस. तेव्हां अशा दुर्गम मार्गानें कृष्णा कशी जाऊं शकेल, याचा तूंच आपल्या मनांत विचार कर.

किंवा हे वीरा, सहदेव, धौम्य, सूत, पाकाध्यक्ष, सर्व परिचारक, रथ, अश्व आणि मार्गांतील क्लेश सहन करण्यास असमर्थ असलेले इतरहि सर्व विप्र यांच्यासह तूं परत फीर. महातपस्वी लोमश, नकुल व मी असे आम्ही तिघेच अल्पाहार व नियतव्रत होऊन पुढें जातों. मी परत येईपर्यंत तुम्ही सर्व गंगाद्वारीं माझी वाट पहात व द्रौपदीचें रक्षण करीत रहा.

**( २ ) भीम**—हे धर्मराजा, ही राजकन्या पांचाली श्रमानें व दुःखानें आर्त झाली असतांहि अर्जुनाला पहाण्याच्या इच्छेनें येत आहे. हे महाराजा, युद्धांतून परत न फिरणाऱ्या त्या महात्म्या गुडाकेशाला पहाण्याची तुलाहि जर इतकी तीव्र उत्कंठा लागली आहे, तर सहदेव, पांचाली व मी अशीं तिघेंहि त्याच्या दर्शनासाठीं उत्सुक झालों असलों तर त्यांत आश्चर्य कसलें !

हे राजा, तुझ्या इच्छेप्रमाणें हे सर्व ब्राह्मण, परिचारक, सूतादि सर्व परिवार आणि आम्हांपैकीं जो कोणी तुला वाटत असेल तो एकटा परत जाऊं दे. मी मात्र राक्षसांनीं व्याप्त असलेल्या या पर्वतावर व या दुर्गम प्रदेशीं तुला सोडून कदापि परत फिरणार नाहीं.

त्याचप्रमाणें हे नरश्रेष्ठा, ही महाभागा पतिव्रता याज्ञसेनी तुझ्यावांचून परत जाण्याची इच्छा करणार नाहीं. तसाच सतत तुला अनुसरणारा हा

सहदेव तुला सोडून केव्हांहि जाणार नाहीं. मी त्याचें मन पूर्णपणें जाणतों. शिवाय हे राजन्, सव्यसाची पार्थाला भेटण्याची सर्वांनाच लालसा आहे, यास्तव आपण सर्वच जाऊं या.

हा पर्वत अनेक घोर दऱ्यांनीं युक्त आहे. जेथें रथांतून जाणें शक्य नसेल, तेथें आपण पायांनींच चालत जाऊं; तस्मात् हे महाराज, तूं खिन्न होऊं नको. जेथें जेथें पांचाली चालूं शकणार नाहीं, तेथें तेथें मी तिला खांद्यावर वाहून नेईन, असें मला तर वाटतें. तसेंच हे दोघे सुकुमार माद्रीनंदन ज्या दुर्गम मार्गातून चालण्यास समर्थ नसतील, तेथें मी त्यांसहि उचलून नेईन. तस्मात् हे धर्मज्ञा, तूं खेद मानूं नको.

युधिष्ठिर—हे भीमसेना, ज्याअर्थीं तूं आपल्या अशा भाषणानें यशस्विनी पांचालीला व या माद्रीपुत्रांना खांद्यावर वाहून नेण्याचा उत्साह प्रकट करीत आहेस, त्याअर्थीं तुझ्या बलाची अधिक वृद्धि होवो. हे वत्सा, तुझें कल्याण असो; तुझ्यासारखें सामर्थ्य दुसऱ्या कोणाहि मनुष्यांत नाहीं. तुझें बल, यश, धर्म व कीर्ति हीं वृद्धि पावोत. तूं आपल्या दोघां भ्रात्यांसह कृष्णेला वाहून नेण्यास समर्थ आहेस. यास्तव तुला केव्हांहि ग्लानि न येवो व तुझा कदापि पराभव न होवो.

वैशंपायन—राजा, धर्मराजानें भीमाला असें आशीर्वचन दिलें असतां पांडवांच्या मनाला रमविणारी कृष्णा हंसतच म्हणाली—" हे प्रभो, आपण माझ्यासाठीं व्यथित होऊं नका. मी सहज चालत जाईन."

त्यानंतर लोमशमुनि युधिष्ठिराला म्हणाला—' हे कुंतीपुत्रा, गंधमादन पर्वतावर केवल तपानेंच जातां येणें शक्य आहे. यास्तव आपण सर्व तपानें युक्त होऊं या. त्यायोगें हे राजा, नकुल, सहदेव, भीमसेन, तूं आणि मीहि श्वेतवाहन पार्थाला पहाण्यास समर्थ होऊं.

याप्रमाणें ते पांडुपुत्र संभाषण करीत चालले असतां विपुल अश्व व गज यांनीं युक्त असलेल्या सुबाहुराजाच्या प्रदेशीं आले. तो देश किरात, तंगण व शेकडों पुलिंद यांनीं व्याप्त होता. सुरगणांनीं सेवन केलेला तो हिमालयांतील अनेक आश्चर्ययुक्त प्रदेश पांडवांच्या दृष्टीं पडला. त्यावेळीं कुलिंदाधिपति सुबाहूनेंहि ' पांडुपुत्र येत आहेत ' असें ऐकतांच आपल्या देशाच्या सीमेवर जाऊन त्यांचें मोठ्या प्रेमानें सत्कारपूर्वक स्वागत केलें.

( ३ ) तेव्हां राजानें सन्मानिलेले ते सर्व पांडव कांहीं काल तेथें सुखानें राहिले आणि इंद्रसेनादि भृत्य व द्रौपदीचा सर्व परिवार कुलिंदाधिपतीच्या देशांत ठेवून ते महारथ कुरुनंदन प्रभातकालीं सूर्योदय होतांच पायांनींच हिमालयपर्वतावर जावयास निघाले.

धनंजयाला पहाण्यास उत्सुक झालेले ते वीर कृष्णेसह संतुष्ट मनानें त्या प्रदेशांतून हळू हळू पुढें जाऊं लागले. ३. ७. १४०.

## अध्याय १४१ वा.

[ १ युधिष्ठिरानें केलेलें धनंजयाचें गुणवर्णन. २ त्याच्या दर्शनाविषयीं उत्सुकता व गंधमादनपर्वतासमीप गमन. ]

( १ ) युधिष्ठिर—हे पांचालि व हे वत्सांनो, मी काय सांगतों तें ऐका. खरोखर प्रारब्ध कर्माचा नाश कधींच होत नाहीं. म्हणूनच आपण आज वनवासी होऊन फिरत आहों. 'आम्ही दुर्बल व दुःखी झालों आहों' असें जरी परस्परांशीं बोलत असलों, तरीहि धनंजयाला पहाण्याच्या इच्छेनें दुर्गम प्रदेशींहि जाण्यास निघालों आहों.

हे भीमा, तो वीर मला अद्यापि समीप असल्याचें दिसत नाहीं. त्यामुळें अग्नीनें दग्ध होणाऱ्या कापसाच्या राशीप्रमाणें माझ्या अंगाचा दाह होत आहे. त्याच्या दर्शनाच्या इच्छेनें तुम्हां अनुजांसह वनाचा आश्रय करणाऱ्या माझें मन दुःशासनानें केलेल्या याज्ञसेनीच्या केशग्रहणामुळें जळत आहे.

हे वृकोदरा, तो अमित तेजस्वी अजिंक्य पार्थ दृष्टीं न पडल्यामुळें मला अतिशय ताप होत आहे. हे वीरहो, तो नकुलाचा ज्येष्ठ भ्राता दिसावा म्हणून मी तुमच्यासह हीं सर्व पवित्र तीर्थें, घोर अरण्यें व रम्य सरोवरें यांतून संचार करीत आहें. तो सत्यसंध धनंजय गेल्या पांच वर्षांत एकदाहि दृष्टीं पडला नाहीं, त्यामुळें माझें मन खिन्न झालें आहे.

हे अनुजहो, तो सिंहाप्रमाणें गमन करणारा गुडाकेश अस्त्रनिपुण असून युद्धविशारद व अप्रतिम धनुर्धर आहे. तो मदोन्मत्त हत्तीप्रमाणें गमन करणारा अर्जुन शत्रुसंघामध्यें क्रुद्ध झालेल्या कालांतक यमासारखा संचार करीत असतो. सिंहासारखे स्कंध असलेल्या त्या अमित पराक्रमी पार्थाचें बल व वित्त इंद्रतुल्य आहे. अरे अरे, अशा त्या महात्म्याला अतिशय क्लेश भोगावे

लागत असून तो उग्र धनुष्य धारण करणारा अजिंक्य वीर मला अद्यापि न दिसल्यामुळें माझें मन व्यथित होत आहे.

एखाद्या क्षुद्र प्राण्यानें तिरस्कार केल्यास त्याच्याशींहि तो उदार अंतःकरणाचा पृथापुत्र सतत क्षमाशीलच होऊन मित्रत्वानें वागतो. सरळ मार्गानें चालणाऱ्या लोकांस सर्वदा अभय व सुख देणारा तो सव्यसाची कुटिल प्रवृत्तीच्या लोकांशींहि कधीं कपटानें वागत नाहीं. तो धनंजय वज्रधर इंद्रालाहि कालविषासारखा भासतो. तो महाबलाढ्य अभयदाता बीभत्सु शरण आलेल्या शत्रूला निष्ठुरतेनें वागवीत नाहीं. तो प्रतापवान् आम्हां सर्वांचा आश्रय व रणांत शत्रूंचें मर्दन करणारा आहे.

आम्हां सर्वांना सुख देणाऱ्या त्या माझ्या प्रिय भ्रात्यानें माझ्यासाठीं असंख्य रत्नें हरण करून आणिलीं. पूर्वीं मजपाशीं जीं विविध प्रकारचीं विपुल रत्नें होतीं व जीं आतां दुर्योधनाला प्राप्त झालीं तीं सर्व या प्रतापी वीराच्या पराक्रमानेंच मला मिळालीं होतीं. सर्व त्रिभुवनांत प्रसिद्ध असलेली माझी रत्नमयी सभा याच फाल्गुनाच्या बाहुबलानें मला प्राप्त झाली होती. पराक्रमांत वासुदेवासारखा व युद्धांत कार्तवीर्यासारखा असलेला तो श्वेतवाहन सर्वदा अजेय आहे. असा तो माझा प्रिय भ्राता मला अद्यापि कोठें दिसत नाहीं. हे वृकोदरा, महावीर्यवान् बलराम, अजिंक्य असलेला तूं व शत्रूचा नाश करणारा मधुसूदन यांचें अनुकरण करणारा तो नरव्याघ्र बाहुबलांत व प्रभावांत पुरंदराच्या तुल्य आहे. वायुसारखा वेगवान्, चंद्रासारखा प्रसन्नवदन, आणि सनातन मृत्यूप्रमाणें क्रोधी असलेल्या त्या श्रेष्ठ धनुर्धराच्या दर्शनेच्छेनें आपण सर्व आतां या गंधमादन पर्वतावर चढून जाऊं या.

(२) हे वीरांनों, येथेंच 'विशाला'-नामक बदरीचा वृक्ष असून नरनारायणांचा पवित्र आश्रम आहे. जेथें यक्ष सर्वदा यजन करितात, तो श्रेष्ठ पर्वत आपण पाहूं या आणि महत्तप आचरणारे आपण राक्षसांनीं रक्षण केलेल्या कुबेराच्या रम्य पुष्करणीला पायांनींच जाऊं या.

हे वृकोदरा, त्या प्रदेशांत वहानांतून जातां येणें शक्य नाहीं. किंवा क्रूर, लुब्ध व चंचलचित्त मानवाचाहि प्रवेश होऊं शकत नाहीं. तेथें आपण सर्व आयुधांनीं सज्ज व खड्गयुक्त होऊन महाव्रत विप्रांसह अर्जुनाचा शोध करीत जाऊं.

हे भीमसेना, त्या प्रदेशांत अशुचि मानवांना मक्षिका, डांस, मशक, सिंह, व्याघ्र, सर्प इत्यादि प्राणी पीडा देतात. परंतु नियतव्रत असणारांच्या ते दृष्टींहि पडत नाहींत. आपण सर्व मिताहार व नियतव्रत आहोंत, यास्तव धनंजयाला पहाण्यासाठीं गंधमादन पर्वतावर प्रवेश करूं या. ३. ७. १४१.

---

## अध्याय १४२ वा.

[ १ लोमशानें केलेलें मंदरपर्वत व अलकनंदा यांचें वर्णन, पांडवांचें गंगेंत स्नान. २ भौमासुराच्या अस्थींचें दर्शन व भौमासुराची कथा. ३ वराहावताराचें उपाख्यान. ]

( १ ) लोमश—रम्य प्रदेश अवलोकन करणाऱ्या पांडवांनों, तुम्ही सर्व या नद्या, पर्वत व नगरांसह अरण्यें पाहून व पवित्र तीर्थांत स्नानादि करून आतां या दिव्य मंदर पर्वताकडे चाललां अहां ! हा मार्ग त्याच पर्वताकडे जातो. यास्तव तुम्ही समाहितचित्त व उद्वेगरहित व्हा. कारण हें देवांचें व पुण्य कर्में करणाऱ्या ऋषींचें दिव्य निवासस्थान आहे. आपण आतां तेथेंच जाणार आहों.

हे युधिष्ठिरा, ही शुभजलानें युक्त असलेली, पुण्यप्रद, महानदी आहे. हिचा उगम बदरीकाश्रमापासून झाला असून देवर्षिगण नित्य तिचें सेवन करितात. आकाशचर महात्म्या वालखिल्य मुनींनीं ती नित्य पूजित आहे. महात्मे गंधर्व इष्ट सिद्धीसाठीं नित्य हिची प्रार्थना करितात. येथें आपलें सर्वात्मत्व पहाणारे मरीचि, पुलह, भृगु व अंगिरा मधुर स्वरानें तैत्तिरीयांत ब्रह्मवेत्त्यांनीं गायलेलीं पवित्र सामें गातात. मरुद्गणांसह इंद्र येथेंच जप करीत असतो. त्यावेळीं अश्विनिकुमार व साध्य त्या देवेंद्राची परिचर्या करितात. सूर्यासह चंद्र व ग्रहांसह नक्षत्रें अहोरात्राच्या विभागानें या पुण्यप्रद नदीला अनुसरतात.

राजा, लोकांची जीवनयात्रा चालण्यासाठीं याच नदीचें पवित्र जल शंकरानें गंगाद्वारीं मस्तकावर धारण केलें. हे पांडुपुत्रहो, तुम्ही सर्व एकाग्र मन करून या भगवती देवीच्या समीप जा व तिला वंदन करा.

महात्म्या लोमशाचें हें वचन ऐकून पांडवांनीं नियतचित्त होऊन त्या आकाशगंगेला अभिवादन केलें. नंतर ते सर्व धर्माचरणी पांडुपुत्र ऋषिगणांसह संतुष्ट चित्तानें पुढें जाण्यास निघाले.

(२) तेव्हां त्या नरश्रेष्ठांनीं दूर अंतरावर सर्व दिशांना व्यापणारी व मेरु-पर्वतासारखी श्वेतवर्ण एक अस्थिराशि पाहिली. तेव्हां त्या वीरांना 'तें काय आहे' हें जाणण्याची इच्छा झाली आहे, असें जाणून वाक्यविशारद लोमश म्हणाला–"हे पांडुपुत्रहो, ऐका. श्रीमान् कैलासशिखरासारखी सर्व प्रदेश व्यापणारी ही जी पर्वतप्राय राशि दिसत आहे त्या महात्म्या भौमासुराच्या अस्थि आहेत. या पर्वताच्या पठारावर असलेला तो अस्थींचा ढीग दुसऱ्या पर्वतासारखाच भासत आहे.

हे धर्मराजा, परमात्म्या पुराणपुरुष विष्णूनें इंद्राचें हित करण्याच्या इच्छेनें भौमासुराचा वध केला. तो दैत्य दहा हजार वर्षें तपश्चर्या करून तप, अध्ययन व पराक्रम यांच्या बलावर इंद्रपद मिळविण्याची इच्छा करीत होता. तो दितिपुत्र तपःसामर्थ्यानें व आपल्या बाहुबलानें दुराधर्ष असलेल्या इंद्राचा नित्य पराभव करीत असे. त्यामुळें शक्र त्या दैत्याचें बल व धर्माचरण जाणून भीतीनें उद्विग्न झाला.

हे अनघा, त्या सुरेंद्रानें मनांत अव्यय विष्णूचें चिंतन केलें. तेव्हां तो श्रेष्ठ प्रभु तत्काल त्याच्या पुढें प्रकट झाला. सर्व ऋषि व देव त्या सर्वगामी परमेश्वराचें स्तवन करूं लागले. त्या स्वयंप्रकाश परमात्म्याला पाहून सदैव प्रदीप्त असणारा भगवान् अग्निहि त्याच्या तेजानें पराभूत व निस्तेज झाला.

त्या वरद देवाधिदेव विष्णूला पाहून वज्रधर देवेंद्रानें हात जोडून नमस्कार केला व ज्याच्यापासून त्याला भय होतें, त्याचा वृत्तान्त त्यास नम्रपणें कथन केला.

विष्णु म्हणाला—हे शक्रा, दैत्यश्रेष्ठ भौमासुरापासून तुला भय आहे, हें मी जाणतों. तो असुर तपानें सिद्ध झालेल्या कर्मानें इंद्रपद मिळविण्याचा प्रयत्न करीत आहे. तथापि हे मघवन्, तुझें प्रिय करण्यासाठीं मी त्या तपानें सिद्ध असणाराचेहि प्राण त्याच्या देहापासून वियुक्त करीन. एक क्षणभर थांब.

असें बोलून महातेजस्वी विष्णूनें आपल्या हाताची एक चपराक मारूनच त्या बलाढ्य राक्षसाचे प्राण हरण केले. तेव्हां वज्रप्रहारानें पडणाऱ्या पर्वताप्रमाणें त्याचा विशाल देह भूमीवर पडला. अशा प्रकारें त्या सर्वव्यापी प्रभूनें आपल्या मायेनें ज्याचा वध केला त्या भौमासुराच्या अस्थींची ही पर्वतप्राय राशि आहे.

लोमश—युधिष्ठिरा, अचिंत्य प्रभावशाली विष्णूचें आणखींहि एक अद्भुत कर्म प्रसिद्ध आहे. त्या सर्वेश्वरानें एक शृंगानें युक्त असलेल्या वराहाचें रूप धारण करून पातालांत बुडून नष्ट होणाऱ्या या समग्र पृथ्वीचा उद्धार केला.

युधिष्ठिर—हे भगवन्, शंभर योजनें खालीं जाऊन नष्ट झालेल्या वसुमतीचा त्या सुरेश्वरानें कसा उद्धार केला आणि सर्व जगाला धारण करणारी ही पृथ्वी कोणत्या प्रकारें स्थिर झाली? सर्व वनस्पतींना उत्पन्न करणारी ही शुभ व महाभाग्यवती सृष्टिदेवी कोणाच्या प्रभावानें शंभर योजनें खालीं गेली. परमात्म्याचें हें शक्तिसर्वस्व कोणीं प्रकट केलें? हें सर्व तत्त्वतः ऐकण्याची माझी इच्छा आहे. यास्तव हे ब्रह्मन्, मला तो वृत्तान्त सविस्तर सांग. कारण या कथांचा तूंच आश्रय आहेस.

( ३ ) लोमश—युधिष्ठिरा, तूं मला जी कथा विचारीत आहेस, ती सर्व मी तुला सविस्तर सांगतों ऐक. हे राजा, पूर्वी कृतयुगामध्यें प्राण्यांची भयंकर वृद्धि झाल्यामुळें पुरातन आदिदेवानें स्वतःच यमत्व स्वीकारिलें. तो बुद्धिमान् देवाधिदेव यमाचा अधिकार चालवीत असतां पृथ्वीवर कोणीं मरण पावलें नाहीं व त्यामुळें उत्पन्नहि झालें नाहीं.

जल जसें वेगानें वाढत जातें, त्याप्रमाणें असंख्य पक्ष्यांचे समूह, गवे, मृग, इतर हिंस्र पशूंचे कळप व सहस्रावधि मनुष्यें यांची पृथ्वीतलावर अतिशय वृद्धि झाली. याप्रमाणें प्राण्यांची अतिशय गर्दी झाली असतां त्यांच्या भारानें धरणी शंभर योजनें खालीं गेली. तेव्हां ती भारानें व्यथित व अति श्रांत झालेली वसुंधरा श्रेष्ठ नारायणाला शरण गेली.

पृथ्वी—हे भगवन्, तुझ्या प्रसादानेंच मी दीर्घकाल या स्थितींत राहिलें आहें. पण आतां मात्र मी या अति भारानें व्याकुल झालें आहें. मला तो सहन करवत नाहीं. हे विभो, माझा हा भार कमी करण्यास तूंच समर्थ आहेस; मी शरण आलें आहें. मजवर प्रसन्न हो.

वसुमतीची ही प्रार्थना ऐकून हृष्ट झालेला प्रभु सुश्राव्य अक्षरांनीं युक्त असलेलें असें वचन बोलला.

विष्णु—हे आर्त वसुधारिणि, तूं भिऊं नको. ज्यायोगें तुझा भार उतरेल, असें कार्य मी करीन.

लोमश—हे वसुधाधिपा, भगवान् त्रैलोक्याधीशानें पर्वतरूपी कुंडलें धारण करणाऱ्या वसुंधरेला असें आश्वासन देऊन निरोप दिला व त्या महा-तेजस्वी जगन्नायकानें एक श्रृंग असलेल्या वराहाचें रूप धारण केलें. अग्नीमध्यें जसा जसा धूप घालावा तसा तसा तो ज्याप्रमाणें प्रज्वलित होत जातो त्याप्रमाणें तो भगवन् आपल्या आरक्त नेत्रांनीं जणुंकाय भयच उत्पन्न करीत आपल्या कांतीनें त्या प्रदेशीं वृद्धि पावला.

हे राजा, त्या वराहरूपी वेदात्म्यानें आपल्या देदीप्यमान एका श्रृंगावर पृथ्वीला शंभर योजनें वर उचलून धरिलें. तो त्या धरणीचा उद्धार करीत असतां सर्वत्र क्षोभ उत्पन्न झाला. देव आणि तपोधन ऋषि क्षुब्ध झाले. स्वर्ग, पृथ्वी व अंतरिक्ष यांत हाहाकार उडाला. देव किंवा मानव यांतील कोणालाच स्वास्थ्य वाटेनासें झालें.

तेव्हां ऋषिगणांसह सर्व देव ब्रह्मदेवापाशीं गेले. आपल्या देदिप्यमान ऐश्वर्यानें जणुंकाय सर्व दिशांना दिपवीत कमलासनावर बसलेल्या लोकसाक्षी पितामहाच्या समीप जाऊन ते सर्व देव हात जोडून त्याला असें वचन बोलले—"हे भगवन्, हे सर्व लोक अस्वस्थ झाले असून चराचर जगत् व्याकुळ झालें आहे. समुद्रहि क्षुब्ध झाला आहे व ही समग्र पृथ्वी शंभर योजनें खालीं गेली आहे! हें आहे तरी काय? कोणाच्या प्रभावानें हें जगत् असें व्याकुळ झालें आहे? हे कमलोद्भवा, आम्हांला सत्वर याचें कारण सांग. कारण आमचें देहभान नाहींसें झालें आहे."

ब्रह्मदेव—हे अमरहो, तुम्हांला या वेळीं असुरापासून यत्किंचित्हि भय नाहीं. हा सर्व क्षोभ कोणीं उत्पन्न केला आहे तें सांगतों, ऐका—"हा जो सर्वगामी श्रेष्ठ वेदात्मा स्थित आहे, त्याच्या प्रभावानें हा त्रैलोक्याचा क्षोभ झाला आहे.

ही जी समग्र पृथ्वी शंभर योजनें खालीं गेली होती, तिचा परमात्म्या विष्णूनें पुनः उद्धार केला आहे. त्या वसुमतीला वर उचलीत असतां हा सर्व क्षोभ उत्पन्न झाला आहे, हें तुम्ही निश्चित समजा व आपला संशय घालवा.

देव—हे प्रभो, तो हृष्ट झालेला परमात्मा कोठें आहे? तो कोणत्या प्रदेशांत राहून पृथ्वीचा उद्धार करीत आहे? तें आम्हांला सांग. म्हणजे आम्ही सर्व तेथें जाऊं.

**ब्रह्मदेव**—हे सुरगणहो, ठीक आहे. तुमचें कल्याण असो. हा पहा, भगवान् येथें समीपच इंद्राच्या नंदनवनांत स्थित असून श्रीमान् गरुड त्याच्या जवळ शोभत आहे. तो लोकभावन भगवान् वराहरूप धारण करून पृथ्वीचा उद्धार करीत असतां प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें भासत आहे. त्याच्या वक्षःस्थलावरील श्रीवत्स चिह्न स्पष्ट दिसत आहे. हे विबुधहो, चला आपण सर्व त्या अनामय परमात्म्याचें दर्शन घेऊं या.

**लोमश**—हे युधिष्ठिरा, नंतर ते सर्व देव ब्रह्मदेवाला पुढें करून व महात्म्या पद्मनाभाचें दर्शन घेऊन, त्याचें वचन श्रवण केल्यावर त्याची अनुज्ञा घेऊन निघाले व आपापल्या स्थानीं आल्या मार्गानें निघून गेले.

**वैशंपायन**—हे पारिक्षिता, ही कथा ऐकून संतुष्ट झालेले ते सर्व पांडव लोमशानें दाखविलेल्या मार्गानें शीघ्रगतीनें पुढें जाऊं लागले. ३. ७. १४२.

---

## अध्याय १४३ वा.

[ १ पांडवांनीं गंधमादनपर्वतावर प्रवेश करतांच झालेली अतिवृष्टि व झंझावात. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, त्या मार्गस्थ शूर पांडवांनीं त्या वेळीं धनुष्यें धारण केलीं असून बाणांचे भाते पाठीवर बांधिले होते. ते अमित पराक्रमी श्रेष्ठ धनुर्धर गोधांगुलित्राण व खड्गें यांनीं युक्त होऊन पांचाली व द्विजश्रेष्ठ यांच्यासह गंधमादनपर्वताकडे जाण्यास निघाले. त्या वीरांनीं मार्गामध्यें अनेक सरोवरें, नद्या, पर्वत, वनें आणि विशाल वृक्ष पाहिले. त्यांची पर्वतशिखरावर घनदाट छाया पसरलेली होती. तो देवर्षिगणांनीं सेवन केलेला प्रदेश नित्य फल-पुष्पांनीं युक्त होता.

ते फलमूलाशन करणारे धर्मज्ञ पांडुपुत्र अंतःकरण समाहित करून त्या दुर्गम प्रदेशांतील उंच-सखल भाग व नानाप्रकारचे पशु यांस पहात संचार करूं लागले. याप्रमाणें दीर्घ मार्गाचें आक्रमण करीत ते महात्मे गंधमादन पर्वतावर चढले. तो श्रेष्ठ पर्वत ऋषि, सिद्ध व देव यांनीं युक्त, गंधर्व व अप्सरा यांना प्रिय आणि किन्नरांनीं व्याप्त होता.

हे राजन्, पांडववीरांनीं त्या पर्वतावर प्रवेश करितांच प्रचंड झंझावात सुटून भयंकर पर्जन्यवृष्टि सुरू झाली. वृक्षांचीं पानें गळून पडूं लागलीं व उडणाऱ्या धूलीनें पृथ्वी, अंतरीक्ष व स्वर्ग यांस एकाएकीं आच्छादित केलें. आकाश धूलीनें व्याप्त झाल्यामुळें कांहींच कळेनासें झालें. परस्परांशीं भाषण करणेंहि अशक्य झालें. नेत्र धूलीनें आवृत्त झाल्यामुळें ते पांडव एकमेकांस दिसेनातसे झाले.

हे परिक्षित्पुत्रा, धूलीयुक्त प्रचंड वायु त्यांना जणुकाय ओढून नेऊं लागला. वायूनें भग्न झालेले वृक्ष वारंवार भूमीवर पडूं लागले. त्यांचा व इतर वृक्षांचाहि भयंकर कडकडाट होऊं लागला. वायूनें मोहित झालेल्या त्या सर्वांना आतां आकाश कोसळून पडतें, भूमि विदीर्ण होते व पर्वत भग्न होतात कीं काय, असें वाटूं लागलें. तेव्हां त्या महावायूच्या वेगातिशयानें भयभीत झालेले ते वीर जवळपास असलेले वृक्ष, वारुळें व खळगे हातांनीं चाचपून त्यांच्या आश्रयानें लपून उभे राहिले. महाबलाढ्य भीमसेन धनुष्य धारण करून व कृष्णेला हातीं धरून एका वृक्षाचा आश्रय करून उभा राहिला, धर्मराज व धौम्य महावनांत लपून बसले, सहदेव अग्निहोत्रें घेऊन पर्वताच्या आश्रयाला राहिला. संत्रस्त झालेला नकुल, महातपस्वी ब्राह्मण व लोमश प्रचंड वृक्षांचा आश्रय करून लपून बसले. कांहीं वेळानें तो भयंकर वायु थांबल्यामुळें धूलि शांत झाली व प्रचंड जलधारांची वृष्टि सुरू झाली.

त्या वेळीं जणुकाय वज्र फेंकल्याप्रमाणें फार मोठा कडकडाट झाला. मेघांतील विजा चमकूं लागल्या. गारांसह भयंकर जलवृष्टि झाली. शीघ्र वायूनें प्रेरणा केलेल्या जलधारांचा त्या पर्वतावर एकसारखा वर्षाव सुरू झाला; त्या पर्वतावरील नद्यांना भयंकर पूर आले. त्यामुळें सागरगामिनी नद्या तुडुंब भरून त्या सर्व प्रदेशांतून वाहूं लागल्या. त्या नद्यांचें जल वेगानें वहात असल्यामुळें फेनयुक्त व गढूळ झालें. नद्यांचा ओघ प्रचंड वृक्षांना ओढून नेत असल्यामुळें त्यांचा फार मोठा घोष होत होता.

कांहीं वेळानें वारा थांबून तो शब्द शांत झाला असतां नद्यांचें पाणी उतरलें व सूर्य दिसूं लागला. तेव्हां ते सर्व वीर पांडव हळू हळू आपापल्या लपलेल्या स्थानांतून बाहेर पडले व एकत्र जमून पुनः गंधमादन पर्वताकडे जाण्यास निघाले. ३. ७. १४३.

## अध्याय १४४ वा.

[ १ मार्गांत द्रौपदीची मूर्च्छा. २ युधिष्ठिराचा विलाप. ३ पांडव व ब्राह्मण यांच्या विविध उपचारांनीं द्रौपदीची मूर्च्छानिवृत्ति. ४ युधिष्ठिराच्या अनुज्ञेनें भीमानें स्मरण करतांच घटोत्कचाचें आगमन. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, ते महात्मे पांडव एक कोसभर पुढें गेले असतां श्रांत झालेली द्रौपदी पायांनीं पुढें चालून जाण्यास असमर्थ होऊन तेथेंच बसली. ती सुकुमारी पांचाली पवन व पर्जन्य यांच्या योगानें दुःखाकुल झाली होती; त्यामुळें त्या तपस्विनीला मूर्च्छा येऊं लागली. त्या वेळीं ती कमललोचना राजकन्या अंगाला कंप सुटल्यामुळें आपले दोन्ही हात मांड्यावर टेंकून उभी राहिली. पण हत्तीच्या सोंडेप्रमाणें पुष्ट असलेल्या आपल्या मांड्यांवर हात टेकीत असतांहि ती कांपत होती. ती साध्वी शेवटीं एखाद्या कदलीप्रमाणें एकदम भूमीवर पडली.

तेव्हां भग्न झालेल्या लतेप्रमाणें ती कोमलांगी पडत असतां चपल नकुलानें धांवत जाऊन तिला सांवरून धरिलें व तो राजपुत्र धर्मराजाला म्हणाला—“ हे राजन्, ही कमलपत्राक्षी पांचालराजकन्या श्रांत होऊन भूमीवर पडली आहे, हिच्याकडे पहा. ही मंदभाषिणी व मृदुगामिनी कृष्णा असलें दुःख भोगण्यास पात्र नसतांहि तिला हें असलें असह्य दुःख प्राप्त झालें आहे. ती श्रमानें क्लान्त झाली आहे. यास्तव हे महाराज, तूं तिला धीर दे.

वैशंपायन—हे राजा, नकुलाचें हें वचन ऐकतांच युधिष्ठिर, भीम व सहदेव अतिशय दुःखाकुल होऊन एकदम धांवतच आले. त्या वेळीं ती राजपत्नी निस्तेज व कृश झालेली दिसत होती. तिला मांडीवर घेऊन दुःखार्त झालेला धर्मात्मा युधिष्ठिर असा शोक करूं लागला.

( २ ) युधिष्ठिर—हे साध्वि, द्वारपालांनीं रक्षण केलेल्या राजमंदिरांतील उत्कृष्ट शय्येवर शयन करण्यासच उचित असलेली व सुखोपभोगासच सर्वथा पात्र असलेली तूं आज भूमीवर अस्ताव्यस्त पडून कशी शयन करीत आहेस ! अरे अरे, माझ्या दुष्ट कृतीमुळें आज या सम्राज्ञींचे हे सुकुमार चरण व हें कमलासारखें मुख कसें म्लान व कृष्णवर्ण होऊन गेलें आहे, पहा ! मीं मूढानें द्यूतलोलुप होऊन आपल्यावर हें केवढें संकट ओढवून घेतलें आहे ! पशूंनीं व्याप्त

असलेल्या या घोर अरण्यांत संचार करणाऱ्या मीं या सुकुमारी कृष्णेलाहि येथें आणून केवढ्या अनर्थांत टाकिलें आहे, पहा.

हे कल्याणि, पांडवपतींना प्राप्त होऊन तूं सुखी होशील, असें तुझा पिता द्रुपदराजा विवाहप्रसंगीं तुला अर्पण करीत असतांना म्हणाला होता. परंतु तें सर्व खोटें ठरलें. भीमा, द्रुपदाच्या इच्छेप्रमाणें ही राजनंदिनी सौख्याला प्राप्त न होतां उलट मज पातक्याच्या दुष्कर्मामुळें आज या वनांतील कठिण भूमीवर मूर्च्छित होऊन पडली आहे.

( ३ ) वैशंपायन—राजा, याप्रमाणें धर्मराज युधिष्ठिर विलाप करीत असतां धौम्यप्रभृति सर्व द्विजोत्तम तेथें आले. त्यांनीं आशीर्वचनांनीं युधिष्ठिराला आश्वासन देऊन व त्याचा सत्कार करून राक्षसांचा नाश करणाऱ्या मंत्राचा जप व क्रिया केल्या. ते श्रेष्ठ ऋषि अशाप्रकारें शांतीसाठीं मंत्र पठन करीत असतां पांडवांनीं आपले शीतल कर तिच्या अंगावरून वारंवार फिरविले. त्याच वेळीं जलमिश्र शीतल वायूहि वाहूं लागला. त्या सुखकर स्पर्शांनीं पांचाली हळुहळू सावध झाली.

तेव्हां देहभानावर आलेल्या त्या दीन तपस्विनीला विश्रांति मिळावी, म्हणून पांडवांनीं कृष्णाजिनें पसरून त्यावर तिला निजविलें. नंतर नकुल-सहदेवांनीं धनुष्याच्या दोरीचे घट्टे पडलेल्या आपल्या कणखर हातांनीं त्या चारुगात्रीचे शुभलक्षणांनीं युक्त असलेले आरक्त चरण हळू हळू दाबले. धर्मराजानेंहि तिला आश्वासन दिलें व तो कुरुश्रेष्ठ भीमसेनाला असें वचन बोलला.

युधिष्ठिर—हे वृकोदरा, हा प्रदेश अनेक पर्वतांनीं युक्त असून विपुल हिमानें दुर्गम झाला आहे. हे भीमा, ही पांचाली अशा मार्गांतून कशी बरें जाऊं शकेल !

भीमसेन—हे राजन्, तुला, या द्रुपद राजकन्येला आणि या दोघां नकुल-सहदेवांना खांद्यावर बसवून मी स्वतः घेऊन जाईन. हे राजेंद्रा, तूं खिन्न होऊं नको. शिवाय हिडिंबेचा पुत्र घटोत्कच महा पराक्रमी, आकाशगामी व माझ्यासारखाच बलवान् आहे. हे महाराज, तूं आज्ञा केल्यास तो आपणां सर्वांसच उचलून नेईल.

( ४ ) वैशंपायन—जनमेजया, याप्रमाणें भीमसेनानें युधिष्ठिराची अनुज्ञा घेऊन आपल्या राक्षसपुत्राचें स्मरण केलें. तेव्हां पित्यानें स्मरण करतांक्षणींच

तो धर्मात्मा घटोत्कच तेथें प्रकट झाला व पांडवांना आणि ब्राह्मणांना वंदन करून तो महाबाहु हात जोडून उभा राहिला.

नंतर तो बलाढ्य भीमपुत्र आपल्या भयंकर पराक्रम करणाऱ्या पित्याला म्हणाला—'हे तात, तूं माझें स्मरण केलेंस म्हणून मी तुझ्या सेवेसाठीं आपल्या अनुयायी राक्षसांसह शीघ्र गतीनें येथें आलों. हे महाबाहो, मला आज्ञा कर म्हणजे मी तें सर्व कार्य निःसंशय करीन.

राजा, घटोत्कचाचें हें भाषण ऐकून भीमसेनानें आपल्या राक्षसपुत्राला मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें. ३.७.१४४.

---

## अध्याय १४५ वा.

[ १ धर्मराजाच्या आज्ञेनें घटोत्कचानें द्रौपदीला व इतर राक्षसांनीं द्विजांसह पांडवांना स्कंधांवरून वाहून नेणें, लोमशाचें आकाशमार्गानें गमन. २ विविध प्रदेश व कैलास पर्वत पहात त्यांचें नर-नारायणाश्रमांत उतरणें. ३ आश्रम, बदरी व भागीरथी यांचें वर्णन. ४ तपोधन ऋषींनीं सत्कार केला असतां पांचाली-सह पांडवांचा तेथें हृष्टचित्तानें विहार. ]

( १ ) युधिष्ठिर—हे भीमा, हा तुझा औरस पुत्र व आमचा भक्त धर्मज्ञ, बलवान्, शूर व सत्यनिष्ठ आहे. हा राक्षसश्रेष्ठ आम्हांला सत्वर वाहून नेऊं दे. हे भयंकर पराक्रमी भीमा, तुझ्या बाहुबलानें मी आज पांचालीसह सुख-रूपपणें गंधमादन पर्वतावर जाईन.

वैशंपायन—राजा, भ्रात्याचें हें वचन ऐकून भीमसेनानें आपल्या शत्रु-कर्षण घटोत्कच पुत्राला अशी आज्ञा केली. "हे घटोत्कचा, ही तुझी अपरा-जित माता अतिशय श्रांत झाली आहे. तूं तिला खांद्यावर घेऊन, पीडा होणार नाहीं अशाप्रकारें, मंदगतीनें अंतरिक्षांतून जा. हे वत्सा, तुझें कल्याण असो. आम्हांमध्यें तूंच आकाशमार्गानें जाण्यास समर्थ असून इच्छेप्रमाणें गमन कर-णारा व बलवान् आहेस.

घटोत्कच—हे तात, धर्मराज, धौम्य, पांचाली व नकुल-सहदेव या सर्वांना वाहून नेण्यास मी एकटाहि समर्थ आहें आणि आतां तर मला इतर राक्षसांचेंहि साह्य आहे. मग आपल्याला काळजी कसली ! मला साह्य कर-

णारे हे शेकडों शूर, आकाशगामी व कामरूपी राक्षस ब्राह्मणांसह या सर्वांना वाहून नेतील.

जनमेजया, असें बोलून पांडवांच्या मध्यभागीं उभ्या असलेल्या त्या वीर घटोत्कचानें कृष्णेला आपल्या स्कंधावर बसविलें व इतर राक्षसांनीं पांडवांना वाहून नेलें. अनुपम तेजस्वी 'लोमश'-महर्षि मात्र जणुकाय अपर सूर्याप्रमाणेंच स्वप्रभावानें आकाशमार्गानें निघाला. घटोत्कचाच्या आज्ञेवरून भयंकर पराक्रमी राक्षस इतर सर्व ब्राह्मणांना आपल्या खांद्यांवर बसवून आकाशमार्गानें चालले.

( २ ) याप्रमाणें ते सर्व पांडवश्रेष्ठ रम्य वनें व उपवनें पहात 'विशाला बदरी'-कडे जाऊं लागले. अतिवेगवान् व चपल राक्षसांनीं वाहून नेल्यामुळें ते वीर अतिशय दूर असलेल्या प्रदेशींहि अगदीं समीप असल्याप्रमाणें सत्वर जाऊन पोंचले.

त्या महात्म्यांनीं मार्गामध्यें म्लेच्छांनीं व्याप्त असलेले देश, नाना रत्नांच्या खाणी, आणि विविध धातूंनीं युक्त, अशा पर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या अनेक लहान लहान टेकड्या अवलोकन केल्या. विद्याधर, वानर, किन्नर, यक्ष, गंधर्व, मयूर, चमर, 'रुरु'-जातीचे मृग, वराह, गवे आणि महिष यांनीं व्याप्त, नदीजलानें परिवेष्टित, नानाविध पक्षी, पशु व वानर यांनीं सुशोभित आणि मदोन्मत्त पक्षी व वृक्ष यांनीं आवृत्त असलेले असंख्य प्रदेश त्यांच्या दृष्टीं पडले.

याप्रमाणें अनेक देशांचें व उत्तर कुरूंचें उल्लंघन केल्यानंतर विविध आश्चर्यांनीं युक्त असलेला श्रेष्ठ कैलास पर्वत त्यांनीं पाहिला. त्याच्या समीपच दिव्य वृक्षांनीं युक्त असलेला नर-नारायणाश्रमहि त्यांस दिसला. त्या आश्रमाच्या सभोंवार असलेले वृक्ष सर्वदा फल-पुष्पांनीं युक्त असतात.

नंतर त्या धर्मात्म्यांना मनोरम बदरीचें दर्शन झालें. त्या दिव्य वृक्षाच्या शाखा वर्तुलाकार असून त्यांची घनदाट छाया पसरली होती. त्यांचीं पानें टवटवीत, मृदु व अविरल होतीं. विशाल शाखांनीं युक्त असलेला तो तेजस्वी वृक्ष अतिशय शोभत होता. राजा, महर्षिगण मधाचा स्राव करणाऱ्या मधुर व स्वादिष्ट फलांनीं युक्त असलेल्या त्या श्रेष्ठ वृक्षाचें सतत सेवन करीत असत. त्या वृक्षावर मदानें हृष्ट झालेले नाना प्रकारचे पक्षीहि नित्य वास करीत होते.

देव-गंधर्वांनीं सेवन केलेला तो प्रदेश डांस व माशा यांनीं रहित, हिरव्या चार तृणानें व्याप्त व विपुल कंद-मूलें व फळें यांनीं युक्त होता. तो भूमीचा भाग सपाट, कंटकरहित व हिमासारखा मृदु असून तेथें तो बदरीवृक्ष निसर्गतःच उत्पन्न झाला होता.

त्या वृक्षाच्या समीप येतांच ब्राह्मणांसह ते सर्व महात्मे राक्षसांच्या स्कंधावरून हळू हळू खालीं उतरले. नंतर त्या द्विजश्रेष्ठांसह पांडवांनीं नर-नारायणांच्या रम्य आश्रमाचें दर्शन घेतलें. तो पुण्यप्रद आश्रम अंधकारानें रहित असून त्याला सूर्यकिरणांचा स्पर्शहि होत नसे. हे महाराज, ऋग्यजुःसामांचें पठन करणाऱ्या ऋषिगणांनीं व्याप्त असलेला तो आश्रम क्षुधा, तृषा, शीतोष्ण इत्यादि द्वंद्वरहित व शोकाचा नाश करणारा असून अधार्मिक पुरुषांचा तेथें प्रवेश होणेंहि शक्य नव्हतें.

( ३ ) तो पवित्र आश्रम बलि, होम, पूजा, सडा-संमार्जन यांनीं युक्त असून दिव्य पुष्पांच्या मालांनीं सुशोभित केलेला होता. त्या आश्रमांत विशाल अग्निशाला असून ती स्रुक्-स्रुवादि यज्ञोपयोगी शुभ उपकरणांनीं व्याप्त होती. तेथें मोठाले जलकलश व शिंकीं शोभत होतीं.

ब्रह्मघोषानें नादित झालेला तो आश्रम सर्व प्राण्यांचें आश्रयस्थान असून श्रमपरिहार करणारा होता. सत्य संकल्पादिकांमुळें त्या आश्रमाची योग्यता अवर्णनीय होती. तेथें रहाणारे सर्व जितेंद्रिय ब्रह्मर्षि व मुमुक्षु यति फलमूलाशन करणारे, दान्त, रम्य कृष्णाजिन धारण करणारे, तपानें सूर्य किंवा अग्नि यांच्यासारखे तेजस्वी व आत्मचिंतन करणारे होते. ते सर्व ब्रह्मवेत्ते ब्रह्मस्वरूपाला प्राप्त झालेले होते.

अशा त्या महातेजस्वी श्रेष्ठ ऋषींच्या समीप धर्मराज युधिष्ठिर शुचिर्भूत व नियतचित्त होऊन भ्रात्यांसह गेला. तेव्हां त्या महर्षींनीं दिव्य दृष्टीनें 'युधिष्ठिर आला आहे' असें जाणलें व त्या स्वाध्यायनिरत मुनींनीं मोठ्या प्रेमानें त्याच्या समीम जाऊन आशीर्वादपूर्वक त्याचें स्वागत केलें. अग्नितुल्य तेजस्वी असलेल्या त्या मुनींनीं निर्मल जल, कंद-मूल, पुष्पें व फळें समर्पण करून त्याचा सत्कार केला. तेव्हां युधिष्ठिरानेंहि प्रेमानें केलेल्या त्यांच्या त्या सत्काराचा विनयपूर्वक स्वीकार केला.

(४) नंतर कृष्णेसह पांडवांनीं त्या इंद्रभुवनासारख्या पवित्र आश्रमांत प्रवेश केला. तो दिव्य सुगंधानें युक्त असलेला स्वर्गतुल्य आश्रम अतिशय रम्य होता. त्या आश्रमांत धर्मात्म्या युधिष्ठिरानें भ्राते व सहस्रावधि वेदपारग ब्राह्मण यांसह प्रवेश केला. तेथें देव-देवर्षींनीं पूजित व भागीरथीनें शोभणारें 'नर-नारायण'-स्थान पाहून ते सर्व नरश्रेष्ठ पांडव अतिशय संतुष्ट झाले. ब्रह्मर्षिगणानें सेवित व मधुस्राव करणाऱ्या फलांनीं युक्त अशा त्या दिव्य स्थलास प्राप्त होऊन ते महात्मे ब्राह्मणांसह तेथें राहिले व विहारादिकांनीं आपल्या मनाला रमवूं लागले.

नानाविध पक्ष्यांनीं युक्त असलेला मैनाकपर्वत, त्याचें सुवर्णमय शिखर व त्याच्या समीपच असलेलें शुभ बिंदुसरोवर यांस अवलोकन करीत ते पांडव कृष्णेसह सर्व ऋतूंतील पुष्पांनीं युक्त असणाऱ्या श्रेष्ठ अरण्यांत विहार करूं लागले. तें वन विकसित कुसुमांनीं युक्त होतें. त्यांतील वृक्ष फलभारांनीं नम्र झालेले होते. तो प्रदेश असंख्य कोकिलांनीं सुशोभित व घनदाट कोमल पानांच्या शीतल छायेनें मनोरम दिसत होता. प्रसन्न जलानें व विचित्र कमलांनीं युक्त असलेलीं अनेक सुंदर सरोवरें पहाण्यांत पांडवांचें चित्त अतिशय रमलें.

त्याचप्रमाणें तेथें पुण्यगंधयुक्त वायु आपल्या सुखकर स्पर्शानें द्रौपदीसह चारी पांडवांना आल्हाद देत वाहूं लागला. नंतर त्या महात्म्यांनीं बदरी वृक्षाच्या समीपच असलेली तीर्थश्रेष्ठ भागीरथी आणि निर्मल कमलांनीं युक्त असलेली 'सीता'-नामक नदी पाहिली. त्या नदीच्या घाटाला रत्नें व पोंवळीं जडविलीं होतीं. तें नदीतीर मनःप्रसाद वाढविणाऱ्या दिव्य पुष्पयुक्त वृक्षांनीं सुशोभित झालें होतें.

हे जनमेजया, अशाप्रकारच्या त्या परम दुर्गम प्रदेशीं देवर्षि संचार करीत असत. त्या विशाला बदरीच्या सभोंवारचा प्रदेश पहाणाऱ्या त्या कुरुश्रेष्ठांनीं भागीरथीच्या पवित्र जलांत देव व ऋषि यांना उद्देशून तर्पण केलें. याप्रमाणें परम शुचिर्भूत झालेले ते नरश्रेष्ठ ब्राह्मणांसह तेथें तर्पण व जप करीत राहिले. राजा, द्रौपदीची विचित्र क्रीडा अवलोकन करीत ते देवतुल्य पांडव तेथें अतिशय रमले. ३. ७. १४५.

---

## अध्याय १४६ वा.

[ १ वायूनें उडवून आणलेलें सौगधिक कमल पाहून द्रौपदीनें तशीं आणखीं कमलें आणून देण्याविषयीं भीमाची केलेली प्रार्थना. २ कमलें आणण्यासाठीं भीमाचें ईशान्यदिशेकडे गमन, गंधमादन पर्वत, त्यावरील अरण्य, सरोवरें व पशु-पक्षी यांचें वर्णन. ३ भीमाच्या औद्धत्यामुळें प्राण्यांस झालेली पीडा. ४ हनुमानानें केलेला मार्गनिरोध. ]

( १ ) **वैशंपायन—जनमेजया, धनंजयाच्या भेटीची इच्छा करणारे ते सर्व पांडववीर अतिशय शुचिर्भूतपणानें सहा रात्रीं तेथें राहिले. एके दिवशीं ईशान्येकडून वारा वहात असतां यदृच्छेनें तेथें एक सूर्याप्रमाणें तेजस्वी सहस्र पाकळ्यांचें दिव्य कमल येऊन पडलें. तेव्हां पांचालीनें भूमीवर पडलेलें तें सुगंधयुक्त मनोरम कमल उचलून घेतलें.**

**नंतर हे राजन्, तें अप्रतिम दिव्य शोभायुक्त सौगंधिक कमल पाहून अतिशय आनंदित झालेली ती शुभ याज्ञसेनी भीमसेनाला म्हणाली—"हे प्रभो, हें दिव्य पुष्प पहा. याचा मनोरम आकार व उत्तम सुगंध माझ्या मनाला आनंद देत आहे. हे परंतपा, मी हें कमल धर्मराजाला देईन. परंतु आपण येथून जेव्हां परत जाऊं, तेव्हां काम्यक वनांतील आपल्या आश्रमांत नेण्यासाठीं मला या जातीचें आणखीं एक तरी कमल आणून दे. हे वीरा, तुझें मजवर जर प्रेम असेल, तर असलीं विपुल कमलें घेऊन ये. तीं सर्व काम्यक वनांत नेण्याची माझी इच्छा आहे.**

**(२) राजन्, भीमसेनाला असें बोलून ती निष्पाप पतिव्रता द्रौपदी तें सुंदर पुष्प घेऊन धर्मराजाकडे गेली आणि महाबलाढ्य भीमसेन आपल्या राज्ञीचा अभिप्राय जाणून त्या प्रिय पत्नीची इच्छा पुरविण्यासाठीं तेथून निघाला. ज्या दिशेकडून तें पुष्प वाऱ्यानें उडून आलें होतें व जिकडून वारा वहात होता, त्या दिशेकडे मुख करून तो पुरुषर्षभ आणखीं तसलीं पुष्पें आणण्यासाठीं त्वरेनें निघाला. त्या शूर वायुपुत्रानें धनुष्य व सुवर्णपुंखयुक्त सर्पतुल्य विषारी बाण बरोबर घेतले. त्या वेळीं तो वृकोदर सिंहाप्रमाणें क्रुद्ध व हत्तीप्रमाणें मत्त दिसत होता. याप्रमाणें प्रचंड धनुष्य-बाण धारण करून जाणाऱ्या त्या बलाढ्य भीमसेनाला सर्व प्राण्यांनीं पाहिलें.**

**त्या पृथापुत्राला ग्लानि किंवा वैक्लव्य कसें तें ठाऊकच नव्हतें. देहाची ग्लानि व चित्ताची व्याकुलता यांच्या अभावीं भयहि नव्हतें. तो वीर निर्भय**

असल्यामुळें त्याला 'मी यत्नानें कोणत्याहि दुर्गम प्रदेशीं जाईन' असा उत्साह वाटत होता. त्यामुळें त्या वायुपुत्राला भीति व संभ्रमहि स्पर्श करूं शकले नाहींत.

याप्रमाणें भय व मोह यांनीं रहित असलेला तो बलवान् भीमसेन केवल स्वतःच्या बाहुबलाचा आश्रय करून द्रौपदीला इष्ट असलेल्या पुष्पांचा शोध करीत त्या पर्वताच्या समीप जाऊन पोंचला. तो पर्वत वृक्ष, लता व गुल्म यांनीं आवृत्त झालेला असून त्यावरील शिला नीलवर्ण होत्या. किन्नरांचा नित्य संचार होत असलेल्या त्या शुभ पर्वतावर भीमसेन चढून गेला. तेव्हां नानाप्रकारच्या वर्णांनीं चित्र-विचित्र आणि धातु, वृक्ष, पशु व पक्षी यांनीं व्याप्त झालेलें तें पर्वतशिखर जणुं काय पृथ्वीचा वर उचललेला सर्वभूषणयुक्त एक हातच आहे, असा त्या वीराला भास झाला.

त्या रमणीय गंधमादन पर्वतावर फिरत असतां मनामध्यें त्या पुष्पाचेंच स्मरण करीत असलेल्या भीमाचे नेत्र देव, ऋषि, गंधर्व इत्यादिकांच्या लीलांमध्यें आसक्त झालें. तो महापराक्रमी वीर कोकिलांचें कूजन व भ्रमरांचा गुंजारव ऐकत आणि सर्व ऋतूंतील पुष्पांचा वास घेत असतां त्याचे नेत्र, श्रोत्र व मन हीं सर्व त्यांवर लुब्ध झालीं. तथापि तो नरश्रेष्ठ इष्ट पुष्पांच्या प्राप्तीसाठीं शोधकदृष्टीनें सर्वत्र निरीक्षण करूं लागला.

त्या पर्वतशिखरावरील विविध पुष्पांच्या उत्कट गंधाचा सुवास घेऊन तो स्वतः एखाद्या मत्त गजाप्रमाणें उन्मत्त झाला. गंधमादनावरील शीत, मंद व सुगंधयुक्त पवित्र वायु त्याला वारंवार स्पर्श करीत होता. त्यामुळें त्याचा तो पिता आपल्या बलाढ्य पुत्राचे श्रम स्वतःच्या सुखावह आलिंगनानें घालवीतच आहे कीं काय, असा भास झाला व भीमाच्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्या शत्रुनाशक वायु-पुत्रानें इष्ट असलेल्या पुष्पासाठीं यक्ष, गंधर्व, देव व ब्रह्मर्षिगण यांनीं सेवन केलेल्या त्या शैलाकडे सूक्ष्म दृष्टीनें पुनः अवलोकन केलें.

ज्याप्रमाणें एखादा धार्मिक पुरुष आपल्या अंगुलींनीं ललाटादि स्थानीं विचित्र त्रिपुंड्र रचितो, त्याप्रमाणें तो पर्वत पीत, श्वेत व कृष्णवर्ण धातूंनीं रंजित झालेल्या त्रिपुंड्राकार सप्तपर्णादि पत्रांनीं जणुं काय अनुरक्तच झाला होता. त्या पर्वताच्या सभोंवार मेघ येऊन चिकटले होते. त्यामुळें पंखयुक्त असलेला

तो गिरिश्रेष्ठ जणुं काय नृत्यच करीत आहेसें भासलें. त्याच्या अंगावरून प्रचंड जलप्रवाह वहात होते; त्यामुळें त्या महाशैलानें आपल्या गळ्यांत मौक्तिक-हारच घातले आहेत, असा भीमसेनाला भास झाला.

त्या पर्वताच्या दऱ्या, कडे, त्यावरील लताकुंज व निर्झरोदक इत्यादि सर्वच अतिशय रमणीय दिसत होतें. अप्सरांच्या नूपुरांचा ध्वनि ऐकून त्यावरील मत्त मयूर नृत्य करीत होते. त्या शैलावरील विशाल शिलातल व शयन करण्यास योग्य असलेले प्रशस्त पाषाण, यांवर दिग्गजांनीं आपल्या दंताग्रांनीं घर्षण केलें होतें. सखल प्रदेशाकडे संथपणें वहाणाऱ्या नदीजलांच्या योगानें त्या महाशैलाच्या अंगावरील शुभ्र उत्तरीय वस्त्र खालीं घसरतच आहे, असा भास झाला.

ज्यांनीं कोवळ्या गवतांचे ग्रास मुखांत घेतले आहेत व ज्यांना भय कसें तें ठाऊकच नाहीं, अशा समीपवर्ती मृगांकडून कुतूहलानें पाहिला जाणारा हा वायुपुत्र भीम आपल्या वेगानें लतासमूहांस अनेकप्रकारें हालवीत, हृष्टचित्तानें खेळतच त्या पर्वतावर इतस्ततः फिरूं लागला. तो कमलनयन पांडव त्या वेळीं आपल्या प्रिय कांतेचा मनोरथ पूर्ण करण्यास सज्ज झाला होता. त्या धिप्पाड भीमसेनाची अंगकांति सुवर्णासारखी पीतवर्ण व शरीराचा बांधा सिंहासारखा अति दृढ होता. त्याची चाल व वेग मत्त गजाप्रमाणें असून नेत्रहि मत्त हत्ती-प्रमाणें रक्तवर्ण होते. तो वीर संग्रामादि-प्रसंगीं मत्त गजांचेंहि निवारण कर-ण्यास समर्थ होता.

अपूर्व स्वरूपानें युक्त असलेला तो पांडव जणुं काय क्रीडा करीतच त्या रमणीय गंधमादनाच्या शिखरावर संचार करीत असतां अदृश्य असलेल्या यक्ष-गंधर्व-स्त्रियांनीं समीपच बसलेल्या आपल्या वल्लभांसह एकाग्र व आश्चर्ययुक्त दृष्टीनें त्याला पाहिलें. दुर्योधनानें दिलेल्या अनेक प्रकारच्या असंख्य क्लेशांस आठवणारा तो वीर त्या वेळीं वनवासी द्रौपदीचें प्रिय करण्यास जरी तयार झाला होता, तरी त्या वीरानें मनांत असा विचार केला—“ अर्जुन इंद्रलोकीं गेला असून मीहि पांचालीला इष्ट असलेल्या पुष्पांसाठीं या घोर अरण्यांत आलों आहें. पण माझा ज्येष्ठ भ्राता युधिष्ठिर काय करील! खरोखर तो सत्यप्रतिज्ञ राजा स्नेहामुळें व सामर्थ्याच्या अनिश्चयामुळें नकुल व सहदेव यांना तर माझ्या साह्यार्थ पाठविणार नाहींना? मला त्या दिव्य पुष्पांची प्राप्ति सत्वर कशी बरें होईल!”

(१) राजा जनमेजया, असा विचार करीत तो नरसिंह गरुडाप्रमाणें मोठ्या वेगानें पुढें निघाला. फुललेल्या पर्वतशिखरावर त्याचें मन व दृष्टि हीं

दोन्हीं आसक्त झालीं होतीं. द्रौपदीचें वाक्य हेंच मार्गांतील पाथेय बरोबर घेऊन तो मोठ्या वेगानें उत्सवांतील उत्पाताप्रमाणें आपल्या दोन्ही पायांनीं भूमीला कांपवीत वेगानें जाऊं लागला.

तो महा बलवान् वृकोदर वायूप्रमाणें गज-यूथांना भयभीत करीत आणि सिंह, व्याघ्र व पशु यांचें मर्दन करीत निघाला. मदोन्मत्त गजाप्रमाणें पर्वत-शिखराच्या उत्तरोत्तर अग्रभागीं चढून जाण्याची इच्छा करणारा तो बलाढ्य पांडुनंदन आपल्या वेगानें महावृक्षांना मूळापासून उपटून भूमीवर लोळवीत, लतावल्लींस वेगानें आकर्षण करीत व विद्युद्युक्त मेघाप्रमाणें अतिशय गर्जना करीत पुढें जाऊं लागला असतां त्याच्या त्या भयंकर शब्दानें क्षुब्ध झालेले वनवासी व्याघ्र आपापल्या गुहा सोडून लपून बसले. भयभीत झालेले पक्षी आकाशांत उडून गेले. मृगांचे कळप पळत सुटले. अस्वलांनीं आपल्या निवासवृक्षांचा त्याग केला. सिंह आपल्या गुहा सोडून बाहेर पडले. महिषहि भीमाला पाहून अरण्यभर उधळले. भीमानें ज्यांना भयभीत केलें आहे अशा हत्तींना हत्ती-णींनीं वेढलें व तें वन सोडून दुसऱ्या महावनांत प्रवेश केला.

वराह, मृगसंघ, वनेचर महिष, व्याघ्र, कोल्हे व गवे इत्यादि पशु व चक्रवाक, हंस, कारंडव इत्यादि पक्षी भीतीनें आक्रोश करीत दश-दिशांत पळून गेले. कांहीं हत्तीणींना पाहून कामशरांनीं पीडित झालेले मत्त गज व अतिशय क्रुद्ध झालेले सिंह-व्याघ्र भीमसेनावर धांवून आले. भयभीत झालेले सिंह-व्याघ्र पुरीषोत्सर्गादि करीत भीषण आक्रोश करूं लागले. तेव्हां आपल्या बाहुबलाचा आश्रय केलेल्या क्रुद्ध वायुसुतानें एकेका गजाला उचलून दुसऱ्या गजावर फेंकलें व सिंहांच्या योगानें सिंहांना पळवून लाविलें. कित्येक पशूंना नुसत्या तलप्रहारानेंच गतप्राण केलें.

याप्रमाणें भीमसेनाकडून पीडिले जाणारे सिंह-व्याघ्रादि हिंस्र प्राणीहि भय-भीत होऊन त्याच्यापासून दूर पळून गेले असतां तो महाबलाढ्य पांडव आपल्या शब्दानें दाही दिशा नादित करून व त्या पशूंचा नाश करून सत्वर त्या शिखरावर चढला व तेथें त्या महाबाहूनें अतिशय रम्य व अनेक योजनें विस्तीर्ण असें कदलीवन पाहिलें. तेव्हां तो वीर मदोन्मत्त हत्तीप्रमाणें विविध वृक्षांस तोडीत व त्या वनास क्षुब्ध करीत पुढें चालला. तो बलाढ्य वायुसुत मोठमोठे कदली-स्तंभ उपटून इतस्ततः फेंकूं लागला.

नंतर नृसिंहाप्रमाणें दृप्त झालेल्या त्यानें मोठा सिंहनाद केला. तो ऐकून तेथील जलाशयाचा आश्रय करून राहिलेले पशु-पक्षी पळत सुटले. त्याच्या त्या भयंकर गर्जनेनें आसपासच्या इतर वनांतील पक्षीहि भयभीत होऊन आक्रोश करूं लागले. त्यांचा शब्द ऐकून जलाशयांतील पक्षीहि आपल्या जलार्द्र पंखांनीं आकाशांत उडून गेले. त्या जलचर पक्षिसमूहास पाहून भीम त्याच दिशेकडे निघाला.

तों त्याला एक विस्तृत रम्य सरोवर दिसलें. त्यांत वायूनें किंचित् हाल-विलेलें एक सुवर्णवर्ण कदलीखंड असून त्याच्या योगानें तें सरोवर अक्षोभ्य झालें होतें. तथापि विपुल नलिन-कमलांनीं युक्त असलेल्या त्या सरोवरांत तो बलाढ्य वीर उतरला व बराच वेळ निष्प्रतिबंध जलक्रीडा करीत राहिला. त्यामुळें त्या पांडवाच्या श्रमांचा परिहार झाला.

नंतर त्या रम्य सरोवरांतून वर निघून वृकोदरानें गंधमादन पर्वताच्या शिखरावरील वनांत प्रवेश केला. अतिशय उंच प्रदेशीं असलेलें तें वन विविध वृक्षांनीं व्याप्त होतें. त्यांत प्रवेश करितांना त्या वीरानें उच्च स्वरानें आपला शंख वाजविला व दंड थोपटले. त्यामुळें त्याच्या ध्वनीनें दिशा दुमदुमून गेल्या. गुहेंतून त्याचे प्रतिध्वनि निघाले.

(४) त्याचा तो शंखनाद व मेघध्वनीसारखें बाहूचें आस्फोटन ऐकून गुहेंत निजलेल्या सिंहांनीं गर्जना केली. त्या सिंहनादानें भयभीत झालेल्या हत्तींनींहि मोठा चीत्कार केला. त्यामुळें तो पर्वत दुमदुमून गेला. हत्तींचा तो चीत्कार ऐकून हनुमानानें आपला कनिष्ठ भ्राता भीमसेन आला आहे, असें ताडलें व भीमाच्या हितासाठीं त्याचा स्वर्गमार्ग अडविला.

या मार्गानें आपल्या प्रिय भ्रात्यानें जाऊं नये, असा विचार करून हनुमान् कदलीखंडानें मंडित असलेल्या त्याच्या मार्गातील एका अरुंद प्रदेशीं जाऊन बसला. आपल्या भीम भ्रात्याचें रक्षण करण्यासाठींच त्यानें त्याचा मार्ग अड-विला होता. ‘ या माझ्या प्रिय पांडवभ्रात्याला शाप किंवा पराभव प्राप्त होऊं नये’ म्हणून तो वानरश्रेष्ठ त्या कदलीखंडाच्या मध्यभागीं जाऊन बसला. तो निद्रावश झाल्याचें मिष करून जांभया देऊं लागला. धिप्पाड शरीरानें युक्त असलेल्या त्या बलाढ्य कपीनें आपलें इंद्रध्वजासारखें वर उचललेलें पुच्छ भूमीवर आपटलें. त्यामुळें वज्रपातासारखा भयंकर ध्वनि उत्पन्न झाला.

मत्त वृषभाच्या डुरकण्याप्रमाणें सर्वतः पसरणाऱ्या त्या लांगूलध्वनीनें पर्वत हादरले, गुहांतून प्रतिध्वनि निघाले व सर्व प्राणी भयभीत झाले. तो भयंकर शब्द ऐकून भीमसेनाच्या अंगावरहि रोमांच उभे राहिले व 'हा ध्वनि कोठून आला!' हें जाणण्याच्या इच्छेनें तो महावीर कदलीवनांत इतस्ततः फिरूं लागला.

तों त्या कदलीवनाच्या मध्यभागीं एका उंच शिलातलावर बसलेला वानरश्रेष्ठ त्याच्या दृष्टीं पडला. तो विजेच्या लोळाप्रमाणें दुष्प्रेक्ष्य असून तसाच पिंगटवर्ण होता. विजेच्या कडकडाटाप्रमाणें त्याचा ध्वनि असून विद्युत्समूहाप्रमाणें तो चंचल होता. त्यानें आपल्या चौकोनी विस्तीर्ण स्कंधावर मान टेंकली होती. त्याचें शरीर स्कंधप्रचुर होतें. कटिप्रदेश अतिशय कृश व किंचित् वाकविलेलें त्याचें मस्तक दीर्घ लोमांनीं व्याप्त होतें. ऊर्ध्वगामी पुच्छानें त्याचें शरीर जणुंकाय ध्वजानेंच विराजमान होत होतें. त्याचे ओंठ आंखुड आणि जिह्वा व मुख तांबडें होतें. रक्तवर्ण भुंवया अतिशय चंचल होत्या. शुक्ल व तीक्ष्ण अग्रांनीं सुशोभित झालेल्या त्याच्या दाढा व दांत स्पष्ट दिसत होते.

भीमाला त्याचें वदन किरणयुक्त चंद्राप्रमाणें दिसलें. त्याचें तें मुख शुभ्र दांतांनीं अलंकृत झालें होतें. सुवर्णमय कदलींच्या मध्यभागीं बसलेला तो अति तेजस्वी वानर अशोक पुष्पांतील केसरांच्या राशीप्रमाणें दिसत होता. आपल्या देदीप्यमान शरीरानें तो ज्वालायुक्त अग्नीसारखाच भासत होता. आपल्या पिंगटवर्ण लोचनांनीं तो शत्रुनाशक भीमाकडे टक लावून पहात होता.

तेव्हां स्वर्गमार्ग अडवून महावनांत हिमालयाप्रमाणें एकाकी स्थित असलेल्या त्या वानरश्रेष्ठाला पाहून बुद्धिमान्, बलाढ्य व निर्भय भीमसेन वेगानें त्याच्या समीप जाऊन उभा राहिला. तों हा वानरश्रेष्ठ नेत्र मिटून निद्रावश झाला आहे, असें पाहून पराक्रमी भीमसेनानें वज्राशनितुल्य उग्र सिंहनाद केला. त्या शब्दानें वनस्थ पशु-पक्षी भयभीत झाले.

तो शब्द ऐकून महाबलाढ्य हनुमानानेंहि आपले पिंगट नेत्र किंचित् उघडून अवज्ञेनें त्याच्याकडे पाहिलें व स्मित करून म्हटलें—"हे वीरा, मी येथें सुखानें झोंप घेत असतां तूं अशा कर्कश ध्वनीनें माझ्या श्रोत्रेंद्रियाला पीडा देऊन माझा निद्राभंग कां केलास?" अरे भल्या माणसा, तुझ्यासारख्या समंजस पुरुषानें भूतांवर दया करावी, हेंच उचित आहे. आम्ही तिर्यग्योनींत उत्पन्न झाल्यामुळें धर्म जाणत नाहीं.



भीम व हनुमान यांची भेट [पृष्ठ ३६०

हनुमानानें त्या कुरुवीराचें हें वाक्य स्मितपूर्वक ऐकून घेतलें व तो वायुतनय त्या वायुपुत्र भीमसेनाला म्हणाला—हे वीरा, मी वानर आहें. मी तुला इष्ट असलेला मार्ग देणार नाहीं. अरे बाबा, तूं सुखानें परत फीर कसा. व्यर्थ विरोध करूं नको.

भीमसेन—हे वानरा, विरोध असो किंवा अन्य कांहीं असो; मी तुला विचारीत नाहीं. चल, मार्गांतून ऊठ, मला जाऊं दे. माझ्या हातून व्यर्थ व्यथा पावूं नको.

हनुमान्—हे मानवश्रेष्ठा, मी व्याधीनें पीडिलों आहें, त्यामुळें मला जागेवरून हलण्याचीहि शक्ति नाहीं. तुला जाणें जर अवश्यच असेल तर माझें उल्लंघन करून जा.

भीम—हे कपे, निर्गुण परमात्मा सर्व देहांना व्यापून रहात असतो, त्या निरुपाधिक चिन्मात्र प्रत्यगात्म्याला शास्त्रार्थ व ध्यानादिक यांच्या योगानें मी जाणत असल्यामुळें त्याचा अवमान करून मी तुझें उल्लंघन करणार नाहीं. प्राणिशरीराचें उल्लंघन केल्यानें सर्वप्रकाशक अहंकारादि-साक्षीचाच अवमान होतो. यास्तव मी तुझें उल्लंघन करून जाणार नाहीं. मी जर वेदावरून त्या भूतभावन प्रभूला जाणलें नसतें, तर मात्र हनुमानानें जसें सागराचें उल्लंघन केलें, तसें मी तुझें व या पर्वताचेंहि उल्लंघन करून गेलों असतों.

हनुमान्—हे नरश्रेष्ठा, ज्यानें सागराचें उल्लंघन केलें तो हनुमान् कोण बरें आहे, असें मी तुला विचारितों. जर शक्य असेल तर सांग.

भीम—हे वानरा, तो हनुमान् श्लाघ्य गुणांनीं युक्त आणि बुद्धि, सत्त्व व बल यांनीं संपन्न असलेला माझा भ्राता आहे. तो श्रीमान् वानरश्रेष्ठ रामायणांत प्रसिद्ध आहे. त्या कपींद्रानें शंभर योजनें विस्तृत असलेल्या समुद्राचें रामपत्नीसाठीं एका उडींत उल्लंघन केलें; असा तो माझा भ्राता महापराक्रमी आहे आणि मीहि तत्तुल्य तेजानें युक्त आहें. यास्तव मी बल, पराक्रम व युद्ध यांत तुझा निग्रह करण्यास समर्थ आहें. तस्मात् हे मर्कटा, ऊठ, मला मार्ग दे पाहूं. चल, बाजूला हो. अथवा आज माझें सामर्थ्य पहा. माझ्या आज्ञेप्रमाणें जर कां तूं वागला नाहींस तर मी तुला यमलोकीं पाठवीन.

(२) वैशंपायन—हे भरतसत्तमा, हा भीम बलानें उन्मत्त व बाहुवीर्यानें दर्पयुक्त झाला आहे, हें जाणून तो महाकपि मनांत हंसला व भीमाला

म्हणाला—" हे पांडववीरा, माझ्यावर प्रसन्न हो. मी जरेनें जर्जर झालों आहें, त्यामुळें मला जागेवरून उठण्याचीहि शक्ति नाहीं. यास्तव माझ्या-वरील अनुकंपेनें माझें हें पुच्छ कृपा करून बाजूला सार आणि तूं जा."

वैशंपायन—राजा, हनुमान् असें बोलला असतां स्वतःच्या बाहुबलानें दृप्त झालेला भीम त्या वानराचें मानस-धैर्य व शारीरबल आपणांहून हीन आहे, असें समजला व 'मी आज या हीनवीर्य व पराक्रमशून्य अस-लेल्या वानराला वेगानें पुच्छ धरून यमाच्या सालोक्याला पाठवीन' असा मनांत विचार करून, त्या बलाढ्य भीमानें अतिशय तुच्छतेनें आपल्या डाव्या हातानें त्या महाकपीचें पुच्छ धरिलें. परंतु महा बलवान् भीमसेन त्याचें तें पुच्छ जागचें हलविण्यासहि समर्थ झाला नाहीं.

( ३ ) तेव्हां तो पृथापुत्र इंद्रध्वजाप्रमाणें उभारलेलें त्याचें तें पुच्छ दोन्ही हातांनीं उचलूं लागला. तरीहि त्या महा बलाढ्य वायुसुताला दोन हातांनीं सुद्धां तें उचलेना. तें पुच्छ उचलण्याचा प्रयत्न करीत असतां भीमानें डोळे वटारले, कपाळाला आंठ्या घातल्या, त्याचें अंग घामानें भिजलें; परंतु तो वीर तें उचलूं शकला नाहीं.

याप्रमाणें त्या महा कपीचें लांगूल उचलण्याचा परम यत्न करूनहि जेव्हां तो सफल झाला नाहीं, तेव्हां लज्जेनें अधोमुख झालेला भीमसेन हनुमानाच्या बाजूला जाऊन उभा राहिला आणि त्याला वंदन करून हात जोडून म्हणाला— " हे कपिश्रेष्ठा, माझ्या दुरुक्तीची क्षमा कर आणि मजवर प्रसन्न हो. मी तुला जिज्ञासेनें विचारितों कीं, स्वेच्छेनें वानररूप धारण करणारा तूं कोण आहेस ? तूं कोणी सिद्ध, देव, गंधर्व किंवा गुह्यक आहेस, तें सांग; यांत जर कांहीं गुप्त नसेल व मला श्रवण करण्यास योग्य असेल तर मला तें ऐकण्याची इच्छा आहे. हे अनघा, मी तुला शिष्यत्वानें शरण येऊन विचारीत आहें.

( ४ ) हनुमान्—हे अरिंदम पांडुनंदना, ज्याअर्थीं माझें सर्व वृत्त ऐक-ण्याचें तुला कुतूहल वाटत आहे, त्याअर्थीं मी तें समग्र सांगतों ऐक—" हे कमलनयना भीमा, जगताचा प्राण असलेल्या वायूपासून 'केसरी'-वान-राच्या भार्येच्या ठिकाणीं माझा जन्म झाला. मी 'हनुमान्'-नांवाचा वानर आहें.

सूर्यपुत्र सुग्रीव, इंद्रपुत्र वाली, सर्व वानरराजे आणि वानरांच्या कळपाचे पराक्रमी अधिपति माझ्या पुढें सतत उभे रहात असत. हे कौंतेया, वायूचें अग्नीशीं जसें सख्य असतें, तसा माझा सुग्रीवाशीं स्नेह होता.

कांहीं कारणानें सुग्रीवाला त्याच्या भ्रात्यानें घालवून दिलें असतां तो सूर्यपुत्र माझ्यासह ऋष्यमूक पर्वतावर दीर्घकाल राहिला.

त्याच वेळीं मानुषरूपानें अवतीर्ण झालेला भगवान् विष्णु महा बलाढ्य 'दाशरथि राम' या नांवानें पृथ्वीवर संचार करीत होता. तो धनुर्धरांतील श्रेष्ठ रामचंद्र पित्याचें प्रिय करण्यासाठीं आपली पत्नी व अनुज यांसह दंडकारण्याचा आश्रय करून राहिला. तेव्हां दुरात्म्या बलाढ्य राक्षसेंद्र रावणानें मारीच राक्षसाकडून मायावी 'विचित्र रत्नजडित' सुवर्ण मृगाचें रूप धारण करविलें आणि त्या मृगरूपानें रामाला फसवून त्या सत्यप्रतिज्ञ प्रभूची भार्या कपटानें व बलात्कारानें हरण केली. ३. ७. १४७.

---

## अध्याय १४८ वा.

[ १ हनुमानानें भीमाला कथन केलेलें रामचरित्र व भीमाला देवसेवित मार्गानें पुढें न जाण्याचा उपदेश. ]

(१) हनुमान्—हे पांडववीरा, याप्रमाणें राक्षसानें रामपत्नीचें हरण केलें असतां तो राघव भ्रात्यासह पत्नीच्या शोधार्थ निघाला. तेव्हां त्यानें शैलशिखरावर बसलेल्या वानराधिपति सुग्रीवाला पाहिलें व त्या महात्म्या रघुनाथाबरोबर त्याचें सख्य जडलें. नंतर रामानें वालीचा वध करून त्याच्या राज्यावर सुग्रीवाला स्थापिलें.

अशा प्रकारें राज्य प्राप्त झालें असतां सुग्रीवानें रामभार्या सीतेचा शोध करण्यासाठीं कोट्यवधि वानर पाठविले. तेव्हां हे नरश्रेष्ठा, त्या असंख्य वानरांसह मी सीतेचा शोध करीत दक्षिण दिशेकडे गेलों. तेव्हां 'संपाति'-नामक महात्म्या गृध्रानें 'सीता रावणाच्या मंदिरांत आहे' अशी वार्ता मला सांगितली असतां दुष्कर कर्में सहज करणाऱ्या राघवाच्या कार्यसिद्धीसाठीं मीं शंभर योजनें विस्तीर्ण असलेल्या सागरावरून वेगानें उडी मारिली व मकरांनीं युक्त असलेल्या समुद्राचें स्वसामर्थ्यानें उल्लंघन केलें.

तेव्हां हे भरतश्रेष्ठा, रावणाच्या अंतःपुरांत ती देवकन्यातुल्य जनकराजनंदिनी सीता माझ्या दृष्टीं पडली. त्या राघवपत्नी वैदेहीची भेट घेऊन व

तिच्याशीं संभाषणादि करून मीं पुढील कार्याचा निश्चय केला आणि प्रासाद, नगरद्वारें इत्यादिकांसह लंकानगरी निःशेष दग्ध करून त्या लंकेंत श्रीरामाचें नांव सर्वतोमुखीं केलें व तेथून परत आलों. सुग्रीवाच्या समीप आल्यावर रामाला सर्व वृत्तान्त निवेदन केला.

भीमा, मीं सांगितलेलें तें सर्व वृत्त ऐकून राजीवलोचन रामानें सैन्याच्या विचारानें नलाकडून महासागरावर महासेतु बांधविला आणि कोट्यवधि वानरांसह तो महावीर समुद्राचें उल्लंघन करून गेला.

त्यानंतर रामानें रणामध्यें स्वसामर्थ्यानें त्या सर्व राक्षसांचा व लोकांना पीडा देणाऱ्या राक्षसराज रावणाचा, त्याचे भ्राते, सुत व बांधव यांसह वध केला आणि त्याच्या बिभीषण भ्रात्याला लंकेच्या राज्यावर स्थापिलें. तो रावणाचा कनिष्ठ भ्राता मोठा धार्मिक, श्रद्धाळु, रामभक्त आणि अनुयायी जनांवर प्रेम करणारा होता.

रावणाचा वध केल्यावर रामचंद्रानें, नष्ट झालेल्या वेदश्रुतीप्रमाणें, आपल्या भार्येला परत आणिलें आणि तो महा यशस्वी राम आपल्या साध्वी भार्येसह मोठ्या त्वरेनें स्वनरीस परत गेला. नंतर तो प्रभु त्या अजिंक्य अयोध्या-नगरींत आनंदानें राहूं लागला.

पुढें तो नृपश्रेष्ठ राम राज्यावर बसला असतां मीं—" हे प्रभो, जोंवर ही रामकथा या लोकीं राहील, तोंवर मीं जिवंत रहावें " असा वर त्या कमलनयनापाशीं मागितला. त्यावर राघवानें ' तथास्तु ' असें म्हटलें. हे भीमा, तेव्हांपासून मी जरी या प्रदेशीं रहात आहें, तरी सीतादेवीच्या प्रसादानें मला इष्ट असलेले सर्व दिव्य भोग येथें प्राप्त होतात. रामानें राज्य केलें व तो प्रभु निजधामाला निघून गेला. तेव्हांपासून गंधर्व व अप्सरा त्या वीराचें चरित्र गाऊन माझ्या मनाचें रंजन करीत असतात.

हे कुरुनंदना, हा मार्ग मानवांना अगम्य आहे, म्हणून या देवसेवित मार्गाचा मीं निरोध केला आहे. हे भारता, तूं या मार्गानें गेल्यास तुला शाप किंवा पराभव प्राप्त होईल. हा देवांचा दिव्य मार्ग आहे. येथून मनुष्यांना जातां येत नाहीं. शिवाय तूं ज्यासाठीं आला आहेस, तें सरोवरहि येथें समीपच आहे. ३. ७. १४८.

---

## अध्याय १४९ वा.

[ १ हनुमानाचें अप्रतिम पूर्वरूप पहाण्याची भीमाची इच्छा. २ कालमानानुरूप तें स्वरूप दिसणें अशक्य, असें हनुमानाचें उत्तर. ३ त्याच प्रसंगानें कृतादि युगांचें व धर्मांचें वर्णन. ]

(१) **वैशंपायन**—राजा, हनुमानाच्या मुखानें रामचरित्र ऐकून हृष्ट झालेल्या प्रतापवान् भीमसेनानें परम प्रीतीनें आपल्या भ्रात्याला प्रणिपात करून मृदु वाणीनें म्हटलें—" हे कपीश्वरा, ज्याअर्थी मला आज तुज आर्याचें दर्शन घडलें आहे त्याअर्थी माझ्या सारखा धन्य दुसरा कोणीहि नाहीं. खरोखर हा मजवर महान् अनुग्रह झाला. तुझ्या दर्शनानें मी तृप्त झालों. आतां तूं मला प्रिय असलेलें एक कार्य कर.

हे वीरा, तूं पूर्वी जेव्हां मकरालय महासागराचें उल्लंघन केलेंस, त्या वेळचें तुझें तें अप्रतिम स्वरूप पहाण्याची माझी इच्छा आहे. त्यायोगें मी संतुष्ट होईन आणि तुझ्या शब्दावर माझा विश्वासहि बसेल."

(२) तेजस्वी भीमसेनाचें हें वचन ऐकून तो वानरश्रेष्ठ हंसून म्हणाला—भीमा, तुला किंवा अन्य कोणालाहि तें रूप आतां दिसणें शक्य नाहीं. कारण त्या वेळचा काल भिन्न होता. तो काल आतां राहिलेला नाहीं. कृतयुगांत एक प्रकारचा काल, त्रेतामध्यें त्याहून वेगळा व द्वापरांत निराळा असतो. सांप्रत द्वापर आणि कलि यांचा संधिकाल आहे. हा काल धर्म व सामर्थ्य यांचा विध्वंस करणारा आहे. यास्तव माझें तें रूप आतां दिसणें शक्य नाहीं.

भूमि, नद्या, पर्वत, शैलशिखरें, सिद्ध, देव आणि महर्षि हीं सर्व प्रत्येक युगांत त्या त्या कालाला अनुसरतात. त्याचप्रमाणें जीवांचें बल, शरीर व प्रभावहि कालाप्रमाणें क्षीण होतात व वृद्धि पावतात. यास्तव हे कुरुश्रेष्ठा, तें माझें रूप पहाण्याची इच्छा सोडून दे. मी युगाला अनुसरतों, कारण कालाचें अतिक्रमण करतां येत नाहीं.

**भीम**—हे धर्मज्ञ भ्रात्या, युगांची संख्या, प्रत्येक युगांतील आचार, धर्म, काम, अर्थ, तत्त्व, शुभाशुभ कर्म, फलोदयापर्यंत शक्ति, उत्पत्ति-विनाश किंवा ऐश्वर्य-अनैश्वर्य हें सर्व मला सांग.

(३) **हनुमान्**—बा भीमसेना, पहिलें कृत युग होय. त्या सनातन उत्तम धर्मयुगांत सर्व कृतकृत्य असतात. कोणाला कांहीं कर्तव्य राहिलेलें नसतें. त्या

आद्य युगांत धर्मलोप होत नाहीं किंवा प्रजेचा क्षय होत नाहीं. म्हणून त्याला 'कृतयुग' असें म्हणतात. पण तेंच मुख्य असलेलें कृतयुग आज कालामुळें गौण झालें आहे.

त्या पवित्र युगांत देव-दानव-गंधर्व-यक्ष-राक्षस-पन्नग इत्यादि जातिविशेष व क्रय-विक्रय नव्हता. साम, ऋक्, यजु इत्यादि वेद नव्हते. वर्तमान युगांत ब्राह्मणादि तीन वर्ण चित्तशुद्धीसाठीं सामादिकांचें अनुष्ठान करितात. परंतु त्या कालीं स्वाभाविक चित्तशुद्धीमुळें सामादि वेद व ब्राह्मण-क्षत्रियादि वर्ण हा भेद नव्हता. त्याचप्रमाणें केवल संकल्पानेंच सर्व पदार्थ प्राप्त होत असल्यामुळें कृषि-वाणिज्यादि मानवी उद्यमांचाहि अभाव होता. त्या वेळीं संन्यास हाच एक धर्म होता.

त्या कृतयुगांत संसर्गजन्य व्याधि किंवा इंद्रियक्षय यांचें नांवहि नव्हतें. असूया, रोदन, गर्व, कपट, वैर, आलस्य, दुसऱ्याचें अनिष्टचिंतन, द्वेष, चहाडी, भय, संताप, अक्षमा व मत्सर यांचा यत्किंचित्हि प्रादुर्भाव झाला नव्हता. त्यायोगें असूयादिकांच्या त्यागामुळेंच परमानंदात्मक ब्रह्माची प्राप्ति होत असे. सर्व भूतांचा आत्मा शुक्लवर्ण नारायणच योग्यांची परम गति होती.

त्या कालांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र स्वतःसिद्ध शमादि लक्षणांनीं युक्त असल्यामुळें सर्व प्रजा आपापल्या कर्मांत तत्पर असे.

समब्रह्मच त्या युगाचा आश्रय असल्यामुळें त्यांतील लोक फलप्राप्तीसाठीं त्याचाच आश्रय करीत. लोकांचा आचारहि ब्रह्मप्राप्तीसाठींच होता. लोकांचें ज्ञानहि निरुपाधिक ब्रह्मविषयकच होतें. सर्व वर्णांचे लोक सम कर्मानें धर्माला प्राप्त होत असत. गति, आगति इत्यादि सर्व कर्में ब्रह्मरूपच होतीं. त्या युगांतील लोक प्रत्यगात्मरूप एका देवामध्येंच सदा युक्त होऊन रहात असत. म्हणजे त्यांचें चित्त प्रत्यगात्म्यामध्येंच स्थिर असे. त्या युगांत प्रणव हाच एक मंत्र, वेदान्तश्रवणादि हाच एक विधि, ध्यानादि हीच एक क्रिया, एका तत्त्वाचें प्रतिपादन करणारा वेद हाच त्यांचा प्रमाण ग्रंथ असून सर्व लोक ज्ञाननिष्ठच होते. केवल कर्मठ किंवा व्यसनी कोणी नव्हतें.

---

१ कृत, त्रेता, द्वापर व कलि या चार युगांत परमात्म्याचें स्वरूप क्रमानें श्वेत, रक्त, पीत व कृष्ण असतें. यास्तव कृतयुगांत नारायणाला शुक्लवर्ण म्हटलें आहे.

चार आश्रमांनीं व दर्शादि कालानें युक्त अशा निष्काम कर्मानें सर्व लोक परम गतीला प्राप्त होतात. निष्काम कर्मालाच निवृत्त कर्म म्हणतात. त्या कर्मामध्यें स्त्री-पुत्रादि व स्वर्गादि फलसंकल्प, यांचा अभाव असतो, त्यामुळें तीं कर्में बंधनकारक होत नाहींत. ब्रह्मरूप आत्म्यामध्यें चित्ताचें जें ऐक्य त्यालाच 'आत्मयोग' असें म्हणतात. त्या आत्मयोगानें युक्त असलेला हा धर्म कृत-युगाचा सूचक आहे. ज्या ज्या वेळीं व ज्या कोणत्याहि पुरुषामध्यें अशा प्रकारचा धर्म वृद्धि पावतो त्याच वेळीं तें कृतयुग आहे, असें जाणावें.

कृतयुगामध्यें चारी वर्णांचा शाश्वतधर्म 'चतुष्पाद' म्ह० सर्वांगपूर्ण असतो. हें कृतयुग त्रैगुण्यरहित असतें. त्या युगांत रजोगुणाचें कार्य प्रवृत्ति, सत्त्व-गुणाचें ज्ञान व तमोगुणाचें मोह, यांचा प्रादुर्भाव होत नाहीं.

त्रेतायुगांत रजोगुणाचें मिश्रण होतें. त्यामुळें त्यांत यज्ञक्रिया प्रवृत्त होतात. धर्मांचा एका पादानें ऱ्हास होतो व त्या युगांत अच्युत आत्मा रक्तवर्ण होतो. लोक सत्यानेंच प्रवृत्त होतात व क्रिया धर्मामध्येंच तत्पर होऊन रहातात. त्यामुळें यज्ञांची प्रवृत्ति होते. सर्व धर्म कर्मप्रधान असतात. त्यावेळीं लोकांचा 'मी या कर्माच्या योगानें हें फल याप्रकारें संपादन करीन' असा संकल्प असतो. त्यामुळें कर्मानुष्ठानानेंच त्यांना फलप्राप्ति होते.

त्रेतायुगांतील तप व दान यांत तत्पर झालेले लोक धर्मापासून च्युत होत नाहींत. त्यामुळें ते स्वधर्मनिष्ठ व क्रियावान् असतात. म्हणूनच कृतयुगा-प्रमाणें त्यांच्या सिद्धि केवल संकल्पानेंच सिद्ध होत नाहींत.

द्वापरयुगामध्यें धर्म दोन पादांनीं हीन होतो. विष्णु पीतवर्ण होतो व वेदाचे चार भाग होतात. त्यामुळें कांहीं लोक चतुर्वेदवेत्ते, कांहीं त्रिवेदवेत्ते, कित्येक दोन वेद जाणणारे, कांहीं एकच वेद म्हणणारे व कित्येक वेदाक्षर-हीनच असतात. कारण त्यांची बुद्धि पापाचरणामुळें मंद झालेली असते.

अथवा 'चतुर्वेदाः' म्हणजे वेदत्रयोक्त ज्योतिष्टोमादि कर्म व आथर्वणोप-निषदांत सांगितलेलें ध्यान यांचें समुच्चयानें अनुष्ठान करणारे असतात. 'त्रिवेदाः' म्हणजे केवल कर्मठ. 'द्विवेदाः' म्हणजे स्वशाखोक्त संध्या-वंद-नादि कर्म व ध्यान यांचें समुच्चयानें अनुष्ठान करणारे व 'एकवेदाः' म्हणजे केवल ध्याननिष्ठ व 'अनृचः' म्हणजे कृतकृत्य, ध्यानाविषयींहि विरक्त झालेले, असे असतात. ते भिन्न भिन्न शास्त्रांत सांगितलेल्या विविध क्रिया आचरितात.

तात्पर्य तिसऱ्या द्वापरयुगांत तप व दान यांमध्यें प्रवृत्त झालेली प्रजा प्रायः राजसी असते. एका वेदाचें ज्ञान शक्य नसल्यामुळें त्या युगांत वेदाचे चार भाग झाले. या युगांत बुद्धीचा अंश झाल्यामुळें सत्यामध्यें कोणी एखादाच अवस्थित होतो. सत्यापासून च्युत झाल्यामुळें अनेक शारीर-व्याधि उद्भवतात. त्या वेळीं देव शारीरव्याधि व काम यांची समृद्धि करितात आणि व्याधि व काम यांनीं पिडलेले मानव परम तप आचरितात. स्त्र्यादि भोग व स्वर्ग यांची इच्छा करणारे लोक अनेक याग करितात. याप्रमाणें द्वापरयुगांतील प्रजा अधर्मामुळें क्षय पावते.

हे कुंतीपुत्रा भीमा, कलीयुगांत धर्म एका पादानेंच स्थित होतो. त्या तमोगुण-प्रधान कलीस प्राप्त होऊन केशव कृष्णवर्ण होतो. वेदाचार, धर्म व यज्ञक्रिया निवृत्त होतात. अतिवृष्ट्यादि दैवी दोष, व्याधि, आलस्य, क्रोधादि घोर वृत्ति, मानस चिंता, इतर उपद्रव, क्षुत्पीडा इत्यादि अनेक अनर्थ प्रवृत्त होतात.

याप्रमाणें युगाची पुनः पुनः आवृत्ति होऊं लागली असतां युगाच्या क्रमानें धर्माचाहि उत्तरोत्तर नाश होतो. धर्माचा नाश झाला असतां लोकांचा क्षय होतो. लोकक्षय झाला असतां लोकप्रवर्तक धर्म-ज्ञानादि भावहि नष्ट होतात. युगाच्या क्षयामुळें धर्महि निष्फल होतो. धर्माचरणानें एका फलाची इच्छा केली तर त्याच्या अगदीं विपरीत फल प्राप्त होतें. फार काय, पण पौष्टिक कर्महि विधीच्या लोपामुळें हितावह होण्याऐवजीं विनाशक होतें.

वत्सा भीमसेना, हें अशा स्वरूपाचें कलियुग आतां लवकरच प्रवृत्त होणार आहे. त्यामुळें माझ्यासारखे चिरंजीव भगवद्भक्तहि युगधर्माला अनुसरतात.

हे प्रिय भ्रात्या, समुद्रोल्लंघनप्रसंगीं मीं जें स्वरूप धारण केलें होतें तें पहाण्याचें तुला कौतुक वाटत आहे; पण त्याचा काय उपयोग! ज्ञानी पुरुष अशा निष्फल गोष्टींविषयीं आग्रह धरीत नाहींत. भीमा, तूं मला युगधर्मा-विषयीं जो प्रश्न केला होतास, त्याचें उत्तर मी तुला सविस्तर सांगितलें आहे. आतां तूं जा. हे महाबाहो, तुझें कल्याण होवो. ३. ७. १४९.

## अध्याय १५० वा.

[ १ भीमाच्या अत्याग्रहावरून हनुमानानें त्यास दाखविलेलें स्वरूप. २ भीमसेनाला क्षत्रियादि वर्णांच्या धर्मांचा उपदेश. ]

( १ ) **भीमसेन**—हे कपीश्वरा, तुझ्या त्या अलौकिक पूर्वस्वरूपाचें दर्शन घेतल्यावांचून मी येथून कदापि जाणार नाहीं. यास्तव मी जर तुला अनुग्रहास पात्र वाटत असेन तर आपलें तें पूर्व स्वरूप मला दाखीव.

**वैशंपायन**—भीमसेनाचा हा अत्याग्रह पाहून हनुमानानें स्मित केलें आणि समुद्रोल्लंघनाच्या वेळचें आपलें उग्र स्वरूप त्याला दाखविलें. भ्रात्याची इच्छा पुरविण्यासाठीं तो वानरश्रेष्ठ जेव्हां आपलें शरीर वाढवूं लागला तेव्हां त्याच्या देहाचा विस्तार अतिशय वाढला. तो महातेजस्वी कपिवर वृक्षांसह सर्व कदलीवनाला आच्छादून विंध्यपर्वताप्रमाणें त्या उंच शैलशिखरावर जाऊन बसला.

त्याचें तें प्रचंड शरीर जणुंकाय दुसरा पर्वतच असल्याप्रमाणें भासलें. त्याचें मुख आरक्त नेत्र, तीक्ष्ण दाढा आणि वक्र भ्रुकुटी यांच्या योगानें अतिशय उग्र दिसूं लागलें. तो वानर आपलें दीर्घ पुच्छ पसरून सर्व दिशांना व्यापून बसला असतां भ्रात्याचें तें प्रचंड रूप पाहून कौरवनंदन भीम अतिशय हृष्ट व विस्मित झाला. सूर्य, मेरुपर्वत किंवा प्रदीप्त आकाश, यांसारखें त्या वायुपुत्राचें तेज पाहून भीमानें क्षणभर आपले नेत्र मिटले.

तेव्हां हनुमान् हंसतच भीमसेनाला म्हणाला—हे निष्पाप पांडवा, माझें एवढेंच महद्रूप पहाण्यास तूं समर्थ आहेस. मी याहूनहि वाटेल तितका मोठा होऊं शकतों. हे भीमा, शत्रूच्या पुढें माझें शरीर व सामर्थ्य यांची अतिशय वृद्धि होत असते.

**वैशंपायन**—हनुमानाचा तो विंध्यपर्वतासारखा अति उग्र व अद्भुत देह पाहून भ्रांत झालेल्या त्या पृथापुत्राचें शरीर रोमांचित झालें. परंतु तो स्वभावतःच धीट असलेला वायुनंदन पुढें बसलेल्या हनुमानाला हात जोडून म्हणाला—" हे प्रभो, तुझ्या या विशाल देहाचा आकार मीं पाहिला. आतां तूं आपल्या शरीरांतच त्याचा उपसंहार कर. तुझें हें उदय पावलेल्या सूर्याप्रमाणें प्रखर असलेलें स्वरूप पहाण्यास मी समर्थ नाहीं. तुझा हा मैनाक पर्वतासारखा दुराधर्ष शरीराकार अप्रमेय आहे. परंतु हे वीरश्रेष्ठा,

तुझ्यासारखा बलाढ्य योद्धा समीप असतां श्रीरामचंद्र स्वतः रावणावर कां चालून गेला, याचें मला अतिशय आश्चर्य वाटतें. कारण हे वायुसुता, तूंच आपल्या बाहुबलानें सर्व योद्धे व वाहनें यांसह समग्र लंकेचा नाश करण्यास समर्थ होतास. तुला अशक्य असें कांहींच नाहीं. तुला एकट्याला रावण त्याच्या सर्व परिवारासहहि पुरेसा नव्हता.

वैशंपायन—भीमाचें हें भाषण ऐकून वानरश्रेष्ठ हनुमान् मृदु व गंभीर वाणीनें म्हणाला—हे भरतश्रेष्ठा, तूं म्हणतोस तें खरें आहे. तो राक्षसाधम मला मुळींच पुरेसा नव्हता. परंतु मीं जर त्या लोककंटक रावणाचा वध केला असता तर राघवाची या लोकीं इतकी कीर्ति पसरली नसती. यास्तव मीं त्या राक्षसाची उपेक्षा केली. वीर रामचंद्रानें त्या राक्षसाधमाचा सर्व परिवारासह नाश करून सीतादेवीला आपल्या अयोध्या-नगरींत परत आणिलें व आपली अढळ कीर्ति लोकांत प्रस्थापित केली.

( २ ) हे महाप्राज्ञा, तूं भ्रात्याचें प्रिय व हित करणारा आहेस. वायु तुझें रक्षण करीत असल्यामुळें तुझा मार्ग निर्विघ्न व सुखकर होवो. तूं आतां जा.

हे कुरुश्रेष्ठा, सौगंधिक वनाकडे जाण्याचा हा मार्ग आहे. तेथें यक्ष-राक्षसांनीं रक्षण केलेलें कुबेराचें उपवन तुझ्या दृष्टीं पडेल. पण तूं त्यांत एकदम शिरून तेथील सुवासिक पुष्पें स्वतःच तोडूं नको. कारण मानवांनीं देवतांचा सत्कार करणेंच उचित आहे. बलि, होम, नमस्कार, मंत्र व भक्ति यांच्या योगानें देवता प्रसन्न होतात. यास्तव बा भीमा, तूं साहस करूं नको. स्वधर्माचें पालन कर. स्वधर्मात स्थित राहून आपला श्रेष्ठ धर्म समजून घे आणि त्याचें आचरण कर.

हे वीरा, बृहस्पतितुल्य बुद्धिमानांसहि धर्म समजून घेतल्यावांचून व वृद्धांची सेवा केल्यावांचून धर्म व अर्थ यांचें ज्ञान होणें शक्य नाहीं. दुर्जनांचा वध हा हिंसा या रूपानें जरी अधर्म असला तरी तो धर्मच आहे आणि दुसऱ्याचा घात करणारें सत्यवचन जरी धर्म्य असलें तरी तें परपीडाकारक असल्यामुळें अधर्मच आहे. यास्तव धर्म व अधर्म यांस पृथक्‌पणें जाणावें. मूढबुद्धि जन त्याविषयीं मोहित होतात.

हे धर्मानुजा, शौचादि आचारापासून धर्म प्रवृत्त होतो, धर्मापासून वेदाचें ज्ञान होतें, वेदानें यज्ञानुष्ठानाची प्रवृत्ति होते आणि त्यापासून देवतांचा प्रसाद

प्राप्त होतो. वेदोक्त आचार आणि विधि यांच्या योगानें प्रवृत्त झालेल्या यज्ञांनीं देवतांची स्थिति होते आणि बृहस्पति व शुक्र यांनीं सांगितलेल्या नीतीनें मानवांची स्थिति होते. सेवा, वाणिज्य, कृषि व पशूंचें पालन या जीविकोपयोगी वृत्तीच्या योगानें सर्व जगाचें धारण होतें. पुढील धर्मांनीं द्विज जगाचें धारण करितात. ब्राह्मणाचें याजन-अध्यापनादि, वैश्याचें व्यापारादि आणि क्षत्रियांचें दंडादि, अशीं हीं तीन निर्वाहाचीं साधनें जाणावीं. त्यांचें योग्य प्रकारें आचरण करणारांची लोकयात्रा व्यवस्थित होते. पण ती लोकयात्रा जर धर्मविरुद्ध असेल तर त्रयीधर्म व दंडनीति यांच्या अभावीं हें सर्व जगत् मर्यादारहित होईल. आपापल्या वृत्तिधर्मांचें आचरण न करणाऱ्या या प्रजा नाश पावतील आणि या तीन प्रकारच्या वृत्तीमध्यें उत्तमप्रकारें प्रवृत्त होणाऱ्या प्रजांपासून धर्मांची उत्पत्ति होईल.

हे भीमा, 'आत्मज्ञान'-संज्ञक सत्य, केवल सात्त्विक स्वरूपाचा शुक्ल वर्ण व 'योग'-नांवाचा धर्म केवल ब्राह्मणांकरितां सांगितला असून यज्ञ, अध्ययन व दान हे त्रैवर्णिकांचे सामान्य धर्म श्रुत आहेत. याजन, अध्यापन व प्रतिग्रह हा ब्राह्मणांचा, प्रजापालन हा क्षत्रियांचा, पोषण हा वैश्यांचा आणि द्विजांची सेवा हा शूद्रांचा धर्म म्हटला आहे. ब्राह्मण-क्षत्रियादि श्रेष्ठ द्विजांची सेवा करून उपजीविका करणारे शूद्र भिक्षावृत्ति, व्रत, होम इत्यादि धर्मांनीं हीन असतात. हें क्षत्रियधर्मांचें प्रकरण आहे आणि रक्षण करणें हा तुझा धर्म आहे. यास्तव हे भीमसेना, तूं नम्र आणि जितेंद्रिय होऊन स्वधर्मांचें आचरण कर.

बुद्धिमान्, विद्वान् व शिष्ट वृद्धांबरोबर धर्माचा विचार करून त्यानें अनुगृहीत झालेला पुरुष दंडानें सर्वांचें शासन करितो व मृगयादि व्यसनासक्त पुरुष पराभव पावतो. जेव्हां राजा निग्रह व अनुग्रह यांच्या योगानें यथाशास्त्र प्रवृत्त होतो, तेव्हां लोकांच्या सर्व मर्यादा सुव्यवस्थित होतात. यास्तव देश, दुर्ग व शत्रु-मित्रांचें बल या ठिकाणीं सतत आपले हेर पाठवून त्यांतील सिद्ध वस्तूंचें रक्षण, वृद्धि व क्षय यांचें ज्ञान संपादन करावें.

हेर, बुद्धिमान् मंत्र्याशीं संकेत व पराक्रम हे नृपतींचे उपाय असून शत्रूचा निग्रह, प्रतिबंध व दक्षता हे कार्यसाधक उपाय आहेत. साम, दाम, भेद, दंड व उपेक्षा यांतील एकेकाचा किंवा दोन, तीन इत्यादि उपायांचा उपयोग

करून आपलीं इष्ट कार्यें साधावीं. हे भरतश्रेष्ठा, सर्व राजनीति व चार मंत्रमूलक आहेत. जी सिद्धि चांगल्या मंत्रांनींच साध्य होणारी असेल तिचा ब्राह्मणांबरोबर संकेत करावा.

स्त्री, मूढ, बाल, लुब्ध, हीनप्रकृति व भ्रमिष्ट यांच्याशीं गुह्य गोष्टींचा संकेत करूं नये. विद्वानांशीं संकेत करावा. समर्थांकडून कार्यें करवावीं व आपल्या इष्ट वस्तु आणि स्त्री-पुत्रादि या सर्वांस आपल्या हितचिंतकापाशीं ठेवावें. धर्मकार्यांमध्यें धार्मिकांची योजना करावी. अर्थकार्यांमध्यें पंडितांना, स्त्रियांमध्यें क्लीबांना व क्रूर कर्मांमध्यें निष्ठुर लोकांना नियुक्त करावें.

कार्य व अकार्य यांविषयीं उत्पन्न झालेली संशयित बुद्धि आपले हेर व धनादिकांचा लोभ दाखवून वश करून घेतलेले शत्रूंचे लोक, यांच्या द्वारा निश्चित करावी आणि शत्रूचें बलाबलहि जाणावें. जीविताच्या आशेनें शरण आलेल्या साधूवर अनुग्रह करावा आणि मर्यादा सोडून वागणाऱ्या अशिष्टांचा निग्रह करावा. कारण राजा जेव्हां निग्रह व अनुग्रह यांमध्यें प्रवृत्त होतो, तेव्हांच या लोकांची मर्यादा सुव्यवस्थित होते, हें मीं तुला सांगितलेंच आहे.

हे पार्था, मीं हा तुला राजधर्म सांगितला आहे. तो आपला धर्म इतर द्विजांच्या धर्माहून पृथक्त्वानें जाणून त्याचें नम्रपणें प्रतिपालन कर. ब्राह्मण तप, धर्म, दम व याग यांच्या योगानें स्वर्गलोकीं जातात. दान, आतिथ्य व धर्म यांच्या योगानें वैश्यांना सद्गति मिळते आणि क्षत्रिय भूलोकांतील दुष्टांचा निग्रह व साधूंचें परिपालन यांच्या योगानें स्वर्ग जिंकतात. जे क्षत्रिय काम, क्रोध, लोभ व द्वेष यांनीं रहित होऊन यथाशास्त्र दंडाचा उपयोग करितात, ते साधूंच्या सलोकतेस प्राप्त होतात. ३. ७. १५०.

---

## अध्याय १५१ वा.

[ १ हनुमानाच्या उग्र स्वरूपाचा उपसंहार. २ त्याचा भीमसेनाला वर. ]

(१) वैशंपायन—राजा जनमेजया, त्यानंतर त्या वानरश्रेष्ठानें स्वेच्छेनें प्रकट केलेल्या आपल्या विशाल शरीराकाराचा उपसंहार करून दोन्ही हातांनीं भीमसेनाला आलिंगन दिलें. तेव्हां हे भारता, भ्रात्यानें आलिंगन देतांक्षणीं भीमाच्या सर्व श्रमांचा परिहार होऊन त्याला सर्व भूतें अनुकूल झालीं. तो स्वभा-

वतःच बलाढ्य असलेला पांडुपुत्र स्वतःला अतिबलवान् व 'माझ्यासारखा दुसरा कोणीहि नाहीं' असें मानूं लागला.

शेवटीं तो वायुपुत्र हनुमान् अश्रुपूर्ण नयनांनीं व सद्गदित कंठानें मोठ्या प्रेमानें भीमसेनाला म्हणाला—"हे वीरा, तूं आतां आपल्या निवासस्थानीं जा आणि कथाप्रसंगीं माझें स्मरण कर. परंतु हे कुरुश्रेष्ठा, मी येथें असतों हें मात्र कोणाला सांगूं नको. आतां कुबेराच्या मंदिरांतून निघालेल्या देव-गंधर्व-स्त्रियांचा येथें येण्याचा समय झाला आहे.

हे भीमा, तुझ्या दर्शनानें आज माझ्या नेत्रांचें सार्थक झालें. तुझ्या मानुषशरीराचा स्पर्श झाल्यामुळें मला जगताला आनंद देणाऱ्या राघवाचें स्मरण झालें. तो 'राम'-संज्ञक भगवान् विष्णु सीतेच्या मुखकमलाला विकसित करणारा भास्कर आणि रावणरूपी अंधकाराचा नाश करणारा प्रकाशच होता. हे वीरा, आजची आपली ही भेट तुला फलद्रूप होवो. यास्तव भ्रातृस्नेहाला स्मरून तूं इष्ट वर मागून घे.

मी तुझें कोणतें प्रिय करूं, तें सांग. तूं हस्तिनापुरास जाऊन त्या क्षुद्र धार्तराष्ट्रांचा वध करावयास जर सांगत असशील तर मी तें आतांच करीन. किंवा 'शिलांच्या वर्षावानें मी त्यांच्या नगरीचा विध्वंस करावा आणि दुर्यो-धनाला बांधून तुझ्या समीप आणावें' अशी जर तुझी मनीषा असेल तर मी तीहि तत्काल पूर्ण करीन."

वैशंपायन—राजा, त्या महात्म्याचें हें वचन ऐकून संतुष्ट झालेला भीम त्याला म्हणाला—हे वानरश्रेष्ठा, तूं माझें सर्व प्रकारें प्रिय केलें आहेस. तुझें कुशल असो. मजवर प्रसन्न हो. तूं माझी एवढीच इच्छा पूर्ण कर.

हे अतुल सामर्थ्यवान् कपीश्वरा, तुझ्या साह्यामुळें आम्ही सर्व पांडव सनाथ झालों आहों. तुझ्याच तेजानें आम्ही सर्व शत्रूंचा पराजय करूं.

(२) राजन्, भीम असें बोलला असतां हनुमान् भ्रातृप्रेम आणि स्नेह यांनीं प्रेरित होऊन म्हणाला—"हे नरश्रेष्ठा, मी तुझें सर्व प्रिय करीन. तूं जेव्हां परसैन्याला व्याकुळ करणाऱ्या शत्रुसैन्यांत प्रवेश करून सिंहनाद कर-शील तेव्हां धनंजयाच्या रथध्वजावर स्थित असलेला मी आपल्या प्रचंड गर्ज-नेनें तुझा महाध्वनि वाढवीन आणि शत्रुसैन्याला भयभीत करणारा दारुण शब्द उत्पन्न करीन, म्हणजे तुम्ही शत्रूंचा सहज संहार कराल."

याप्रमाणें त्या हनुमानानें भीमाला सांगून त्याला मार्ग दाखविला आणि तो वायुसुत तेथेंच अंतर्धान पावला. ३. ७. १५१.

---

## अध्याय १५२ वा.

[ १ गंधमादन पर्वतावरील मार्गाचें वर्णन. २ भीमाचें सुवर्णकमलांनीं युक्त असलेल्या नदीपाशीं गमन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, याप्रमाणें कपिश्रेष्ठ हनुमान् तेथेंच गुप्त झाला असतां बलवानांतील श्रेष्ठ भीमहि त्या विस्तीर्ण गंधमादन पर्वतावर संचार करूं लागला. त्या बलाढ्य वायुसुताचें भूलोकांतील विशाल शरीर आणि अप्रतिम तेज यांचें स्मरण, दाशरथि रामाचें माहात्म्य आणि त्याचा प्रभाव, यांचें चिंतन करीत तो पुढें चालला.

त्या पांडुपुत्रानें त्या वेळीं सौगंधिक वनांत जाण्याच्या इच्छेनें मार्गांत अनेक रमणीय वनें आणि उपवनें पाहिलीं. त्याचप्रमाणें तीरावरील प्रफुल्ल वृक्षांनीं सुशोभित झालेलीं विचित्र सरोवरें, रम्य नद्या व नानाप्रकारच्या पुष्पांनीं चित्रविचित्र दिसणारीं वनें त्याच्या दृष्टीं पडलीं. वृष्टि करणाऱ्या मेघांप्रमाणें भासणाऱ्या व चिखलानें माखलेल्या मत्त गजांचे कळप आणि चंचल नेत्रांच्या हरिणींसह, कोमल तृणांचे हिरवे घांस तोंडांत घेऊन इतस्ततः फिरणारीं विपुल हरणें त्याला मार्गांत दिसलीं.

याप्रमाणें विचित्र सृष्टिशोभा अवलोकन करीत शूर भीमसेनानें महिष, वराह, सिंह यांचें निवासस्थान असलेल्या त्या पर्वतावर निर्भयपणें प्रवेश केला. त्या वेळीं नानाविध पुष्पांच्या सुवासानें व आरक्त कोमल पल्लवांनीं युक्त असलेले त्या अरण्यांतील वृक्ष वायूनें हलविल्यामुळें जणुं काय भीमसेनाला नम्रपणें बोलावीतच आहेत, असें भासलें. ज्यांनीं कमलरूपी अंजलिपुट जोडिले आहेत व मत्त भ्रमरांनीं ज्यांचें सेवन केलें आहे अशा मार्गांतील कमलिनींचेंहि त्यानें उल्लंघन केलें. त्या प्रफुल्ल पर्वतशिखरावर मन व दृष्टि आसक्त झाली असतां भीमसेन द्रौपदीचें वचन हेंच साहित्य बरोबर घेऊन मोठ्या त्वरेनें पुढें गेला.

( २ ) तेव्हां दिवस उलटून गेल्यामुळें एकत्र जमलेल्या हरिणांचे कळप सर्वत्र फिरूं लागले होते. इतक्यांत निर्मल, सुवर्ण कमलांनीं व्याप्त व विपुल

जलानें युक्त असलेली एक नदी त्यानें पाहिली. हंस, कारंडव, चक्रवाक इत्यादि पक्ष्यांनीं गजबजलेली ती नदी त्या शैलराजाच्या कंठांत घातलेल्या कमल-मालेप्रमाणेंच शोभत होती.

त्या नदीमध्यें महाबलाढ्य भीमसेनाला बाल सूर्याप्रमाणें प्रकाशणारें एक आल्हादकारक महत् सौगंधिक वन दिसलें. तें दृष्टीं पडतांच मनांतील हेतु पूर्ण झाल्यामुळें त्या पांडुनंदनानें मनांत वनवासाचे क्लेश भोगणाऱ्या पांचालीचें स्मरण केलें. ३. ७. १५२.

---

## अध्याय १५३ वा.

[ १ भीमाचा कुबेराच्या उद्यानांत प्रवेश व तेथील सरोवरांत क्रीडा. २ तेथील रक्षकांशीं संवाद. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, त्यानंतर त्या पृथापुत्रानें कैलास शिखराच्या समीप असलेल्या शुभ उपवनांत जाऊन प्रफुल्लित कमलांनीं व्याप्त असलेली एक पुष्करणी पाहिली. कुबेराच्या मंदिरासमीपच असलेलें तें सरोवर पर्वतावरून वहाणाऱ्या निर्झरांपासून उत्पन्न झालेलें असून नानाप्रकारचे वृक्ष व लता यांच्या विपुल छायेनें युक्त होतें. त्याच्या तीरावर सुंदर घाट बांधला होता. त्याच्या जवळचा प्रदेश पंकाच्या अभावीं अतिशय निर्मल व विविध पक्ष्यांच्या मधुर रवानें गजबजलेला होता. त्यांतील पीत कमलें सुवर्णासारख्या दिव्य परागांनीं प्रेक्षकांचें चित्त हरण करीत होतीं.

तें अतिशय रम्य सरोवर पर्वताच्या कड्यावरून वहाणाऱ्या निर्मल जलानें युक्त असून या लोकीं एक आश्चर्यच होतें. तें शुभ सरोवर अतिशय अद्भुत दिसत होतें. त्यांतील अमृततुल्य पवित्र व शीतल उदक पाहून कुंतीसुताला परम आल्हाद वाटला व त्यानें त्यांतील विपुल जल प्राशन केलें. ती रम्य पुष्करणी दिव्य सौगंधिक पुष्पांनीं व्याप्त झालेली असून त्यांतील सुवर्णासारखीं कमलें अतिशय सुवासिक होतीं. त्यांचे देंठ वैदूर्य मण्याप्रमाणें चित्रविचित्र व मनोरम दिसत होते. हंस-कारंडवादि पक्षी आपले पंख वारंवार हालवीत असल्यामुळें त्या कमलांतील निर्मल पराग इतस्ततः उडत होते.

तें रम्य सरोवर यक्षाधिपति महात्म्या कुबेराचें क्रीडास्थान असून गंधर्व, अप्सरा व देव त्याला परम पूज्य मानीत असत. दिव्य ऋषि, यक्ष व किन्नर यांनीं

सेवन केलेल्या त्या पवित्र सरोवराचें कुबरानें यक्ष व राक्षस यांच्याकडून मोठ्या दक्षतेनें रक्षण करविलें होतें. तें दिव्य सरोवर पाहून महा बलाढ्य कुंतीपुत्र अतिशय संतुष्ट झाला.

तेथें 'क्रोधवश'-नामक लक्षावधि राक्षस विचित्र आयुधें व कवचें धारण करून राजाज्ञेनें त्या सरोवराचें रक्षण करीत होते. ते रक्षक अजिन परिधान केलेला, सुवर्णाचीं बाहुभूषणें धारण करणारा व खड्गादि आयुधांनीं सज्ज झालेला भयंकर पराक्रमी भीम त्या पुष्करणीकडे कमलें नेण्यासाठीं निःशंकपणें येत आहे, असें पाहून परस्परांस हांका मारून उच्च स्वरानें बोलले—"अरे, हा आयुधांनीं सज्ज झालेला व अजिन पांघरलेला पुरुषव्याघ्र कोणत्या इच्छेनें येथें आला आहे, हें आपण त्याला विचारूं या."

असें बोलून ते सर्व वनरक्षक त्या महाबाहु तेजस्वी भीमसेनासमीप येऊन म्हणाले—"हे महामते, तूं कोण आहेस! तूं मुनिवेषधारी असून आयुधांनीं युक्त असलेलाहि दिसत आहेस! यास्तव तूं येथें कोणत्या हेतूनें आला आहेस, तें आम्हांला सांग." ३. ७. १५३.

---

## अध्याय १५४ वा.

[ १ कुबेराच्या आज्ञेनें कमलें तोडण्याविषयीं राक्षसांचा भीमाला उपदेश. २ 'याचना करणें हा क्षत्रधर्म नव्हे' असें बोलून भीमाचा पुष्करणींत प्रवेश. ३ राक्षसांनीं त्यास केलेला प्रतिबंध, त्यांशीं युद्ध व पराभव. ४ कुबेराला वृत्तान्त-कथन व त्याची अनुज्ञा. ]

(१) भीम—हे निशाचरहो, ऐका. मी धर्मराजाचा कनिष्ठ भ्राता 'भीमसेन'-नामक पांडव आहें. मी भ्रात्यांसह 'विशाला'-बदरीवृक्षाकडे आलों असतां तेथें वायूनें उडवून आणलेलें एक उत्कृष्ट सौगंधिक कमल पांचालीच्या दृष्टीं पडलें. तें पाहून तिला तशा पुष्कळ कमलांची इच्छा झाली. तेव्हां त्या माझ्या निष्पाप धर्मपत्नीचें प्रिय करण्यांत तत्पर असलेला मी येथें तीं पुष्पें नेण्यासाठीं आलों आहें.

राक्षस—हे पुरुषश्रेष्ठा, हें कुबराचें आवडतें क्रीडास्थान आहे. येथें मरणधर्मी मानवास विहार करतां येणें शक्य नाहीं. हे वृकोदरा, देवर्षि, यक्ष व

देवदेखील यक्षराज कुबेराची आज्ञा घेऊन मगच येथील जलाचें प्राशन व क्रीडा करितात. त्याचप्रमाणें गंधर्व व अप्सराहि त्या यक्षाधिपतीच्या अनुज्ञेनेंच येथें विहार करितात.

एखादा दुराचरणी मानव धनेश्वराचा अवमान करून जर अन्यायानें येथें विहार करण्याची इच्छा करील, तर त्याचा तत्काल नाश होईल, यांत संशय नाहीं. असें असतां तूं कुबेराच्या आज्ञेचा अनादर करून बलात्कारानें येथील कमलें हरण करण्याची इच्छा कशी करीत आहेस आणि तूं आपल्याला धर्मराजाचा भ्राता म्हणवितोस, हें कसें ? तूं अगोदर यक्षराजाची अनुज्ञा घे आणि मग खुशाल येथील जल प्राशन कर व पुष्पें तोडून ने. त्यावांचून तुला या पुष्करणीकडे नुस्तें पहातां येणेंहि शक्य नाहीं.

( २ ) भीमसेन—हे राक्षसहो, धनेश्वर कुबेर येथें कोठें जवळ दिसत नाहीं आणि जरी तो महाराज समीप असला तरीहि मी त्याच्यापाशीं केव्हांहि याचना करणार नाहीं. कारण क्षत्रिय केव्हांहि याचना करीत नसतात. हा सनातन धर्म आहे आणि मी क्षात्रधर्माचा त्याग करण्याची इच्छा कदापि करणार नाहीं.

शिवाय हे वनरक्षकहो, ही रम्य पुष्करणी पर्वताच्या निर्झरापासून उत्पन्न झाली आहे. महात्म्या कुबेराच्या मंदिरासमीप कांहीं हें सरोवर नाहीं. यास्तव कुबेराप्रमाणेंच इतर सर्व प्राण्यांचाहि त्यावर तुल्य अधिकार आहे. अशा प्रकारच्या निसर्गदत्त वस्तूची कोणीं कोणापाशीं याचना करावी ?

वैशंपायन—राजा, त्या सर्व राक्षसांना असें बोलून असहिष्णु भीमसेनानें त्या सरोवरांत प्रवेश केला.

( ३ ) तेव्हां त्या प्रतापवानाला सर्व राक्षसांनीं चोहोंबाजूंनीं 'हे मानवा नको, असें साहस करूं नको' अशी क्रोधानें निर्भर्त्सना करून प्रतिकार केला. पण भयंकर पराक्रमी पांडुपुत्रानें त्या सर्व राक्षसांस तुच्छ लेखून सरोवरांतील कमलें तोडण्यास आरंभ केला. तेव्हां त्या सर्वांनीं महातेजस्वी पांडवाला चोहोंकडून घेरलें आणि 'याला धरा, बांधा, तोडा, या भीमाला आपण शिजवून खाऊं

---

१ न हि याचन्ति राजान एष धर्मः सनातनः ॥

या' असें बोलणारे ते क्रुद्ध राक्षस डोळे वटारून व शस्त्रें उगारून त्याच्या समीप आले.

तेव्हां सुवर्णानें मढविलेली यमदंडासारखी आपली प्रचंड गदा उगारून तो वृकोदर मोठ्या वेगानें त्यांच्या अंगावर धांवला व 'थांबा, थांबा' असें म्हणाला.

तें पाहून ते राक्षसहि तोमर, पट्टे इत्यादि विविध शस्त्रें उपसून अकस्मात् त्याच्या अंगावर धांवले. क्रोधवश झालेल्या त्या भयंकर राक्षसांनीं भीमाला मारण्याच्या इच्छेनें सर्वतः परिवेष्टित केलें. तेव्हां शत्रूंचा संहार करणारा, सत्य व धर्म यांत रत असलेला, समरांत शत्रूला अजिंक्य, बलाढ्य व शूर वायुपुत्र कौंतेय त्या राक्षसांचे अनेकप्रकारचे बाण व शस्त्रें यांची गति कुंठित करून युद्ध करूं लागला. त्या पराक्रमी पांडुसुतानें त्या पुष्करणीच्या समीपच शेकडों वीर राक्षसांचा संहार केला.

तेव्हां त्याचें वीर्य, शारीर बल, विद्याबल व बाहुबल पाहून त्याचा वेग सहन करण्यास असमर्थ झालेले ते सर्व वीर राक्षस एकाएकीं युद्धापासून निवृत्त झाले व दश-दिशांत पळून गेले. ते देहभान विसरून आकाशमार्गानें कैलास-शिखराकडे पळाले. भीमाचा त्यांना अतिशय क्रोध आला होता, पण त्याच्या-कडून पीडिले जाणारे ते त्याच्यासमोर उभे राहूं शकले नाहींत.

अशाप्रकारें तो कुंतीपुत्र दैत्य व दानव यांच्या संघांत इंद्राप्रमाणें संचार करून व संग्रामांत शत्रुसमूहास जिंकून त्या पुष्करणींत शिरला व त्या विजयी पृथापुत्रानें आपल्या इच्छेप्रमाणें कमलें तोडून घेतलीं. नंतर त्यानें तेथील अमृतासारखें मधुर जल प्राशन केलें. त्यामुळें त्याचें बल व तेज अधिकच वाढलें.

(४) त्या वीरानें पुनः उत्तम गंधानें युक्त असलेलीं आणखींहि दिव्य कमलें उपटून घेतलीं. तें पाहून भीमाच्या बलानें पराभूत झालेल्या त्या दैत्यांना फारच क्रोध आला व ते सर्व मिळून धनेश्वर कुबेराकडे आले व भय-भीत झालेल्या त्या कुबेर किंकरांनीं भीमाचें युद्धांतील बल व पराक्रम त्यास निवेदन केला.

राक्षसांचें तें वचन ऐकून यक्षपति कुबेर त्यांस हंसून म्हणाला—"मला हें सर्व वृत्त पूर्वीच कळलें आहे. भीमाला कृष्णेसाठीं त्याच्या इच्छेप्रमाणें हवीं तेवढीं कमलें नेऊं द्या."

तेव्हां यक्षाधिपतीची अनुज्ञा घेऊन ते राक्षस शांत मनानें पुष्करणीजवळ आले आणि पहातात तों कुरुवंशांतील तो वीरश्रेष्ठ भीम त्या सरोवरांत एकटाच यथेष्ट विहार करीत आहे, असें त्यांस दिसलें. ३. ७. १५४.

---

## अध्याय १५५ वा.

[१ भयसूचक उत्पात. २ ते पाहून भीमाच्या शोधार्थ पांडवादिकांचें पुष्करणी-पाशीं आगमन. ३ भीमाला उपदेश. ४ तेथेंच कांहीं काल निवास. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, त्यानंतर निर्भय झालेल्या भीमसेनानें त्या सरोवरांतील अमूल्य, दिव्य, विचित्र व अतिशय शुद्ध अशीं असंख्य कमलें तोडून घेतलीं. इतक्यांत फार मोठा वायु वेगानें वाहूं लागला. भयंकर धूळ उडूं लागली. त्याचा स्पर्श सर्वांस असह्य झाला. मोठ्या गर्जनेसह उल्कापात झाला. सूर्य निस्तेज होऊन जणुंकाय अंधकारानें आवृत झाला. मेघांचा मोठा गडगडाट झाला.

राजा, भीम त्या सरोवरावर असा पराक्रम करीत असतां इकडे अशीं अनेक संग्रामसूचक चिह्नें प्रादुर्भूत झालीं. भूकंप झाला. धूलीची वृष्टि झाली. सर्व दिशा रक्तवर्ण दिसूं लागल्या. पशु-पक्षी कर्कश आक्रोश करूं लागले. सर्वत्र अंधकार पसरला आणि कांहीं दिसेनासें झालें. दुसरेहि असेच अनेक भयंकर उत्पात होऊं लागले.

हा अद्भुत प्रकार पाहून वक्त्यांतील श्रेष्ठ धर्मपुत्र युधिष्ठिर म्हणाला—हे युद्धदुर्मद पांडवहो, आपला पराभव करण्यास कोण बरें येत असावा! हे वीरांनो, तुमचें कल्याण असो, तुम्ही सज्ज व्हा. या सर्व चिह्नांवरून मला आपल्या पराक्रमाचा काल समीप आला आहे, असें वाटतें.

राजन्, असें बोलून धर्मराजानें आपल्या सभोंवार दृष्टि फेंकली. परंतु त्याला तेथें भीमसेन कोठें दिसेना. तेव्हां युधिष्ठिरानें समीपच असलेल्या याज्ञसेनीस व उभय माद्रीपुत्रांस युद्धामध्यें भयंकर कर्मे करणाऱ्या भीमसेनाविषयीं प्रश्न केला.

धर्मराज म्हणाला—हे पांचाली, भीम कोठें आहे, तो वीर कोणतें महत्कृत्य करण्याच्या विचारांत गुंतला आहे. किंवा त्या माझ्या साहसप्रिय भ्रात्यानें

कांहीं साहस तर केलें नाहीं ना ? हे महासंग्रामसूचक उत्पात अकस्मात् चोहोंकडून प्रादुर्भूत होत आहेत. ते माझ्या मनांत भय उत्पन्न करितात.

असें बोलणाऱ्या युधिष्ठिराला मानिनी कृष्णा त्याचें प्रिय करण्याच्या इच्छेनें म्हणाली—हे राजन्, वायूनें जें सौगंधिक कमल आणलें होतें, तें मीं आज प्रीतीनें भीमसेनाला दाखविलें व त्या वीराला म्हटलें कीं, अशीं विपुल कमलें जर तुला कोठें दिसलीं तर तीं सत्वर घेऊन ये. तो महाबाहु पांडव माझें प्रिय करण्यासाठीं ईशान्य दिशेकडे गेला आहे. खरोखर तो तीं कमलें आणण्यासाठींच गेला असावा.

(२) कृष्णेनें असें सांगितलें असतां राजा युधिष्ठिर नकुल-सहदेवांस म्हणाला—हे वीरांनो, वृकोदर ज्या मार्गानें गेला आहे त्याच मार्गानें आपण सर्व मिळून सत्वर जाऊं या. श्रांत व कृश झालेल्या ब्राह्मणांस हे राक्षस वाहून नेवोत.

हे देवतुल्य घटोत्कचा, तूंहि कृष्णेला उचलून घे. भीमाला जाऊन बराच काल लोटला आहे. त्यावरून तो येथून बराच दूर गेला असावा, हें उघड होतें. कारण तो वायूसारखा वेगवान् आहे. मार्गाचें आक्रमण करीत असतां तो गरुडासारखा वेग धारण करीत असतो. तो प्रसंगीं आकाशांतहि उडून जाईल व स्वेच्छेनें मेरुपर्वतावरूनहि उडी टाकील. यास्तव हे रजनीचरांनो, जोंवर त्यानें ब्रह्मवादी सिद्धांचा कांहीं अपराध केला नाहीं, तोंवरच आपण त्याच्यापाशीं जाऊं या.

तेव्हां 'ठीक आहे' असें बोलून ते सर्व हैडिंबादि राक्षस त्याच्या आज्ञेप्रमाणें तेथून निघाले. हे भरतश्रेष्ठा, त्यांना कुबेराच्या त्या पुष्करणीचें स्थान माहित होतें. त्यामुळें ते पांडव व अनेक विप्र यांस उचलून घेऊन लोमशासह संतुष्ट चित्तानें निघाले व थोड्याच अवकाशांत उद्दिष्ट स्थानीं जाऊन पोंचले. तेथें जातांच त्यांनीं त्या शुभ अरण्यानें युक्त असलेल्या पद्मसौगंधिकयुक्त मनोहर पुष्करणीला व तिच्या तीरावर स्थित असलेल्या मानी महात्म्या भीमसेनाला पाहिलें.

भीमसेनाच्या गदाप्रहारांनीं ज्यांचे शरीरावयव छिन्न-भिन्न झाले आहेत, असे गतप्राण होऊन पडलेले यक्षहि त्यांच्या दृष्टीं पडले. त्या वेळीं त्या पुष्करणीच्या तीरावर क्रोधानें नेत्र लाल करून दांत-ओठ खात दोन्ही हातांनीं गदा

उगारून स्थित असलेला विजयी भीम प्रलय कालीं हातीं दंड घेऊन स्थित असलेल्या यमाप्रमाणें भासला.

( ३ ) पण धर्मराज त्याच्या समीप जाऊन व त्याला पुनः पुनः आलिंगन देऊन मधुर वाणीनें म्हणाला—" कौंतेया, हें काय केलेंस! वत्सा, तुझें कल्याण असो. हें तुझें साहस देवांना कधींहि प्रिय वाटणार नाहीं. माझें प्रिय करावें अशी जर तुझी इच्छा असेल, तर तूं पुनः असलें साहस करूं नको. "

भीमाला असा उपदेश करून व तीं सर्व कमलें घेऊन ते सर्व देव-तुल्य वीर त्याच पुष्करणींत विहार करूं लागले. तें पाहून त्या उद्यानाचे रक्षक मोठाल्या शिला हींच आयुधें धारण करून तेथें प्रकट झाले. पण धर्मराज, महर्षि लोमश, नकुल, सहदेव, व इतर ब्राह्मणश्रेष्ठ यांस पाहून ते सर्व विनयानें नम्र झाले. तेव्हां धर्मराजानेंहि प्रणामपूर्वक त्यांचें सान्त्वन केलें. त्यामुळें ते नक्तंचर प्रसन्न झाले.

( ४ ) कुरुश्रेष्ठ पांडव आपल्या पुष्करणीपाशीं आले आहेत, हें कुबेरालाहि कळलें. बीभत्सूची प्रतीक्षा करणारे ते कुरुकुलोद्वह गंधमादनाच्या शिखरावर कांहीं काल विहार करीत राहिले. ३. ७. १५५.

---

## अध्याय १५६ वा.

[ १ धर्मराजाचा कुबेराच्या मंदिराकडे चलण्याविषयीं भ्रात्यांशीं संकेत. २ आकाशवाणीनें त्यांचें केलेलें निवारण. ३ पांडवांचें नर-नारायणाश्रमाकडे पुन-र्गमन व निवास. ]

( १ ) **वैशंपायन**—हे परिक्षित्पुत्रा, याप्रमाणें धर्मराज युधिष्ठिर त्या शैल-शिखरावर रहात असतां एकदा तो कृष्णेसह भ्राते व ब्राह्मण यांस म्हणाला—" अहो, आपण आतांपर्यंत अनेक शुभ व पवित्र तीर्थें आणि मनाला आह्लाद देणारीं निरनिराळीं वनें पाहिलीं. पूर्वी देव आणि महात्मे मुनि यांनीं जेथें निवास केला होता अशीं स्थानें व द्विजांना पूज्य असलेले पुण्यप्रद विविध आश्रम, यांचेंहि क्रमानें अवलोकन केलें. त्याचप्रमाणें ऋषींचीं पूर्वचरित्रें, अद्भुत कर्मे आणि भिन्न भिन्न क्षत्रियश्रेष्ठांच्या नानाप्रकारच्या शुभ कथा व आचार श्रवण करीत आम्हीं त्या त्या शुभ आश्रमांत वास्तव्यहि केलें.

तेथें आम्हीं विशेषतः ब्राह्मणांसह, पवित्र जलांत स्नानें, सुवासिक पुष्पांनीं देवांचें पूजन आणि प्राप्त फळें व कंद-मुळें यांनीं पितरांचें तर्पण केलें. रम्य पर्वतावरून वहाणाऱ्या सर्व नद्या, सरोवरें व महापुण्यप्रद सागर त्याचप्रमाणें इला, सरस्वती, सिंधु, यमुना, नर्मदा इत्यादि अनेक पावन तीर्थें यांत आम्हीं महात्म्या द्विजांसह स्नानें केलीं.

गंगाद्वाराचें उल्लंघन केल्यावर आम्हीं अनेक शुभ पर्वत, विशेषतः नानाप्रकारच्या पक्षिगणांनीं युक्त असलेला हिमवान् पर्वत, विशाला बदरी, नर-नारायणाश्रम आणि सिद्ध व देवर्षि यांस पूज्य असलेली ही दिव्य पुष्करणीहि पाहिली. त्याचप्रमाणें आम्हांला महात्म्या लोमशमुनीनें सर्व देवालयेंहि यथाक्रम दाखविलीं. आतां हे भीमा, या सिद्धसेवित पुण्यप्रद कुबेरमंदिरांत आपला प्रवेश कसा होईल, याचा विचार कर.

(२) वैशंपायन—राजा, युधिष्ठिर जों असें बोलत आहे तोंच अशी आकाशवाणी झाली—"हे राजन्, तुला कुबेराश्रमांत जातां येणें शक्य नाहीं. तें स्थान अतिशय दुर्गम आहे. यास्तव हे पांडवा, तूं आल्या मार्गानें 'बदरी'-नांवानें प्रसिद्ध असलेल्या नर-नारायणांच्या आश्रमाला परत जा. तेथूनच सिद्ध-चारणांनीं सेवन केलेल्या व विपुल पुष्प-फलांनीं युक्त असलेल्या वृषपर्व्याच्या रम्य आश्रमाकडे गमन कर आणि त्याचेंहि आक्रमण करून आर्ष्टिषेणाच्या आश्रमांत जाऊन रहा. तेथें तुला कुबेराच्या मंदिराचें दर्शन घडेल."

जनमेजया, इतक्यांत दिव्य सुवासानें युक्त असलेला, शुद्ध, शीतल व आल्हादकारक वायु वाहूं लागला आणि पुष्पवृष्टि झाली. तेव्हां ती दिव्य आकाशवाणी ऐकून सर्व लोक चकित झाले. विशेषतः ऋषि, ब्राह्मण व क्षत्रिय यांना तर अतिशय विस्मय वाटला.

(३) राजा, ती आश्चर्यकारक आकाशवाणी ऐकून द्विजश्रेष्ठ धौम्य हे 'भरतश्रेष्ठा, आतां या देववाणीला उत्तर देतां येणें शक्य नाहीं' असें बोलला. तेव्हां युधिष्ठिर त्याचें म्हणणें मान्य करून भीमसेनादि भ्राते, पांचाली व ब्राह्मणादि सर्व परिवार यांसह नर-नारायणाश्रमास परत आला आणि तेथें सुखानें राहिला. ३. ७. १५६.

येथें सातवें तीर्थयात्रापर्व समाप्त झालें.

---

# जटासुरवधपर्व ८.

## अध्याय १५७ वा.

[ १ जटासुराचा युधिष्ठिरापाशीं ब्राह्मणवेषानें निवास. २ भीम-घटोत्कचादि तेथून दूर गेले असतां द्रौपदी व अवशिष्ट पांडव यांचें शस्त्रांसह हरण, सहदेवाचें त्याच्या हातून निसटणें. ३ युधिष्ठिराचा राक्षसाला उपदेश व मोह. ४ सहदेवाचें युद्धाला आह्वान. ५ भीमाचें आगमन, राक्षसाची निर्भर्त्सना. ६ जटासुराशीं भीमाचें युद्ध व असुराचा वध.

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, ते पांडव भ्राते प्रिय अर्जुनाची मार्गप्रतीक्षा करीत त्या श्रेष्ठ पर्वतावर ब्राह्मणांसह निर्भयपणें रहात असतां घटोत्कचासह सर्व राक्षस आणि भीमसेनहि यदृच्छेनें आश्रमांत नाहींत, असें पाहून एक असुर ब्राह्मणवेषानें तेथें आला आणि त्यानें 'मी सर्वशास्त्रवेत्ता, मंत्रकुशल व सच्छील ब्राह्मण आहें' इत्यादि सांगून धर्मराज, पांचाली व नकुल-सहदेव यांच्या मनांत स्वतःविषयीं पूज्यभाव उत्पन्न केला. उदारात्म्या युधिष्ठिरानें त्याला आश्रय दिला, पण पांडवांचीं धनुष्यें, भाते व इतर आयुधें यांची इच्छा करणारा तो दुरात्मा कपटवेषधारी दैत्य नित्य त्या कौंतेयांची सेवा करीत द्रौपदीचें हरण करण्याची संधि पहात बसला.

तो पापबुद्धि दानव 'जटासुर' या नांवानें प्रसिद्ध होता. भस्माच्छादित अग्नीप्रमाणें त्याचें खरें स्वरूप जाणतां न आल्यामुळें धर्मराजानें त्याचें पोषण केलें.

( २ ) हे परंतपा, एकदा भीमसेन मृगयेसाठीं आणि घटोत्कच आपल्या अनुयायांसह दश-दिशांकडे निघून गेला होता, लोमशप्रभृति महर्षि समाधींत निमग्न झाले होते आणि इतर तपोधन मुनि स्नान करण्यास व पुष्पादि आणण्यास आश्रमापासून दूर गेले होते. अशा वेळीं त्या असुरानें भयंकर विकृत रूप धारण केलें आणि सर्व शस्त्रें घेऊन तो दुरात्मा द्रौपदीसह तिन्ही पांडवांना उचलून घेऊन चालला.

परंतु चपल सहदेव मोठ्या यत्नानें त्याच्या हातांतून निसटला. त्यानें खड्ग उपसून शत्रूपासून स्वतःला सोडवून घेतलें आणि भीमसेन ज्या दिशेनें गेला होता, त्या मार्गाकडे वळून उच्च स्वरानें हांका मारूं लागला.

( ३ ) त्यावेळीं हरण करून नेणाऱ्या राक्षसाला धर्मराज युधिष्ठिर म्हणाला —हे मूढा, तुझ्या धर्मांची हानि होत आहे. त्याकडे तूं पहात नाहींस. तुझ्यावांचून इतर सर्व मनुष्यें, तिर्यग्योनींत उत्पन्न झालेले प्राणी व विशेषतः राक्षस तर धर्माकडे अवश्य दृष्टि देतात. राक्षस धर्माचें मूळ आहेत. त्यामुळेंच ते तो धर्म उत्तमप्रकारें जाणतात. हें सर्व लक्षांत घेऊन तूं येथें समीपच थांबावेंस हें योग्य होय.

हे असुरा, देव, ऋषि, सिद्ध, पितर, गंधर्व, नाग, राक्षस, पशु, पक्षी आणि तिर्यग्योनींत उत्पन्न झालेले कीट, मुंग्या, माशा इत्यादि सर्व प्राणी मनुष्यावर उपजीविका करितात आणि तूंहि मानवांच्या अनुग्रहानेंच जीवंत राहिला आहेस. या मर्त्यलोकींच्या समृद्धीवरच देवासुरादिकांचा उत्कर्ष होत असतो. हा मानवलोक शोकग्रस्त झाला असतां देवताहि खिन्न होतात आणि मनुष्यांनीं हव्य-कव्यादिकांच्या योगानें त्यांचें यथाविधि पूजन केलें असतां वृद्धि होत असते.

शिवाय हे राक्षसा, आम्ही या राष्ट्राचें रक्षण व पालन करणारे आहों. आमचा नाश केल्यानें राष्ट्राचें संरक्षण होणार नाहीं. मग सुख कोठचें व ऐश्वर्य तरी कोठचें ? राक्षसानें अपराधावांचून राजाचा अवमान करूं नये.

आम्हीं तुला यत्किंचित्‌हि अपकार केलेला नाहीं. हे नरभक्षका, आम्ही देव, असुर, ब्राह्मण इत्यादिकांना यथाशक्ति अन्न अर्पण करून शेष राहिलेल्या ‘ विघसान्नाचें भोजन करितों, गुरु व ब्राह्मण यांचें वचन प्रमाण मानून तद्वत् वागत असतों.

हे निशाचरा, मित्र, आपणावर विश्वास ठेवणारे, आपले अन्नदाते व आश्रयदाते यांच्याशीं केव्हांहि द्रोह करूं नये आणि तूं तर आमच्या आश्रयाला सुखानें राहिलास, आमचें अन्न खाल्लेंस, आम्हीं तुझा मोठा सत्कार केला, असें असतां हे दुर्बुद्धे, आम्हांला हरण करून नेण्याची इच्छा कशी करतोस !

हे मंदमते, तुझा आचार, तुझी बुद्धि व तुझें वृद्धत्व हें सर्व व्यर्थ होऊन तूं आज आपणावर व्यर्थ मरण ओढवून घेत आहेस. यास्तव बाबारे, वृथा प्राण

१ द्रोग्धव्यं न च मित्रेषु न विश्वस्तेषु कर्हिचित् ।
येषां चान्नानि भुंजीत यत्र च स्यात्प्रतिश्रयः ॥

गमावूं नको. सर्वधर्मरहित असलेल्या तुझी जर अशीच दुष्टबुद्धि असेल तर आमचीं शस्त्रें आम्हांला परत देऊन आमच्याशीं युद्ध कर आणि मग द्रौपदीचें हरण कर.

परंतु तूं जर अविवेकानें हें अमानुष कर्म करशील तर तुला या लोकीं केवल अधर्म व अपकीर्ति यांचीच प्राप्ति होईल. हे राक्षसा, तूं आज मानवस्त्रीला स्पर्श करून हें विषच ढवळून कुंभानें प्राशन केलें आहेस.

असें बोलून युधिष्ठिरानें आपलें शरीर जड केलें. त्या भारानें पराजित झालेल्या त्या राक्षसाला शीघ्र गतीनें चालवेना. तेव्हां युधिष्ठिरानें द्रौपदी व नकुल यांना म्हटलें—"तुम्ही भिऊं नका, या मूढ राक्षसाची गति मीं कुंठित केली आहे. वायुनंदन पराक्रमी भीमसेनहि येथून फारसा दूर गेला नसेल. तो जर इतक्यांत आला तर हा राक्षस जिवंतच रहाणार नाहीं."

( ४ ) हे जनमेजया, त्यानंतर त्या मूढ झालेल्या राक्षसाला पाहून सहदेव कुंतीपुत्र युधिष्ठिराला म्हणाला—"हे राजन्, युद्धामध्यें शत्रूला तोंड देऊन प्राणत्याग करणें किंवा शत्रूंला जिंकणें याहून क्षत्रियाला अधिक सत्कार्य तें काय आहे ? हे परंतप, आपण या राक्षसाशीं युद्ध करूं या. कारण हा युद्धाचाच काल आहे. त्यांत हा आम्हांला मारील किंवा आम्ही याला मारूं.

हे सत्यपराक्रमी राजा, हा क्षत्रधर्माचा काल आला आहे. या वेळीं माघार घेणें योग्य नाहीं. एक तर आपण याला जिंकूं किंवा याच्या हातून मरून सद्गतीला प्राप्त होऊं. आज हा राक्षस जिवंत असतांना जर सूर्य अस्त पावला तर मी पुढें केव्हांहि स्वतःला क्षत्रिय म्हणविणार नाहीं. हे दुष्ट राक्षसा, उभा रहा, मी पांडुपुत्र सहदेव आहें. प्रथम माझा वध करून मग तूं या राजकन्येला घेऊन जा. किंवा माझ्या हातून मरून भूमीवर शयन कर."

( ५ ) पारिक्षिता, माद्रीपुत्र सहदेव असें बोलत आहे तोंच वज्रयुक्त असलेल्या इंद्राप्रमाणें हातीं गदा घेतलेला भीमसेन समोर दिसला. त्या वीरानेंहि आपले दोघे भ्राते, यशस्विनी द्रौपदी व भूमीवर उभा राहून राक्षसाची निर्भर्त्सना करीत असलेला सहदेव यांस पाहिलें.

त्या महात्म्यानें कालवशात् मूढ व अविवेकी झालेल्या, मार्गामध्यें घोंटाळणाऱ्या, तेथल्या तेथेंच भ्रमण करीत असलेल्या त्या दुर्बुद्धि राक्षसालाहि पाहिलें. तो दुरात्मा आपल्या भ्रात्यांना व द्रौपदीला हरण करीत आहे, असें पाहून भीम

अतिशय क्रुद्ध झाला व त्या राक्षसास म्हणाला—"अरे पाप्या, आमच्या शस्त्रांकडे तुझी दृष्टि आहे हें पाहूनच मीं तुला ओळखलें होतें, परंतु मला तुझें यत्किंचित्‌हि महत्त्व वाटलें नाहीं, म्हणून मीं तुझी उपेक्षा केली व त्याच वेळीं तुझा नाश केला नाहीं. तूं, आपलें मूळ स्वरूप झांकून ब्राह्मणरूपानें आमच्या आश्रयास राहिलास, आम्हांला कधीं अप्रिय बोलला नाहींस, आमचें प्रिय करण्यांत तत्पर होतास, तेव्हां प्रिय करणाऱ्या निरपराध, ब्राह्मणरूप अतिथीला मीं कसें मारावें ?

तूं राक्षस आहेस हें जरी मला ठाऊक होतें, तरी अपराधावांचून मीं तुझा वध केला असता, तर मला नरकप्राप्ति झाली असती. आजपर्यंत तूं कालानें परिपक्क झाला नव्हतास, म्हणून तुला या पूर्वींच माझ्या हातून मृत्यु आला नाहीं. पण आज तूं परिपक्क झाला आहेस. म्हणून तुला अशी बुद्धि झाली. खरोखरच अद्भुत कर्में करणाऱ्या कालानेंच तुला कृष्णेला हरण करण्याची प्रेरणा केली आहे. कालसूत्राला अडकविलेला हा गळच तूं गिळला आहेस व त्यामुळें मत्स्याप्रमाणें तो तुझ्या कंठाला अडकला आहे. तेव्हां बाबारे, तूं आतां कसा जिवंत रहाणार ?

तूं ज्या प्रदेशीं जावयास निघाला आहेस व तुझें मन जेथें पूर्वींच जाऊन पोंचलें आहे, तेथें तुझें शरीर जाऊन पोंचणार नाहीं. तर तूं बक व हिडिंब यांच्याच मार्गानें जाशील."

(६) भीमानें असें भाषण केलें असतां कालानें ज्याला प्रेरणा केली आहे असा तो राक्षस भयभीत झाला आणि युधिष्ठिर, नकुल व द्रौपदी यांस सोडून भीमाशीं युद्ध करण्यास सज्ज झाला.

क्रोधानें अधरोष्ठ कांपत असलेला तो राक्षस भीमाला म्हणाला—"हे पाप्या, मी दिङ्मूढ झालों व त्यामुळें मार्गांत घोंटाळत राहिलों असें समजूं नको, तर तूं यावास म्हणूनच मीं विलंब लाविला. तूं रणामध्यें ज्या ज्या राक्षसांना गतप्राण केलेंस, असें मीं ऐकलें आहे, त्या सर्वांना उद्देशून आज तुझ्या रक्तानें मी त्यांचें तर्पण करणार आहें.

जटासुराचें हें वचन ऐकून भीम अतिशय क्रुद्ध झाला. तो दांत-ओंठ खात व जिभल्या चाटीत त्याच्या अंगावर धांवून गेला; त्या वेळीं तो वीर पांडव साक्षात् कालांतकासारखा भासला. दंड थोपटून त्या राक्षसाकडे क्रूर दृष्टीनें

पहात विजयी कौंतेय राक्षसापुढें गेला असतां तो राक्षसहि युद्धार्थ उपस्थित झालेल्या भीमाच्या अंगावर मुख पसरून व जिभल्या चाटीत धांवून आला.

त्या वेळीं क्षुब्ध झालेला तो जटासुर इंद्रावर चालून जाणाऱ्या बलीप्रमाणें शोभला. इतक्यांत अतिशय क्रुद्ध झालेले दोघे माद्रीपुत्रहि त्या राक्षसावर धांवून आले. पण कुंतीपुत्र वृकोदरानें त्यांचें हंसतच निवारण करून म्हटलें— "वत्सांनो, मी एकटाच या राक्षसाचा वध करण्यास समर्थ आहें. तुम्ही केवल प्रेक्षक होऊन आमचें युद्ध पहा. हे राजन्, मी स्वतःची, सर्व भ्रात्यांची, धर्माची, पुण्याची व यज्ञ-यागाची शपथ वाहून तुला सांगतों कीं, मी या राक्षसाचा वध करीन."

इतकें बोलून वृकोदरानें युद्ध आरंभिलें. ते दोघे बलाढ्य वीर परस्परांशीं बाहुयुद्ध करूं लागले. क्रुद्ध झालेल्या त्या दोघांनीं परस्परांवर भयंकर प्रहार केले. देव व दानव यांप्रमाणें त्या उभयतांनीं पराक्रमाची पराकाष्ठा केली. पुनः पुनः वृक्ष उपटून त्यांनीं एकमेकांवर आघात केले. ते दोघेहि बलाढ्य वीर मेघाप्रमाणें गर्जना करूं लागले.

परस्परांचा वध करण्याच्या इच्छेनें एकमेकांवर धांवून जाणाऱ्या त्या दोघांहि बलवानांतील श्रेष्ठ वीरांनीं मांड्यांच्या आघातांनीं महावृक्ष मोडून टाकिले त्या दोघांचें वृक्षांचा विनाश करणारें तें युद्ध पूर्वी स्त्रीच्या इच्छेनें युद्ध करणाऱ्या वाली व सुग्रीव या भ्रात्यांच्या द्वंद्वयुद्धाप्रमाणें भासलें. ते दोघेहि वारंवार वृक्ष उपटून व ते गरगर फिरवून एकमेकांवर फेकूं लागले. त्यांनीं पुनः पुनः भयंकर गर्जना केली.

याप्रमाणें त्या असुर-मानवांचें दोन घटका तुमुल वृक्षयुद्ध झालें. त्या प्रदेशांतील सर्व वृक्ष त्यांनीं पाडवून टाकिले व परस्परांचा वध करण्याच्या इच्छेनें शेंकडों वृक्ष मुंजातृणासारखे मृदु करून सोडिले. जसे दोन महापर्वत प्रचंड मेघांनीं परस्पर युद्ध करीत असल्याप्रमाणें भासतात, त्याप्रमाणें त्या दोघां बलवानांनीं शिला घेऊन एकमेकांवर फेंकल्या. शत्रूचा पराक्रम सहन न करणाऱ्या त्या दोघां वीरांनीं, वेगवान् वज्राप्रमाणें, पर्वतशिखरांसारख्या प्रचंड शिला एकमेकांच्या अंगावर फेंकल्या. बलानें उन्मत्त झालेल्या त्या दोघांनीं एकमेकांवर चालून जाऊन परस्परांचे हात धरिले व ते गजांप्रमाणें एकमेकांस ओढूं लागले, भयंकर मुष्टिप्रहार केले, त्यांचा चटचट असा शब्द होऊं लागला.

शेवटीं भीमानें पांच फणांनीं युक्त असलेल्या सर्पासारख्या आपल्या हाताची मूठ वळून त्याच्या मानेवर असह्य प्रहार केला. त्यामुळें तो राक्षस श्रांत व हतबल झाला. आपला शत्रु सर्वथा दुर्बल झाला आहे, असें पाहून भीमानें दोन्ही हातांनीं त्याला वर उचलून भूमीवर आदळलें व त्याला चिरडून त्याचीं सर्व गात्रें खिळखिळीं करून सोडिलीं आणि मनगटाच्या प्रहारानें त्याचें मस्तक धडापासून दूर केलें. तेव्हां वृक्षापासून फल जसें तोडून टाकावें, त्याप्रमाणें ज्याची दांतखिळी बसली आहे, ओंठ स्फुरण पावत आहेत व दृष्टि फिरली आहे, अशा त्या जटासुराचें शिर भीमानें बलात्कारानें धडापासून वेगळें केलें. तेव्हां रक्तानें माखलेला त्याचा देहहि भूमीवर निश्चेष्ट होऊन पडला.

याप्रमाणें जटासुराचा वध करून विजयी भीमसेन युधिष्ठिरापाशीं आला. तेव्हां देव इंद्राची जशी स्तुति करितात तशी ब्राह्मणांनीं त्याच्या पराक्रमाची स्तुति केली. ३. ८. १५७.

येथें आठवें जटासुरवधपर्व समाप्त झालें.



## यक्षयुद्धपर्व ९.

—✿—

### अध्याय १५८ वा.

[ १ पांडवांचें वृषपर्व्याच्या आश्रमांत गमन. २ तेथून कैलासपर्वताकडे प्रयाण. ३ हिमालयाच्या पृष्ठभागाचें व गंधमादनपर्वताचें वर्णन. ४ आर्ष्टिषेण मुनीचें दर्शन. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, भीमानें जटासुराचा वध केल्यानंतर प्रभु युधिष्ठिर पुनः नर-नारायणांच्या आश्रमांत येऊन राहिला. एके दिवशीं धर्मराजानें भ्राते व द्रौपदी या सर्वांस बोलावून अर्जुनाचें स्मरण करीत योग्य कालीं असें म्हटलें—"हे वीरांनो, वनांत संचार करण्यांत आपण चार वर्षें सुखानें घालविलीं. 'मी पांच वर्षांनीं अवश्य परत येईन' असें बोलून बीभत्सु येथून गेला. आतां त्याचा परत येण्याचा काल समीप आला आहे; यास्तव आपण मत्त कोकिल, मयूरादि पक्षी, मृगादि पशु व व्याघ्र-सिंहादि हिंस्र श्वापदें यांचें निवासस्थान, प्रफुल्ल वृक्ष, नीलोत्पलें आणि विविध कमलें यांनीं युक्त

आणि सुरासुरांना सेव्य अशा या पुण्यप्रद श्रेष्ठ शैलराज कैलासपर्वतावर जाऊं या. त्या पवित्र गिरिशिखरावरच धनंजयाची मार्गप्रतीक्षा करीत बसण्याचा आम्हीं संकेत केला होता.

शिवाय त्या सव्यसाचीनेंहि ‘ मी अस्त्रविद्या संपादन करण्यासाठीं पांच वर्षे स्वर्गलोकीं राहीन ’ असा मजपाशीं पूर्वीच संकेत केला आहे. तस्मात् आपण सर्व तेथें जाऊन गांडीव धनुष्य धारण करणाऱ्या त्या कृतार्थ अरिंदमाला देवलोकांतून या लोकीं परत आलेला पाहूं या. ”

आपले प्रिय भ्राते व साध्वी द्रौपदी यांस असें बोलून युधिष्ठिरानें सर्व ब्राह्मणांचाहि विचार घेतला आणि त्या तपोनिष्ठ मुनींना तेथें जाण्याचें कारणहि निवेदन केलें. नंतर पांडवांनीं त्या उग्र तपस्वी ब्राह्मणांना मोठ्या संतोषानें प्रदक्षिणा घातली. तेव्हां ब्राह्मणांनीं त्यांचें कुशल चिंतून शुभाशीर्वादपूर्वक युधिष्ठिरास अनुमोदन दिलें.

तपस्वी—हे धर्मराजा, तुझ्या सुखाचा लवकरच उदय होईल. तूं या क्लेशांतून पार पडून अल्पावधींतच क्षत्रधर्मानें पृथ्वीचें पालन करशील.

त्या तपस्वी मुनींचे असे आशीर्वाद घेऊन धर्मराज, भ्राते व ब्राह्मण यांसह निघाला. घटोत्कचादि राक्षस त्यांच्या मागून चालले होते व लोमश मुनि त्या सर्वांचें संरक्षण करीत होता. महा तेजस्वी धर्मराज भ्रात्यांसह कांहीं मार्ग पायांनींच आक्रमीत होता व क्वचित् स्थलीं ते राक्षसांच्या स्कंधावर बसून जात होते. याप्रमाणें अनेक प्रकारच्या क्लेशांचा विचार करीत राजा युधिष्ठिर सिंहव्याघ्रादिकांनीं व्यास असलेल्या उत्तर दिशेकडे गेला.

तेथून कैलास, मैनाक, गंधमादनपर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या टेंकड्या, हिमालयाचीं उंच शिखरें आणि त्या शैलावरील विपुल जलयुक्त पवित्र नद्या पहात ते पांडवश्रेष्ठ सातव्या दिवशीं हिमालयाच्या पृष्ठभागावर येऊन पोंचले. तेव्हां गंधमादनपर्वताच्या समीपच असलेल्या पुण्यप्रद हिमालयाच्या पृष्ठभागीं असलेला वृषपर्व राजर्षीचा पुण्यतम आश्रम त्यांच्या दृष्टीं पडला. जलप्रवाहापासून उत्पन्न झालेल्या विविध पुष्पित वृक्षांनीं तो पवित्र आश्रम आवृत झाला होता.

तो रम्य आश्रम पाहून पांडवांच्या श्रमाचा परिहार झाला व त्या अरिंदम पांडुपुत्रांनीं त्या धर्मात्म्या राजर्षीपाशीं जाऊन त्यास वंदन केलें. तेव्हां वृषपर्वा

राजर्षीनेंहि त्यांचें अभिनंदन करून पुत्रवत् सत्कार केला. त्यानंतर त्या भरत-श्रेष्ठांनीं सात दिवस त्या आश्रमांत राहून आठव्या दिवशीं प्रातःकालींच त्या लोकप्रसिद्ध राजर्षीचा निरोप घेऊन पुढें जाण्याचा विचार केला.

( २ ) युधिष्ठिरानें आपल्या बंधूंप्रमाणें मान्य असलेल्या सर्व विप्रांची वृष-पर्वा महीपतीला पृथक् पृथक् ओळख करून दिली. प्रत्येक ब्राह्मणाचें नांव सांगून त्यास एखाद्या ठेवीप्रमाणें त्या राजर्षीच्या स्वाधीन केलें आणि आपला इतर सर्व परिवार, यज्ञपात्रें, रत्नें, भूषणें इत्यादि सर्व त्या महात्म्याच्या आश्रमांतच ठेविलीं. त्यानंतर भूत-भविष्यद्वेत्त्या, विद्वान् व सर्वधर्मवित् वृषपर्व्या मुनीनें पांडवांना पुढील कार्यांचा पुत्रांप्रमाणें उपदेश केला आणि त्याची अनुज्ञा घेऊन पांडव उत्तर दिशेकडे जावयास निघाले.

त्या वेळीं तो राजर्षि वृषपर्वा त्यांच्याबरोबर त्यांस पोंचवावयास निघाला. बराच मार्ग चालून आल्यावर श्रेष्ठ ब्राह्मणांना महा-तेजस्वी पांडवांचें रक्षण करण्याविषयीं सांगून, त्या कौंतेयांचें शुभाशीर्वादानें अभिनंदन करून आणि त्यांना पुढील मार्ग दाखवून तो परत फिरला.

( ३ ) नंतर सत्यपराक्रमी राजा युधिष्ठिर आपल्या भ्रात्यांसह पुढें निघाला. व मार्गांत अनेक वृक्षांनीं व्याप्त असलेल्या पर्वतशिखरांवर वास करीत चवथ्या दिवशीं अनेक मृगगणांनीं आवृत असलेल्या पर्वतावर जाऊन पोंचला. तो पर्वत मोठमोठ्या अभ्रांच्या समूहासारखा दिसत होता. त्यावरून शुभ-जलप्रवाह वहात होते. रत्नें व सुवर्ण यांप्रमाणें शोभणाऱ्या शिलांचे अनेक ढीग त्या पर्वतावर पसरले होते.

याप्रमाणें ते वीर पांडव वृषपर्व्यानें सांगितलेल्या मार्गास प्राप्त होऊन विविध पर्वत पहात आपल्या उद्दिष्ट प्रदेशीं चालले. त्या पर्वताच्या उंच उंच प्रदेशीं दुर्गम गुहा होत्या. तथापि त्या अनेक दुर्गम पर्वतशिखरांचेंहि आक्रमण करून चारी पार्थ, कृष्णा, धौम्य व महर्षि लोमश हे सर्व अनायासानें व एकाच वेळीं इष्ट स्थानीं जाऊन पोंचले. त्यांतील कोणीहि श्रांत होऊन मागें राहिलें नाहीं. मृग-पक्ष्यांच्या ध्वनींनीं नादित, विविध लता व वृक्ष यांनीं युक्त, वानरसमूहांनीं सेवित, अति मनोहर व पुण्य पद्मसरोवरानें युक्त, अशा माल्य-वान् महागिरीवर ते महाभाग येऊन पोंचले. त्याच्या समीप असलेलें महावन अनेक जलाशयांनीं शोभत होतें.

त्या महात्म्यांनीं, तेथूनच किंपुरुषांचें निवासस्थान व सिद्ध-चारणांनीं सेवित असा गंधमादन पर्वत पाहिला. त्या श्रेष्ठ पर्वताच्या दर्शनानें त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले. किन्नरी व विद्याधर त्या पर्वतावरून संचार करीत होते. तो पर्वत गजसमूहांचें वसतिस्थान असून सिंह-व्याघ्रादि हिंस्त्र प्राण्यांनीं व्याप्त होता. शरभांच्या भयंकर गर्जनांनीं तो महापर्वत दुमदुमून जात असे. अनेक पशुगणांनीं सेविलेलें तें गंधमादनवन नंदन-वनोपम होतें.

तें हृदयंगम वन पाहून पांडुतनयांना मोठा आल्हाद झाला. त्या वीरांनीं द्रौपदी व महात्मे ब्राह्मण यांसह त्या आश्रयणीय शुभ काननांत हळुहळू प्रवेश केला. त्या वेळीं पक्ष्यांचा श्रुतिमनोहर मंजुल रव त्यांच्या कानीं पडत होता. त्या वनामध्यें सर्व ऋतूंतील फळें व पुष्पें यांनीं युक्त असलेले विपुल वृक्ष होते. ते सर्व फल-पुष्पभारानें नम्र झालेले दिसत होते.

त्या गंधमादन-पर्वताच्या शिखरावर आम्र, आम्रातक, नारळ, टेंबुरणी, मुंजालक, अंजीर, डाळिंब, महाळुंग, फणस, ओंट, केळीं, खजूर, आम्लवेतस, पारावत, क्षौद्र, नीप, बिल्व, कवठ, जांभूळ, शिवणी, बोरी, पिंपरी, औदुंबर, वट, अश्वत्थ, खिरणी, बिब्बे, आंवळी, हिरडे, बेहडे, हिंगणमिट्टे, करवंदें, व आणखींहि विविधप्रकारच्या अमृतासारख्या मधुर फळांनीं युक्त असलेले विपुल वृक्ष आणि वेली होत्या.

त्याचप्रमाणें चंपक, अशोक, केतकी, बकुल, नागचांफा, सप्तपर्ण, पारिजात, कांचन, देवदारु, साग, तमाल इत्यादि सुगंध पुष्पयुक्त अनेक वृक्षांनीं तें अरण्य व्यापिलें होतें. कोकिला, शुक, सारिका, चातक इत्यादि नानाप्रकारचे पक्षी त्या वृक्षांवर बसून मधुर कूजन करीत होते. त्या शैलशिखरावर चंद्र-विकासी, सूर्यविकासी, नीलवर्ण व इतरहि विविध प्रकारच्या उत्पलांनीं युक्त असलेलीं विपुल जलपूर्ण असंख्य सरोवरें होतीं. त्यांच्या तीरावर राजहंस, बगळे, चक्रवाक् व इतरहि जलचर पक्षी विहार करीत होते.

शीतल व मधुर जलानें युक्त असलेल्या त्या पद्मसरोवरांत कमलांतील मकरंद सेवन करून मत्त झालेले आणि रक्तवर्ण उत्पलांचे पराग व केसरें यांच्या योगानें आरक्त दिसणारे भ्रमरांचे थवे गुंजारव करीत होते. सर्वत्र पसरलेल्या कमलांनीं तीं रम्य सरोवरें अतिशय शोभत होतीं.

तेथील लतामंडपांमध्यें मयूरींसह असलेले अनेक मयूर त्यांच्या दृष्टीं पडले. ते मेघांचा मंगल ध्वनि ऐकून उत्कट मदनानें आकुल झाले होते. त्यामुळें आपल्या मंजुल ध्वनीनें केकारूप मधुर गायन करून व आपला विचित्र पिसारा पसरून ते विलास करीत होते. मदोन्मत्त झालेले ते मयूर मोठ्या आनंदानें नृत्य करीत होते. त्यांना वनांत रहाण्याचीच लालसा आहे, असें दिसत होतें. त्यांतील कांहीं मोर मयूरींशीं रममाण होत होते. कित्येक शाखांनीं आच्छादित झालेल्या कुटज वृक्षावर बसले होते. कांहीं त्यांच्या शाखांवर बसले होते. त्या वेळीं त्यांनीं आपला पिसारा आंवरून धरिलेला असल्यामुळें ते त्या वृक्षांच्या मुकुटाप्रमाणेंच भासत होते. कित्येक सुंदर मयूर वृक्षांच्या मोठमोठ्या ढोलींमध्यें बसलेलेहि त्यांना दिसत होते.

त्या पर्वतावर पांडवांनीं पीतवर्ण कुसुमांनीं युक्त असलेले सिंधुवारहि पाहिले. पर्वतशिखरावर असलेले ते सिंधुवार मदनाच्या तोमराप्रमाणेंच भासले. उत्तम कर्णपुराप्रमाणें शोभणारे पुष्पित कर्णिकारहि त्यांच्या दृष्टीं पडले. वनपंक्तींमध्यें फुललेलीं कोरांटीचीं झाडेंहि तेथें होतीं, तीं कामवश झालेल्या लोकांची उत्सुकता वाढवीत होतीं. त्याचप्रमाणें त्यांनीं तेथें तिलक वृक्षहि पाहिले. ते त्या वनपंक्तीच्या ललाटावरील उत्कृष्ट तिलकाप्रमाणें शोभत होते. तेथील मनोहर आम्रवृक्ष त्या वीरांना मदनशराप्रमाणें दिसले.

त्यांच्या पुष्पमंजरींवर बसलेल्या भ्रमरांचा मनोहर गुंजारवहि त्यांच्या कानीं पडला. पिंवळ्या, लाल, इत्यादि अनेक रंगांच्या पुष्पांनीं युक्त असलेले वृक्ष अग्नि किंवा वैदूर्य मणि यांसारखे दिसत होते. त्यामुळें त्या शैलशिखरावरील ते पुष्पित वृक्षच सर्वांपेक्षां अधिक शोभत होते. तसेच ताल, तमाल, पाटल, बकुल इत्यादि वृक्ष पर्वताच्या शिखरावर घातलेल्या माळांसारखे दिसत होते.

जनमेजया, पार्थांनीं त्या गंधमादन शिखरावर असंख्य सरोवरेंहि पाहिलीं. तीं पद्मकमलांनीं युक्त असून त्यांतील जल शीतल व सुखावह होतें. याप्रमाणें ते वीर क्रमानें समंततः सुगंधी पुष्पें, रसयुक्त फलें, सुंदर सरोवरें व अति मनोहर वृक्ष सभोंवार पहात, आश्चर्यचकित होत्साते, त्या पर्वतावरून पुढें निघाले. विविध पुष्पांच्या व कमलांच्या सुगंधानें युक्त असलेला वायु आपल्या सुखावह स्पर्शानें त्यांची सेवा करीत होता.

त्यानंतर राजा युधिष्ठिर भीमसेनाला असें प्रेमयुक्त वचन बोलला—" हे भीमा, हें गंधमादनकानन किती मनोहर आहे ? या रमणीय वनांतील दिव्य

वृक्ष व विविध आकारांच्या लता पत्रें, पुष्पें व फलें यांनीं युक्त आणि कोकि-लांनीं व्याप्त असल्यामुळें अतिशय शोभत आहेत. या अरण्यांत कंटकयुक्त किंवा पुष्परहित एकहि वृक्ष नाहीं. सर्व वृक्ष कोमल पल्लव व फलें यांनीं भरून गेले आहेत.

हे वृकोदरा, ही पुष्करणी पहा. हिच्यांतील प्रफुल्ल कमलें गुंजारव करणाऱ्या भ्रमरांनीं विशेषच शोभिवंत दिसत आहेत. हत्तिणींसह हत्ती यांतील जल आपल्या क्रीडेनें क्षुब्ध करीत आहेत.

कमलपंक्तींनीं युक्त असलेली ही दुसरी नलिनी पहा. ती कमलमाला धारण करणाऱ्या साक्षात् लक्ष्मीप्रमाणेंच शोभत आहे. या सर्वोत्तम वनांतील या वनपंक्ति विविध पुष्पांच्या सुगंधानें युक्त व भ्रमरांच्या गुंजारवांनीं नादित झाल्या आहेत.

हे भीमा, हे समंततः पसरलेले शुभ प्रदेश देवांचीं क्रीडास्थानें आहेत, पहा. हे वृकोदरा, जेथें मनुष्यांची गति होत नाहीं, अशा या स्थानीं आम्ही येऊन पोंचलों आहों. आम्ही आतां सिद्ध झालों आहों. या गंधमादन पर्वताच्या शिखरावरील हे पुष्पित वृक्ष त्याला जणुकाय चिकटल्याप्रमाणेंच दिसतात. त्या वृक्षांवरील लतांचीं अग्रेंहि असंख्य पुष्पांनीं व्याप्त आहेत. या पर्वतशिखरावर मयूरींसह संचार करणाऱ्या मयूरांचा हा केकानाद ऐक.

चकोर, शतपत्र, मत्तकोकिल व सारिका या पुष्पित महावृक्षांवर तुटून पडत आहेत. या वृक्षांच्या अग्रांवर बसलेले विविध वर्णांचे असंख्य पक्षी पर-स्परांस पहात आहेत व कांहीं विचित्र रंगांनीं युक्त असलेल्या कोमल तृणावर बसून विश्रांति घेत आहेत. पर्वतावरून वहाणाऱ्या जलप्रवाहामध्यें सारस पक्षी बसलेले असून ते सर्व प्राण्यांना मनोहर वाटणारा मधुर रव करीत आहेत. भृंगराज, उपचक्र, लोहपृष्ठ इत्यादि पक्षीहि त्या जलप्रवाहांच्या तीरावर विहार करीत आहेत.

ज्यांना चार विशाल दंत आहेत, असे हत्तिणींसह असलेले शुभ्र हत्ती वैदूर्य मण्याप्रमाणें स्वच्छ असलेल्या या महासरोवराला क्षुब्ध करीत आहेत. अनेक ताड उंच असलेल्या या पर्वताच्या शिखरावरून पडणारे हे अनेक प्रस्रव पहा. त्यांपासून या जलधारा सभोंवार पसरत आहेत. सूर्याप्रमाणें त्यांची प्रभा

असून शरदृतूंतील मोठमोठ्या मेघांप्रमाणें दिसणाऱ्या त्या जलधारा प्रेक्षकांच्या चित्ताचें आकर्षण करीत आहेत.

अनेक रजताकार शुक्ल धातु या महाशैलाला कसे शोभवीत आहेत, पहा. या महाशैलाचीं शिखरें कांहीं ठिकाणीं कज्जलाकार व कांहीं ठिकाणीं सुवर्णाकार दिसत असून, कांहीं प्रदेशीं हरिताल, हिंगुळ या धातूंनींच भूषित झालीं आहेत. या पर्वतावरील मनःशिल-धातूच्या गुहा संध्याकाळच्या अभ्रसमूहाप्रमाणें कशा दिसत आहेत, पहा. कांहीं ठिकाणीं हे गैरिकधातु शशाच्या रक्ताप्रमाणें लाल दिसत आहेत. याचीं शिखरें कोठें शुभ्र व कृष्णवर्ण अभ्रांप्रमाणें व कांहीं ठिकाणीं बालसूर्याप्रमाणें आपल्याला प्रतीत होतात. खरोखर! या पर्वताचे हे अति तेजस्वी विविध प्रदेश त्याला अतिशय शोभवीत आहेत.

वृषपर्वा राजर्षीनें सांगितल्याप्रमाणें हे गंधर्वहि आपल्या स्त्रियांसह या गंधमादन पर्वताला सुशोभित करीत आहेत. हे पार्था, या पर्वतशिखरावर किन्नरांसह संचार करीत असलेले हे महात्मे येथून दिसतात. हे भीमा, सर्व भूतांच्या चित्तांचें आकर्षण करणारा व समतालानें युक्त असलेला हा सामगायनाचा ध्वनि आपल्याला ऐकूं येत आहे.

हे वीरा, ही शुभ व पुण्य देवनदी महागंगा पहा. ती कलहंसांच्या समूहानें युक्त असून ऋषि व किन्नर यांनीं सेवित आहे. हे शत्रुनाशका, विविध धातु, अनेक नद्या, पशु, पक्षी, किन्नर, गंधर्व, अप्सरा, मनोहर अरण्यें व शंभर हत्तींच्या बलांनीं युक्त असलेले नाग, यांनीं व्याप्त असलेला हा शैलराज खरोखर प्रेक्षणीय आहे. भीमा, या पर्वताचें श्रद्धेनें दर्शन घे. असें सृष्टिसौंदर्य आपल्याला दुसऱ्या कोठेंहि पहावयास सांपडणार नाहीं.

(४) वैशंपायन—जनमेजया, याप्रमाणें अनुत्तम गतीला प्राप्त झालेल्या त्या शूरांचें चित्त प्रसन्न झालें. त्या पर्वतश्रेष्ठाला पाहून त्यांच्या मनाची तृप्ति होईना. कारण तो विचित्र पुष्पें, फलें व वृक्ष यांनीं युक्त होता. तेथेंच त्या महात्म्यांनीं आर्ष्टिषेण महर्षीचा आश्रम पाहिला व ते वीर अतिशय तेजस्वी, कृश व ज्याच्या शरीरांतील शिरा स्पष्ट दिसत आहेत अशा सर्वधर्मपारंगत आर्ष्टिषेण मुनीपाशीं आले. ३. ८. १५८.

---

## अध्याय १५९ वा.

[ १ आर्ष्टिषेण-युधिष्ठिर संवाद. २ युधिष्ठिराला पुढें न जातां त्या आश्रमांतच राहून कुबेराचें दर्शन घेण्याविषयीं मुनीचा उपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, तपानें ज्याचें पातक दग्ध झालें आहे, अशा त्या आर्ष्टिषेण मुनीच्या समीप जाऊन युधिष्ठिरानें त्यास 'मी युधिष्ठिर आपल्याला अभिवादन करितों' असें म्हणून प्रीतिपूर्वक शिरसा वंदन केलें. त्याच्या मागून पांचाली, भीमसेन व नकुल-सहदेवादि हीं सर्व त्या पूज्य मुनीला शिरसा प्रमाण करून त्याच्या सभोंवार उभीं राहिलीं. त्याचप्रमाणें पांडवांचा पुरोहित धर्मज्ञ धौम्यहि यथान्याय सत्कार करून त्या नियतव्रत ऋषीच्या समीप आला. त्या वेळीं त्या धर्मज्ञ मुनीनें 'हे कुरुश्रेष्ठ पांडव आहेत' असें दिव्य दृष्टीनें जाणून त्यांस 'बसा' असें म्हटलें.

तेव्हां युधिष्ठिर भ्रात्यांसह उचित स्थानीं बसला असतां आर्ष्टिषेण मुनीनें त्या कुरुपुंगवांचा योग्य सत्कार केला व त्यांचें कुशल विचारिलें. ऋषि म्हणाला—हे पार्था, तूं अनृतामध्यें कदापि प्रवृत्त होत नाहींस ना? सर्वदा धर्मांतच प्रवृत्त होतोस ना? आपल्या माता-पितरांचें श्राद्धकरणादिरूप जें योग्य कर्तव्य त्यापासून कधीं च्युत होत नाहींस ना? तुझे वडिल, आप्त, पूज्य गुरुजन व विद्वान् यांचा तूं यथाविधि सत्कार करतोस ना? कोणत्याहि पापकर्मांत प्रवृत्त होत नाहींस ना?

हे धर्मराजा, सत्कृत्याचें आचरण व दुष्कृत्याचा त्याग कसा करावा, हें तूं योग्यप्रकारें जाणतोस ना! 'मी सर्वज्ञ व ज्ञाता आहें' अशी आत्मश्लाघा कदापि करीत नाहींस ना? तुझ्याकडून योग्यतेप्रमाणें सत्कार पावलेले सज्जन संतुष्ट होतात ना? तूं वनांत रहात असतांहि धर्माचेंच अनुवर्तन करितोस ना? तुझ्या असदाचारानें धौम्य मुनीला कधीं ताप होत नाहीं ना?

हे कौंतेया, तूं दान, धर्म, तप, शौच, अंतःकरणाचा सरळपणा व तितिक्षा यांच्या योगानें आपल्या पूर्वजांच्या धर्माचेंच अनुवर्तन करितोस ना? हे पांडवा, पूर्वींचे राजर्षि ज्या मार्गानें गेले त्याच मार्गाला तूं अनुसरतोस ना? आपल्या कुलामध्यें पुत्र किंवा नातु यांचा जन्म झाला असतां पितृलोकस्थ पितर शोक करितात व संतुष्टहि होतात. कारण 'या उत्पन्न झालेल्या पुरुषाच्या दुष्कृतीमुळें आम्हांला कोणती गति प्राप्त होईल' असें म्हणून ते शोक करीत असतात आणि 'त्याच्या सत्कृत्यानें आमचें कोणतें शुभ होईल' असें म्हणून

हंसत असतात. हे युधिष्ठिरा, माता, पिता, अग्नि, गुरु आणि पांचवा आत्मा यांची जो यथायोग्य उपासना करितो, तो इह व पर हे दोन्ही लोक जिंकतो.

युधिष्ठिर—हे भगवन्, आपण जो धर्मनिश्चय मला सांगत अहां त्याप्रमाणेंच मी यथाशास्त्र, यथान्याय व यथाशक्ति वागत असतों.

( २ ) आर्ष्टिषेण—हे धर्मराजा, जल प्राशन करून रहाणारे, वायुभक्षण करणारे व आकाशांतून संचार करणारे अनेक महर्षि प्रतिपदा व अमावास्या, आणि प्रतिपदा व पौर्णिमा, यांच्या संधिकालीं या श्रेष्ठ शैलराजाचें सेवन करितात. परस्परांवर अनुरक्त असलेले कामीजनहि आपल्या कामिनींसह या गिरिशिखरावर नित्य विहार करीत असतात. त्याचप्रमाणें पर्वतशिखरावर राहणारे किंपुरुषहि येथून दृष्टीं पडतात.

हे पार्था, धूलिरहित निर्मल रेशमी वस्त्रें परिधान करणारे गंधर्व व अप्सरा यांचे अनेक समूह, पुष्पमाला धारण करणारे प्रियदर्शन विद्याधरांचे संघ आणि नाग, सर्प व पक्षी यांचे असंख्य समुदाय तेथें संचार करीत असलेले दिसतात. शिवाय प्रत्येक पर्वकाळीं या शैलशिखरावरून भेरी, पणव, शंख व मृदंग यांचा ध्वनि ऐकूं येत असतो.

यास्तव हे भरतश्रेष्ठ पांडवहो, तुम्ही येथें राहूनच तें सर्व श्रवण करा. त्या शिखरावर जाण्याचा विचार कधीं मनांतहि आणूं नका. कारण या प्रदेशाच्या पुढें कोणालाहि जातां येणें शक्य नाहीं. ती देवांची विहारभूमि आहे. तेथें मानवांची गति होणार नाहीं. येथें एखाद्या मनुष्यानें मर्यादेचें यत्किंचित् जरी उल्लंघन केलें, तरी येथील सर्व प्राणी त्याचा द्वेष करितात व राक्षस त्याला ताडन करितात. या कैलास शिखराचें अतिक्रमण करून केवल परम सिद्ध देवर्षिच तेथें गमन करितात. त्यांच्यावांचून इतर कोणी जर उच्छृंखलपणानें या मार्गानें जाऊं लागला तर राक्षस त्याला लोखंडाच्या शूलानें तत्काल परलोकचा मार्ग दाखवितात.

हे युधिष्ठिरा, येथें पर्वकालीं अप्सरांच्या समुदायांनीं परिवेष्टित झालेल्या ऐश्वर्यसंपन्न विश्रवणसुत नरवाहन कुबेराचें दर्शन होतें. उदय पावणाऱ्या सूर्याप्रमाणें या शैलशिखरावर बसलेल्या त्या यक्ष-राक्षसाधिपाला सर्व प्राणी पहातात.

हे भरतश्रेष्ठ वीरांनो, हें शैलशिखर देव, दानव आणि वैश्रवण कुबेर यांचें क्रीडास्थान आहे. या गंधमादनावर बसलेल्या धनेश्वराची उपासना करणाऱ्या

तुंबुरूच्या मधुर सामगायनाचा ध्वनि येथें पर्वकालीं स्पष्ट ऐकूं येतो. हे युधिष्ठिरा, पर्वकालीं असे अनेक चमत्कार येथें सर्व प्राण्यांच्या दृष्टीं पडतात. यास्तव हे पांडवहो, तुम्हीं मुनींना भक्ष्य असलेलीं रसाळ फळें भक्षण करीत अर्जुनाचें दर्शन होईपर्यंत येथेंच रहा. बाबांनो, येथें आलेले तुम्ही कोणत्याहि प्रकारचें चापल्य न करतां या प्रदेशांत आपल्या इच्छेप्रमाणें श्रद्धेनें राहून शांतपणें विहार करा. म्हणजे बा युधिष्ठिरा, तूं शस्त्रानें सर्व पृथ्वी जिंकून तिचें पालन करशील. ३. ७. १५९.

---

## अध्याय १६० वा.

[१ पांडवांच्या आश्रमनिवासाविषयीं जनमेजयाचा प्रश्न. २ वैशंपायनाचें उत्तर. ३ राक्षसांचा वध करून पर्वतशिखराचा मार्ग निष्कंटक करण्याविषयीं द्रौपदीची भीमसेनाला प्रेरणा. ४ भीमाचें शैलशिखरावर आरोहण. ५ राक्षसांशीं युद्ध व त्यांचा पराभव. ६ मणिमानाचा वध.]

( १ ) जनमेजय—हे तपोधना, गंधमादन पर्वतावरील आर्ष्टिषेणमुनीच्या त्या आश्रमांत माझे प्रपितामह, दिव्य पराक्रमी, महात्मे पांडव किती काल राहिले ! त्या सर्व महावीर्यवान् व अति बलाढ्य वीरांनीं तेथें काय केलें ? तेथें रहात असतां ते लोकवीर कोणता आहार करीत असत ! त्याचप्रमाणें महाबाहु भीमसेनानें त्या हैमवतपर्वतावर जे जे कांहीं पराक्रम केले, त्या सर्वांचें समग्र वृत्त मला सांग. त्या बलाढ्य वीराचें यक्षांबरोबर पुनः युद्ध झालें नाहीं ना ? आर्ष्टिषेणानें ' धनेश्वर कुबेर तेथें येत असतो ' असें म्हटलें होतें, तेव्हां त्याची व महात्म्या पांडुपुत्रांची प्रत्यक्ष भेट झाली किंवा नाहीं ! हें सर्व सविस्तर ऐकण्याची माझी इच्छा आहे. त्या वीरांच्या कथा कितीहि ऐकल्या तरी माझी तृप्ति होत नाहीं.

( २ ) वैशंपायन—हे राजेंद्रा, अप्रतिम तेजस्वी आर्ष्टिषेण मुनीचें तें हित वचन ऐकून भरतर्षभ पांडवांनीं त्याच्या आज्ञेप्रमाणें सतत आपलें आचरण ठेविलें. ते पराक्रमी कुरुश्रेष्ठ मुनींना भोज्य असलेलीं रसाळ फळें, शुद्ध बाणांनीं मारलेल्या हरिणांचें व इतर मेध्यपशूंचें मांस आणि त्या हिमालयाच्या पृष्ठभागीं मिळणारे विविध रुचकर स्वादु पदार्थ यांवर उपजीविका करीत तेथें सुखानें राहिले.

याप्रमाणें त्या आश्रमांत राहून लोमशांनीं सांगितलेल्या विविध कथा ऐकत त्यांचें पांचवें वर्ष पूर्ण झालें. घटोत्कचहि 'योग्य कालीं मी परत येईन' असें सांगून सर्व राक्षसांसह पूर्वींच निघून गेला होता. आर्ष्टिषेण मुनीच्या आश्रमांत रहाणाऱ्या त्या महात्म्यांचे अनेक चमत्कार पहाण्यांत पुष्कळ महिने निघून गेले. ते पांडव तेथें विहार करण्यांत रममाण झाले.

राजा, पांडवांवर प्रीति करणारे महाभाग व नियतव्रत मुनि आणि शुद्धात्मे चारण त्या भरतसत्तमांच्या भेटीला वारंवार येत व त्या वेळीं धर्मात्म्या पांडुपुत्रांशीं अनेक दिव्य कथा बोलत असत.

त्यानंतर कांहीं दिवसांनीं महाऱ्हदांत रहाणाऱ्या एका समृद्ध प्रचंड नागाला गरुडानें एकदम उचलून नेलें. त्या वेळीं तो महापर्वत कांपूं लागला व महावृक्ष मोडून पडले. तेव्हां पांडव आणि सर्व भूतें यांनीं एक अद्भुत आश्चर्य पाहिलें. त्या श्रेष्ठ पर्वतशिखरावरून वायूनें उडविलेलीं उत्कृष्ट सुगंधयुक्त पुष्पें पांडवांच्या सन्निध येऊन पडलीं. तीं पंचरंगी दिव्य पुष्पें यशस्विनी द्रौपदी आणि सुहृज्जनांसह पांडव यांनीं पाहिलीं.

( ३ ) तेव्हां योग्य समय पाहून पर्वताच्या एका भागावर एकांतांत सुखानें बसलेल्या भीमसेनाला कृष्णा म्हणाली—"हे प्रभो, ज्या उच्च प्रदेशांतून गरुडाच्या पंखापासून उत्पन्न झालेल्या वायुवेगानें हीं पंचवर्णाचीं दिव्य पुष्पें या अश्वरथनदीसमीप सर्व प्राण्यांसमक्ष पडतात, तें श्रेष्ठ शैलशिखर अतिशय प्रेक्षणीय असलें पाहिजे.

हे शक्रतुल्य पराक्रमी परंतपा, आपल्या सत्यप्रतिज्ञ महात्म्या भ्रात्यानें पूर्वी खांडव-वनांत गंधर्व, नाग, राक्षस आणि साक्षात् इंद्र यांचा पराभव केला. उग्र मायाव्यांचा संहार करून श्रेष्ठ गांडीव धनुष्य प्राप्त करून घेतलें. महाराज, आपणहि अतिशय तेजस्वी असून आपलें अगाध बाहुबल शत्रूला असह्य आणि अजिंक्य आहे. यास्तव हे भीमसेना, आपल्या बाहुबलानें पीडिलेल्या सर्व राक्षसांना हें शैलशिखर सोडून दाही दिशांत भयानें पळवून लावा. म्हणजे आपले सर्व सुहृद् मोहरहित होऊन विचित्र पुष्पांनीं युक्त असलेलें हें मंगलप्रद शैलशिखर निर्भयपणानें पहातील. हे महाबाहो, आपल्या बाहुबलानें सुरक्षित असलेल्या मला फार दिवसांपासून हें श्रेष्ठ शैलशिखर पहाण्याची इच्छा झाली आहे."

(४) जनमेजया, याप्रमाणें द्रौपदीनें किंचित् टोंचून भाषण करतांच तिचें तें वचन महाबाहु भीमाला, प्रहार सहन न करणाऱ्या जातिवंत वृषभाप्रमाणें, सहन झालें नाहीं. तो वृकोदर सिंह किंवा वृषभ यांसारखा गतिमान्, श्रीमान्, उदार, सुवर्णासारख्या कांतीनें युक्त, बुद्धिमान्, बलवान्, दृप्त, मानी, शूर, आरक्तनयन, विशालस्कंध, मत्त गजाप्रमाणें चालणारा व शालवृक्षाप्रमाणें उंच होता. सिंहाप्रमाणें दाढा असलेल्या त्या आजानुबाहु वीराची मान शंखाप्रमाणें असून त्याचे सर्व अवयव सुंदर होते. तो बलाढ्य पांडव आपलें सुवर्णपृष्ठयुक्त धनुष्य, खड्ग व भाते यांस स्पर्श करून चवताळलेल्या सिंहाप्रमाणें वेगानें व मदोन्मत्त हत्तीप्रमाणें निर्भयपणें त्या शैलावर चाल करून गेला.

त्या वेळीं सर्व प्राण्यांनीं धनुष्य-बाण धारण करणाऱ्या भीमाला एखाद्या मृगेंद्राप्रमाणें किंवा मत्तगजाप्रमाणें पर्वतावर जात असलेलें पाहिलें. द्रौपदीचा आह्लाद वाढविणारा तो बलाढ्य कौंतेय हातांत गदा घेऊन निःशंक व निर्भय मनानें त्या पर्वतावर चढून गेला. त्या वायुपुत्राला ग्लानि, भय, अनुत्साह किंवा मत्सर हे विकार कधीं स्पर्शहि करीत नसत. त्यामुळें तो लोकोत्तर महा बलाढ्य वीर भयंकर व दुर्गम अशा पायवाटेनें अनेक ताडांएवढ्या उंच असलेल्या त्या शैलशृंगावर मोठ्या उत्साहानें चढूं लागला व शेवटीं किन्नर, महानाग, गंधर्व आणि राक्षस यांना आह्लाद देत त्या अति बलवान् पांडुपुत्रानें पर्वतशिखरावर आरोहण केलें.

तेथून त्या भरतश्रेष्ठाला कुबेराचें भव्य मंदिर दिसलें. तें वैश्रवणाचें निवासस्थान सुवर्णमय स्फटिकाच्या अनेक मंदिरांनीं अलंकृत असून त्यांच्या सभोंवर सुवर्णाचा तट होता. त्याला तेजस्वी रत्नें जडलेलीं असून तो अनेक उद्यानांनीं परिवेष्टित झाला होता. तो तट पर्वतापेक्षांहि उंच असून त्यावर बुरूज शोभत होते. प्रवेशद्वारें, बहिर्द्वारें, नागदंत-नामक आंतून बाहेर पडण्याचीं द्वारें, ध्वज इत्यादिकांनीं तो तट अतिशय सुशोभित दिसत होता. त्याच्या आसपास विलासिनी स्त्रिया उत्तम प्रकारचें नृत्य करीत होत्या. वायूनें हालणाऱ्या पताकांनीं तो तट भूषित झाला होता.

तेथें पोंचल्यावर भीमसेन आपलें धनुष्य भूमीवर टेंकून व त्याच्या दुसऱ्या टोंकावर आपला बाहु ठेवून त्या धनाधिपतीच्या नगरीकडे खेदानें पाहूं लागला. धनेश्वराचें तें ऐश्वर्य पाहून त्या प्रतापवान् पांडवाला आपल्या पूर्व वैभवाचें स्मरण झालें.

त्या वेळीं गंधमादन-पर्वतावरून सर्व सुगंध वाहून आणणारा सुखावह वायु सर्व भूतांना आनंद देत वहात होता. तेथें विविध वर्णांचे व विचित्र मंजरींनीं युक्त असलेले, अचिंत्य व परम शोभिवंत असंख्य वृक्ष होते. अशाप्रकारचें रत्नज्वालांनीं आवृत व विचित्र पुष्पांनीं भूषित असलेलें तें राक्षसाधिपति कुबेराचें स्थान भीमसेनानें पाहिलें.

(५) तेव्हां स्वतःच्या जीवितावर उदार झालेला महाबाहु भीमसेन गदा, खड्ग व धनुष्य हातीं घेऊन पर्वताप्रमाणें अचल उभा राहिला आणि त्यानें शत्रूंना रोमांचित करणारा शंखध्वनि केला. मोठ्यानें टाळी वाजविली व धनुष्याचा टणत्कार करून सर्व प्राण्यांना मोहित केलें.

तो प्रचंड ध्वनि ऐकून रोमांचित झालेले यक्ष-राक्षस-गंधर्व त्या शब्दाच्या अनुरोधानें पांडवाच्या समीप आले. ते यक्ष-राक्षस हातांत घेतलेल्या गदा, परिघ, खड्ग, शूल, शक्ति व परशु यांनीं शोभत होते. कुबेराचे ते सर्व किंकर तेथें येतांच त्यांचें भीमसेनाशीं युद्ध सुरू झालें.

महापराक्रमी भीमानें त्या मायावी राक्षसांनीं फेंकलेलीं शूलादि आयुधें आपल्या अतिशय वेगवान् भल्ल बाणांनीं तोडून भूमीवर पाडिलीं व अंतरिक्षांत राहून भयंकर गर्जना करणाऱ्या त्या महाबलाढ्य राक्षसांचीं शरीरें तीव्र शरांनीं विद्ध केलीं. त्यामुळें गदा व परिघ हातीं घेतलेल्या राक्षसांच्या शरीरांतून वहाणाऱ्या रक्ताच्या धारांनीं त्या महाबलाढ्य पांडवावर जणुंकाय लोहिताची महावृष्टीच केली. भीमसेनानें फेंकलेल्या आयुधांनीं छिन्न-विच्छिन्न झालेलीं राक्षसांचीं शरीरें व मस्तकें सभोंवार दिसूं लागलीं. त्यामुळें त्या सर्व राक्षससमूहानें परिवेष्टित झालेला तो प्रियदर्शन पांडव सर्व प्राण्यांना अभ्राच्छादित सूर्याप्रमाणें भासला. परंतु आपल्या किरणांनीं मेघांचें निवारण करणाऱ्या आदित्याप्रमाणेंच सत्यपराक्रम भीमानें शत्रूंचा नाश करणाऱ्या अमोघ बाणांच्या योगानें त्या सर्व राक्षसगणांचा नाश केला.

राजा, ते सर्व भयंकर राक्षस भीमाच्या सभोंवार येऊन भीषण गर्जना करीत होते, परंतु तो वीर यत्किंचित्‌हि मोहित झालेला दिसला नाहीं. शेवटीं ज्यांचीं शरीरें छिन्न-भिन्न झालीं आहेत असे ते महा आयुधें धारण करणारे सर्व यक्ष भीमसेनाच्या भीतीनें व्याकुल होऊन भयंकर आक्रोश करीत पळूं लागले. दृढ धनुष्य धारण करणाऱ्या भीमसेनानें त्रस्त केलेले सर्व राक्षसहि गदा, शूल, खड्ग इत्यादि आपलीं सर्व आयुधें टाकून दक्षिण दिशेकडे पळून गेले.

त्या निशाचरांमध्यें ' मणिमान् '-नामक एक राक्षस कुबेराचा सखा होता. त्याचें वक्षःस्थल विशाल असून त्या महाबाहूनें हातांत शूल व गदा धारण केली होती. त्यानें पूर्वी आपला अधिकार व पराक्रम प्रकट केला होता. तो ' मणिमान् '-राक्षस त्या सर्व योद्धयांना रणांतून परत फिरलेलें पाहून त्यांचा उपहास करीत म्हणाला—" अरे, भीरु राक्षसांनो, एका मानवानें तुम्हां असंख्य रक्षकांचा युद्धांत पराभव करावा ना ! आतां तुम्ही कुबेराच्या नगरींत जाऊन त्या धनेश्वराला काय सांगाल ! "

( ६ ) जनमेजया, त्या पळत सुटलेल्या राक्षसांना असें बोलून मणिमान् भीमाकडे वळला आणि शक्ति, शूल व गदा हातीं घेऊन वृकोदरावर धांवून गेला. तेव्हां भीमानें मत्त गजाप्रमाणें वेगानें चाल करून येणाऱ्या त्या राक्षसाच्या कुशींत ' वत्सदंत '-नांवाच्या तीन बाणांनीं वेध केला. त्या वेळीं क्रुद्ध झालेल्या महा बलाढ्य मणिमानानेंहि आपली प्रचंड गदा भीमसेनावर फेंकली. ती विद्युल्लतेप्रमाणें चमकणारी भयंकर गदा अंतरिक्षांत दिसतांच भीमानें तीक्ष्ण धारेचे अनेक बाण तिच्यावर सोडिले. परंतु ते गदेवर पडतांच त्यांची गति कुंठित झाली. ते बाण जरी अतिशय वेगवान् होते तरी गदेचा प्रचंड वेग त्यांस सहन झाला नाहीं.

तेव्हां गदायुद्धांत प्रवीण असलेल्या भीमानें त्या गदेचा प्रहार मोठ्या शौर्यानें चुकविला. तें पाहून ' मणिमान् '-राक्षसानें सुवर्णदंडानें युक्त असलेली लोखंडाची भयंकर शक्ति भीमसेनावर सोडिली. ती अग्निज्वालेसारखी महा घोर शक्ति त्या पांडवाच्या उजव्या बाहूला विद्ध करून एकदम भूमीवर पडली.

त्या वेळीं शक्तीनें भयंकर वेध केल्यामुळें अमित पराक्रमी भीमाचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले. त्यानें शत्रूंचा पराभव करणारी व सुवर्णानें मढविलेली आपली प्रचंड लोखंडी गदा घेऊन मोठ्यानें सिंहनाद करीत त्या राक्षसावर चाल केली. तेव्हां त्या राक्षसानेंहि आपला देदीप्यमान प्रचंड शूल अतिशय वेगानें भीमावर फेंकला.

तें पहातांच गदायुद्धांत विशारद असलेल्या वृकोदरानें आपल्या गदेच्या अग्रानें त्या शूलाचे तुकडे करून टाकिले आणि सर्पावर झडप घालणाऱ्या गरुडाप्रमाणें तो कौंतेय त्या राक्षसाचा वध करण्यासाठीं त्याच्या अंगावर धांवून गेला.

त्या महाबाहूनें संग्रामांत प्रचंड गर्जना केली व आपली विशाल गदा गरगर फिरविली आणि अंतरिक्षांत उडी मारून ती वेगानें त्यावर फेंकून दिली. तेव्हां ती गदा इंद्राच्या वज्राप्रमाणें वायुवेगानें खालीं उतरून एखाद्या कृत्येप्रमाणें राक्षसाला गतप्राण करून भूमीवर पडली. खरोखर सिंहानें जसें वृषभाला मारावें, त्याप्रमाणें भीमसेनानें त्या बलाढ्य राक्षसाचा वध केलेला सर्व भूतांच्या दृष्टीं पडला. आपला नायक गतप्राण होऊन पडला आहे, असें पाहतांच अवशिष्ट राहिलेले सर्व राक्षस भयंकर आक्रोश करीत पूर्व दिशेकडे पळून गेले. ३. ९. १६०.

---

## अध्याय १६१ वा.

[ १ शैलशृंगावरील गर्जना ऐकून आश्रमांत नसलेल्या भीमाविषयीं युधिष्ठिरादिकांची चिंता. २ द्रौपदीला आश्रमांत ठेवून पांडवांचें शैलशिखरावर आरोहण. ३ युधिष्ठिराचा भीमास उपदेश. ४ घडलेला वृत्तान्त ऐकून कुबेराचें पांडवांपाशीं आगमन. ५ भीमाला पाहून त्याचा संतोष. ६ अगस्त्यानें दिलेल्या शापाची निवृत्ति व त्याचें निमित्तकथन. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, याप्रमाणें शैलशृंगावर तुमुल युद्ध चाललें असतां, गिरिगुहांतून नानाप्रकारच्या शब्दांचा प्रतिध्वनि निघूं लागला. प्रचंड सिंहनाद, भयंकर आयुधांचा खणखणाट व राक्षसांचा भीषण आक्रोश ऐकून आणि भीमसेनहि आश्रमांत दिसत नाहीं, असें पाहून अजातशत्रु युधिष्ठिर, दोघे माद्रीपुत्र, कृष्णा, धौम्य, सर्व ब्राह्मण आणि इतर सर्व सुहृद् सचिंत झाले.

( २ ) ते महारथ शूर पांडव द्रौपदीला आर्ष्टिषेणाच्या स्वाधीन करून व आपलीं आयुधें घेऊन पर्वतावर चढून गेले. ते अरिंदम धनुर्धर शैलशृंगावर जाऊन पोंचतांच अतिशय क्रुद्ध झालेला महारथ भीमसेन आणि गतप्राण होऊन भूमीवर पडलेल्या राक्षसांचीं धिप्पाड शरीरें, यांस त्यांनीं पाहिलें. भीमसेनानें युद्धांत पाडलेले कांहीं राक्षस मरणोन्मुख झाल्यामुळें त्यांची किंचित् हालचाल दिसत होती.

त्या वेळीं त्या राक्षसांचा युद्धांत संहार करून गदा, खड्ग व धनुष्य धारण करणारा भीमसेन दानवांचा वध करणाऱ्या इंद्राप्रमाणें शोभला. त्यानंतर त्या उत्कृष्ट स्थानाला प्राप्त झालेले ते महारथ पांडव आपल्या भ्रात्याला पाहून

व आलिंगन देऊन तेथेंच बसले. त्या वेळीं चार महाभाग लोकपालांच्या योगानें स्वर्ग जसा शोभतो, तसें या चार श्रेष्ठ धनुर्धर भ्रात्यांनीं तें शैलशृंग शोभलें. युधिष्ठिर कुबराचें सदन आणि मारून पाडलेले असंख्य राक्षस यांच्याकडे पाहून आपल्या समीप बसलेल्या भीमसेनाला म्हणाला—

( ३ ) "हे वीरा, तूं साहसानें आणि मोहानें केवढें हें पातक केलेंस ! मुनीप्रमाणें वनवासांत रहाणाऱ्या तुला कांहीं कारणावांचून या राक्षसांची व्यर्थ हिंसा करणें उचित नाहीं. असल्या पापकर्मांचें फल निश्चित भोगावें लागतें, यास्तव बा पार्था, माझें प्रिय करण्याची जर तुझी इच्छा असेल तर तूं पुनः असें साहस करूं नको."

वैशंपायन—राजा, आपल्या जागेवर स्वस्थ बसलेल्या भ्रात्याला असें बोलून अर्थ व तत्त्व यांचा विभाग जाणणारा कुंतीपुत्र युधिष्ठिर त्याचाच विचार करीत बसला.

इतक्यांत भीमानें संहार करून उरलेले कांहीं राक्षस एकत्र जमून मोठ्या त्वरेनें कुबेराच्या मंदिरांत गेले आणि भीमसेनाच्या भीतीनें आर्त झालेले ते सर्व भयंकर आक्रोश करूं लागले. त्या वेळीं ते सर्व शस्त्ररहित व क्लान्त झालेले असून त्यांचीं कवचादि रक्तानें माखलेलीं आणि केस पिंजारलेले होते.

ते राक्षस यक्षाधिपाला म्हणाले—हे धनेश्वरा, एका मानवानें मोठ्या वेगानें या शैलावर चढून रणामध्यें तुझ्या असंख्य योद्ध्यांचा संहार केला. गदा-खड्गादि विविध आयुधांनीं युद्ध करणारे क्रोधवशादि बलाढ्य राक्षस, श्रेष्ठ यक्ष आणि तुझा सखा मणिमान् हे सर्व गतप्राण होऊन पडले आहेत. आम्ही त्याच्या हातून सुटून जीव घेऊन पळालों म्हणूनच वांचलों आहों. हें सर्व अतिमानुष कर्म एका मनुष्यानें केलें आहे. यास्तव हे प्रभो, तूं पुढील कार्याचा निश्चय कर.

राक्षसांचें हें भाषण ऐकून तो यक्षपति कुबेर क्रुद्ध झाला आणि क्रोधानें नेत्र आरक्त करून 'हें कसें झालें ?' असें म्हणाला. भीमसेनाचा हा दुसरा अपराध ऐकून क्रुद्ध झालेल्या धनेश्वरानें आपला रथ सज्ज करण्याची आज्ञा केली.

तेव्हां त्याच्या भृत्यांनो सोनेरी, मेघासारखा कांतिमान् व शैलशृंगासारखा उंच रथ बाहेर काढिला आणि सुवर्णाच्या माला व नाना रत्नें यांनीं भूष-

विलेले 'गंधर्व'-जातीचे चार सुलक्षणी अश्व त्यास जोडिले. ते विमलाक्ष अश्व तेज व बल यांनीं युक्त असून अतिशय शीघ्रगामी होते. त्यामुळें ते अंतरिक्षांतूनच चालत आहेत कीं काय असें भासत होतें. ते एकमेकांशीं स्पर्धा व विजयसूचक शब्द करीत होते.

राजराजेश्वर कुबेर त्या महारथावर आरूढ झाला, देव आणि गंधर्व यांनीं त्याची स्तुति केली व तो महा तेजस्वी धनेश्वर पुढें निघाला. महात्मा धनाधिप शत्रूवर चाल करून जात आहे, असें पहातांच असंख्य यक्षहि आकाशमार्गानें त्याच्याबरोबर निघाले. ते सर्व आरक्त नयन, हेमवर्ण, धिप्पाड व बलाढ्य असून खड्गादि शस्त्रांनीं युक्त होते. ते सर्व महावेगवान् यक्ष आकाशमार्गानें मोठ्या वेगानें जणुं काय आकाशाला ओढीतच चालल्याप्रमाणें गंधमादन पर्वतावर येऊन पोंचले.

त्या वेळीं कुबेरानें पालन केलेला तो फार मोठा अश्वसमुदाय आणि यक्षराक्षसगणांनीं आवृत झालेला स्वतः महात्मा प्रियदर्शन धनेश्वर यांस पाहून पांडव हर्षानें रोमांचित झाले. धनुष्य व खड्ग धारण करणाऱ्या महाबलाढ्य पांडुपुत्रांना पाहून देवकार्य करण्याची इच्छा करणाऱ्या वैश्रवणालाहि संतोष झाला. ते महावेगवान् यक्ष पक्ष्यांप्रमाणें अंतरिक्षांतून त्या गिरिशृंगावर उतरले आणि धनेश्वराला पुढें करून पांडवांच्या समीप येऊन उभे राहिले. हे भारता, धनपति कुबेर पांडवांवर संतुष्ट झालेला पाहून ते सर्व यक्ष-राक्षस निर्विकार चित्तानें स्वस्थ बसले.

त्यानंतर धर्मवेत्ता युधिष्ठिर व नकुल-सहदेव, या महात्म्या पांडवांनीं त्या धनेश्वराला प्रणाम केला आणि स्वतःला अपराधी समजणारे ते सर्व महारथ हात जोडून कुबेराच्या सभोंवार उभे राहिले. धनराज कुबेर विश्वकर्म्यानें निर्माण केलेल्या 'पुष्पक'-नांवाच्या चित्र-विचित्र देदीप्यमान आसनावर अधिष्ठित झाला. शंकूसारखे कान असलेले महावेगवान् हजारों बलाढ्य राक्षस व यक्ष, देवेंद्र शतक्रतूच्या सभोंवार बसणाऱ्या शेंकडों गंधर्व-अप्सरांच्या परिवाराप्रमाणें, त्या वैश्रवणाच्या सभोंवार बसले.

पण मस्तकावर दिव्य पुष्पमाला धारण करून पाश, खड्ग, धनुष्य, इत्यादि आयुधांनीं शोभणारा भीमसेन धनाधिपाकडे निर्भयपणें पहात राहिला. राक्षसांनीं केलेल्या क्षतांनीं तो यत्किंचित्‌हि श्रांत झाला नाहीं किंवा तशा अवस्थेंत कुबेराकडे पहात असतांहि त्याला ग्लानि आली नाहीं.

त्या वेळीं नरवाहन कुबेर हातीं तीक्ष्ण बाण घेऊन युद्धाला सज्ज होऊन उभ्या असलेल्या भीमाकडे अवलोकन करून युधिष्ठिराला म्हणाला—"हे पृथापुत्रा, सर्व प्राणी 'तूं सर्व भूतांच्या हितामध्यें रत असतोस' असें समजतात. यास्तव तूं भ्रात्यांसह या शैलशिखरावर निर्भयपणें रहा. हे धर्मराजा, भीमसेनानें केलेल्या राक्षसांच्या वधाविषयीं तूं त्याच्यावर रागावूं नको. कारण कालानें पूर्वींच त्यांचा संहार केला असून तुझा हा अनुज केवल निमित्तमात्र झाला आहे. त्यानें केलेल्या या साहसाविषयीं लज्जित होण्याचें कांहीं कारण नाहीं. यक्ष-राक्षसांचा हा भावी विनाश मीं पूर्वींच जाणला होता.

हे भरतश्रेष्ठा, भीमसेनाचा मला मुळींच कोप आलेला नाहीं. उलट त्याच्यावर मी प्रसन्न झालों आहें. या वृकोदराच्या अलौकिक कर्मानें पूर्वींहि मी संतुष्ट झालों होतों."

(५) वैशंपायन—राजा, धर्मराजाला असें बोलून कुबेरानें भीमाकडे वळून त्याला म्हटलें—"हे कुरुश्रेष्ठा, तूं कृष्णेसाठीं जें हें साहस केलेंस आणि माझा व देवांचा अनादर करून आपल्या बाहुबलानें यक्ष-राक्षसांचा जो नाश केलास, त्याचा माझ्या मनाला मुळींच विषाद वाटत नाहीं; उलट तूं मला प्रियच वाटत आहेस. बा वृकोदरा, मी आज एका घोर शापापासून मुक्त झालों. पूर्वीं श्रेष्ठ अगस्त्य ऋषीनें कांहीं अपराधामुळें क्रुद्ध होऊन मला शाप दिला होता, त्याची तूं आज निवृत्ति केलीस. हे पांडवा, माझें हें भावी दुःख मला पूर्वींच कळलें होतें. त्यांत तुझा यत्किंचित्हि अपराध नाहीं."

युधिष्ठिर—हे भगवन्, महात्म्या अगस्त्यानें तुला कशासाठीं शाप दिला होता! हे धनेश्वरा, त्या शापाचें कारण ऐकण्याची माझी इच्छा आहे. त्या तपोनिष्ठ महर्षीच्या क्रोधाग्नीनें तूं आपलें सैन्य व अनुयायी यांसह दग्ध झाला नाहींस, हेंच मोठें आश्चर्य आहे!

(६) धनेश्वर—हे भूपते, पूर्वीं 'कुशवती'-नांवाच्या देशांत देवतांचा कांहीं संकेत चालला असतां मी असंख्य यक्षांच्या परिवारासह तेथें जावयास निघालों. ते घोर स्वरूपाचे यक्ष विविध आयुधें धारण करून चालले होते. तेव्हां मार्गामध्यें यमुनातीरावर उग्र तपश्चर्या करीत असलेला श्रेष्ठ अगस्त्य-ऋषि माझ्या दृष्टीं पडला.

तें यमुनेचें तीर पुष्पित वृक्षांनीं सुशोभित झालेलें असून नानाविध पक्षिगणांनीं व्याप्त होतें. तेथें प्रदीप्त अग्निप्रमाणें देदीप्यमान दिसणारा अतिशय तेजस्वी अगस्त्यमुनि एक हात वर करून सूर्याभिमुख उभा होता. माझ्याबरोबर 'मणिमान्'-नांवाचा राक्षसाधिपति माझा एक सखा होता. त्याला हा अगस्त्य आहे हें ठाऊक नव्हतें. तो अविचारानें म्हणा किंवा संपत्ति नश्वर आहे, हें जाणत नसल्यामुळें धनदर्पानें म्हणा किंवा मोहानें म्हणा, आकाशमार्गानें जात असतां त्या महर्षीच्या मस्तकावर मूर्खपणानें थुंकला.

तेव्हां तो तपोनिष्ठ मुनि क्रोधानें जणुंकाय सर्व दिशा दग्ध करीत मला म्हणाला—"हे धनेश्वरा, ज्या अर्थी तुझा हा दुरात्मा सखा तुझ्या समक्ष माझा अवमान करून मला तिरस्कृत करीत आहे, त्या अर्थी तो तुझ्या सर्व सैन्यासह मनुष्याच्या हातून मरण पावेल आणि दुर्मति असलेला तूंहि त्या सैन्याच्या नाशानें क्लेश सहन करून शेवटीं त्याच मानवाच्या दर्शनानें या पातकापासून मुक्त होशील. पण तुझ्या सैनिकांतील जो कोणी तुझी आज्ञा प्रमाण मानील तो मानवाच्या हातून मृत्यु पावणार नाहीं. तुझ्या सैन्यांतील इतर सर्व राक्षस आपल्या पुत्र-पौत्रांसह मनुष्यास वध्य होतील." (एका मणिमानाच्या अपराधामुळें अनेक राक्षसांना प्राणनाशरूप दंड भोगावा लागणार, हेंच या शापाचें घोरत्व आहे.)

हे धर्मराज, पूर्वीं मला त्या श्रेष्ठ ऋषीकडून असा शाप झाला होता, त्यापासून तुझ्या या वीर भ्रात्यानें मला आज मुक्त केलें. ३. ९. १६१.

---

## अध्याय १६२ वा.

[ १ कुबेराचा युधिष्ठिराला उपदेश. २ त्यांना त्या पर्वतावर एक पक्षभर राहण्याची अनुज्ञा. ३ अर्जुनाची प्रशंसा. ४ भीमाची शरणागति. ५ कुबेराचें स्वमंदिरास गमन. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, याप्रमाणें शापकथनमिषानें 'थोरांची अवज्ञा करूं नये' हा सुचविलेलाच अर्थ साक्षात् शब्दांनीं व्यक्त करण्यासाठीं कुबेर युधिष्ठिराला म्हणाला—

"हे धर्मराजा, धृति म्ह० संकटांत व्याकुल न होतां धैर्य धरणें, दक्षता म्ह० यत्नशीलता, देश, काल व पराक्रम असे हे लोकतंत्रविधानाचे पांच

प्रकार आहेत. पण देश व काल अनुकूल नसल्यास अंगीं धैर्यादि गुण असले तरी कार्यसिद्धि न होतां पराजय होतो.

हे भारता, कृतयुग ज्ञानप्रधान असल्यामुळें त्या कालीं सर्वदा अभ्युदय होत असे. तेव्हां अनुकूल देश-कालांची अपेक्षा नव्हती. यास्तव कृतयुगांतील पुरुष द्युतिमान्, आपापल्या कर्मांत दक्ष व पराक्रमी होते.

हे क्षत्रियश्रेष्ठा, धैर्यवान्, देश-कालज्ञ व सर्व धर्मांचें विधान जाणणारा क्षत्रिय चिरकाल पृथ्वीचें राज्य करितो. हे पार्था, जो पुरुष अशाप्रकारें वागतो त्याला या लोकीं सत्कीर्ति व परलोकीं सद्गति प्राप्त होते. वृत्रासुराचा वध करणाऱ्या इंद्रानें देश-काल पाहूनच पराक्रम केल्यामुळें त्याला त्रिभुवनाचें राज्य प्राप्त झालें; परंतु केवल क्रोधामुळें जो मनुष्य पुढील अनर्थ पहात नाहीं, तो पापबुद्धि पापात्मा पापालाच अनुसरतो.

कर्मांचा विभाग न जाणणाऱ्या पुरुषाचे इह व पर हे दोन्ही लोक नष्ट होतात. त्याचप्रमाणें कालाचा व कार्यांचा भेद न जाणणारा दुर्बुद्धि मनुष्य कार्यांचा व्यर्थ आरंभ करून या व परलोकीं विनाश पावतो. साहसी, वंचक आणि सर्व सामर्थ्यांची इच्छा करणाऱ्या दुरात्म्यांचा निश्चय पापयुक्त असतो.

( २ ) हे युधिष्ठिरा, हा तुझा भ्राता भीमसेन अधर्मज्ञ, गर्विष्ठ, मूर्ख, असहिष्णु व निर्भय आहे. त्याला तूं उपदेश कर आणि महर्षि आर्ष्टिषेणाच्या आश्रमास परत जाऊन राक्षसांचें भय असलें तरी या कृष्णपक्षभर तेथें निर्भयपणें रहा. हे महाबाहो, अलकानगरींत रहाणारे हे यक्ष, गंधर्व, किन्नर आणि इतर पर्वतवासी जन माझ्या आज्ञेवरून या सर्व ब्राह्मणांसह तुझें रक्षण करतील. हे राजन्, तूं साहसानें या प्रदेशीं आलेल्या वृकोदराचें पूर्णपणें निवारण कर.

युधिष्ठिरा, या पुढें वनांत रहाणारे माझे सेवक तुमच्या सेवेंत तत्पर राहून तुमचें सदोदित संरक्षण करतील. त्याचप्रमाणें माझे भृत्य तुम्हांला सर्वदा स्वादिष्ठ व विपुल अन्न-पानादि आणून देतील.

इंद्राचा अर्जुन, वायूचा वृकोदर, धर्मांचा तूं युधिष्ठिर आणि अश्विनिकुमारांचे नकुल-सहदेव असे तुम्ही पांची भ्राते ज्याअर्थी लोकपालांचे औरसपुत्र आहां, त्याअर्थी तुमचें रक्षण करणें हें माझें कर्तव्य आहे.

( ३ ) हे धर्मराजा, अर्थतत्त्वविधानज्ञ व सर्वधर्मविधानवेत्ता भीमसेनाचा कनिष्ठ भ्राता अर्जुन स्वर्गलोकीं कुशल आहे. युधिष्ठिरा, स्वर्गप्राप्तीचीं जीं श्रेष्ठ

लक्षणें लोकांमध्यें प्रसिद्ध आहेत, तीं सर्व धनंजयामध्यें जन्मतःच सिद्ध आहेत. त्याचप्रमाणें तो फाल्गुन दम, दान, बल, बुद्धि, अकर्माविषयीं लज्जा, धैर्य, व तेज, या उत्कृष्ट गुणांनींहि युक्त आहे.

हे पांडवा, तो सव्यसाची मोहानें निंद्य कर्म केव्हांहि करीत नाहीं. पार्थानें कधीं असत्य भाषण केलें आहे, असें या लोकीं कोणालाच सांगतां येणें शक्य नाहीं. देव, पितर आणि गंधर्व यांना मान्य असलेला व कुरूंची कीर्ति वाढविणारा तो पार्थ इंद्रभुवनांत राहून अस्त्रविद्येचा अभ्यास करीत आहे.

हे युधिष्ठिरा, ज्यानें धर्म्य मार्गानेंच सर्व महीपालांना वश करून घेतलें, तो तुझ्या पित्याचा पितामह महातेजस्वी शांतनुराजा स्वर्गामध्यें धनुर्धारी पार्थाच्या आचरणानें परम संतुष्ट होत आहे. पूर्वीं या महातपस्वी व महापराक्रमी राजानें यमुनेच्या तीरावर पितर, देवता व ऋषि यांचें पूजन करून सात अश्वमेध केले. तो तुझा स्वर्गजित् प्रपितामह राजाधिराज शांतनु इंद्रलोकीं रहात असून त्यानें तुम्हांला कुशल विचारलें आहे."

(४) वैशंपायन—राजा, कुबेराचें हें भाषण ऐकून पांडव अतिशय आनंदित झाले. त्या वेळीं स्वतःचे दोष व अर्जुनाचे गुण श्रवण केल्यामुळें लज्जित झालेल्या भीमसेनानें आपल्या गदा-खड्गादि सर्व शस्त्रांचा उपसंहार करून धनुष्याची दोरी उतरली आणि कुबेराला नमस्कार केला. तेव्हां शरण जाण्यास योग्य असलेला वैश्रवण शरण आलेल्या भीमाला म्हणाला—

"हे वीरा, तूं शत्रूंची मानहानि व सुहृदांची समृद्धि वाढविणारा हो. हे शत्रुतापन पांडवहो, आमच्या रम्य मंदिरांत जाऊन तुम्ही सुखानें रहा. हे यक्ष तुमच्या कोणत्याहि इष्ट कार्यांत विघ्न आणणार नाहींत, उलट ते तुमच्या सर्व कामना पूर्ण करतील आणि कृतास्त्र झालेला तुमचा भ्राता गुडाकेश साक्षात् इंद्राची अनुज्ञा घेऊन लवकरच तुम्हांला येऊन भेटेल."

(५) याप्रमाणें उत्तम कर्में करणाऱ्या युधिष्ठिराशीं संभाषण करून धनपति कुबेर त्या शैलशिखरावरील आपल्या श्रेष्ठ भुवनाकडे निघून गेला. तेव्हां उत्तम झुली व मूल्यवान् रत्नें यांनीं भूषविलेल्या विविध प्रकारच्या वहानांवर आरूढ होऊन सहस्रावधि यक्ष व राक्षस त्याच्या मागोमाग निघाले. त्या वेळीं इंद्रभुवनाच्या मार्गांतील ऐरावताप्रमाणें त्या श्रेष्ठ अश्वांनीं कुबेरसदना-समीप मोठा निर्घोष केला. त्यांचें तें खिंकाळणें पक्ष्यांच्या ध्वनीप्रमाणेंच भासलें. ते

धनपतीचे अश्व मेघमंडलाचें आकर्षण करीत व वायूला जणुकाय प्राशन करीतच आकाशमार्गानें चालले.

नंतर गतप्राण होऊन पडलेल्या राक्षसांचीं शरीरें कुबेराच्या आज्ञेनें त्या शैलशिखरावरून काढून टाकिलीं. बुद्धिमान् अगस्त्यानें त्यांचा जो शापकाल योजिला होता, त्याप्रमाणें त्यांस समरांत मृत्यु येऊन शापाची निवृत्ति झाली.

शेवटीं उद्वेगरहित झालेले महात्मे पांडव कुबेराच्या आज्ञेप्रमाणें त्याच्या मंदिरांत एक पक्ष सुखानें रहात असतां सर्व राक्षसांनीं त्यांचा योग्य सत्कार केला. ३. ९. १६२.

---

## अध्याय १६३ वा.

[ १ आर्ष्टिषेण व धौम्य यांचें शैलशृंगावर आगमन. २ धौम्यानें केलेलें मेरूचें निदर्शन व वर्णन. ]

( १ ) वैशंपायन—राजा, युधिष्ठिराला अर्जुनानें तपोबलानेंच अस्त्रें संपादन केलीं, याविषयीं विस्मय आणि आपल्या भ्रात्याच्या कर्तृत्वाविषयीं गर्व होऊं नये, म्हणून विष्णुलोकापर्यंतचे सर्व लोक कर्मफलानें प्राप्त होणारे आहेत, असें युधिष्ठिराला दर्शविण्यासाठीं धौम्य दुसऱ्या दिवशीं सूर्योदय होतांच आपलें आह्निक आटोपून आर्ष्टिषेणासह पांडवांकडे आला. तेव्हां ते सर्व भ्राते त्या दोघांहि महर्षींच्या चरणांना वंदन करून आणि इतर सर्व ब्राह्मणांचा सत्कार करून हात जोडून उभे राहिले.

( २ ) त्या वेळीं धौम्य महर्षीनें आपल्या उजव्या हातानें युधिष्ठिराचा हात धरून पूर्व दिशेकडे पहात त्याला म्हटलें—"हे महाराज, हा शैलराज मंदर सागरापर्यंत सर्व पृथ्वीला आच्छादित करीत असल्यामुळें अतिशय शोभतो. पर्वत, वनें आणि महारण्यें यांनीं शोभणाऱ्या या पूर्व दिशेचें इंद्र आणि कुबेर रक्षण करितात. सर्व धर्मज्ञ व ज्ञानसंपन्न ऋषि, याला महेंद्र व वैश्रवण यांचें निवासस्थान म्हणतात. धर्मवेत्ते ऋषि, सिद्ध, साध्य व देवता येथेंच उदय पावणाऱ्या आदित्याचें उपस्थान करितात.

हे धर्मराजा, प्राण धारण करणाऱ्या सर्व जीवांचा प्रभु आणि मृतांची गति असा जो धर्मज्ञ यम तो दक्षिण दिशेचा आश्रय करितो. हें परम समृद्ध असलेलें 'संयमन'-नामक यमराजाचें भवन आहे. तें पुण्यप्रद व अति अद्भुत आहे.

" हे कौंतेया, पश्चिम दिशेंतील हा पर्वत पहा. तेथें जाऊन भगवान् सूर्य सत्यानें प्रतिष्ठित होतो. म्हणून याला विद्वान् लोक अस्ताचल म्हणतात. वरुण देव हा शैलराज व महासागर यांचा आश्रय करून सर्व प्राण्यांचें रक्षण करितो.

हे धर्मराजा, हा पर्वतश्रेष्ठ महामेरु उत्तर दिशेला प्रकाशित करीत असतो. हा कल्याणप्रद व ब्रह्मवेत्त्यांची परम गति आहे. हें ब्रह्मसदन असून तेथें सर्व भूतात्मा विराट् वास करितो. तो सर्व चराचर जगत् निर्माण करणारा प्रजापति व ब्रह्मदेवाचे दक्षादि सात मानसपुत्र, यांचेंहि हा महामेरु मंगल व अनामय निवासस्थान आहे. या प्रजापतीमध्येंच वसिष्ठादि सात देवर्षि प्रतिष्ठित होतात व त्याच्यापासून पुनः उदय पावतात.

या मेरूचें हें धूलिरहित उत्तम शिखर पहा. येथें पितामह आत्मतृप्त देवांसह वास करितो. ज्याला सर्व भूतांच्या प्रकृतीचीहि प्रकृति म्हणजे पंचभूतात्मक प्रकृतीचें उपादान कारण, शाश्वत, आद्यंतरहित, परम देव, प्रभु नारायण म्हणतात, त्याचें देवांच्याहि दृष्टीं न पडणारें सर्व तेजोमय शुभ व श्रेष्ठ स्थान या चतुर्मुख ब्रह्मदेवाच्या भुवनापलीकडे दिसत आहे. महात्म्या विष्णूचें तें स्वयंप्रकाश स्थान सूर्य व अग्नि यांहूनहि देदीप्यमान असल्यामुळें देव आणि दानव यांसहि दुष्प्रेक्ष्य आहे.

तें नारायणाचें स्थान मेरूच्या पूर्व दिशेला अतिशय शोभवितें. तेथें तो सर्व प्रकृतीचें उपादान व भूतांचा ईश्वर आपल्या स्वयंप्रभेनें सर्व प्राण्यांना प्रकाशित करीत विराजतो. हे कुरुश्रेष्ठा, केवल यतींनाच ही गति प्राप्त होते. बाबारे, तेथें ब्रह्मर्षिंहि जाऊं शकत नाहींत. मग महर्षि कोठून जाणार ! त्याच्या तेजापुढें सर्व ज्योति निस्तेज होतात. तेथें तो अचिंत्यात्मा स्वयंप्रभु अतिशय शोभतो. यति भक्तीच्या योगानें त्या नारायण हरीला प्राप्त होतात.

परम तपानें संपन्न, शुभ कर्मांनीं युक्त, अज्ञान व मोह यांनीं रहित आणि योगसिद्ध महात्मेच तेथें जातात व ते त्या स्वयंभुव महात्म्या सनातन देवदेवाला प्राप्त होऊन पुनः या लोकीं परत येत नाहींत. हे महाभाग युधिष्ठिरा, ईश्वराचें हें शाश्वत, अक्षय व अव्यय स्थान आहे. त्याला तूं प्रणाम कर. हें परमपद उत्पत्ति-विनाशशून्य आहे.

हे कुरुनंदना, या अढळ मेरूला सूर्य-चंद्र नित्य प्रदक्षिणा करितात. त्याचप्रमाणें सर्वज्योति आणि तमोनाशक भगवान् आदित्य सर्व नक्षत्रांना निस्तेज

करीत त्यांच्यासह या गिरिराजाला प्रदक्षिणा घालतो. मेरूला प्रदक्षिणा घालणारा हा आदित्य ज्या स्थानीं गेला असतां दिसेनासा होतो, त्या स्थानीं जाऊन व संध्याकालाचें अतिक्रमण करून हा अति तेजस्वी अदितिपुत्र सर्व दिशांतील अति श्रेष्ठ उत्तर दिशेचें सेवन करितो. त्यानंतर उत्तरेच्या परम सीमेला प्राप्त होऊन सर्व भूतांच्या हितांत रत असलेला हा सविता पूर्वाभिमुख होऊन तेथून पुनः निघतो. ( या कथनानें मेरूचें चतुष्कोणत्व सुचविलें आहे. )

तो चंद्रयुक्त असलेला सूर्य अमावास्या व पौर्णिमा यांच्या पर्वसंधीमध्यें चैत्रादि मासांचा योग्यकालीं विभाग करितो. आदित्याप्रमाणेंच भगवान् सोमहि नक्षत्रांसह संचार करीत निरलसपणें महामेरूचें अतिक्रमण व सर्व भूतांचें पोषण करीत मंदर पर्वताकडे जातो. तसाच अंधकाराचा नाश करणारा आदित्य देवहि आपल्या किरणांनीं सर्व जगाचें पोषण करितो. याप्रमाणें भगवान् सूर्य आपल्या या निर्बाध मार्गानें सतत परिवर्तन करीत रहातो.

शीतकाल उत्पन्न करण्याच्या इच्छेनें तो दक्षिण दिशेचा आश्रय करितो. त्यामुळें सर्व भूतें शीताचा अनुभव घेतात. त्यानंतर तो दक्षिण दिशा सोडून परत फिरतो व उत्तरेकडे जात असतां ग्रीष्म ऋतूंत आपल्या तेजानें स्थावर-जंगम भूतांचें तेज आकर्षण करून घेतो. त्यामुळें सर्व जीव स्वेद, क्लान्ति, तंद्रा व ग्लानि यांचा अनुभव घेतात. प्राण्यांना वारंवार झोंप येऊं लागते. अशाप्रकारें हा प्रखर किरणांनीं युक्त असलेला सूर्य अंतरिक्षमार्गानें संचार करून वर्षा ऋतूंत वृष्टि उत्पन्न करितो व तिच्या द्वारा प्रजेची वृद्धि करितो.

याप्रमाणें भगवान् सविता वृष्टि, शीतल वायु व संताप यांच्या योगानें स्थावर-जंगम प्रजेला सुख देऊन वाढवितो व तो अति तेजस्वी अदितिनंदन पुनः परत फिरतो. हे युधिष्ठिरा, हा सूर्य अशाप्रकारें निरलसपणें कालचक्रांतून संचार करीत व सर्व प्राण्यांची वृद्धि करीत सतत परिवर्तन करितो. हे पांडवा, याची ही अशी अविच्छिन्न गति चालू आहे. हा केव्हांहि स्थिर रहात नाहीं. तो सर्व भूतांचें तेज घेऊन त्याचा वृष्टिरूपानें पुनः त्याग करितो. आपल्या संतत गतीनें सर्व भूतांचें आयुष्य व कर्म यांचा विभाग करितो. तो प्रभु सर्वदा घटका, पळें, अहोरात्र इत्यादि कालाचे अवयव संपादन करीत असतो. ३. ९. १६३.

## अध्याय १६४ वा.

[ १ पांडवांचें गंधमादन पर्वतावर वास्तव्य. २ अर्जुनाचें इंद्रलोकाहून भ्रात्यांकडे प्रत्यागमन. ]

(१) वैशंपायन—जनमेजया, महात्मे पांडव सद्वृत्तामध्यें स्थित होऊन अर्जुनाची मार्गप्रतीक्षा करीत त्या श्रेष्ठ शैलावर रहात असतां त्यांचें चित्त तेथें प्रसन्न होऊन रमलें. ते वीर्यवान्, तेजस्वी, सद्वासना करणारे व सत्य आणि धैर्य यांनीं युक्त होते. त्यामुळें महर्षि व गंधर्व यांचे अनेक संघ मोठ्या प्रेमानें त्यांच्याकडे येऊं लागले. स्वर्गाला प्राप्त झालेल्या देवतांप्रमाणें पुष्पित वृक्षांनीं शोभणाऱ्या त्या श्रेष्ठ शैलशृंगाला प्राप्त होऊन त्या महारथ पांडुपुत्रांचें मन अतिशय संतुष्ट झालें.

त्या महापर्वताचीं शिखरें सुवासिक पुष्पांनीं व्याप्त व मयूर-हंसादिकांच्या रवानें नादित झालीं होतीं. त्या शैलशिखरावर साक्षात् कुबेरानें निर्माण केलेलीं, नव शैवलादिकांनीं ज्यांतील जल आच्छादित झालें आहे अशीं, कारंडव-हंसादि पक्ष्यांनीं सेवित आणि कमलांनीं व्याप्त, अशीं विपुल रम्य सरोवरें होतीं. तेथें चित्र-विचित्र पुष्पांनीं सुशोभित व विविध रत्नें जडविल्यामुळें मनोरम असे यक्षराज कुबेराच्या ऐश्वर्यास अनुरूप असलेले अनेक क्रीडाप्रदेश पांडवांच्या दृष्टीं पडले.

ते तपोनिष्ठ पांडुनंदन त्या शैलशिखरावर जरी सतत संचार करीत होते, तरी अनेक वर्णांच्या सुगंध पुष्पयुक्त वृक्षांनीं व्याप्त व अभ्रजालांनीं निरंतर आच्छादित असलेलें तें शैलशृंग केवढें विस्तीर्ण आहे, याची कल्पनाहि करूं शकले नाहींत. त्या श्रेष्ठ गिरीवर ओषधि-वनस्पतींची प्रभा सदोदित पसरलेली असल्यामुळें रात्र व दिवस हा विभाग तेथें दिसत नव्हता.

त्या शैलश्रेष्ठावर असतांना पांडववीरांनीं तेथून अमित तेजस्वी अग्नि ज्याच्या आश्रयानें राहून स्थावर-जंगम जीवांचें पोषण करितो व रात्रीं सर्व जगाला प्रकाशित करितो, त्या सूर्याचे उदय व अस्त पाहिले. फार काय पण सूर्याचीं अस्तोदयस्थानें, उदय, अस्त आणि त्याच्या किरणांनीं व्याप्त झालेले दशदिशांतील अवकाश इत्यादि सर्व तेथून त्या वीरांच्या दृष्टीं पडलें.

हे पारिक्षिता, स्वाध्यायसंपन्न, अविच्छिन्न धर्माचरणी, शुचिव्रत, व सत्यप्रतिज्ञ महारथ पांडव अर्जुनाची मार्गप्रतीक्षा करीत तेथेंच राहिले. ‘ कृतास्त्र धनंजयाच्या आगमनानें आम्हांला येथेंच संतोष होवो ’ अशा मोठ्या आशेनें ते वीर तेथेंच तपोनिष्ठ होऊन राहिले. त्या वेळीं ते वीर त्या शैलावरील विचित्र वनें पहात जरी संचार करीत होते तरी अर्जुनाच्या उत्कंठेनें त्यांना प्रत्येक अहोरात्र संवत्सराप्रमाणें दीर्घ भासली. ज्या वेळीं तो महात्मा अर्जुन धौम्यमुनीची अनुमति घेऊन, जटा बांधून निघाला, त्याच वेळीं त्या वीरांचा सर्व आनंद अस्त पावला आणि आतां तर त्यांचें सर्व लक्ष्य त्या धनुर्धराच्या मार्गाकडे लागलें होतें. तेव्हां त्यांच्या चित्ताला स्वस्थता कशी वाटणार ! मत्त गजाप्रमाणें गमन करणारा पार्थ युधिष्ठिराची अनुज्ञा घेऊन जेव्हां काम्यकवनांतून तपश्चर्येसाठीं इंद्रकील पर्वतावर जावयास निघाला, तेव्हांच ते सर्व भ्राते शोकाकुल झाले होते. असो; अस्त्रप्राप्तीसाठीं इंद्राकडे गेलेल्या सव्यसाची फाल्गुनाचें चिंतन करीत त्या भरतश्रेष्ठांनीं त्या पर्वतावर एक महिनाभर वास्तव्य केलें. तेथें त्यांनीं तो महिना मोठ्या कष्टानें घालविला.

हे राजा, इकडे महा पराक्रमी अर्जुनानें पांच वर्षें इंद्रभुवनांत राहून सर्व लोकपाल देवांकडून दिव्य अस्त्रें प्राप्त करून घेतलीं. त्या अप्रतिम वीरानें आग्नेय, वारुण, सौम्य, वायव्य, वैष्णव, ऐंद्र, पाशुपत, ब्राह्म व पारमेष्ठ्य हीं अस्त्रें आणि शतक्रतूपासून प्रजापति, यम, धाता, सविता, त्वष्टा व वैश्रवण या लोकपालांचीं अस्त्रें संपादन करून इंद्रानें परत जाण्याची अनुज्ञा दिली असतां त्यास प्रदक्षिणा केली आणि तो कौंतेय प्रसन्न व हृष्ट मनानें गंधमादन पर्वतावर येऊन पोंचला. ३. ९. १६४.

येथें नववें यक्षयुद्धपर्व समाप्त झालें.

---

# निवातकवचयुद्धपर्व १०



## अध्याय १६५ वा.

[ १ अर्जुनाचें गंधमादन-पर्वतावर आगमन व भ्रात्यांची भेट. २ मातलीचें रथासह इंद्रलोकीं निवर्तन. ३ इंद्रानें दिलेल्या दिव्य भूषणांचें पार्थानें द्रौपदीला केलेलें समर्पण. ४ भ्राते व ब्राह्मण यांस इंद्रलोकवृत्तान्तकथन. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, ते महारथ पांडुपुत्र अर्जुनाचें चिंतन करीत बसले असतां अकस्मात् विद्युल्लतेप्रमाणें प्रकाशणारा व चार अश्व जोडलेला इंद्राचा रथ त्यांच्या दृष्टीं पडला. इंद्रसारथि मातलीनें अधिष्ठित असलेला तो देदीप्यमान रथ अंतरिक्षाला प्रकाशयुक्त करीत आहे, असें पाहून त्या पांडवांना अतिशय हर्ष झाला. वेगानें येणारा तो रथ मेघांतील उल्केप्रमाणें, किंवा धूमरहित प्रज्वलित अग्निज्वालेप्रमाणें भासला.

त्या श्रेष्ठ रथांत बसलेला धनंजय त्यांच्या दृष्टीं पडला. तो नवीन आभरणें व पुष्पमाला धारण केलेला अर्जुन अतिशय शोभत होता. साक्षात् इंद्राप्रमाणें प्रभावशील असलेला व आपल्या कांतीनें देदीप्यमान होणारा धनंजय त्या पर्वतावर येऊन पोंचला व किरीट धारण करणाऱ्या पार्थानें महेंद्राच्या श्रेष्ठ रथांतून उतरून प्रथम धौम्यमुनींच्या चरणांना वंदन केलें. नंतर क्रमानें अजातशत्रु युधिष्ठिर व शत्रुतापन वृकोदर यांच्या चरणांवर मस्तक ठेवून त्यांस प्रणाम केला. तेव्हां दोघां माद्रीपुत्रांनीं कौंतेयाला अभिवादन केलें. त्यानंतर कृष्णेची भेट घेऊन व तिचें सान्त्वन करून तो भ्रात्यांसमीप येऊन नम्रपणानें बसला. अमित पराक्रमी अर्जुनाच्या भेटीनें त्या चारी पांडवांना परम आल्हाद झाला. आपल्या कुशल असलेल्या सर्व भ्रात्यांना पाहून संतुष्ट झालेला धनंजयहि युधिष्ठिराची प्रशंसा करूं लागला.

( २ ) राजा, त्यानंतर उल्लसित चित्तानें युक्त असलेल्या पांडवांनीं इंद्राच्या श्रेष्ठ रथाला प्रदक्षिणा केली. याच दिव्य वाहनावर आरूढ होऊन देवेंद्रानें दैत्यांच्या सात संघांचा संहार केला होता. त्या कुरुराजपुत्रांनीं अत्यंत हृष्ट चित्तानें इंद्राप्रमाणेंच मातलीचा सत्कार केला आणि त्याला सर्व देवांचा यथायोग्य वृत्तान्त विचारिला. तेव्हां तो मातलि पुत्रांचें अभिनंदन करणाऱ्या

पित्याप्रमाणें पांडवांचें अभिनंदन करून व त्यांस आशीर्वाद देऊन इंद्राच्या अप्रतिम तेजस्वी रथावर आरूढ झाला आणि इंद्रलोकीं परत गेला.

(३) मातलि गेल्यानंतर इंद्रशत्रु दैत्यांचा संहार करणाऱ्या इंद्रतनय पार्थानें सुरेश्वरानें दिलेलीं मूल्यवान्, सूर्याप्रमाणें तेजस्वी व अतिशय मनोहर अशीं भूषणें सुतसोमाची माता व त्याची प्रिय पत्नी जी पांचाली तिला अर्पण केलीं. त्यानंतर त्या वीरानें कुरुश्रेष्ठ पांडव आणि सूर्य व अग्नि यांप्रमाणें तेजस्वी असलेले विप्रश्रेष्ठ, यांच्या समुदायांत बसून आपला सर्व वृत्तान्त त्यांस कथन केला.

(४) अर्जुन—हे तपोनिष्ठहो, मी इंद्र, वायु आणि साक्षात् महादेव यांच्यापासून अस्त्रविद्या संपादन केली. त्याचप्रमाणें इंद्रासह सर्व देव माझ्या आचरणानें व चित्ताच्या एकाग्रतेनें मजवर प्रसन्न झाले.

याप्रमाणें पवित्र कर्में करणाऱ्या अर्जुनानें त्यांस स्वर्गांतील आपल्या श्रेष्ठ निवासाचें संक्षिप्त वृत्त निवेदन करून माद्रीपुत्रांसह संतुष्ट चित्तानें त्या रात्रीं तेथेंच शयन केलें. २. १०. १६५.

---

## अध्याय १६६ वा.

[ १ इंद्राचें गंधमादन पर्वतावर आगमन. २ युधिष्ठिराला आशीर्वाद व अर्जुनाची प्रशंसा. ]

(१) वैशंपायन—राजा, त्यानंतर रात्र संपली असतां प्रातःकालीं धनंजयानें आपल्या सर्व भ्रात्यांसह धर्मराज युधिष्ठिराला वंदन केलें. इतक्यांत अंतरिक्षांत देवांच्या वाद्यांचा फार मोठा निर्घोष झाला.

रथचक्रांचा ध्वनि व हिंस्र पशु-पक्ष्यांच्या शब्दाप्रमाणें प्रचंड घंटानाद सर्व बाजूंनीं ऐकूं येऊं लागला. त्या वेळीं गंधर्व व अप्सरा यांचे समुदाय सूर्याप्रमाणें तेजोमय विमानांत बसून अरिंदम देवराज इंद्राला अनुसरले.

त्यानंतर उत्तम अश्वांनीं युक्त, सुवर्णानें अलंकृत व मेघांप्रमाणें गंभीर ध्वनि करणाऱ्या श्रेष्ठ रथावर आरूढ झालेला व आपल्या दैवी कांतीनें देदीप्यमान होणारा देवराज पुरंदर पांडवांच्या समीप आला आणि रथांतून उतरला. त्या श्रीमान् महात्म्या देवेंद्राला पाहतांच विपुल दक्षिणा देणाऱ्या कुंतीपुत्र युधिष्ठिरानें भ्रात्यांसह त्याच्या समीप जाऊन त्या देवराजाचें यथाविधि शास्त्रोक्त पूजन केलें.

राजा तेजस्वी धनंजय पुरंदराला प्रणाम करून भृत्याप्रमाणें नम्रतेनें त्याच्या समीप उभा राहिला. त्या वेळीं तो जटाधारी, तपोनिष्ठ, निष्पाप फाल्गुन देवराजाच्या समीप अत्यंत विनयानें उभा असलेला पाहून युधिष्ठिराला परम आल्हाद झाला व त्यानें त्या आपल्या कनिष्ठ भ्रात्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें. सुरेंद्राचें पूजन करीत असतांना धर्मराजाला अतिशय संतोष वाटला.

(२) तें पाहून धीमान् देवराज त्याला म्हणाला—हे पांडवा, तूं या समग्र पृथ्वीचें राज्य करशील. तुझें कल्याण होवो. हे कुंतीपुत्रा, आतां तूं काम्यकवनांतील आपल्या आश्रमास परत जा. या नियतव्रत अर्जुनानें माझ्या पासून सर्व अस्त्रें प्राप्त करून घेतलीं आहेत. या वीरानें माझ्या शत्रूंचा वध करून माझें प्रिय केलें आहे. या धनंजयाला त्रिभुवनांत कोणीहि जिंकूं शकणार नाहीं.

जनमेजया, युधिष्ठिराला असें बोलून तो सहस्राक्ष इंद्र महर्षि स्तुति करीत असतां संतुष्ट चित्तानें स्वर्गलोकीं गेला. धनेश्वर कुबेराच्या सदनांत रहाणाऱ्या पांडवांचा आणि इंद्राचा हा समागम व त्यांचा संवाद यांचें जो विद्वान् नियमनिष्ठ होऊन व ब्रह्मचर्य पाळून एक वर्षभर अध्ययन करील तो विघ्नरहित होऊन निर्बाधपणें शंभर वर्षें जिवंत राहील. ३. १०. १६६.

---

## अध्याय १६७ वा.

[ १ युधिष्ठिराचा अर्जुनाला अस्त्रप्राप्त्यादिकांविषयीं प्रश्न. २ पाशुपत अस्त्रप्राप्तीचें कथन. ]

(१) वैशंपायन—हे पांडवेया, याप्रमाणें इंद्र आल्या मार्गानें परत गेला असतां धनंजयानें आपल्या भ्रात्यांची व पांचालीची भेट घेऊन युधिष्ठिराचा पुनः सत्कार केला. त्या वेळीं वंदन करणाऱ्या अर्जुनाच्या मस्तकाचें अवघ्राण करून संतुष्ट झालेल्या धर्मराजानें हृष्ट होऊन सद्गदित वाणीनें त्याला म्हटलें—

“ हे अर्जुना, तुझा हा पंचवर्षात्मक काल स्वर्गलोकीं कसा काय गेला ? तूं देवराजाला संतुष्ट करून अस्त्रें कशीं मिळविलींस ? वत्सा, तूं अस्त्रांचें ज्ञान योग्यप्रकारें ग्रहण केलें आहेस ना ? देवाधिदेव रुद्रानें प्रसन्न होऊन तुला अस्त्रें दिलीं ना ? धनंजया, तुला वज्रपाणि शक्र व पिनाकपाणि शंकर यांचें दर्शन कसें झालें ? तूं त्यांची आराधना कशी केलीस व तुला अस्त्रें कशीं प्राप्त झालीं ?

हे अनघा, नुकतेंच भगवान् शतक्रतूनें 'तूं माझें प्रिय केलें आहेस' असें जें म्हटलें, तें काय? त्याचें कोणतें प्रिय कार्य तूं केलेंस? हें सर्व सविस्तर ऐकण्याची माझी इच्छा आहे. हे वीरा, महादेव आणि देवराज कसे संतुष्ट झाले आणि तूं इंद्राचें कोणतें प्रिय केलेंस? हें सर्व मला साद्यंत कथन कर."

(२) अर्जुन—हे महाराज, ठीक आहे. मला शतक्रतु व भगवान् शंकर यांचें दर्शन कोणत्या साधनानें झालें तें सांगतों ऐक. तूं सांगितलेल्या त्या विद्येचें अध्ययन करून तुझ्या आज्ञेनें मी तपश्चर्येसाठीं वनांत जाण्यास निघालों. काम्यकवनांतून निघून भृगुतुंग पर्वतावर एक रात्र राहिलों. तेथें मार्गामध्यें मला एक ब्राह्मण भेटला. त्यानें मला विचारलें—"हे कौंतेया, तूं कोठें जाणार आहेस, तें मला सांग."

तेव्हां मीं त्या ब्राह्मणाला सर्व यथार्थ वृत्तांत सांगितला. तो सत्य वृत्तांत ऐकून त्या ब्राह्मणानें माझा मोठा सत्कार केला आणि मजवर प्रसन्न होऊन म्हटलें—"हे पार्था, तूं तपश्चर्या कर. तूं तपोनिष्ठ होतांच इंद्र तुला सत्वर दर्शन देईल."

हे राजन्, त्याचें हें वचन ऐकून मी हिमालय पर्वतावर आरूढ झालों आणि तपश्चर्या आरंभिली. मीं एक महिना फल-मूलाशन केलें. दुसऱ्या महिन्यांत केवल जलप्राशन केलें. तिसरा महिना निराहार राहून व वायुभक्षण करून घालविला. चवथ्या महिन्यांत एक हात वर करून उभा राहिलों. परंतु हे धर्मराजा, माझें बल यत्किंचित्हि कमी झालें नाहीं, हें केवढें आश्चर्य!

त्यानंतर पांचव्या महिन्याचा पहिला दिवस गेला असतां एक वराहाच्या आकाराचें भूत माझ्या समीप आलें. तें आपल्या मुखाच्या अग्रानें पृथ्वीवर प्रहार करीत, पायांनीं भूमि उकरीत व जठरानें जणुंकाय भूमीचें संमार्जन करीत वारंवार मत्समीप येऊन इतस्ततः फिरूं लागलें. त्याच्या मागोमाग दुसरें एक किरातवेषधारी प्रचंड भूत आलें. त्यानें धनुष्य, बाण व खड्ग हीं आयुधें धारण केलीं असून त्याच्या बरोबर असंख्य स्त्रियांचा समुदाय होता.

तेव्हां मीं आपलें धनुष्य घेऊन अक्षय भात्यांतील शर त्या अद्भुत वराहावर सोडिले. त्याच वेळीं त्या किरातानेंहि आपलें दृढ धनुष्य आकर्षण करून त्या वराहाला विद्ध केलें. तें पाहून माझें मन कंपित झालें. नंतर तो किरात मला म्हणाला—"अरे, हा पशु माझें लक्ष्य असतां तूं मृगयाधर्माचें उल्लंघन करून

त्यावर प्रहार कां केलास? थांब, आतां या माझ्या तीक्ष्ण बाणांनीं मी तुझा दर्प घालवितों."

असें बोलून त्या धिप्पाड शरीरानें युक्त असलेल्या धनुर्धरानें पर्जन्यवृष्टीनें व्यापलेल्या पर्वताप्रमाणें महाशरांची वृष्टि करून मला व्यापून टाकिलें. तेव्हां मींहि त्याच्यावर फार मोठा शरवर्षाव केला. वज्रानें विद्ध केलेल्या पर्वता-प्रमाणें मीं प्रदीप्त अग्रें असलेले बाण अभिमंत्रवून व ते आकर्ण आकर्षण केलेल्या धनुष्यानें सोडून त्याला विद्ध केलें.

त्या वेळीं त्यानें शेंकडों व हजारों शरीरें धारण केलीं. परंतु त्या सर्वांस मीं शरांनीं ताडन केलें. हे भारता, पुनः तीं सर्व शरीरें एकरूप झालीं. त्यांवर मीं पुनरपि प्रहार केला. हे राजन्, त्या वेळीं तें अलौकिक भूत एकदा आपलें शरीर सूक्ष्म व मस्तक विशाल करून आणि पुनः शरीर प्रचंड व मस्तक अणु करून संग्रामांत माझ्या समीप आलें.

हे भरतश्रेष्ठा, रणामध्यें मी जेव्हां त्या भूताचा बाणांनीं पराभव करूं शकलों नाहीं, तेव्हां मीं वायव्य महास्त्र अभिमंत्रवून सोडिलें. परंतु काय चमत्कार सांगावा! तें अस्त्रहि त्याचा नाश करण्यास समर्थ झालें नाहीं. तें दिव्य अस्त्र विफल झालेलें पाहून मला अतिशय विस्मय वाटला.

त्यानंतर हे महाराज, मीं त्या तुमुल रणसंग्रामांत त्या भूतावर सर्व अस्त्रांचा प्रयोग केला. स्थूणाकर्ण हें ज्याचें दैवत आहे, तें रौद्रास्त्र, जलमय वारुणास्त्र, शलभास्त्र व अश्मवर्ष, हीं अस्त्रें सोडून मी त्याच्यावर चाल करून गेलों. परंतु हे राजा, त्यानें माझीं सर्व अस्त्रें भक्षण करून टाकिलीं. तेव्हां मीं महा ब्रह्मा-स्त्राचा प्रयोग करून सर्व बाजूंनीं त्याच्यावर प्रज्वलित बाणांचा वर्षाव केला. परंतु त्याच्यावर शरवृष्टि होतांच त्याचें शरीर वाढत गेलें. मीं सोडलेल्या त्या महा-अस्त्राच्या तेजानें त्रैलोक्य संतप्त झालें. एका क्षणांत सर्व दिशा आणि अंत-रिक्ष प्रज्वलित झालीं. पण त्याहि अस्त्राचा प्रभाव त्यानें क्षणांत क्षीण करून टाकिला.

याप्रमाणें ब्रह्मास्त्राचाहि पराभव झाला असतां मी मनांत भयभीत झालों आणि धनुष्य घेऊन अक्षय्य भात्यांतून त्यांवर पुनः शरवृष्टि केली. परंतु त्यानें ते सर्व शर भक्षण करून टाकिले. अशाप्रकारें त्या महाभूतानें माझीं सर्व अस्त्रें कुंठित करून आयुधें भक्षण केलीं असतां आम्ही दोघे बाहुयुद्धास प्रवृत्त

झालों. त्या द्वंद्वयुद्धांतहि मुष्टिप्रहार, करतलाचे आघात इत्यादि अनेक उपायांनींहि मीं त्या महाभूताचा पराभव करण्यास असमर्थ झालों व शेवटीं निश्चेष्ट होऊन भूमीवर पडलों.

त्या वेळीं तें अद्भुतोपम भूत मोठ्यानें हंसून स्त्रियांसह माझ्या समक्ष तेथेंच अंतर्धान पावलें. हे महाराज, त्या भगवामानें याप्रमाणें अद्भुत कर्म केल्यावर दुसरें रूप धारण केलें. त्यानें किरातरूप टाकून अप्रतिम वस्त्र परिधान केलें आणि तो भगवान् महेश्वर दिव्य स्वरूप धारण करून माझ्या पुढें प्रकट झाला. तो साक्षात् वृषभध्वज महादेव सर्पादि भूषणांनीं युक्त होऊन उमादेवीसह माझ्या दृष्टीं पडला. तो पिनाकपाणि रणांगणांत माझ्या समीप येऊन संमुख उभा राहिला आणि म्हणाला—" हे परंतपा, मी तुजवर प्रसन्न झालों आहें. "

राजा युधिष्ठिरा, असें बोलून त्या शूलपाणीनें माझें धनुष्य व दोन अक्षय्य भाते मला परत देऊन पुनः म्हटलें—" हे कौंतेया, मी प्रसन्न झालों आहें. तुझें कोणतें प्रिय करूं तें सांग. तुझे जेवढे मनोरथ असतील तेवढे सर्व मी पूर्ण करीन. यास्तव एका अमरत्वावांचून तुला इष्ट असलेले सर्व वर मागून घे. "

हे राजन्, महेश्वराचें हें वचन ऐकून मीं हात जोडून त्या देवाधिदेवाला प्रणाम केला आणि माझें सर्व चित्त अस्त्राकडेच लागलेलें असल्यामुळें मी म्हणालों—" भगवान् जर मजवर प्रसन्न झाले असतील तर त्यांनीं मला इष्ट असलेला हा वर द्यावा. सर्व देवतांचीं जेवढीं अस्त्रें आहेत, तेवढीं सर्व मला प्राप्त व्हावीं. "

यावर भगवान् त्र्यंबकानें ' तथास्तु ' असें बोलून ' हे पांडवा, माझें रौद्रास्त्र तुझ्या सेवेंत सर्वदा तत्पर राहील ' असेंहि म्हटलें व मोठ्या प्रेमानें आपलें महत् पाशुपत अस्त्र मला दिलें. तें सनातन अस्त्र मला देतेवेळीं महादेव म्हणाला—" हे पार्था, या अस्त्राचा प्रयोग तूं मनुष्यावर केव्हांहि करूं नको. अल्प तेज असलेल्या प्राण्यांवर तें पडलें असतां तें सर्व सृष्टीला दग्ध करून टाकील. हे धनंजया, तुला शत्रूकडून अतिशयच पीडा होऊं लागली तरच तूं या अस्त्राचा प्रयोग कर. इतर अस्त्रें कुंठित झालीं असतां या अस्त्राचा सर्वथा प्रयोग करावा."

वृषध्वज उमापति प्रसन्न झाला असतां तें दिव्य अस्त्र मूर्तिमंत माझ्या समीप स्थित झालें. तें अस्त्र शत्रूंचा विध्वंस करणारें, अरिसेनेचा नाश करणारें,

सुर-दानव-राक्षस यांना दुःसह व दुरासद होतें. नंतर शंकराच्या अनुज्ञेनें मी तेथेंच बसलों आणि माझ्या समक्ष महादेव अंतर्धान पावला. ३. १०. १६७.

---

## अध्याय १६८ वा.

[ १ अर्जुनाला इंद्रादि लोकपालांचें दर्शन. २ त्याचें इंद्ररथांतून स्वर्गलोकीं गमन. ३ सर्वास्त्रप्राप्ति. ४ इंद्रानें गुरुदक्षिणार्थ निवातकवचवधाची केलेली आज्ञा. ५ देवदत्त शंखाची प्राप्ति. ]

( १ ) अर्जुन—हे अजातशत्रो धर्मराजा, त्यानंतर मीं देवाधिदेव महात्म्या त्र्यंबकाच्या प्रसादानें संतुष्ट होऊन ती रात्र तेथेंच घालविली. दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं मी आह्निक करीत आहें, इतक्यांत तो पूर्वीचाच द्विजश्रेष्ठ माझ्या दृष्टीं पडला. तेव्हां महादेवाच्या समागमापासून दिव्य पाशुपतास्त्राच्या प्राप्ती-पर्यंत घडलेला सर्व वृत्तान्त मीं त्याला निवेदन केला.

तो ऐकून संतुष्ट झालेला ब्राह्मण मला म्हणाला—हे अनघा, पूर्वी दुसऱ्या कोणालाहि न घडलेलें हें महादेवाचें अपूर्व दर्शन तुला लाभलें आहे. आतां सर्व लोकपाल व वैवस्वत यम यांसह साक्षात् देवेंद्र तुला दर्शन देऊन सर्व अस्त्रें अर्पण करील.

हे राजन्, असें बोलून तो आदित्यासारखा तेजस्वी ब्राह्मण मला पुनः पुनः आलिंगन देऊन आपल्या इष्ट प्रदेशीं निघून गेला. त्यानंतर अपराह्णकालीं जणुकाय या लोकाला नवजीवन देत सुखकर वायु वाहूं लागला. त्या हिमालय पर्वताच्या पायथ्याशीं सुगंधयुक्त ताजीं दिव्य पुष्पें प्रादुर्भूत झालीं.

सर्व बाजूंनीं दिव्य वाद्यांचा ध्वनि होऊं लागला. इंद्राचें श्रुतिमनोहर स्तवन ऐकूं येऊं लागलें. गंधर्व व अप्सरा यांचे गण देवाधिदेव इंद्राच्या अग्रभागीं सर्वप्रकारचीं गीतें गात होते, इतक्यांत देवेंद्राला अनुसरणाऱ्या व त्याच्या सदनांत वास करणाऱ्या देवतांचे समुदाय विमानांत बसून तेथें आले. नंतर सर्व देवांनीं परिवेष्टित असलेला शतक्रतु शचीसह वेगवान् अश्वांनीं युक्त व अलंकृत केलेल्या वाहनांतून तेथें प्राप्त झाला.

हे महाराज, त्याच वेळीं आपल्या परम ऐश्वर्यानें शोभणारा नरवाहन कुबेरहि माझ्या दृष्टीं पडला. दक्षिण दिशेत स्थित असलेला यम आणि पश्चिमेंत अव-स्थित असलेला देवराज वरुण, यांनाहि मीं पाहिलें. ते सर्व देव माझें सान्त्वन

करून म्हणाले—"हे सव्यसाचिन्, तुझ्या समीप स्थित असलेल्या आम्हां लोकपालांना पहा. हे वीरा, तुला देवकार्यांच्या सिद्धीसाठीं शंकराचें दर्शन झालें. आतां तूं आम्हां सर्वांकडून हीं अस्त्रें सर्वतः ग्रहण कर."

तेव्हां मीं त्या सर्व सुरश्रेष्ठांना नम्रपणें प्रणिपात केला आणि त्या महदस्त्रांचें विधियुक्त ग्रहण केलें. मीं अस्त्रग्रहण केल्यानंतर ते सर्व देव मला अनुज्ञा देऊन आल्या मार्गानें निघून गेले.

भगवान् देवेंद्रहि आपल्या देदीप्यमान रथावर आरूढ होऊन मला म्हणाला—"हे फाल्गुना, तुला आतां स्वर्गलोकीं यावयाचें आहे. तूं येथें येण्याच्या पूर्वीपासूनच मी तुला जाणतों. हे धनंजया, मी तुला पुनः दर्शन देईन. तूं पूर्वीं पवित्र तीर्थांमध्यें अनेकदां स्नानें केलीं आहेस. त्याचप्रमाणें हें तीव्र तपहि आचरिलें आहेस. त्याच्या प्रभावानें तूं स्वर्गलोकीं जाशील. तूं पुनः उग्र तपश्चर्या कर. हे शत्रुतापना, तुला स्वर्गलोकीं अवश्य गेलें पाहिजे. माझ्या आज्ञेवरून मातलि तुला स्वर्गांत घेऊन येईल. देव आणि महात्मे मुनि यांनाहि तूं येथें आल्याचें माहित आहे."

इंद्राचें हें वचन ऐकून मी म्हणालों—हे भगवन्, मजवर प्रसन्न हो. हे सुरेश्वरा, मी तुला अस्त्रप्राप्तीसाठीं गुरु करितों.

इंद्र—हे परंतपा, तूं अस्त्रवेत्ता झालास म्हणजे क्रूर कर्मे करूं लागशील. यास्तव तूं ज्या इष्ट कार्यासाठीं अस्त्रांची इच्छा करीत आहेस तें तुझें कार्य अस्त्रावांचूनच माझ्या प्रसादानें सिद्ध होईल. मग तुला अस्त्रेंच कशाला पाहिजेत.

त्यावर मीं म्हटलें—हे सुरश्रेष्ठा, माझ्या इतर अस्त्रांचा प्रतिघात झाल्यावांचून मी मानवांवर या दिव्य अस्त्रांचा केव्हांहि प्रयोग करणार नाहीं. यास्तव हे देवाधिदेवा, तूं मला आपलीं सर्व दिव्य अस्त्रें दे. म्हणजे अस्त्रानें जिंकतां येणारे लोक मला प्राप्त होतील.

इंद्र—धनंजया, तुझी परीक्षा पहाण्यासाठींच मीं तसें म्हटलें. खरोखर तुझें हें भाषण माझ्या पुत्राला शोभण्यासारखेंच आहे. हे भारता, आतां माझ्या भवनांत गेल्यावर वायु, अग्नि, वसु, वरुण, मरुद्गण, साध्य, पितामह, गंधर्व, नाग, राक्षस, यांच्यापासून सर्व अस्त्रें तूं प्राप्त करून घे. त्याचप्रमाणें वैष्णव व नैर्ऋत्य हीं अस्त्रेंहि मजपाशीं आहेत, तींहि तूं संपादन कर.

( २ ) राजा, मला असें सांगून तो पूर्व दिशेचा स्वामी शक्र तेथेंच अंतर्धान पावला. त्यानंतर मातलि ज्यांचें नियमन करीत आहे, अशा हरितवर्ण अश्वांनीं युक्त असलेला दिव्य, अतिशय अद्भुत व पुण्यप्रद इंद्ररथ माझ्यापुढें उपस्थित झाला.

लोकपाल निघून गेले असतां मातलि मला म्हणाला—" हे महाबाहो, देवराज इंद्र तुला भेटण्याची इच्छा करीत आहे. यास्तव आपलें सर्व कार्य उरकून सिद्ध हो. हे पुण्यवानांचे लोक पहा. हे महाभागा, तूं सशरीर स्वर्गलोकीं चल. सहस्राक्ष देवराज तुला पहाण्याची इच्छा करीत आहे.

मातलीचें हें वचन ऐकतांच मीं हिमालयपर्वताचा निरोप घेतला. त्या गिरिश्रेष्ठाला प्रदक्षिणा घातली आणि त्या उत्कृष्ट रथावर आरूढ झालों. तेव्हां अश्वविद्याविशारद मातलीनें मन व वायु यांप्रमाणें वेगवान् असलेल्या अश्वांना प्रेरणा केली.

तो उदार सारथि रथ वेगानें चालला असतां रथांत बसलेल्या माझें मुखावलोकन करीत विस्मयानें मला म्हणाला—"हे वीरा, तुझी ही वृत्ति मला आज अतिशय अद्भुत व विचित्र भासत आहे. हा रथ चालत असतांनाहि तूं आपल्या स्थानापासून मुळींच चलित होत नाहींस. तुझें आसन दृढ आहे. हे भरतश्रेष्ठा, अश्वांना प्रथम चालना देतांच साक्षात् देवराजहि आपल्या स्थानापासून किंचित् च्युत होत असलेला मी नित्य पहातों. परंतु हे कुरुश्रेष्ठा, तूं मात्र रथ चालत असतांहि आपल्या स्थानापासून ढळला नाहींस. खरोखर, तूं इंद्राचेंहि अतिक्रमण केलें आहेस, असें मला भासतें."

राजा, इतकें बोलून मातलीनें अंतरिक्षांत प्रवेश करून मला देवांचीं भुवनें आणि विमानें दाखविलीं. त्यानंतर अश्वांनीं युक्त असलेला तो रथ ऊर्ध्व मार्गानें जाऊं लागला. तेव्हां देवता आणि ऋषि यांनीं माझा सत्कार केला. तेथें इच्छेप्रमाणें गमन करणाऱ्या देवर्षींचा समुदाय व अमिततेजस्वी गंधर्व-अप्सरांचे संघ मीं पाहिले. इंद्रसारथि मातलीनें मला नंदनवन व देवांचीं उपवनें दाखविलीं.

त्यानंतर इंद्राची अमरावती नगरी माझ्या दृष्टीं पडली. हे नृपश्रेष्ठा, ती नगरी दिव्य कल्पवृक्ष आणि रत्नें यांनीं अलंकृत होती. तेथें सूर्य तापत नाहीं, शीतोष्ण बाधत नाहीं व कधीं आळस येत नाहीं. त्याचप्रमाणें रजोगुण, जरा, शोक,

दैन्य, दौर्बल्य यांचें दर्शनहि होत नाहीं. तेथील देवांना ग्लानि, क्रोध, लोभ, यांचा कधीं स्पर्शहि होत नाहीं. त्या देवसदनांत सर्व प्राणी नित्य तृप्त असतात. त्या इंद्रलोकांतील वृक्ष सर्वदा गाढ छायेनें युक्त व फल-पुष्पांनीं समृद्ध असतात. तेथील पुष्करणी विविध सौगंधिक कमलांनीं व्याप्त असतात. तेथें नवजीवन देणारा पवित्र व सुगंधयुक्त शीतल वायु वहात असतो. तेथील भूमि विचित्र रत्नें व विविध पुष्पें यांनीं विभूषित असते. त्या देवलोकांतील अनेक दर्शनीय मृग आणि पक्षी मनोहर व मधुर स्वर करीत असतात. त्याचप्रमाणें अंतरिक्षांतून असंख्य वैमानिक संचार करितात.

हे धर्मराजा, तेथें मीं अष्टावसु, रुद्र, मरुद्गणांसह साध्य, आदित्य व अश्विनिकुमार यांस पाहिलें व त्या सर्वांचें पूजन केलें. तेव्हां त्या सर्वांनीं मला 'तूं वीर्य, यश, तेज व बल यांनीं युक्त, अस्त्रसंपन्न व संग्रामांत विजयी हो' असा आशीर्वाद दिला.

त्यानंतर देव-गंधर्वांना पूज्य असलेल्या त्या दिव्य नगरींत प्रवेश करून मी सहस्राक्ष देवराजाच्या समीप हात जोडून उभा राहिलों. तेव्हां वरद वासवानें मला मोठ्या प्रेमानें आपल्या अर्ध्या आसनावर बसविलें आणि माझा बहुमान करून माझ्या अंगावरून हात फिरविला.

( ३ ) हे भरतश्रेष्ठा, त्या इंद्रभुवनामध्यें मीं अतिशय दक्ष असलेल्या देवगंधर्वांपासून अस्त्रविद्येचें शिक्षण घेत वास केला. त्यानंतर विश्वावसु गंधर्वाचा पुत्र चित्रसेन माझा सखा झाला व त्यानें मला समग्र गंधर्वविद्या शिकविली. राजा, मीं कृतास्त्र होऊन त्या शक्रसदनांत मोठ्या सन्मानानें वास्तव्य केलें. तेथें माझ्या सर्व कामना पूर्ण होत असत. गीतांचा शब्द व वाद्यांचा विपुल ध्वनि श्रवण करीत आणि श्रेष्ठ अप्सरांचें नृत्य अवलोकन करीत मी सुखानें कालक्षेप करीत होतों.

तथापि हे कुरुश्रेष्ठा, त्या सर्व दिव्य विषयांकडे दुर्लक्ष करून व ' खरा पुरुषार्थ कोणता ' हें जाणून मी आसक्तिरहित झालों आणि आपलें सर्व लक्ष केवल अस्त्रविद्येकडेच लाविलें. आपल्या मनाला गीतादिकांत आसक्त होऊं दिलें नाहीं. तेव्हां मला भोगेच्छा नसून केवल अस्त्रविद्येचीच कामना आहे, हें पाहून सहस्राक्ष संतुष्ट झाला. हे राजन्, स्वर्गलोकीं रहात असतां अशाप्रकारें माझा काल गेला.

तेव्हां कृतास्त्र झालेला मी अतिशय विश्वासार्ह आहें, असें जाणून इंद्रानें आपल्या दोन्ही हातांनीं माझ्या मस्तकाला स्पर्श केला व मोठ्या संतोषानें म्हटलें—"हे वीरा, आतां देवहि तुला युद्धामध्यें जिंकू शकणार नाहींत. मग अस्त्रविद्याशून्य मानवांची काय कथा! तूं आतां दुर्धर, अजिंक्य व अप्रतिम योद्धा झाला आहेस. अस्त्रविद्येंत तुझ्यासारखा दुसरा वीर होणार नाहीं. हे कुरुश्रेष्ठा, तूं अप्रमत्त, सर्वदा दक्ष, सत्यवादी, जितेंद्रिय, ब्राह्मणभक्त, अस्त्रवेत्ता आणि शूर आहेस.

हे पार्था, तूं पंधरा प्रकारचीं अस्त्रें संपादन केलीं आहेस. अस्त्रांचे पांच प्रकारचे प्रयोग जाणणारा तुझ्यासारखा अन्य कोणीहि नाहीं. हे धनंजया, अस्त्रांचा प्रयोग व उपसंहार, त्यांची पुनः पुनः आवृत्ति, अस्त्राग्नीनें दग्ध होऊन गतप्राण झालेल्यांचें पुनरुज्जीवन, दुसऱ्यांच्या अस्त्रानें पराभव झाला असतां स्वतःच्या अस्त्रांचें उद्दीपन, या सर्व विद्या तुला उत्तमप्रकारें ज्ञात झाल्या आहेत. यास्तव हे परंतपा, आतां गुरुदक्षिणेचा काल प्राप्त झाला आहे. तेव्हां तें कार्य करण्याची तूं प्रतिज्ञा कर. म्हणजे मी तुला दुसरें मोठें देवकार्य निवेदन करीन."

हे राजन्, देवेंद्राचें हें वचन ऐकून मी म्हणालों—हे प्रभो, मला जें कार्य करतां येणें शक्य असेल, तें मीं केलेंच आहे, असें समज व आपलें इष्टकार्य मला सांग.

तें ऐकून वृत्रासुराचा वध करणारा पुरंदर हंसून म्हणाला—"हे धनुर्धरा, या त्रैलोक्यामध्यें तुला अशक्य असें कांहींच नाहीं. यास्तव माझें कार्य मी तुला सांगतों, तें ऐक. 'निवातकवच'-नांवानें प्रसिद्ध असलेले दानव माझे शत्रु आहेत. ते समुद्राचा आश्रय करून त्यांतील दुर्गम प्रदेशीं रहात असतात. ते सर्व रूप, बल व प्रभाव यांनीं तुल्य असून त्यांची संख्या तीन कोटी आहे. हे कौंतेया, तेथें जाऊन तूं त्या सर्वांचा नाश कर. म्हणजे तूं योग्य गुरुदक्षिणा दिलीस असें मी समजेन."

असें बोलून त्या शचीपतीनें आपला दिव्य रथ मला दिला. त्या देदीप्यमान रथाला मयूरपिच्छांसारख्या केसांनीं युक्त असलेले अश्व जोडले असून मातलि त्यांचें नियमन करीत होता. त्या प्रसंगीं देवेश्वरानें माझ्या मस्तकावर मूल्यवान् किरीट बांधला. स्वतःसारखींच भूषणें दिलीं आणि स्पर्श करण्यास मृदु व दर्शनीय असें अभेद्य कवच अर्पण केलें. ही अक्षय्य प्रत्यंचा माझ्या

गांडीव धनुष्यास जोडली आणि त्याची अनुज्ञा मिळतांच मी त्या रथावर आरूढ होऊन निघालों. पूर्वी याच रथांतून इंद्रानें वैरोचन बलीचा पराजय केला होता.

त्या वेळीं सर्व देवांनीं त्या इंद्ररथाचा घोष ओळखला आणि मला देवराजच समजून ते सर्व माझ्या समीप आले व मला पाहून म्हणाले—" हे फाल्गुना, तूं हें काय करीत आहेस !"

तेव्हां मीं त्यांस सर्व यथार्थ वृत्त निवेदन करून म्हटलें—" संग्रामांत निवातकवचांचा वध करण्याच्या इच्छेनें मी चाललों आहें. यास्तव मला कल्याणप्रद आशीर्वाद द्या."

( ५ ) तेव्हां त्या सर्व देवांनीं प्रसन्न होऊन पुरंदराप्रमाणें माझी स्तुति केली. ते म्हणाले—" या रथावर आरूढ होऊन त्या वृत्रशत्रु इंद्रानें युद्धामध्यें शंबरासुर, नमुचि, बलि, वृत्र, प्रह्लाद, नरकासुर व अशाच आणखीहि असंख्य दैत्यांचा पराजय केला. यास्तव जितेंद्रिय शक्रानें पूर्वी मिळविलेल्या विजयाप्रमाणेंच तूंहि या रथानें निवातकवचांना रणांत जिंकशील.

त्याचप्रमाणें हे कौंतेया, हा उत्कृष्ट शंख घे. याच्या योगानें तूं दानवांना जिंकण्यास समर्थ होशील. महात्म्या देवेंद्रानेंहि याच्याच योगानें त्रैलोक्य जिंकून घेतलें."

राजा, इतकें बोलून त्या सर्व देवांनीं जलांतून उत्पन्न झालेला हा श्रेष्ठ 'देवदत्त'-नामक शंख मला अर्पण केला. तेव्हां सर्व अमर स्तुति करीत असतां जयप्राप्तीसाठीं मीं त्या शंखाचा स्वीकार केला. याप्रमाणें शंख, कवच, बाण, भाते इत्यादि सर्व उत्कृष्ट आयुधांनीं सज्ज होऊन मीं युद्धाच्या इच्छेनें त्या दानवालय समुद्राकडे प्रयाण केलें. ३. १०. १६८.

---

## अध्याय १६९ वा.

[ १ अर्जुनाचें समुद्रापाशीं गमन, समुद्राचें वर्णन. २ युद्धारंभ. ]

( १ ) अर्जुन—हे धर्मराजा, त्यानंतर महर्षींकडून ठिकठिकाणीं स्तुति केला जाणारा मीं पुढें गेलों व तेथें अव्यय आणि अगाध असा समुद्र पाहिला. त्याच्या परस्परांवर आपटणाऱ्या फेनयुक्त विस्तीर्ण लाटा भयंकर शब्द करीत पर्वताप्रमाणें उंच दिसत होत्या. त्या सागरांत सहस्रावधि रत्नयुक्त नौका इत-

स्ततः फिरत होत्या. तिमि-नामक मत्स्यांना गिळणारे महा मत्स्य व त्यांनाहि गिळणारे दुसरे प्रचंड मत्स्य, कासव आणि नक्र जलमग्न पर्वताप्रमाणेंच दिसत होते.

जलानें आच्छादित झालेले हजारों शंख रात्रीं चमकणाऱ्या अभ्राच्छादित तारकांप्रमाणें सर्वत्र भासत होते. असंख्य रत्नसमुदाय त्या समुद्रावर तरंगत असून भयंकर वायु वेगानें वहात होता. खरोखर तें एक मोठें आश्चर्यच होतें.

तो वेगानें वहाणारा भीषण जलनिधि पाहिल्यावर त्याच्या समीपच दानवांनीं व्याप्त असलेलें दैत्यनगर माझ्या दृष्टीं पडलें. तेव्हां मातलि मोठ्या त्वरेनें रथासह भूमीवर उतरला व उतरणीवरून जाणारीं रथचक्रें दृढ करून त्यानें रथ चालविला.

तो रथसंचारविशारद मातलि रथध्वनीच्या योगानें शत्रूंना त्रस्त करीत वेगानें दैत्यनगरीवर चालून गेला. तेव्हां आकाशांतील मेघध्वनीप्रमाणें होणारा तो रथघोष ऐकून मलाच देवराज इंद्र समजणारे ते सर्व दानव उद्विग्न झाले. त्यांनीं भ्रांत चित्तानें धनुष्य, बाण, खड्ग, शूल, परशु इत्यादि आयुधें धारण केलीं व भयभीत होऊन नगराच्या संरक्षणासाठीं नगरद्वारें बंद केलीं. त्यामुळें नगराबाहेर एकहि दानव दृष्टीं पडला नाहीं.

त्या वेळीं मीं प्रचंड ध्वनि करणारा देवदत्त शंख घेऊन मोठ्या हर्षानें हळुहळू वाजविला. तेव्हां तो शब्द आकाशांत जाऊन पोंचला व त्याचा प्रतिध्वनि उमटला. तो ऐकून सर्व मोठ-मोठे प्राणीहि त्रस्त होऊन लपून बसले.

त्यानंतर ते सर्व निवातकवच उत्तम अलंकारांनीं भूषित होऊन व विविध आयुधें आणि विचित्र कवचें धारण करून सज्ज झाले. लोखंडी महा शूल, गदा, मुसळें, खड्ग, रथचक्रें, शतघ्नी, भुशुंडी इत्यादि नानाप्रकारचीं आयुधें घेऊन सहस्रावधि दानव तेथें प्रकट झाले.

हे भरतश्रेष्ठा, त्या वेळीं मातलीनें सर्वप्रकारें विचार करून रथमार्गानें सपाट प्रदेशाकडे अश्व वळविले. त्यानें त्या शीघ्रगामी अश्वांना जेव्हां प्रेरणा केली तेव्हां त्यांच्या वेगामुळें मी तेथें केव्हां पोंचलों, हें मला कांहींच कळलें नाहीं. खरोखरच तें एक आश्चर्यच घडलें.

( २ ) त्यानंतर त्या असंख्य दानवांनीं विकृत आकारांचीं व भीषण ध्वनि करणारीं आपलीं सर्व वाद्यें एकसारखीं वाजविलीं; तो प्रचंड घोष ऐकून लक्षावधि

पर्वतप्राय महा मत्स्य अकस्मात् भ्रांत होऊन इतस्ततः पळूं लागले. इतक्यांत ते सर्व दैत्य वेगानें मजवर धांवून आले आणि त्या दानवांनीं मजवर हजारों तीक्ष्ण बाणांची वृष्टि केली.

त्या वेळीं हे भरतश्रेष्ठा, त्या दानवांचें व माझें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. तें निवातकवचांचा नाश करणारें होतें. त्या घोर संग्रामांत देवर्षि, दानव, ऋषि-समुदाय, ब्रह्मर्षि व सिद्धहि आले होते. पूर्वीं तारेसाठीं झालेल्या संग्रामांत त्यांनीं जशी इंद्राची स्तुति केली होती, त्याचप्रमाणें माझ्या जयप्राप्तीची इच्छा करणाऱ्या त्या मुनींनीं मधुर व अनुरूप अशा वाणीनें माझेंहि स्तवन केलें. ३. १०. १६९

---

## अध्याय १७० वा.

[ १ अर्जुनाचें निवातकवचांशीं शस्त्रयुद्ध. ]

( १ ) अर्जुन—धर्मराजा, त्यानंतर त्या रणांगणांत सर्व निवातकवच एकत्र जमून आयुधें धारण करून मोठ्या वेगानें माझ्यावर धांवून आले. त्यांनीं मोठ्यानें गर्जना करून माझा रथमार्ग अडवून धरिला व मला शरवृष्टीनें आच्छादून टाकिलें. दुसऱ्या शूल व पट्टे धारण करणाऱ्या वीर्यवान् दानवांनीं मजवर शूल व भुशुंडी फेंकल्या. सतत फेंकलेल्या गदा, शक्ति व शूल यांचा माझ्या रथावर फार मोठा वर्षाव होऊं लागला.

दुसरे कित्येक कालरूपी, भयंकर, शत्रूवर प्रहार करणारे व शस्त्राघात सहन करणारे निवातकवच मजवर चाल करून आले. तेव्हां मीं गांडीव धनुष्या-पासून सरळ व वेगवान् विविध बाण सोडून त्यांतील एकेकाला दहा दहा शरांनीं विद्ध केलें. मीं सोडलेल्या त्या तीक्ष्ण बाणांनीं ते दानव पराङ्मुख झाले असतां मातलीनें अश्व वेगानें चालविले. त्यामुळें त्या देवसारथ्यानें उत्तमप्रकारें संयत केलेले व विचित्र मार्गांनीं चालविलेले ते अश्व वायुवेगानें संचार करीत दानवांचा विध्वंस करूं लागले.

हे पृथ्वीपते, इंद्राच्या त्या महारथाला दहा हजार अश्व जरी जोडले होते तरी मातलीच्या नैपुण्यामुळें अल्प अश्वांप्रमाणें ते संथपणें चालले होते. त्या अश्वांच्या पदाघातानें, रथचक्रांच्या घोषानें व माझ्या बाणवृष्टीनें शेंकडों असु-रांचा संहार झाला. कित्येक हातीं धनुष्य घेतलेले दानव गतप्राण होऊन रथां-

तच पडले. त्याचप्रमाणें त्यांचे सारथीहि मृत झाल्यामुळें, त्यांचे अनियंत्रित अश्व त्या रथांना यथेष्ट ओढीत चालले होते.

राजेंद्रा, नंतर त्या दानवांनीं सर्व दिशा व विदिशा यांचा निरोध करून मजवर विविध शस्त्रांचे प्रहार केले. तेव्हां माझें मन व्यथित झालें. परंतु त्या वेळीं मला मातलीचें परम अद्भुत कौशल्य व सामर्थ्य दिसून आलें. हे राजा, ते अश्व जरी अतिशय वेगवान् होते, तरी मातलि त्यांचें सहज नियमन करीत होता.

पुढें मीं शीघ्रगामी व विचित्र अस्त्रें सोडून असंख्य असुरांचा त्यांच्या आयुधांसह छेद केला. याप्रमाणें मी सर्व प्रकारच्या यत्नानें त्या युद्धांत संचार करीत आहें असें पाहून इंद्रसारथि मातलि संतुष्ट झाला. त्या युद्धामध्यें अश्व व रथ यांच्या आघातांनींच अनेक दैत्यांचा नाश झाला व कांहीं दानव परत फिरले. त्यानंतर रणामध्यें जणुंकाय आमच्याशीं स्पर्धा करणारे कित्येक निवातकवच पुढें आले व मी बाणांनीं आर्त झालों आहें, असें पाहून मजवर प्रचंड शरवृष्टि करूं लागले.

त्या वेळीं हे भारता, मीं वेगवान् ब्रह्मास्त्राचें अभिमंत्रण करून विचित्र शर सोडिले व सहस्रावधि दैत्यांना विद्ध केलें. तेव्हां बाणांनीं पीडल्यामुळें क्रुद्ध झालेले ते महारथ एकत्र जमून शक्ति-शूलांच्या वर्षावानें मला पीडा देऊं लागले. तें पाहून मी इंद्राला प्रिय असलेलें, प्रखर तेजस्वी व मधुदैत्याच्या वधार्थ निर्मिलेलें 'माधव'-नामक अस्त्र अभिमंत्रवून सोडिलें. त्या माधवास्त्रापासून उत्पन्न झालेल्या खड्गयुक्त त्रिशूलांनीं दैत्यांच्या अगणित तोमरांचे तुकडे उडविले. याप्रमाणें त्या दानवांचीं आयुधें तोडून टाकल्यावर मीं क्रुद्ध होऊन प्रत्येकावर दहा दहा शर सोडून त्यांस विद्ध केलें.

हे महाराज, त्या युद्धामध्यें गांडीव धनुष्यापासून भ्रमरांच्या पंक्तीप्रमाणें मोठाले बाण सुटत होते. तें पाहून मातलीनें माझा सत्कार केला. उलट त्या दानवांचेहि तसेच असंख्य शर मजवर येत होते. परंतु मी त्या सर्वांचा बाणांनीं छेद करीत होतों. त्याचीहि मातलीनें प्रशंसा केली.

मी पुनरपि निवातकवचांचा संहार करीत आहें, असें पाहून त्या दैत्यांनीं मला शरवृष्टीनें सर्व बाजूंनीं व्यापून टाकिलें. त्या वेळीं अस्त्रांचा प्रतिघात करणाऱ्या, प्रज्वलित, शीघ्र व परम अस्त्रांनीं मीं त्यांच्या बाणांचा वेग कुंठित

केला आणि दानवांना विद्ध केलें. तेव्हां त्या असुरांचीं सर्व गात्रें छिन्न-विच्छिन्न झाल्यामुळें, वर्षाकाळीं पर्वतावरून वहाणाऱ्या जलप्रवाहांप्रमाणें त्यांच्या शरीरांतून रक्ताच्या धारा वाहूं लागल्या. ज्यांचा स्पर्श इंद्राच्या वज्रासारखा आहे अशा वेगवान् व सरळ गमन करणाऱ्या माझ्या बाणांनीं वध पावणारे ते सर्व दानव उद्विग्न झाले. त्या वेळीं त्यांचीं सर्व आयुधें व सामर्थ्य क्षीण झालें होतें व देह शतधा छिन्न-भिन्न झाले होते. त्यामुळें निवातकवचांनीं माझ्याशीं मायावी युद्ध आरंभिलें. ३. १०. १७०.

---

## अध्याय १७१ वा.

[ १ निवातकवचांच्या मायावी युद्धाचा वृत्तान्त. ]

( १ )अर्जुन—हे धर्मराजा, त्यानंतर मजवर सर्व बाजूंनीं पाषाणवृष्टि होऊं लागली. त्या वृक्षाकार शिलांनीं मला अतिशय पीडा दिली. तेव्हां मीं वज्रतुल्य महेंद्रास्त्राचा प्रयोग करून त्या महायुद्धांत वेगवान् शरजालांनीं त्या पाषाणांचें चूर्ण करून टाकिलें. परंतु पाषाणांचें चूर्ण होत असतां त्यापासून अग्नि उत्पन्न झाला व पाषाणांचें उडणारें चूर्ण अग्नीच्या राशीप्रमाणें दिसूं लागलें.

पण अश्मवृष्टि शांत झाली असतां प्रचंड जलवृष्टि सुरू झाली आणि माझ्या समीप जलधारांचा वर्षाव होऊं लागला. आकाशांतून होणाऱ्या त्या भयंकर जलवृष्टीनें अंतरिक्ष, दिशा व विदिशा व्यापून टाकिल्या. जलधारांचा प्रचंड वर्षाव, सोसाट्याचा वायु व दैत्यांची गर्जना, यांच्या घनघोर ध्वनीमुळें मला कांहींहि कळेनासें झालें. स्वर्ग आणि पृथ्वी यांना जणुं काय संबद्ध करणाऱ्या जलधारा सतत भूमीवर पडत असल्यामुळें माझें चित्त भ्रांत झालें.

तथापि मीं मोठ्या धैर्यानें त्या दानवांवर इंद्रोपदिष्ट ‘ विशोषण ’-नामक दिव्य अस्त्राचा प्रयोग केला. तेव्हां तें घोर व प्रदीप्त अस्त्र प्रकट झालें व त्यानें सर्व जल शोषून टाकिलें. पण मीं अश्मवृष्टीचा नाश व जलवृष्टीचें शोषण केलें असतां त्या दानवांनीं मायावी अग्नि व वायु मजवर सोडिले. तेव्हां मीं सलिलास्त्रानें अग्नीला सर्वशः शांत केलें व ‘ शैल ’-नामक महास्त्रानें वायूचा वेग कुंठित केला.

याप्रमाणें त्या युद्धदुर्मद दानवांची माया मीं प्रतिहत केली असतां त्यांनीं एकाच वेळीं अनेकप्रकारची माया प्रकट केली. त्या वेळीं अग्नि, वायु व पाषाण या घोर अस्त्रांचा भयंकर वर्षाव सुरू झाला. त्यामुळें माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले. ती मायामय वृष्टि मला त्या संग्रामांत पीडा देऊं लागली. इतक्यांत चोहोंकडे घोर अंधकार पसरला. त्या भीषण व घनदाट अंधकारानें सर्व लोकांस व्यापून टाकिलें. त्यामुळें माझ्या रथाचे अश्व विमुख झाले, मातलिहि चांचपडूं लागला आणि त्याच्या हातांतील रज्जु व सुटल्या सुवर्णमय प्रतोद भूमीवर पडला.

तेव्हां तो इंद्रसारथि भयभीत होऊन ' हे पार्था, तूं कोठें आहेस ! ' असें मला पुनः पुनः विचारूं लागला. याप्रमाणें मातलि भ्रांत झाला असतां मीहि भयभीत झालों.

परंतु इतक्यांत भ्रांत झालेला मातलि मला म्हणाला—" हे निष्पाप पार्था, पूर्वीं देव आणि दानव यांचे पुष्कळ घोर संग्राम मीं पाहिले आहेत. अमृतासाठीं झालेलें सुर व असुर यांचें महायुद्ध मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे. शंबरासुराच्या वधप्रसंगींहि जें भयंकर युद्ध झालें तेव्हांहि मींच देवराज इंद्राचें सारथ्य केलें. त्याचप्रमाणें वृत्रासुराच्या वधार्थ झालेल्या दारुण युद्धांतहि इंद्राच्या अश्वांचें नियमन मीच करीत होतों. बलीशीं झालेल्या घोर संग्रामांतहि मीच देवेंद्राचा सारथि होतों. असे महा घोर संग्राम मीं पूर्वीं पाहिलेले आहेत. परंतु हे पांडवा, त्यांतील एकाहि युद्धप्रसंगीं मी असा भ्रांत झालों नव्हतों. खरोखर आज पितामहानें प्रजेचा संहार करण्याचेंच मनांत आणिलें आहे. जगत्संहारावांचून इतर प्रसंगीं असें दारुण युद्ध संभवत नाहीं."

धर्मराजा, मातलीचें तें वचन ऐकून मीं स्वतःच आपल्या मनाला धीर दिला आणि दानवांचें तें भयंकर मायाबल नष्ट करण्याच्या इच्छेनें भयभीत झालेल्या मातलीला म्हणालों—" हे सारथे, भीऊं नको, आतां माझें बाहुबल व गांडीवधनुष्याचा प्रभाव पहा. यांच्या या दारुण मायेचा मी मायावी अस्त्रानेंच नाश करितों. त्याचप्रमाणें हा घोर अंधकारहि नाहींसा करून टाकितों. हे सूता, तूं घाबरूं नको. स्थिर हो."

हे नराधिपा, असें बोलून मीं देवांच्या हितासाठीं सर्व प्राण्यांना मोहित करणारी अस्त्रमाया निर्माण केली. त्या माझ्या मोहनास्त्रानें दानवांच्या

त्या त्या मायेचा नाश होऊं लागला असतां त्या अमित सामर्थ्यवान् असुरांनीं पुनः बहुविध माया उत्पन्न केल्या. त्यामुळें वारंवार प्रकाश होऊं लागला, त्याला पुनः पुनः अंधकार ग्रासूं लागला. एका क्षणांत लोक अदृश्य होऊं लागले व लगेच जलांत बुडून जाऊं लागले.

प्रकाश झाला असतां मातलि अश्वांचा उत्तम प्रकारें निग्रह करून रथाच्या अग्रभागीं स्थित झाला व अंगावर रोमांच आणणाऱ्या त्या संग्रामांत संचार करूं लागला. तेव्हां कांहीं उग्र स्वरूपी निवातकवच मजवर चालून आले. पण मीं त्यांचें छिद्र पाहून त्यांस यमसदनीं पाठविलें. अशा प्रकारचें निवातकवचांचा अंत करणारें तें युद्ध प्रवृत्त झालें असतां दानव मायेनें आवृत झाले. त्यामुळें त्यांचा सर्व समुदाय एकदम माझ्या दृष्टीं पडला नाहीं. ३. १०. १७१

---

## अध्याय १७२ वा.

[१ निवातकवचांचा नाश व अर्जुनाचा दैत्यनगरींत प्रवेश.]

( १ ) अर्जुन—हे भरतश्रेष्ठ धर्मराजा, याप्रमाणें ते दैत्य मायेनें अदृश्य होऊन माझ्याशीं युद्ध करूं लागले असतां मीहि अदृश्य अस्त्रांच्या सामर्थ्यानें त्यांच्याशीं युद्ध केलें. माझ्या गांडीव धनुष्यापासून सुटलेले व अस्त्रमंत्रांनीं यथाविधि अभिमंत्रित केलेले तीक्ष्ण बाण जेथें जेथें ते दानव होते, तेथें जाऊन त्यांचीं मस्तकें छेदूं लागले. तेव्हां युद्धामध्यें दानवांचा वध होत असलेला पाहून अवशिष्ट राहिलेल्या निवातकवचांनीं मायावी युद्ध सोडून आपल्या नगरींत प्रवेश केला.

याप्रमाणें ते दानव पळून गेले असतां सर्व अंधकार नाहींसा होऊन सर्वत्र प्रकाश पडला. तेव्हां मरून पडलेले लक्षावधि दैत्य माझ्या दृष्टीं पडले. त्या रणांगणांत शेंकडों शस्त्रें, असंख्य भूषणें, कवचें आणि असुरांचीं गात्रें यांचें चूर्ण झालेलें दिसत होतें. त्यांनीं सर्व भूमि व्यापली असल्यामुळें माझ्या अश्वांना पुढें जाण्यास एक पाऊलभरहि जागा मिळेना. तेव्हां ते अश्व एकदम उडी मारून रथ अंतरिक्षांतून नेऊं लागले.

त्यानंतर ते अदृश्य निवातकवच केवल आकाशाला आच्छादित करीत मजवर शिलांचा वर्षाव करूं लागले. कांहीं घोर दानवांनीं भूमीच्या अंतर्भागीं राहून माझ्या रथाचीं चक्रें व अश्वांचे पाय धरून ठेविले. याप्रमाणें युद्ध करणाऱ्या माझ्या

रथाची गति कुंठित करून त्या दानवांनीं मला रथासह सर्व बाजूंनीं विद्ध केलें. कांहीं दैत्य मजवर पर्वतांचा वर्षाव करूं लागले. त्यामुळें आम्ही जेथें युद्ध करीत होतों, तेथें त्या पर्वत राशीनें व सतत पडणाऱ्या दुसऱ्याहि पर्वतांच्या योगानें एक गुहाच दिसूं लागली. याप्रमाणें माझे अश्व धरून ठेविल्यामुळें व पर्वतवृष्टीनें आच्छादित झाल्यामुळें मी अतिशय आर्त झालों आहें, हें मातलीच्या लक्षांत आलें.

तेव्हां मी भयभीत झालों आहें, असें जाणून तो श्रेष्ठ सारथि मला म्हणाला –"हे अर्जुना, भीऊं नको. वज्रास्त्राचा प्रयोग कर."

हे नराधिपा, त्याचें हें वाक्य ऐकतांच मीं इंद्राचें आवडतें वज्रास्त्र सोडलें व निश्चल स्थानीं जाऊन गांडीव धनुष्याला अभिमंत्रित केलें आणि त्या भयंकर अस्त्रानें युक्त असलेले वज्रतुल्य लोखंडी तीक्ष्ण शर सोडूं लागलों. तेव्हां वज्रास्त्रानें अभिमंत्रण केलेले ते बाण वज्ररूपी होऊन ती माया व सर्व निवातकवच यांमध्यें वेगानें शिरले. त्या वेळीं वज्रवेगानें प्रतिहत झालेले ते सर्व पर्वतप्राय दानव परस्परांस कवटाळून भूमीवर पडले.

त्या बाणांनीं भूमीच्या अंतर्भागीं राहून माझा रथ व अश्व धरून ठेवणाऱ्या त्या दानवांच्या देहांत प्रवेश करून त्यांसहि यमसदनास पाठविलें.

याप्रमाणें त्या सर्व पर्वतप्राय निवातकवचांचा नाश झाला असतां सर्वत्र पसरलेल्या त्यांच्या विशाल मृत देहांनीं तो प्रदेश जणुंकाय पर्वतांनीं आच्छादित झाल्याप्रमाणें भासूं लागला. पण हे राजन्, त्या वेळीं माझा रथ, अश्व व मातलि यांतील कोणालाहि यत्किंचित्‌हि क्षत झालेलें मला दिसलें नाहीं. हें खरोखर केवढें आश्चर्य आहे!

तेव्हां मातलि हंसून मला म्हणाला—हे अर्जुना, तुझ्यासारखें सामर्थ्य देवतांमध्येंहि दिसत नाहीं. असुरांच्या सर्व समुदायाचा संहार झाल्यामुळें त्यांच्या स्त्रिया शरदृतूंतील हंसाप्रमाणें दैत्यनगरींत आक्रोश करीत आहेत.

त्यानंतर, हे राजा, मीं मातलीसह त्या नगरींत प्रवेश केला. माझ्या रथघोषानें त्या निवातकवचांच्या स्त्रिया भयभीत झाल्या. मयूरासारखे दशसहस्र अश्व व रविवत् उज्ज्वल रथ पाहून त्या स्त्रियांचे समुदाय इतस्ततः पळूं लागले. त्या वेळीं पर्वतावर पडणाऱ्या शिलांच्या ध्वनीप्रमाणें त्या भयत्रस्त झालेल्या स्त्रियांच्या अलंकारांचा नाद होऊं लागला. त्या भयभीत झालेल्या दैत्यस्त्रियांनीं

चित्र-विचित्र बहुविध रत्नांनीं भूषविलेल्या आपल्या सुवर्णमय मंदिरांत प्रवेश केला. तेव्हां तें अद्भुत आकाराचें व देवनगराहूनहि उत्कृष्ट असलेलें दैत्यनगर पाहून मीं मातलीला विचारिलें—" हे सारथे, ही अशाप्रकारची उत्कृष्ट नगरी असतां येथें देव कां वास करीत नाहींत! खरोखरच ही नगरी इंद्रलोकापेक्षांहि श्रेष्ठ आहे, असें मला वाटतें."

मातलि—हे पार्था, पूर्वीं हें नगर आमच्या देवराजाचेंच होतें. पुढें निवातकवचांनीं देवांना येथून घालवून दिलें व तीव्र तप आचरून पितामहाला प्रसन्न करून घेतलें. तेव्हां प्रजापतीनें 'या नगरींत दानवांचाच निवास व युद्धामध्यें देवांपासून अभय' हे दोन वर त्यांना दिले. त्यानंतर शक्रानें भगवान् ब्रह्मदेवाला 'आपल्या हितासाठीं दानवांचा नाश करावा' अशी प्रेरणा केली.

त्यावेळीं स्वयंभू प्रजापतीनें इंद्राला या दानवांचें भवितव्य सांगितलें. तो म्हणाला—" हे परंतपा, तूंच अन्य देहानें त्यांचा वध करशील."

हे अर्जुना, याच कारणानें इंद्रानें या दैत्यांचा वध करण्यासाठीं तुला हीं अलौकिक अस्त्रें दिलीं. हे वीरा, ज्यांचा तूं संहार केलास त्या बलाढ्य दानवांचा वध देवांनाहि करितां येणें शक्य नाहीं. हे भारता, त्यानंतर कांहीं कालानें सांप्रत त्यांचा अंत करणारा तूं येथें प्राप्त झालास आणि त्यांचा नाश केलास. हे पुरुषेंद्रा, दानवांच्या विनाशासाठींच महेंद्रानें या श्रेष्ठ अस्त्रांचें तुजकडून ग्रहण करविलें.

अर्जुन—हे धर्मराजा, याप्रमाणें त्या सर्व दानवांचा संहार करून व त्यांच्या नगरीचें चांगल्याप्रकारें अवलोकन करून मी मातलीसह पुनः देवलोकीं परत गेलों. ९. १०. १७२.

---

## अध्याय १७३ वा.

[ १ पार्थानें मार्गांत पाहिलेल्या हिरण्यपुरीचें वर्णन. २ मातलीनें सांगितलेला तिचा वृत्तान्त. ३ पौलोम व कालकंज दैत्यांशीं युद्ध व त्यांचा वध. ४ अर्जुनाचें इंद्रलोकीं गमन. ५ संतुष्ट झालेल्या इंद्राचा पांडवास आशीर्वाद. ]

( १ ) अर्जुन—हे अजातशत्रो, त्या दैत्यनगरींतून परत येत असतांना मार्गांत एक इच्छागामी दिव्य नगर माझ्या दृष्टीं पडलें. अग्नि व आदित्य,

यांच्यासारखी त्याची प्रभा प्रसरली होती. रत्नमय वृक्षांनीं अलंकृत असलेल्या व पक्ष्यांच्या सुस्वर ध्वनीनें नादित झालेल्या त्या अद्भुत नगरींत पौलोम व कालकंज हे दैत्य हृष्ट चित्तानें रहात होते. तें नगर गोपुरें, बुरुज व चार द्वारें यांनीं युक्त असून शत्रूंना दुर्गम होतें. सर्व रत्नमय फल-पुष्पांनीं सुशोभित असलेलें तें दिव्य नगर प्रेक्षणीय होतें. त्याचप्रमाणें मनोहर दिव्य पक्षी आणि शूल-खड्गादि आयुधें धारण करणारे व नित्य आनंदांत असणारे दैत्य, यांनीं व्याप्त होतें. अशाप्रकारचें तें विचित्र नगर दृष्टीं पडतांच मीं मातलीस म्हटलें—" हे सूता, हें अद्भुत नगर कोणाचें आहे ! "

( २ ) मातलि—हे धनंजया, पूर्वीं पुलोमा व कालका, या नांवाच्या दोघी महा-असुरींनीं एक हजार दिव्य वर्षें श्रेष्ठ तप आचरिलें. तेव्हां तपाच्या शेवटीं स्वयंभू ब्रह्मदेव प्रसन्न होऊन त्यांना वर देऊं लागला असतां त्यांनीं 'आमचे पुत्र अल्पदुःखी व देव, दानव आणि पन्नग यांस अवध्य व्हावे, तसेंच, त्यांस रमणीय व परम प्रकाशयुक्त आकाशगामी नगर प्राप्त व्हावें' असे वर मागून घेतले.

तेव्हां हे भरतश्रेष्ठा, ब्रह्मदेवानें यक्ष, गंधर्व, पन्नग, असुर व महर्षि यांस अजिंक्य, सर्व कामना पूर्ण करणारें, शोक-भयशून्य व अनामय असें एक रत्नजडित नगर कालकेय दैत्यांसाठीं निर्माण केलें. हे वीरा, तेंच हें देवतांनीं रहित आणि पौलोम व कालकेय या दैत्यांचें निवासस्थान असलेलें दिव्य आकाशगामी नगर आहे. या महानगराला ' हिरण्यपुर ' अशी संज्ञा असून कालकेय व पौलोम हे महादैत्य त्याचें रक्षण करीत असतात. हे क्षत्रियश्रेष्ठा, सर्व देवतांना अवध्य असल्यामुळें ते दैत्य उद्वेगरहित व निश्चित होऊन येथें मोठ्या आनंदानें रहात आहेत. परंतु हे पार्था, ब्रह्मदेवानें मानवाच्या हातून या दैत्यांचा वध पूर्वींच निश्चित केलेला आहे, यास्तव तूं अतिशय बलाढ्य व दुरासद असलेल्या या दानवांचाहि वज्रास्त्रानें सत्वर नाश कर.

अर्जुन—हे विशांपते धर्मराजा, ' तें नगर सुरासुरांसहि अजिंक्य आहे ' असें मातलीच्या मुखानें ऐकतांच मी संतुष्ट होऊन त्याला म्हणालों—"तर मग चल, या पुरीवर आपण सत्वर चाल करून जाऊं या. म्हणजे या इंद्र-शत्रूंचाहि मी या अस्त्रानें नाश करून टाकितों. पापी देवशत्रु मला केव्हांहि अवध्य नाहींत."

( ३ ) माझें हें वचन ऐकतांच मातलीनें त्या अश्वयुक्त दिव्य रथानें मला हिरण्यपुराच्या समीप मोठ्या त्वरेनें नेलें. तेव्हां मला पाहून ते विचित्र आभ-

रणें धारण केलेले व आयुधांनीं सज्ज झालेले दैत्य रथारूढ होऊन मोठ्या वेगानें मजवर धांवून आले. त्या तीव्र पराक्रमी क्रुद्ध दानवांनीं नालीक, नाराच, भल्ल इत्यादि बाणांनीं व शक्ति-तोमरादिकांनीं मला विद्ध केलें.

तेव्हां हे राजन्, मीं विद्याबलाचा आश्रय करून फार मोठ्या शरवृष्टीनें त्यांचा शस्त्रवर्षाव कुंठित केला आणि रणांगणांत विविध रथमार्गांनीं संचार करणाऱ्या त्यांना मोहित केल्यामुळें ते सर्व परस्परांशीं युद्ध करीत दानवांचाच वध करूं लागले. अशाप्रकारें ते एकमेकांवर चालून जात असतां मीं प्रदीप्त शरांनीं त्यांच्या मस्तकांचे शतधा तुकडे करून टाकिले.

याप्रमाणें वध होऊं लागला असतां ते सर्व दैत्य दानवी मायेचा आश्रय करून आपल्या नगरीसह आकाशांत उडाले. तेव्हां मीं प्रचंड शरवर्षाव करून त्या दैत्यांचा मार्ग आच्छादित केला व त्यांची गति कुंठित केली. ते दैत्य सूर्या-सारख्या देदिप्यमान आकाशगामी दिव्य नगराला ब्रह्मदेवाच्या वरानें इच्छेस येईल तेथें सहज स्थापन करीत असत. त्यामुळें तें क्षणांत भूमीवर उतरे व लगेच ऊर्ध्व गतीनें वर जाई. पुनः वक्र मार्गानें संचार करी व तत्काल जलांत निमग्न होई. पण हे परंतपा, अशा त्या अमरावतीतुल्य नगरीचा मीं बहुविध अस्त्रांच्या योगानें निरोध केला. नंतर दिव्य अस्त्रांनीं अभिमंत्रित केलेल्या शरवृष्टीनें दैत्यांसह त्या कामगामी पुरीला सर्वतः अडवून धरिलें. तेव्हां माझ्या सरळ जाणाऱ्या लोखंडी बाणांनीं तें नगर छिन्न-भिन्न झालें व भग्न होऊन खालीं पडलें. त्या वेळीं माझ्या वज्रतुल्य वेगवान् लोहमय बाणांनीं विद्ध झालेले ते सर्व कालप्रेरित दानव इतस्ततः भ्रमण करूं लागले.

तें पाहून मातलीनें आपला सूर्यतुल्य तेजस्वी रथ अंतरिक्षांत उडी मारल्या-प्रमाणें वर नेला आणि क्षणांत मोठ्या वेगानें भूमीवर उतरविला. त्या वेळीं त्या असहिष्णु योद्ध्यांचे साठ सहस्र रथ माझ्या सभोंवार येऊन उभे राहिले. तेव्हां मीं गृध्रपंखांनीं सुशोभित केलेल्या तीक्ष्ण बाणांनीं त्यांस विद्ध केलें असतां ते दैत्य मागें जाऊन समुद्राच्या लाटांप्रमाणें पुन्हा परत येऊं लागले.

तेव्हां 'मानुषयुद्धानें यांचा पराभव होणें शक्य नाहीं' असा विचार करून मीं क्रमानें दिव्य अस्त्रांचा प्रयोग केला. परंतु त्या विचित्र युद्ध करणाऱ्या हजारों रथ्यांनीं हळुहळू माझ्या सर्व दिव्य अस्त्रांनाहि कुंठित केलें. विचित्र रथमार्गांनीं संचार करणारे ते सर्व महाबलाढ्य असुर त्या संग्रामांत सर्वत्र दिसूं

लागले. तेव्हां चित्रविचित्र मुकुट, कवचें, ध्वज व अलौकिक आभरणें यांनीं भूषित झालेल्या त्या सहस्रावधि दैत्यांस पाहून माझ्या मनाला आनंद वाटला.

हे महाराज, मी त्या संग्रामांत अस्त्रयुक्त बाणांनींहि त्या दैत्यांना क्लेश देऊं शकलों नाहीं. उलट त्या दानवांनींच मला पीडा दिली. त्या युद्धकुशल व अस्त्रनिपुण दैत्यांकडून त्या महायुद्धांत मला अनेक प्रकारें पीडा होऊं लागली असतां मी व्यथित झालों. माझ्या मनांत भय उद्भवलें. तेव्हां मीं शुद्ध चित्तानें देवाधिदेव रुद्राचें स्मरण करून व 'या युद्धांत या दैत्यांवांचून इतर सर्व प्राण्यांचें स्वास्थ्य असो' असें म्हणून सर्व शत्रूंचा विनाश करणारें प्रसिद्ध 'रौद्र'-महास्त्र सोडिलें.

त्या वेळीं हे राजन्, तीन मुखें, तीन मस्तकें, नऊ नेत्र, सहा हात, प्रदीप्त अग्नीवत् केंस यांनीं युक्त व जिभल्या चाटीत असलेल्या महा नागांनीं सर्वांग आच्छादिलेल्या रुद्रदेवतेचें मला दर्शन झालें. तेव्हां मीं निर्भयपणें तें सनातन घोर रौद्रास्त्र अभिमंत्रवून गांडीव धनुष्याला जोडिलें आणि तें अमित तेजस्वी त्रिनेत्र शंकराला नमस्कार करून दानवांच्या पराभवासाठीं सोडिलें.

हे भरतर्षभा, तें अस्त्र सोडतांच मृग, सिंह, व्याघ्र, अस्वलें, महिष, पन्नग, वृषभ, शरभ, गज, वानर, वराह, मार्जार, श्वान, प्रेत, भुरुंड, गृध्र, गरुड, चमर, देव, ऋषि, गंधर्व, पिशाच, यक्ष, असुर, गुह्यक, राक्षस, गजमुखी मत्स्य, उलूक, त्याचप्रमाणें अश्वमुखी मत्स्य, इत्यादि नानाविध रूपें धारण केलेले व विविध आयुधांनीं युक्त असलेले सहस्रावधि प्राणी तेथें निर्माण झाले.

राजा, तें रौद्रास्त्र सोडतांच या व अशाच प्रकारच्या नानारूपें धारण केलेल्या भूतांनीं सर्व जगत् व्याप्त करून टाकिलें.

तेव्हां तीन शिरें, चार दाढा, चार मुखें, चार बाहु व अनेक रूपें धारण करणाऱ्या आणि मांस, मेद, वसा व अस्थि यांनीं युक्त असलेल्या त्या सर्व भूतांनीं वारंवार वेध केल्यामुळें ते सर्व दानव नाश पावले. हे भारता, मींहि त्या सर्व दानवांचा अग्नि व आदित्य यांच्यासारख्या प्रज्वलित, वज्रासारख्या तेजस्वी व पर्वतासारख्या दृढ नाशकारक बाणांनीं एका घटकेंत संहार केला.

त्यानंतर गांडीवापासून सुटलेल्या अस्त्रांनीं गतप्राण होऊन अंतरिक्षांतून पडणाऱ्या दैत्यांना पाहून मीं त्रिपुराचा नाश करणाऱ्या रुद्राला पुनः नमस्कार केला. याप्रमाणें मीं दिव्य आभरणांनीं भूषित असलेल्या त्या सर्व दानवांचें रौद्रास्त्रानें चूर्ण केलें आहे, असें पाहून इंद्रसारथि अतिशय हृष्ट झाला. देवां-

नाहि दुष्कर असलेल्या त्या माझ्या कर्मानें संतुष्ट होऊन त्यानें माझा मोठा सत्कार केला.

तो देवेंद्राचा सारथि हात जोडून हृष्ट चित्तानें मला म्हणाला—"हे वीरा, तूं आज जें दुर्घट कर्म केलेंस तें देवासुरांनाहि असाध्य आहे. फार काय, पण साक्षात् सुरेश्वरहि संग्रामांत अशाप्रकारचें अलौकिक कर्म करण्यास समर्थ नाहीं. हें आकाशगामी प्रचंड नगर सुरासुरांनाहि अवध्य असतां तूं स्वतःचें तप व सामर्थ्य यांच्या बलानें त्याचा विध्वंस करून टाकिलास.

(४) हे धर्मराजा, अशाप्रकारें मीं त्या आकाशगामी नगरीला उध्वस्त करून दानवांचा संहार केला असतां आक्रोश करणाऱ्या सर्व दैत्यस्त्रिया त्या नगरींतून बाहेर पडल्या. टिटवीप्रमाणें कर्कश शब्द करणाऱ्या त्या आसुरींचे केंस अस्ताव्यस्त झाले होते. पुत्र, पितर व भ्राते यांच्यासाठीं विलाप करणाऱ्या त्या भूमीवर पडल्या होत्या. पतींचा वध झाल्यामुळें रोदन व आक्रोश करणाऱ्या त्या दैत्यस्त्रियांचे कंठ शुष्क झाले होते. त्यांच्या पुष्पमाला व भूषणें तुटून पडलीं असून त्या उर बडवून घेत होत्या. त्या स्त्रियांच्या शोकस्वरानें व्याप्त, ऐश्वर्यशून्य, दुःख-दैन्यानें युक्त व अधिपतीचा नाश झाल्यामुळें निस्तेज झालेलें तें नगर शोभाशून्य झालें. त्यामुळें गरुडानें ज्यांतील नागाचें हरण केलें आहे अशा ह्रदाप्रमाणें व ज्यांतील वृक्ष शुष्क झाले आहेत अशा अरण्याप्रमाणें दिसणारें तें दैत्याचें पुर गंधर्वनगरीप्रमाणें अदृश्य झालें.

त्यानंतर हे कुरुश्रेष्ठा, युद्धामध्यें कृतकृत्य होऊन संतुष्ट झालेल्या मला मातलीनें मोठ्या त्वरेनें इंद्रलोकीं नेलें. याप्रमाणें तें हिरण्यपुर सोडून, महासुरांचा वध करून व निवातकवचांचा नाश करून मी शक्राच्या समीप गेलों. तेव्हां मातलीनें देवेंद्राला माझें सर्व यथार्थ कृत्य सविस्तर निवेदन केलें. त्या वेळीं हिरण्यपुराचा नाश, मायेचें निवारण आणि महाबलाढ्य निवातकवचांचा युद्धांत वध, यांचा सर्व वृत्तान्त ऐकून भगवान् सहस्राक्ष श्रीमान् देवगणांसह मोठ्या प्रेमानें 'धन्य धन्य' असें म्हणाला.

(५) हे महाद्युते अजातशत्रो, देवांसह देवराज इंद्रानें मला पुनः पुनः आश्वासन दिलें व तो महात्मा मला असें मधुर वचन बोलला—"हे धनंजया, तूं रणामध्यें देव-दानवांनाहि असाध्य असलेलें कर्म केलें आहेस. हे पार्था, तूं माझ्या महाशत्रूंचा नाश करून मला इष्ट असलेली गुरुदक्षिणा दिली आहेस. हे कौंतेया, युद्धामध्यें सर्वदा असाच स्थिर राहून भ्रांत न होतां अस्त्रांचा प्रयोग

करीत जा. तूं रणांगणांत देव, दानव, राक्षस, यक्ष, असुर, गंधर्व, पक्षिगण, व नाग, या सर्वांना असह्य होशील आणि धर्मराज युधिष्ठिर तुझ्या बाहुबलानें जिंकिलेल्या या पृथ्वीचें पालन करील." ३. १०. १७३.

## अध्याय १७४ वा.

[ १ अर्जुनानें इंद्रभवनांत पांच वर्षें वास्तव्य केल्यावर इंद्रानें अर्जुनास भ्रात्यांकडे परत जाण्याविषयीं दिलेली अनुज्ञा. २ युधिष्ठिराचीं दिव्य अस्त्रें पहाण्याची इच्छा. ]

( १ ) अर्जुन—हे धर्मराजा, त्यानंतर मीं पूर्ण विश्रांति घेतल्यावर आणि युद्धामध्यें माझ्या शरीरावर झालेलीं शरक्षतें भरून आल्यावर देवराज इंद्रानें मला समीप बोलावून असें म्हटलें—" हे भारता, तूं संपादिलेलीं सर्व दिव्य अस्त्रें तुझ्या ठिकाणीं सतत प्रतिष्ठित राहतील. या पृथ्वीतलावर कोणीहि मानुष तुझा पराभव करण्यास समर्थ होणार नाहीं. हे वत्सा, सर्व राजांसह भीष्म, द्रोण, कृप, कर्ण व शकुनि हे संग्रामामध्यें स्थित असलेल्या तुझ्या सोळाव्या कलेलाहि पात्र होणार नाहींत."

असें बोलून प्रभु पुरंदरानें मला हें देहाचें संरक्षण करणारें अभेद्य कवच आणि ही सुवर्णमाला अर्पण केली. प्रचंड ध्वनि करणारा ' देवदत्त '-शंख मला पुनः दिला आणि इंद्रानें स्वतः हा दिव्य किरीट माझ्या मस्तकावर ठेविला. त्याचप्रमाणें त्या देवेंद्रानें हीं दिव्य वस्त्रें व हे अमूल्य आणि तेजस्वी अलंकार मला अर्पण केले. याप्रमाणें इंद्रानें सत्कार केला असतां इंद्राच्या पुण्यप्रद भवनांत गंधर्वपुत्रांसह मी कांहीं काल सुखानें राहिलों.

त्यानंतर एकदा देवांसह असलेल्या शक्रानें संतुष्ट होऊन मला म्हटलें—" हे अर्जुना, तुझा परत जाण्याचा समय प्राप्त झाला आहे. तुझे भ्राते नित्य तुझें स्मरण करीत आहेत. यास्तव तूं आतां त्यांच्याकडे जा."

युधिष्ठिरा, इंद्राच्या मंदिरांत मी पांच वर्षें राहिलों. पण मला द्यूतजन्य कलहाचें स्मरण नित्य होत असे. त्यामुळें इंद्राची आज्ञा होतांच मी इंद्र-रथांतून तुम्हांकडे यावयास निघालों. तों या गंधमादन पर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या या शैलशिखरावर भ्रात्यांनीं परिवेष्टित असलेल्या तुला मीं पाहिलें.

युधिष्ठिर—हे धनंजया, तूं अस्त्रें संपादन केलींस, देवाधिपति इंद्राची आराधना केलीस, उमादेवीसह साक्षात् भगवान् शंकराचें दर्शन घेऊन स्वयु-

ह्यानें त्यांस प्रसन्न केलेंस व लोकपालांची भेट घेतलीस, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. हे पार्था, खरोखर आतां आपल्या उत्कर्षाचा काल समीप आला आहे. तूं परत आलास हें फार उत्तम झालें. आज आपण अनेक नगरांनीं युक्त असलेली ही समग्र पृथ्वी जिंकून धृतराष्ट्रपुत्रांना वश करून घेतलेंच आहे, असें मी समजतों.

(२) आतां हे भारता, ज्या अस्त्रांच्या सामर्थ्यानें तूं निवातकवचांचा वध केलास, तीं दिव्य अस्त्रें पहाण्याची माझी इच्छा आहे.

अर्जुन—हे धर्मराजा, ज्यांच्या प्रभावानें मीं निवातकवचांचा नाश केला तीं सर्व दिव्य अस्त्रें उद्यां प्रभातकाळीं मी तुला दाखवीन.

वैशंपायन—जनमेजया, याप्रमाणें धनंजयानें आपल्या आगमनाचा वृत्तांत कथन करून भ्रात्यांसह त्या रात्रीं तेथेंच निवास केला. ३. १०. १७४.

---

## अध्याय १७५ वा.

[ १ अर्जुनाचा अस्त्रप्रदर्शनारंभ. २ अस्त्रतेजानें पृथ्वीसह सर्व भूतांचा क्षोभ. ३ नारदाचें आगमन व योग्य कारणावांचून अस्त्रांचा प्रयोग न करण्याचा अर्जुनाला उपदेश. ]

(१) वैशंपायन—जनमेजया, ती रात्र निघून गेली असतां धर्मराज युधिष्ठिरानें उठून भ्रात्यांसह अवश्य कार्यें केलीं. नंतर त्यानें मातेला आनंद देणाऱ्या अर्जुनाला ' कौंतेया, ज्यांच्या योगानें तूं दानवांना जिंकलेंस, तीं दिव्य अस्त्रें मला दाखीव ' अशी प्रेरणा केली. तेव्हां धनंजयानें देवांनीं दिलेलीं तीं सर्व अस्त्रें दाखविलीं.

प्रथम अर्जुन यथाविधि शुचिर्भूत झाला. नंतर त्यानें आपल्या मनःकल्पित पृथ्वीरूपी रथाचे पर्वतच कूबर, चक्रें व कणा आहेत, अशी कल्पना केली. शुभ वेळूचे वृक्ष हे आंस कल्पिले आणि महातेजस्वी अर्जुन भूमिरूप मानसरथावर ध्यानबलानें आरूढ झाला. त्यानें इंद्रदत्त देदीप्यमान कवच धारण केलें. गांडीव धनुष्य व देवदत्त शंख हातीं घेतला आणि त्या महाबाहूनें तीं दिव्य अस्त्रें क्रमानें दाखविण्यास आरंभ केला.

(२) त्या दिव्य अस्त्रांचा प्रयोग करूं लागतांच पार्थाच्या पदांच्या भारानें आक्रान्त झालेली समग्र पृथ्वी वृक्षांसह कांपूं लागली. नद्या व समुद्र क्षुब्ध

झाले. पर्वत विदीर्ण होऊन वायु वाहिनासा झाला. सूर्य भासेनासा झाला. अग्नि प्रज्वलित होईना. द्विजांना वेद आठवेनात. त्या वेळीं हे जनमेजया, भूमीच्या अंतर्भागीं असलेले सर्व प्राणी पीडित होऊन वर आले व अर्जुनाच्या सभोंवार उभे राहिले. अस्त्रप्रभावानें दाह होऊं लागल्यामुळें भयानें कांपणारे ते सर्व प्राणी हात जोडून विकृत मुखांनीं धनंजयाची प्रार्थना करूं लागले.

त्याचप्रमाणें हे राजा, ब्रह्मर्षि, सिद्ध, महर्षि, जंगम भूतें, श्रेष्ठ देवर्षि, देवता, यक्ष, राक्षस, गंधर्व, पक्षी व सर्व आकाशगामी भूतें तेथें जमा झालीं. पितामह, समग्र लोकपाल आणि सर्व गणांसह भगवान् महादेवहि तेथें आले. त्या वेळीं हे महाराज, वायूनें पांडवांवर सर्व बाजूंनीं दिव्य पुष्पांची वृष्टि केली. देवांनीं प्रेरणा केलेले गंधर्व विविध गाथा गाऊं लागले. अप्सरांचे गण संघानें नृत्य करूं लागले.

( ३ ) इतक्यांत हे पारिक्षिता, सुरगणांनीं प्रेरणा केल्यामुळें देवर्षि नारद तेथें प्राप्त झाला आणि अर्जुनाला असें श्रवणीय वचन बोलला—"अर्जुना, अर्जुना ! थांब, थांब. या दिव्य अस्त्रांचा प्रयोग करूं नको. कारण अधिष्ठाना-वांचून म्ह० पुढें लक्ष्य नसतांना व स्वतःला पीडा झाल्यावांचून या अस्त्रांचा केव्हांहि प्रयोग करूं नये. हे कुरुनंदना, या अस्त्रांचा निष्कारण प्रयोग कर-ण्यांत महादोष आहे.

हे धनंजया, हीं अस्त्रें तूं जशीं संपादन केलींस, तसेंच त्यांचें संरक्षण कर म्हणजे हीं बलवान् अस्त्रें तुला सुखावह होतील, यांत संशय नाहीं. या अस्त्रांचें योग्य प्रकारें रक्षण केलें नाहीं तर तीं त्रैलोक्याचाहि नाश करून टाकतील. यास्तव पुनः असें कधींहि करूं नको.

अर्जुनाला असा उपदेश करून भगवान् नारद युधिष्ठिराकडे वळून म्हणाला—" हे अजातशत्रो, हा धनंजय युद्धामध्यें शत्रूंचा नाश करण्यासाठीं या अस्त्रांचा जेव्हां प्रयोग करील, तेव्हां तीं सर्व तूं पहाशील."

वैशंपायन—जनमेजया, याप्रमाणें पार्थाचें निवारण करून ते सर्व देव आल्या मार्गानें परत गेले. इतरहि जे प्राणी तेथें जमले होते, तेहि सर्व आपा-पल्या स्थानीं निघून गेले आणि ते सर्व परत गेले असतां हृष्ट झालेले पांडुपुत्र कृष्णेसह त्या वनामध्यें सुखानें राहिले. ३. १०. १७५.

येथें दहावें निवातकवचयुद्धपर्व समाप्त झालें.

---

# आजगरपर्व ११.



## अध्याय १७६ वा.

[ १ पांडवांचें गंधमादनपर्वतावरून निवर्तन. २ लोमशमुनींचें स्वर्गलोकीं प्रयाण.]

( १ ) जनमेजय—हे ब्रह्मन्, रथिश्रेष्ठ अर्जुन इंद्रभुवनांतून कृतास्त्र होऊन परत आला व भ्रात्यांना भेटला, हा वृत्तांत तूं मला सांगितलास. पण त्यानंतर त्या शूर धनंजयानें पुढें काय केलें !

वैशंपायन—हे नृपश्रेष्ठा, त्यानंतर ते सर्वहि नरश्रेष्ठ वीर पांडव इंद्रतुल्य अर्जुनासह त्या वनांतील रम्य शैलशिखरावरील धनेश्वराच्या उद्यानांत क्रीडा करीत सुखानें राहिले. तो अस्त्रवेत्ता धनुर्धर अर्जुन तेथील अप्रतिम मंदिरें व नानाप्रकारच्या वृक्षांनीं व्याप्त असलेलीं क्रीडाभुवनें अवलोकन करीत त्या पर्वतावर सतत संचार करूं लागला.

हे राजन्, धनपति वैश्रवणाच्या नगरींत वास करावयास मिळाल्यामुळें त्या राजपुत्रांना पुनः मनुष्यलोकीं येण्याची इच्छा होईना. शिवाय त्यांचा तो कालहि अतिशय सुखकर होता. अर्जुनाच्या भेटीनंतर त्यांचीं चार वर्षें तेथें एका रात्रीप्रमाणें गेलीं. पूर्वींचीं सहा व हीं चार अशीं दहा वर्षें वनांत रहाणाऱ्या पांडवांनीं सुखानें घालविलीं.

त्यानंतर एकदा महावेगवान् वायुसुत भीम इंद्रतनय जिष्णु आणि देवतुल्य नकुल-सहदेव युधिष्ठिराच्या समीप एकांतांत बसले असतां त्याला असें हित व प्रिय वचन बोलला—" हे कुरुराज, तुझी तेरा वर्षांची प्रतिज्ञा सत्य करण्याची इच्छा करणारे आम्ही तो काल प्राप्त झाल्यावरच तुझें प्रिय करूं. तोंपर्यंत आम्ही हें वन सोडून दुर्योधनाचा त्याच्या अनुयायांसह नाश करण्यास जाणार नाहीं. दुर्योधनानें सुखार्ह असलेल्या आमचें राज्यादि सर्व ऐश्वर्य हिरावून घेतल्यावर आपण वनांत वास्तव्य करूं लागलों. त्या वनवासाचीं दहा वर्षें पूर्ण होऊन आतां हें अकरावें वर्ष चाललें आहे.

हे धर्मराजा, तुझ्या आज्ञेनें आम्ही मानाचा त्याग करून निःशंकपणें वनांत संचार करीत आहोंत. आतां अज्ञातवासाचें एक वर्ष त्या अधम दुर्बुद्धि धार्तराष्ट्राला फसवून येथेंच सुखानें घालवूं या. आपण जर भूलोकीं समीपच कोठें राहिलों तर ते लोभी कौरव आपल्याला शोधून काढतील. पण आपण दूर व

सामान्य मानवांस अगम्य अशाच एखाद्या स्थानीं राहिल्यास ते आपल्याला ओळखणार नाहींत. यास्तव आपण या अप्रसिद्ध प्रदेशांतच एक वर्षभर गुप्त राहून नंतर त्या नराधमांचा अनायासानें उद्धार करूं.

हे प्रभो, त्या अपकारकर्त्याला उलट अपकारच करणें उचित आहे. आम्ही अनुचरांनीं परिवेष्टित असलेल्या त्या सुयोधनाला युद्धामध्यें कंटकवत् दूर फेंकून देऊं आणि राज्यप्राप्तिरूप फल व शत्रुवधरूपी पुष्पें संपादन करून आमच्या वैराची चांगली फेड करूं.

हे महाराज, त्यानंतर तूं या पृथ्वीच्या राज्यावर अधिष्ठित हो. 'अहो पण येथेंच महत्सुख प्राप्त होत असतां पृथ्वीची वासना कशाला करितां?' असें जर म्हणशील, तर हे धर्मराजा, या स्वर्गतुल्य प्रदेशांत संचार करून आपला शोक व क्लेश दूर करणें शक्य आहे, तथापि आपण चिरकाल येथेंच राहिल्यास या चराचर लोकांतील आपली पुण्यप्रद कीर्ति नष्ट होईल. पण याच्या उलट, आपण जर कुरुश्रेष्ठांचें राज्य परत मिळविलें तर महत्कार्यें करण्यासहि समर्थ होऊं.

हे नरेंद्रा, सांप्रत तुला कुबेरापासून जें ऐश्वर्य प्राप्त झालें आहे, तें सतत मिळणेंहि शक्य आहे. तेव्हां 'बांधवांचा वध कसा करावा' असें जर म्हणशील तर हे धर्मात्म्या, त्या दुष्टांनीं तुझे महदपराध केले आहेत, यास्तव त्या शत्रूंचा वध करण्याचें मनांत आण. हे राजन्, साक्षात् वज्रपाणि इंद्रहि संग्रामांत तुझें तेज सहन करण्यास समर्थ होणार नाहीं.

त्याचप्रमाणें हे धर्मराज, गरुडध्वज श्रीकृष्ण आणि सात्यकि हे दोघे तुझे हितकर्ते आहेत. तुझ्या कार्यसिद्धीसाठीं प्रवृत्त झालेल्या त्या वीरांचा देवांकडूनहि पराभव होणें शक्य नाहीं. तसाच हा अप्रतिम सामर्थ्यसंपन्न अर्जुन आणि मी भीमसेन तत्तुल्य आहों. तुझें धन व ऐश्वर्य यांच्या प्राप्तीसाठीं वासुदेव जसा यादवांसह तत्पर राहील, तसाच मीहि अस्त्रप्रयोगांत कुशल असलेल्या या दोघां माद्रीनंदनांसह युद्धामध्यें शत्रुनाशानें किंवा सामानें तुझें कार्य करीन."

**वैशंपायन**—राजा, त्या वेळीं महात्म्या युधिष्ठिरानें भ्रात्याचें म्हणणें मान्य केलें. त्या अतिशय तेजस्वी धर्मार्थवेत्त्यानें कुबेराच्या मंदिराला प्रदक्षिणा घातली आणि तेथील गृहें, नद्या, सरोवरें व सर्व राक्षस यांचा निरोप घेऊन आल्या

मार्गानेंच त्या गिरीचें पुनः निरीक्षण केलें. नंतर त्या शुद्धचित्त महात्म्यानें त्या श्रेष्ठ पर्वताची अशी प्रार्थना केली—"हे अद्रिराज, सर्व सुहृदांसह माझें कार्य पूर्ण झाल्यावर, शत्रूंना जिंकून, राज्य परत मिळवून व जितात्मा होऊन मी तप करण्यासाठीं पुनः तुझ्या दर्शनास येईन." असें बोलून त्यानें परत जाण्याचा निश्चय केला.

त्यानंतर हे राजा, तो कुरुदेशाधिपति आपले अनुज व द्विज यांसह आल्या मार्गानेंच परत फिरला. त्या वेळीं राक्षसगणांसह घटोत्कचानें त्या सर्वांस आपल्या स्कंधावर वाहून पर्वतांवरील निर्झरांच्या पलीकडे नेऊन पोंचविलें.

( २ ) हे राजन्, अशाप्रकारें ते पांडुपुत्र तेथून परत निघाले असतां महर्षि लोमश पुत्रांना उपदेश करणाऱ्या पित्याप्रमाणें त्या सर्वांस मोठ्या प्रेमानें हितावह उपदेश करून देवांच्या पुण्यप्रद निवासस्थानीं निघून गेला. त्याचप्रमाणें आर्ष्टि-षेणानेंहि त्यांस तसाच उपदेश केला. त्यानंतर नरश्रेष्ठ पांडव रम्य तीर्थें, तपोवनें व मोठालीं सरोवरें अवलोकन करीत परत फिरले. ३. ११. १७६.

---

## अध्याय १७७ वा.

[ १ मार्गांतील विविध आश्रमांत व देशांत वास्तव्य करीत पांडवांचा द्वैतवनांत प्रवेश. ]

( १ ) वैशंपायन—जनमेजया, याप्रमाणें तीर्थयात्रादिकांच्या पुण्य प्रभावानें आणि देवताप्रसादानें पांडवांना उत्तम लोक व अद्भुत सामर्थ्य यांची प्राप्ति झाली. परंतु सामर्थ्य प्राप्त झाल्यामुळें दृप्त होणें सर्वथा अनर्थकर आहे, यास्तव दर्पजयार्थ या पुढें मी तुला नहुष व भीम यांची दुरवस्था कथन करितों.

राजा, त्या पांडवांना दिग्गज, किन्नर, पक्षी व निर्झर यांनीं युक्त असलेलें तें गंधमादन पर्वतावरील सुखकर निवासस्थान सोडून जाण्यास बरें वाटेना. तथापि ते भरतश्रेष्ठ तेथून निघाले. त्यांना मार्गामध्यें कैलास पर्वत लागला. त्यास पाहून त्यांना अतिशय हर्ष वाटला. तो कुबेराला प्रिय असलेला शैलश्रेष्ठ मेघाप्रमाणें शुभ्र दिसत होता. तेथून ते खड्ग धारण करणारे श्रेष्ठ धनुर्धर शैल-शिखरावरील गर्द प्रदेश, हरिण, सिंह, पर्वतावरील नद्या तरून जाण्यासाठीं निर्मिलेल्या सेतूंच्या पंक्ति, मोठ-मोठाले कडे, त्या त्या भागांतील सखल प्रदेश आणि पशु व गज यांनीं सेवन केलेलीं महावनें यांस अवलोकन करीत द्वैत-वनाकडे चालले.

ते नरश्रेष्ठ नद्या व सरोवरें यांचे तीर, रम्य वनें किंवा पर्वतावरील गुहा यांचा आश्रय करीत रात्रं-दिवस मार्गक्रमण करूं लागले. ते महात्मे दुर्गम प्रदेशांत वास्तव्य करीत अचिंत्यरूप कैलासपर्वताचें उल्लंघन करून वृषपर्व्याच्या मनोरम आश्रमास प्राप्त झाले.

तेव्हां त्या ज्ञानसंपन्न पांडुपुत्रांनीं वृषपर्व्याची भेट घेतली असतां त्या राजर्षीनें त्यांचा सत्कार केला. तेव्हां त्या वीरांनीं आपल्या शैलशिखरावरील प्रवासाचें सविस्तर वृत्त वृषपर्व्याला निवेदन केलें. नंतर त्या देव-महर्षिसेवित पुण्याश्रमामध्यें एक रात्र सुखानें राहून ते विशाला-बदरीकाश्रमास पुनः परत आले.

तेथें ते सर्व पराक्रमी पांडव भ्राते कुबेराला प्रिय असलेलें व देव आणि सिद्ध यांनीं सेवन केलेलें सरोवर अवलोकन करीत शोकरहित होऊन नारायणाश्रमांत वास्तव्य करूं लागले. तें सरोवर पाहून इंद्राच्या नंदन-वनांत वास करणाऱ्या निष्पाप ब्रह्मर्षींप्रमाणें शोकशून्य झालेले ते नरश्रेष्ठ पांडुपुत्र रममाण झाले. याप्रमाणें त्या वीरांनीं एक महिना त्या बदरिकाश्रमीं सुखानें काढला.

त्यानंतर ते वीर हळुहळू मार्गाचें आक्रमण करीत किरातराज सुबाहूच्या राज्यांत येऊन पोंचले. ते नरश्रेष्ठ चीन, तुषार, दरद, सर्व कुलिंददेश, त्यांतील श्रेष्ठ भूमि आणि हिमालयाचा दुर्गम प्रदेश यांचें उल्लंघन करून सुबाहूच्या नगरीस प्राप्त झाले.

त्या वेळीं कुरुश्रेष्ठ राजपुत्र व राजपौत्र आले आहेत हें ऐकतांच सुबाहु आपल्या सव परिवारासह नगरीच्या सीमेवर गेला आणि त्या राजानें मोठ्या प्रेमानें त्या पांडुसुतांचें स्वागत केलें. याप्रमाणें सुबाहूला भेटून महात्म्या पांडवांनीं इंद्रसेनादि सारथि, परिचारक, पाकशालेवरील मुख्य सूपकार व तेथें ठेविलेला आपला सर्व परिवार यांच्या भेटी घेतल्या, नंतर तेथें त्यांनीं एक रात्र मोठ्या सुखानें वास्तव्य केलें.

दुसऱ्या दिवशीं त्या वीरांनीं घटोत्कचाला त्याच्या राक्षसगणांसह परत जाण्याची अनुज्ञा दिली आणि आपले रथ, सारथि आणि इतर सर्व समुदाय बरोबर घेऊन यमुना-नदीचें उगमस्थान असलेल्या गिरिराजाकडे गमन केलें. त्या शैलशिखरावरून वहात असलेल्या शुभ्र निर्झरानें तो पर्वत वस्त्राच्छादित झाल्याप्रमाणें भासत होता. त्याची रक्तवर्ण व शुभ्र शृंगें अतिशय शोभत होतीं.

तेथें 'विशाखयूप'-नांवाच्या अरण्यांत त्या महात्म्यांनीं निवास केला. वराहादि नानाप्रकारच्या पशूंनीं व पक्ष्यांनीं सेवन केलेलें तें महावन कुबेराच्या चैत्ररथ-वनाप्रमाणें शोभत होतें. त्या प्रदेशांत पांडवांनीं मृगया करीत एक वर्ष सुखानें घालविलें.

राजा, तेथील पर्वताच्या गुहेमध्यें एकदा मृत्यूप्रमाणें उग्ररूप असलेल्या एका क्षुधार्त व महाबलवान् भुजंगाची भीमसेनाशीं गांठ पडली. तेव्हां वृकोदर खेद आणि मोह यांनीं व्याकुळ झाला असतां धर्मज्ञ युधिष्ठिर त्याला द्वीपाप्रमाणें आश्रय झाला. वृकोदराचे सर्व अवयव सर्पानें ग्रासले असतां अमित तेजस्वी युधिष्ठिरानें त्याला सोडविलें.

त्यानंतर बारावें वर्ष वनांतच घालविण्याचा निश्चय करून ते तपोनिष्ठ व तेजस्वी कुरुश्रेष्ठ त्या चैत्ररथतुल्य महावनांतून निघाले आणि ते श्रेष्ठ धनुर्धर मरुधन्व-देशाच्या समीप असलेल्या सरस्वती-नदीच्या तीरावर येऊन तेथून द्वैतवनांतील सरोवरावर निवास करण्याच्या इच्छेनें गेले. तेव्हां पांडव द्वैतवनांत येऊन राहिले आहेत, हें पाहून तप, दम, योग आणि सदाचार यांनीं युक्त असलेले अश्मकुट्ट[1] वानप्रस्थाश्रमी त्यांच्या समीप आले. त्यांतील प्रत्येकापाशीं आसनार्थ तृण आणि पाद्यार्थ उदकपात्र होतें.

त्या सरस्वतीचें तीर बेहेडे, रोडा, वेत, बोरी, हिंगणमिट्टे, अक्रोड इत्यादि अनेक वृक्षांनीं शोभिवंत दिसत होतें. यक्ष, गंधर्व आणि महर्षि यांस प्रिय व देवतांचें निवासस्थान असलेल्या त्या सरस्वतीच्या तीरावर ते राजपुत्र सुखानें राहिले. ३. ११. १७७.

---

## अध्याय १७८ वा.

[ १ पांडवांचा द्वैतवनांत विहार. २ अजगरानें केलेलें भीमसेनाचें ग्रहण. ]

( १ ) **जनमेजय**—हे भगवन्, दहासहस्र हत्तींच्या बलानें युक्त व भीमपराक्रमी असलेल्या भीमसेनानें त्या अजगरापासून स्वतःवर तीव्र संकट कसें

---

१ वानप्रस्थांना दांत हेंच उखळ विहित आहे. परंतु त्या वनवासी मुनींचे दंत जरेनें नष्ट झाल्यामुळें त्यांना कठिण पदार्थ दगडानें कुटून भक्षण करावा लागत असे, म्हणून त्यांना 'अश्मकुट्टाः' असें म्हटलें आहे.

ओढवून घेतलें? हे मुने, ज्या दर्पयुक्त वीरानें पौलस्त्य कुबेराला युद्धाचें आह्वान केलें, सौगंधिक कमलांचें कदन करून यक्ष-राक्षसांचा नाश केला, तो शत्रूंचा संहार करणारा वृकोदर भयग्रस्त कसा झाला, हें सर्व ऐकण्याची मला तीव्र इच्छा झाली आहे.

वैशंपायन—हे राजन्, वृषपर्वराजाच्या आश्रमांतून ते श्रेष्ठ धनुर्धर त्या आश्चर्य-युक्त वनांत येऊन रहात असतां धनुष्य व खड्ग धारण करणारा वृकोदर यदृच्छेनें तें देव-गंधर्व-सेवित रम्य वन अवलोकन करीत संचार करूं लागला. त्या बलाढ्य पांडवानें हिमालय पर्वतावरील देवर्षि व सिद्ध यांच्या संचारांनीं युक्त असलेले व अप्सरागणांनीं सेवन केलेले अनेक शुभ प्रदेश पाहिले. तो प्रदेश चकोर, कोकिला, जीवंजीवक इत्यादि पक्ष्यांच्या मधुर शब्दांनीं नादित झाला होता. भीमसेन नित्य पुष्प-फलांनीं व हिमस्पर्शाप्रमाणें कोमल पर्णांनीं युक्त असलेल्या छायाप्रधान व नयनमनोहर वृक्षांनीं व्याप्त असलेला तो रम्य प्रदेश अवलोकन करीत चालला. त्या सम, विषम व निर्जल प्रदेशांत मृगयेच्या इच्छेनें तो महाबलवान् कौंतेय शुद्ध शरांनीं मृगांना विद्ध करीत संचार करीत होता. तेव्हां त्या सहस्रगजांच्या बलानें युक्त असलेल्या प्रख्यात भीमसेनानें सिंह, वराह, महिष यांचा बलात्का-रानें संहार केला. तो शतगजांच्या बलानें युक्त असलेला व मनुष्यांचें निवारण करणारा, सिंहासारखा पराक्रमी, बलाढ्य वायुपुत्र त्या वनांत मोठ्या वेगानें वृक्ष उपटून व मोडून टाकूं लागला. त्यामुळें पृथ्वीवरील सर्व प्रदेश व वनें नादीत झालीं. त्यानें पर्वताचीं शिखरें तुडवून व वृक्ष आपटून त्यांच्या प्रचंड ध्वनीनें पृथ्वी भरून सोडिली.

तो दृप्त झालेला भीमसेन बाहु थोपटीत, सिंहनाद करीत, टाळ्या वाजवीत त्या वनांतून निर्भयपणें वेगानें जात असतां त्याच्या त्या प्रचंड ध्वनीनें गज-सिंहादि बलाढ्य पशु भीतीनें आपल्या गुहा सोडून इतस्ततः पळाले. त्या वेळीं तो मनुजव्याघ्र पृथापुत्र केव्हां धांवत, तर केव्हां उभा रहात व केव्हां बसत त्या भयंकर वनामध्यें वनचरासारखा निर्भयपणें मृगयेच्या इच्छेनें फिरत होता. त्या महारण्यामध्यें पायांनींच संचार करणारा तो महापराक्रमी भीमसेन प्रचंड गर्जनेनें सर्व भूतांना त्रस्त करूं लागला. वृकोदराच्या सिंह-नादानें भ्यालेले सर्प आपल्या गुहेंतून निघून वेगानें जाणाऱ्या त्या वीराच्या मागून हळुहळू जाऊं लागले.

( २ ) हे राजा, इतक्यांत त्या देवतुल्य भीमानें अंगावर रोमांच आणणारा एक प्रचंड भुजंग पाहिला. तो पर्वताच्या एका दुर्गमस्थानीं आपल्या दीर्घ व विशाल देहानें ती गुहा अडवून बसला होता. त्या महा बलवान् सर्पाचें अमर्याद शरीर पर्वतासारखें विस्तीर्ण असून त्याच्या अंगावर चित्र-विचित्र केंस होते. त्याची कांति पिवळी असून त्याच्या गुहेसारख्या मुखांत चार दाढा शोभत होत्या. त्याचे आरक्त नेत्र दोन प्रदीप्त निखाऱ्यांसारखे भासत होते व तो वारंवार जिभल्या चाटीत होता. तो कालांतक यमाप्रमाणें सर्व भूतांना भयभीत करीत आपल्या फूत्कारानें जगताला जणुकाय तुच्छ करीत होता.

अशा त्या क्रुद्ध झालेल्या भयंकर अजगरानें एकदम उडी मारून भीमसेनाचे दोन्ही बाहु मोठ्या त्वरेनें व बलात्कारानें ग्रासले व त्या सर्पाचा स्पर्श होतांच भीमसेन तत्काल देहभान विसरला. कारण त्या अजगराला तसा वरच होता. दहा हजार नागांचें बल धारण करणारे ते भीमसेनाचे बाहु जेवढ्या बलानें युक्त होते, तेवढें बल इतर कोणामध्येंहि नव्हतें. परंतु अशा बलाढ्य व तेजस्वी वृकोदराला त्या भुजंगानें अधीन करून घेतलें. त्या वीरानें त्याच्या मुखांतून सुटण्याचा हळुहळू प्रयत्न केला, तथापि तो यत्किंचित्‌हि हालचाल करूं शकला नाहीं.

सिंहवत् पराक्रमी भीम दशसहस्र नागांच्या बलानें जरी युक्त होता, तरी अगस्त्याच्या वरानें समर्थ झालेल्या त्या सर्पानें ग्रासतांच त्याची बुद्धि कुंठित झाली. त्या वीरानें सर्पमुखांतून सुटण्याचा तीव्र प्रयत्न चालविला. परंतु तो बलाढ्य कौंतेय त्या सर्पाचा यत्किंचित्‌हि पराभव करण्यास समर्थ झाला नाहीं. ३.१०.१७८.

---

## अध्याय १७९ वा.

[ १ भीमाचा अजगराशीं संवाद. २ युधिष्ठिरानें पाहिलेलीं अनिष्टसूचक दुश्चिन्हें. ३ त्याचें भीमाच्या शोधार्थ गमन. ]

( १ ) **वैशंपायन**—हे जनमेजया, अशाप्रकारें त्या विशाल भुजंगानें भीमसेनाला पूर्णपणें हतबल केलें असतां त्या तेजस्वी पांडुकुमारानें त्या महासर्पाच्या अद्भुत सामर्थ्याचा विचार केला आणि बुद्धिपुरःसर त्याला म्हटलें—“ हे भुजंगश्रेष्ठा, तूं कोण आहेस आणि मला धरून तूं काय करणार आहेस, तें सांग.

हे पन्नगा, मी धर्मराजाचा कनिष्ठ भ्राता भीमसेन आहें. मी दशसहस्र नागांच्या बलानें युक्त असतां तूं मला अधीन कसें करून घेतलेंस ?

हे सर्पराज, मीं आजपर्यंत शेंकडों सिंह, व्याघ्र, महिष, गज यांच्याशीं युद्ध करून त्यांना गतप्राण केलें आहे. त्याचप्रमाणें राक्षस, पिशाच व महा बलाढ्य सर्पहि माझ्या बाहुबलाचा वेग सहन करण्यास समर्थ झाले नाहींत. असें असतां सुटण्याचा प्रयत्न करीत असतांहि तूं कोणत्या विद्येच्या बलानें किंवा वराच्या प्रभावानें मला असें धरून ठेविलें आहेस ?

हे नागश्रेष्ठा, ज्या अर्थीं तूं माझें महद्बलहि कुंठित केलेंस, त्या अर्थीं मनुष्याचा पराक्रम वृथा आहे, असें मला वाटूं लागलें आहे."

वैशंपायन—राजा, सहज कर्में करणारा भीम असें बोलला असतां त्या सर्पानें आपल्या प्रचंड देहानें भीमसेनाच्या शरीराला पूर्णपणें वेढून टाकिलें आणि त्या महाबाहूचा अशा रीतीनें निग्रह करून त्याचें बाहुबल जाणण्याच्या इच्छेनें त्या वीराच्या दोन्ही पुष्ट भुजा सोडून देऊन तो असें वचन बोलला.

भुजंग—हे महाबाहो, मज क्षुधिताला देवांनीं आज तुझ्यासारखें उत्कृष्ट भक्ष्य पाठवून दिलें, हें माझें महद्भाग्य होय. कारण जीवांना त्यांचे प्राण नेहमींच प्रिय असतात. यास्तव मी आतां तुला भक्षण करणार. मला हें सर्पाचें रूप कसें प्राप्त झालें, तें मी तुला अवश्य कथन करितों, तें ऐक. महर्षींच्या कोपामुळें मला ही अवस्था प्राप्त झाली आहे. त्या शापाचा अंत होण्याच्या इच्छेनें तें सर्व वृत्त मी तुला सांगतों.

हे अरिसूदना, नहुष-राजर्षीचें नांव तुझ्या कानीं आलेलें असेलच. तो तुझाच पूर्वज असून त्याच्या 'आयु'-नामक पूर्वजाचा वंशकर पुत्र होता. हे वृकोदरा, तोच मी अगस्त्य ब्राह्मणाचा अवमान केल्यामुळें या अवस्थेला प्राप्त झालों आहें. माझें हें दैव कसें आहे पहा! प्रियदर्शन असलेला तूं वास्तविक मला अवध्य आहेस. कारण तूं माझा वंशज आहेस आणि नरमांस वैश्वदेवादिकांस विहित नसल्यामुळें तूं अभक्ष्यहि आहेस. तथापि मी आज तुला भक्षण करण्याची इच्छा करीत आहें. हा विलक्षण दैवयोग कसा आहे, तो पहा.

हे नरश्रेष्ठा, गज, महिष, किंवा अन्य कोणताहि प्राणी माध्याह्नकालीं माझ्या जबड्यांत सांपडला असतां, तो कदापि सुटत नाहीं. हे कुरुश्रेष्ठा, केवल तिर्यग्योनींतील सर्पानेंच तुला धरलें नसून वरदानामुळें प्रबल झालेल्या

मीं—नहुषानें तुला पकडलें आहे. इंद्राच्या श्रेष्ठ विमानाग्रावरून खालीं पडत असतां माझ्या शापाचा अंत करण्याविषयीं मीं भगवान् अगस्त्यमुनीची प्रार्थना केली. त्या वेळीं त्या तेजस्वी मुनिश्रेष्ठानें कृपायुक्त अंतःकरणानें मला म्हटलें—" हे राजन्, कांहीं कालानंतर तूं मुक्त होशील."

त्यानंतर मी भूमीवर पडलों. परंतु माझी स्मृति नष्ट झाली नाहीं. दीर्घकालापूर्वीं अध्ययन केलेल्या स्मृति-पुराणांचेंहि मला स्मरण आहे. 'जो आत्मानात्मविवेक जाणणारा विद्वान्, तुझ्या प्रश्नांचें उत्तर देईल, तो तुला शापापासून मुक्त करील. शिवाय हे राजन्, तूं धरलेला प्राणी कितीहि बलाढ्य असला तरी तो तत्काल हतबल होईल' असें मजवर स्नेह करणाऱ्या त्या दयार्द्र ऋषीचें वचन माझ्या कानीं पडलें आणि तो विप्रर्षि तेथेंच अंतर्धान पावला. हे भीमा, तेव्हांपासून परम दुष्कर्म करणारा मी सर्पयोनीला प्राप्त होऊन, या अपवित्र नरकामध्यें राहून योग्य कालाची प्रतीक्षा करीत आहें.

त्या भुजंगाचें हें भाषण ऐकून महाबाहु भीमसेन त्याला म्हणाला,–हे महासर्पा, मी क्रुद्ध झालों नाहीं किंवा तुझ्या भक्ष्यस्थानीं पडत आहें याविषयीं मला खेदहि वाटत नाहीं. मी स्वतःची निंदाहि करीत नाहीं. कारण प्राण्याला पुण्य-पापांच्या साम्यानें मनुष्यजन्म प्राप्त होत असतो. त्या नरजन्मांत सुखाची प्राप्ति झाली असतां तो कदाचित् सामर्थ्यहीन होतो व पुष्कळ वेळां सामर्थ्य-संपन्नहि होतो. परंतु सुख नाहींसें झालें व दुःख प्राप्त झालें तरी मन खिन्न होऊं देऊं नये. प्रयत्नानें दैवाला फसविण्यास कोण समर्थ आहे! तस्मात् मी दैवच श्रेष्ठ मानितों. पुरुषार्थ व्यर्थ आहे. माझीच स्थिति पहा! बाहुबलाचा आश्रय करणाऱ्या मला कांहीं कारणावांचून केवल प्रतिकूल दैवामुळेंच आज ही अवस्था प्राप्त झाली आहे. हे भुजगोत्तमा, स्वतःच्या नाशाबद्दल मी यत्किंचित्‌हि शोक करीत नाहीं. परंतु मी राज्यभ्रष्ट झालेल्या माझ्या भ्रात्यांना अरण्यांत एकटें टाकून आलों आहें, याचें मला अतिशय दुःख वाटतें.

यक्ष-राक्षसांनीं व्यापलेल्या हिमालयाच्या या दुर्गम प्रदेशांत माझी प्रतीक्षा करणारे ते माझे भ्राते विह्वल होऊन पडतील आणि मी नष्ट झाल्याचें ऐकतांच कर्तव्यमूढ होऊन बसतील. ते माझे भ्राते सत्यप्रतिज्ञ आहेत, परंतु मीच राज्य

---

१ दैवं पुरुषकारेण को वंचयितुमर्हति । दैवमेव परं मन्ये पुरुषार्थो निरर्थकः ॥ म. भा. ३—२९

परत मिळविण्याच्या हेतूनें त्यांस कठोर वचनानें उद्योगाची प्रेरणा करीत असतों.

अथवा सर्वास्त्रवेत्त्या बुद्धिमान् अर्जुनाला विषाद वाटणार नाहीं. तो महाबाहु धनुर्धर देव, गंधर्व व राक्षस यांस अजिंक्य असून तो एकटाच साक्षात् देवराज इंद्रालाहि पदच्युत करण्यास समर्थ आहे. मग तो सर्व लोकांना द्वेष्य, दंभ-मोहपरायण व कपटद्यूतपटु, अशा धृतराष्ट्रपुत्राला राज्यभ्रष्ट करील, हें काय सांगावें !

पण माझ्या दीन व पुत्रवत्सल मातेविषयीं मला अतिशय दुःख वाटत आहे. आमच्या शत्रूपेक्षां आमचा अधिक उत्कर्ष व्हावा अशी नित्य आशा करणाऱ्या त्या माझ्या अनाथ जननीची माझा विनाश झाला असतां काय अवस्था होईल ! हे सर्पराज, माझे सर्व मनोरथ आतां निष्फल होणार ! माझ्या बाहुबलानें संरक्षित असल्यामुळें स्वतःला नित्य पुरुषार्थी मानणारे ते माद्रीनंदन नकुल-सहदेव ज्येष्ठ बंधूंच्या आज्ञेंत वागणारे आहेत. ते माझ्या विनाशानें निरुत्साह, वीर्य-पराक्रमरहित व उद्विग्न होतील.

राजा, वृकोदरानें असा पुष्कळ विलाप केला. परंतु सर्पानें बद्ध केलेला तो यत्किंचित्‌हि हालचाल करण्यास समर्थ झाला नाहीं.

( २ ) इकडे धर्मराज युधिष्ठिर अनिष्टसूचक अनेक घोर उत्पात होत असलेले पाहून अतिशय अस्वस्थ झाला. त्या वेळीं भालू आश्रमाच्या दक्षिणेस उभ्या राहून अशुभ शब्द करूं लागल्या. ती दिशा प्रदीप्त दिसूं लागली.

एक नेत्र, एक चरण व एक पक्ष यांनीं युक्त असलेला एक भीषण व निस्तेज ‘ वर्तिक ’ पक्षी सूर्याभिमुख उभा राहून रक्त ओकीत असलेला दृष्टीं पडला. वाळूचे कण वाहून आणणारा रूक्ष व सोसाट्याचा वायु वाहूं लागला. डाव्या बाजूला पशु-पक्षी भयंकर ध्वनि करूं लागले. मागच्या बाजूला कृष्णवर्ण वायस ‘ जा, जा, ’ असा शब्द करूं लागले. धर्मराजाचा उजवा बाहु व डावा नेत्र वारंवार स्फुरण पावून अनिष्ट सुचवूं लागला. हृदय आणि वामचरण यांचा दाह होऊं लागला.

जनमेजया, हीं सर्व अनिष्टसूचक चिन्हें जाणून बुद्धिमान् धर्मराजाला आपल्यावर कांहींतरी महत्संकट ओढवलें आहे, असें वाटलें. त्यानें द्रौपदीला ‘ भीम कोठें आहे ? ’ असा प्रश्न केला. तेव्हां ‘ वृकोदराला जाऊन बराच वेळ झाला ’ असें पांचालीनें त्याला सांगितलें.

. तें ऐकतांच धर्मराजानें अर्जुनाला द्रौपदीचें रक्षण करण्यास सांगून नकुलसहदेवांस ब्राह्मणांच्या स्वाधीन केलें आणि तो धर्मात्म्या धौम्यमुनीसह भीमाच्या शोधार्थ निघाला. त्या प्रभूनें आश्रमापासूनच भीमाचीं पावलें पहात पहात त्या महावनांत त्याचा पुष्कळ शोध केला. नंतर पूर्वदिशेकडे वळल्यावर त्यास भूमीवर बलाढ्य हत्तींचे कळप पडलेले आढळले व तेथेंच भीमाचीं उमटलेलीं पावलेंहि दृष्टीं पडलीं. त्यानंतर असंख्य पशु व सिंह त्या वनांत मरून पडलेले पाहून तो त्याच मार्गानें पुढें जाऊं लागला. त्या मार्गामध्यें वीर भीमसेन मृगयार्थ वायुवेगानें धांवत असतां त्याच्या मांड्यांच्या आघातानें अनेक वृक्ष मोडून पडले होते.

या सर्व चिह्नांच्या अनुरोधानें युधिष्ठिर चालला असतां तो एका पर्वताच्या गुहेसमीप आला. तो प्रदेश पत्ररहित शुष्क वृक्षांनीं व्याप्त असून कांटेरी झुडपें, पाषाण, वृक्षांचे खुंट, खांच-खळगे यांनीं युक्त होता. तेथें वायूहि रूक्ष वहात होता. अशा त्या निर्जल व दुर्गम प्रदेशांत महा भुजंगानें धरल्यामुळें निश्चेष्ट होऊन पडलेला आपला अनुज धर्मराजाच्या दृष्टीं पडला. ३. ११. १७९.

---

## अध्याय १८० वा.

[ १ युधिष्ठिराचें अजगरापाशीं गमन. २ त्याचे प्रश्न व त्याला युधिष्ठिरानें दिलेलीं समर्पक उत्तरें. ]

(१) **वैशंपायन**—पारिक्षिता, तेव्हां बुद्धिमान् युधिष्ठिर सर्पानें वेष्टिलेल्या आपल्या प्रिय भ्रात्याजवळ येऊन त्यास म्हणाला—" हे कुंतीपुत्रा, तूं आपणावर हें संकट कसें ओढवून घेतलेंस ? पर्वतप्राय शरीराचा हा सर्पसत्तम कोण आहे ?"

तेव्हां आपला ज्येष्ठ भ्राता धर्मराज आला आहे, असें पाहून भीमानें त्याला सर्पग्रहणाचा सर्व वृत्तांत निवेदन केला.

**भीम**—हे राजन्, या बलाढ्य प्राण्यानें मला भक्ष्यासाठीं धरिलें आहे. हा नहुषराजर्षि सर्परूपानें स्थित आहे, हा खरा सर्प नव्हे.

**युधिष्ठिर**—हे आयुष्मन्, या माझ्या अमितपराक्रमी भ्रात्याला सोडून दे. तुझ्या क्षुधानिवारणार्थ आम्ही तुला दुसरा आहार आणून देऊं.

अजगर—हे धर्मज्ञा, हा राजपुत्र आज माझ्या मुखांत पडलेला आहार आहे. यास्तव तूं निघून जा. येथें राहूं नको. नाहीं तर तूंहि उद्यां माझ्या भक्ष्यस्थानीं पडशील. हे महाबाहो, 'जो कोणी माझ्या समीप येईल तो माझा भक्ष्य होईल, असें माझें व्रत आहे. अरे बाबा, तूंहि आज माझ्या समीप आला आहेस. आज दीर्घकालानें तुझा हा अनुज मला आहारार्थ मिळाला आहे. त्याला मी सोडणार नाहीं आणि मला अन्य आहाराचीहि अपेक्षा नाहीं.

युधिष्ठिर—हे भुजंगमा, तूं कोण आहेस? तूं कोणी देव, दैत्य, किंवा नाग आहेस! मी युधिष्ठिर तुला विचारीत आहें, यास्तव मला सत्य सांग. तूं या भीमसेनाला कां ग्रासलें आहेस! इतकें बोलून आपलें सर्वशक्तिमत्त्व व सर्वज्ञत्व सुचविण्यासाठीं युधिष्ठिर पुढें म्हणाला—" हे सर्पश्रेष्ठा, आम्हीं तुला काय आणून दिलें असतां किंवा तुझ्या कोणत्या प्रश्नाचें उत्तर दिलें असतां तूं संतुष्ट होशील! तुला मी कोणता आहार आणून देऊं? तुझें कोणतें प्रिय केलें असतां तूं याला सोडशील!"

अजगर—हे अनघा, मी तुझा पूर्वज नहुषराजा आहें. सोमापासून पांचवा पुरुष जो आयु त्याचा मी पुत्र आहें. मी यज्ञ, तप, स्वाध्याय, दम आणि पराक्रम यांच्या योगानें त्रैलोक्याचें अव्यग्र ऐश्वर्य संपादन केलें. पण तें अपूर्व ऐश्वर्य प्राप्त झालें असतां मी दर्पयुक्त झालों आणि सहस्र ब्राह्मणांना माझी शिबिका वहावयास लाविलें. हे नराधिपा, मीं ऐश्वर्यमदानें त्या विप्रांचा अवमान केला.

हे पृथिवीपाला, त्या वेळीं अगस्त्यमुनीनें मला या दशेस पोंचविलें. परंतु त्या महात्म्याच्याच अनुग्रहानें अद्यापि माझें ज्ञान नष्ट झालें नाहीं. हे पांडवा, तुझा हा भ्राता अपराह्णकालीं मला आहार सांपडला आहे. यास्तव मी आतां त्याला सोडणार नाहीं व अन्य कशाचीहि इच्छा करीत नाहीं. कारण मी केवळ ज्ञानालाच पुरुषार्थ मानितों.

असें बोलून ज्ञानातिरिक्त सर्व पदार्थांविषयीं आपलें वैराग्य प्रकट करण्यासाठीं तो अजगर पुढें म्हणाला—" तथापि तूं मीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें जर देशील तर तुझ्या या वृकोदर भ्रात्याला मी सोडून देईन."

युधिष्ठिर—हे सर्पराज, ठीक आहे. तूं इष्ट असलेले प्रश्न विचार. मी त्यांचें यथामति उत्तर देईन. हे भुजंगमा, तुला संतुष्ट करण्यास मी समर्थ

होतों किंवा नाहीं तें पाहूं या. स्वतःच ब्रह्मरूप, होण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें जें अवश्य जाणावयास पाहिजे, तें निर्विशेष ब्रह्मच पुरुषार्थ आहे, असें जर तूं जाणत असशील तर त्या तुझ्या ज्ञानाशीं माझ्या ज्ञानाचीहि एकवाक्यता आहे, हें सिद्ध करण्याच्या हेतूनें मी तुला तें सांगेन.

(२) ब्रह्मवेत्त्याचीं जीं लक्षणें तींच मुमुक्षूचीं साधनें आहेत, असें मानणारा अजगर ब्रह्मवेत्त्याचें लक्षण व ब्रह्मस्वरूप, यांविषयीं धर्मराजाला प्रश्न करण्याच्या इच्छेनें म्हणाला—"हे राजा, ब्राह्मण कोण व वेद्य काय आहे, तें मला सांग. तुझ्या भाषणावरून तूं अतिज्ञानी आहेस, असें माझें अनुमान होतें."

युधिष्ठिर—यथार्थ व अहिंस्र वचन हें सत्य, सत्पात्रीं दान, क्षमा, शील, निष्ठुरताराहित्य, स्वधर्माचरणरूप तप व कृपा हे गुण ज्याच्यामध्यें दिसतात तोच ब्राह्मण, असें म्हटलें आहे. हे नागेंद्रा, परब्रह्मच वेद्य आहे. तें सर्व विशेष-शून्य व सुख-दुःखरहित आहे. अशा अखंड-एकरस ब्रह्माला प्राप्त होऊन पुरुष संतप्त होत नाहीं. कारण त्याला शोकाचें स्थान जें हृदय तेंच नाहीं. त्यामुळें तो पुरुष पुनरपि संसारास प्राप्त होत नाहीं. हे सर्पा, माझें हें असें मत आहे. याविषयीं तुझें मत काय आहे, तें सांग पाहूं!

युधिष्ठिराचें हें वचन ऐकून तो अजगररूपी नहुष 'ब्राह्मण'-शब्दानें आपल्याला ब्राह्मणजातीच विवक्षित आहे, असें कल्पून युधिष्ठिरानें सांगितलेल्या ब्राह्मणाच्या लक्षणाची अतिव्याप्ति होते, हें दाखविण्यासाठीं युधिष्ठिरास म्हणाला—"सत्य चारी वर्णांना हितावह आहे, धर्माची व्यवस्था करणारें वेदाख्य प्रमाणहि ब्राह्मणादि चारी वर्णांसाठीं आहे. कारण शूद्राच्या आचाराचें प्रतिपादन करणारी श्रुति वेदमूलक आहे. त्याचप्रमाणें हे युधिष्ठिरा, सत्य, दान, अक्रोध, अनैष्ठुर्य, अहिंसा व दया हे धर्म शूद्रांमध्येंहि दिसतात. शिवाय ब्रह्म सुख-दुःखातीत आहे, असें तूं सांगतोस; पण हे राजा, या जगांत सुख-दुःखशून्य अशी वेद्य वस्तूच नाहीं आणि सुख-दुःखरहित असलेलें प्राप्य स्थानहि मला दिसत नाहीं."

त्यावर युधिष्ठिर म्हणाला—हे अजगरा, तुझ्या प्रश्नांतील ब्राह्मणशब्दानें मला ब्रह्मवेत्ता विविक्षित आहे, त्यामुळें शूद्राचें जें कामादि चिह्न तें ब्राह्मणामध्यें नसतें, व ब्राह्मणाचें जें शमादि चिह्न तें शूद्रामध्यें नसतें. त्यामुळें ज्या शूद्रामध्यें शमादि ब्राह्मणलक्षण असतें तो शूद्र नव्हे व ज्या ब्राह्मणामध्यें

कामादि शूद्रधर्म दिसतात तो ब्राह्मण नव्हे. यास्तव शूद्रहि शमादिकांनीं युक्त असल्यास तो ब्राह्मण व ब्राह्मणहि कामादिकांनीं युक्त असल्यास तो अब्राह्मणच होय.

आतां सुख-दुःखातीत वेद्य स्थानच नाहीं, असें जें तुम्ही म्हणणें आहे, तें खरें आहे. कारण पूर्वी प्राप्त नसलेलें जें स्थान सत्कर्मादिकांच्या योगानें संपादन केलें जातें, तें सुख-दुःखांनीं रहित असणें शक्य नाहीं. कारण ब्रह्मलोकामध्यें स्थित असलेल्या जीवांनाहि ऐश्वर्याच्या न्यूनाधिक्यामुळें दुःख होतें. मग लोकांतरीं स्थित असलेल्या जीवांविषयीं काय सांगावें!

शीत व उष्ण यांचा परस्पर विरोध असल्यामुळें ज्याप्रमाणें शीतल जलामध्यें उष्ण अग्नि नसतो किंवा उष्ण अग्नीमध्यें शीतल जलहि नसतें, त्याप्रमाणें ज्ञेय वस्तु कोणत्याहि देशीं किंवा कालीं सुख दुःखानें हीन असूं शकतच नाहीं. म्हणजे जें जें कर्मानें प्राप्त होणारें स्थान तें केव्हांहि सुख-दुःखरहित असणें शक्य नाहीं. पण जी वस्तु कर्मप्राप्त नसून अवश्य ज्ञातव्य आहे, ती प्रमाणसामर्थ्यामुळें 'तूंच ब्रह्म आहेस' एवढ्या वाक्यानेंच सिद्ध होते. कंठांत असलेलाहि अलंकार विस्मरणानें नसल्याप्रमाणें भासतो. पण दुसऱ्या कोणी 'तो पहा, तुझ्या कंठांतच आहे' असें सांगितलें असतां तो जसा जणुं काय प्राप्तच होतो, त्याप्रमाणें नित्य सिद्ध असलेली ब्रह्म वस्तुहि महावाक्यानें केवल स्वज्ञानाच्या निवृत्तीचीच अपेक्षा करिते. त्या नित्य सिद्ध वस्तूशीं सुख-दुःखसंबंध नसतो. कारण त्याची प्राप्ति कर्मजन्य नसते, म्हणूनच ही वस्तु अनित्यहि नाहीं. कारण कर्मजन्य वस्तूच अनित्य असते आणि महावाक्यजन्य ज्ञानानें ज्ञेय असलेली वस्तु ज्ञानजन्य नसून ज्ञानानें केवल अभिव्यक्त होते.

तें ऐकून अजगर आपल्या पहिल्या प्रश्नाच्या उत्तरावर आक्षेप घेण्याच्या इच्छेनें धर्मराजास म्हणाला—" हे धर्मज्ञा, शमादि गुण व सदाचार, यांवरूनच जर तूं ब्राह्मण ठरवीत असशील तर तुझ्या मतीं जाति व्यर्थ झाली आणि मग जोंवर एखादा ब्राह्मणपुत्रहि ब्राह्मणकर्म करूं लागला नाहीं, तोंवर त्याला ब्राह्मण म्हणतां येणार नाहीं.

युधिष्ठिर—हे महासर्पा, सर्व वर्णांचा संकर झालेला असल्यामुळें 'जातीचा निश्चय दुष्कर आहे' असें मीं समजतों. कारण सर्व नर सर्व स्त्रियांमध्यें प्रजा उत्पन्न करितात. सर्व मनुष्यांची वाणी, ग्राम्यधर्म, जन्म-मरण इत्यादि सर्व

तुल्य असतें. याविषयीं 'ये यजामहे०' असें आर्षप्रमाणहि आहे. यास्तव तत्त्वदर्शी लोक शीलच प्रधान व इष्ट आहे असें मानितात.

हे सर्पश्रेष्ठा, नालच्छेदन करण्यापूर्वी अपत्याचें जातकर्म विहित आहे. त्या संस्काराच्या वेळीं माता 'सावित्री' व पिता 'आचार्य' असतो. वेदाध्ययनासाठीं उपनयन संस्कार विहित आहे. त्या संस्कारांत 'सावित्री' ही त्याची माता व 'आचार्य' हा त्याचा पिता असतो. या द्वितीय जन्मरूप संस्कारानें पुरुषाचा दुसरा जन्म होऊन वेदाशीं संयोग होईपर्यंत तो पुत्र शूद्रतुल्य असतो.

बालकाच्या वर्णाविषयीं संशय उत्पन्न झाला असतां स्वायंभुव मनूनें त्याविषयीं असा निर्णय केला आहे—"ज्याप्रमाणें वेदसंयोगानंतरच ब्राह्मण्य उदय पावतें, त्याचप्रमाणें यज्ञादि कर्मप्रसंगीं श्रेष्ठ ब्राह्मणांच्या वरणानें म्ह० श्रेष्ठ ब्राह्मणांना कर्माची वरणी दिल्यानें यजमान कर्माधिकारी होतो."

वैदिकसंस्काररूप सदाचार जर नसेल, तर सर्व वर्ण शूद्रतुल्य होतील. 'शूद्र संस्कारास पात्र नाहींत, व त्यांना कांहीं पापहि लागत नाहीं,' असें स्मृतीनें त्यांचें कृतकृत्यत्व दाखविलें आहे. त्याच न्यायानें संस्कारांच्या अभावीं त्रैवर्णिकहि कृतकृत्य होतील. शिवाय हे नागेंद्रा, सांप्रतकालीं या मनुष्यलोकीं अपरिहार्य संकरहि प्रतीतीला येतो. यास्तव अशा या दुर्धर समयीं ज्या पुरुषामध्यें वैदिक संस्कारयुक्त सदाचार दिसतो, तोच ब्राह्मण होय, असें मीं तुला सांगितलें.

**अजगर**—हे युधिष्ठिरा, ज्याला वेद्य वस्तु ज्ञात झाली आहे, अशा तुज पंडिताचें भाषण मीं ऐकलें, तेव्हां आतां मी तुझ्या वृकोदर भ्रात्याला कशाला भक्षण करूं? ३. ११. १८०.

---

१ आम्ही ब्राह्मण आहों किंवा अब्राह्मण आहों, हें आम्हांला ठाऊक नाहीं, असा संशय व्यक्त करून 'ये यजामहे' या वाक्यानें आम्ही ब्राह्मण किंवा अब्राह्मण जे कोणी आहों, ते याग करितों, असा श्रुतींत ब्राह्मण्याविषयीं अनिश्चय प्रकट केला आहे. 'पण आपल्या ब्राह्मण्याविषयींच जर असा अनिश्चय असेल, तर ब्राह्मणांना विहित असलेला यज्ञ करणें अनिष्टावह होईल' अशी आशंका घेऊनच याज्ञिकाकडून यागामध्यें यजमानाचें प्रवरवरण केलें जातें व अब्राह्मण यजमानाचेंहि ब्राह्मणत्व सिद्ध करणें हेंच त्याचें प्रयोजन आहे. यास्तव आचारावरूनच ब्राह्मण्याचा निश्चय होतो.

## अध्याय १८१ वा.

[ १ अजगर व युधिष्ठिर यांचा ब्रह्मप्राप्तीविषयीं संवाद. २ नहुषाची शापनिवृत्ति.]

( १ ) युधिष्ठिर—हे भुजगोत्तमा, तूं जर असा वेद-वेदांगपारंगत आहेस तर कोणतें कर्म केल्यानें उत्तम गति–स्वर्ग प्राप्त होतो तें सांग पाहूं !

अजगर—सत्पात्रीं दान, सत्य व प्रिय भाषण आणि अहिंसा यांमध्यें रत असलेला पुरुष स्वर्गाला जातो, असा माझा निश्चय झाला आहे.

युधिष्ठिर—दान व सत्य यांमध्यें श्रेष्ठ काय आहे ! त्याचप्रमाणें अहिंसा व सत्य यांचा गुरु-लघुभाव कसा आहे, तो मला सांग.

अजगर—राजा, दान, सत्य, अहिंसा व प्रिय यांचें गौरव व लाघव कार्यांच्या गुरु-लघुभावावर अवलंबून आहे. आतां अगोदर मी तुला कार्यांचें गौरवच सामान्यतः सांगतों. एखाद्या दानाहून सत्यच विशिष्ट असतें. एखाद्या सत्यवचनाहून दान विशिष्ट असतें. त्याचप्रमाणें हे महाराजा, एखाद्या प्रिय वाक्याहून अहिंसा वरिष्ठ असते व एखादेवेळीं अहिंसेहून प्रिय वचनाचें महत्त्व अधिक मानलें जातें.

उदाहरणार्थ—विद्वानानें एखाद्या निंद्य माणसाला अभय देण्यासाठीं सत्य सोडूं नये, पण साधूंना अभय देण्यासाठीं सत्याचाहि त्याग करावा. चोरांना प्रिय कथन करण्यापेक्षां अहिंसाच श्रेष्ठ मानली आहे. अहिंसेपेक्षांहि परमार्थ-रूप प्रिय कथन करणें विशिष्ट आहे. कश्यपाच्या पुत्रांना तत्त्वोपदेशानें निवृत्त करून कश्यपाला दुःख देणाऱ्या नारदानें व पुत्राला पाळण्यांतच तत्त्वोपदेश करून पतीला दुःख देणाऱ्या मदालसेनें हेंच कार्य केलें आहे.

हे युधिष्ठिरा, कार्यांच्या अपेक्षेनें दान व सत्य आणि अहिंसा व प्रिय यांतील गौरव व लाघव हें अशाप्रकारचें आहे. तुला आणखी कांहीं विचारा-वयाचें असल्यास विचार.

तें ऐकून आत्मा देहाहून भिन्न आहे, हें सिद्ध करण्यासाठीं व पूर्व कर्महि आहे, हें प्रदर्शित करण्यासाठीं युधिष्ठिर कर्मांच्या निष्फलतेविषयीं जणुकाय साशंक होऊन अजगरास म्हणाला—“हे सर्पराज, ज्याचा देह नष्ट झाला

---

१ पूर्वाध्यायांत युधिष्ठिराच्या मुखानें ब्रह्मवेत्त्याचीं लक्षणें व ब्रह्म यांचें निरू-पण करून आतां सर्पमुखानें चित्तशुद्धीच्या द्वारा किंवा आत्मजिज्ञासोत्पादनद्वारा ब्रह्मप्राप्तीच्या दानादि उपायांचें विधान करण्यासाठीं हा अध्याय आरंभिला आहे.

आहे, अशा शरीररहित पुरुषाला स्वर्गप्राप्ति कशी होते! तेथें विषयोपभोग कसा संभवतो? व कर्मफल निश्चित कसें आहे? कारण देहयुक्त असलेल्या आत्म्याच्याच ठिकाणीं हें संभवतें. देहरहित आत्म्याच्या ठिकाणीं संभवत नाहीं."

अजगर—हे धर्मराजा, आत्म्याला स्वकर्मांनीं तीन गति प्राप्त होतात. १ मानुषयोनि, २ स्वर्गवास व ३ तिर्यग्योनि. ज्याप्रमाणें घट-शराव-परळ, उदंचन-मोघा इत्यादि मृद्विकारांच्या विषमतेचें कारण कुलालाचा भिन्न संकल्प व भिन्न क्रिया हें असतें त्याचप्रमाणें देव, मानव, तिर्यक् यांच्या भौतिक शरीरांतील विषम-तेचें निमित्त त्याहून पृथक् असलेल्या कर्तृरूप आत्म्याच्या भिन्न क्रिया व भिन्न संकल्प हेंच आहे. याविषयीं बृहदारण्यक, काठक, इत्यादि उपनिषदांतील अनेक श्रुति प्रमाण आहेत. त्यांत उपासना, यज्ञादि कर्म व पूर्वजन्मसंस्कार, त्या मृतजीवाबरोबर जातात. आणि ते जीव त्यांना अनुरूप अशा देव, तिर्यक् व मनुष्य या योनींत जन्म घेतात व त्या त्या योनीमध्येंहि उत्तम, मध्यम व अधम असा त्रिविध भेद अनुभवास येतो. यांपैकीं मानुषलोकांतील दानादि व अहिं-सादि या कर्मांचें निरलसपणें अनुष्ठान केल्यानें स्वर्गप्राप्ति होते. याच्या विपरीत आचरण केल्यानें मानुषजन्म व तिर्यग्योनि यांची प्राप्ति होते.

पुण्य व पाप यांच्या साम्यानें मनुष्ययोनि, पुण्याच्या आधिक्यानें स्वर्ग-प्राप्ति व पापाच्या आधिक्यानें नरकप्राप्ति होते. त्यांतील पुण्याच्या अधिक अंशाचा भोगानें क्षय झाला असतां पुण्य-पापांचें साम्य होऊन व पापाच्या अधिकांशाचा भोगानें क्षय झाला असतांहि पुण्य-पापांचें साम्य होऊन मनुष्य-योनि प्राप्त होते.

जो मनुष्य काम-क्रोध-हिंसा-लोभ यांनीं युक्त असतो, तो मनुष्यत्वापासून भ्रष्ट होऊन तिर्यग्योनींत उत्पन्न होतो. तिर्यग्योनींतूनहि देवयोनीची प्राप्ति होते. गोयोनि, अश्वयोनि यांतूनहि साक्षात् देवभाव प्राप्त होतो. 'जे पशू यज्ञादि प्रसंगीं मनुष्यांच्या उपयोगीं पडतात, त्यांना साक्षात् देवत्वहि मिळतें' असें बह्वृच ब्राह्मणांत सांगितलें आहे.

हे राजा, ज्याप्रमाणें कार्यवान् पुरुष संसारांत इतस्ततः पर्यटन करितो व कृतकार्य पुरुष स्वस्थानीं सुखानें रहातो, त्याप्रमाणें हा कर्मठ जंतु या तीन गतींना प्राप्त होतो व कृतकृत्य द्विज उपाधीचा त्याग करून आत्म्याला महद्ब्रह्मा-

मध्यें स्थापितो. घटाकाश महाकाशांत जसें लीन होतें, त्याप्रमाणें जीवात्मा परत्माम्याशीं तादात्म्य पावतो.

हे धर्मज्ञा, देहाभिमानी जीव अदृष्टाच्या अधीन होऊन सुखाच्या इच्छेनें पुनः पुनः जन्म घेतो व देहसंबंधामुळें इष्टानिष्ट फल भोगितो. यावरून सकाम पुरुषाचीच प्रवृत्ति संभवते. त्या प्रवृत्तीपासून शुभाशुभ कर्मे, कर्मांपासून जन्म व जन्मद्वारा फलभोग. फलभोगानें पुनः कर्मासक्ति. कर्मांमुळें फलेच्छा, याप्रमाणें अविच्छिन्न संसार सतत प्रवृत्त होतो. पण फलाशा सोडून विरक्त झालेला व नित्य कर्में करणारा पुरुष संसारांतील जन्म-मरणादि दोषांचा विचार करतो. कारण त्याचें चित्त निष्काम कर्मांच्या अनुष्ठानानें शुद्ध झालेलें असतें.

किंवा, तो सर्व कार्यांचें अनिर्वचनीयत्व हेंच लक्षण आहे, असें चिंतन करितो. ज्याविषयीं सत् किंवा असत् असें कांहींच बोलतां येत नाहीं, तें स्वमगजाप्रमाणें मिथ्या असतें. त्यामुळें आसक्तिरहित पुरुष अधिष्ठानाच्या ज्ञानानें आत्म्यावर आरोपिलेला संसार शुक्ति-रजताप्रमाणें मिथ्या आहे, असें जाणतो.

यावर युधिष्ठिर 'या अनिर्वचनीय प्रजारूप कार्यांचें अधिष्ठान काय आहे,' हें जाणण्याच्या इच्छेनें अजगरास म्हणाला—" हे सर्पराज, शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पांची विषय ग्राह्य आहेत व 'अहं'—मी हा त्यांचा ग्राहक आहें. पण त्या दोहोंचेंहि अधिष्ठान काय आहे, तें मला तूं आपल्या अव्यग्र चित्तानें सांग. कारण प्रकाश्य घट व प्रकाशक सूर्य यांची भूमि व आकाश अशीं दोन भिन्न अधिष्ठानें दिसतात. त्याचप्रमाणें ग्राहक 'अहं' व ग्राह्य 'इदं' म्हणजे शब्दादि, यांचींहि दोन पृथक् अधिष्ठानें असलीं पाहिजेत. शिवाय तर्कमतांत प्रकाश्य सुख व प्रकाशक ज्ञान या दोहोंचें एक आत्मा हेंच अधिष्ठान मानलेलें आहे. तो पक्ष जर खरा मानला तर एकाच क्षणांत ज्ञानाची उपलब्धि न होणें या लिंगावरून सिद्ध होणारें मन आत्म्याहून पृथक् द्रव्य आहे, असेंच मानणें भाग आहे. त्यावांचून आत्म्यामध्यें भिन्न भिन्न जातीच्या मनःसंयोगानें सिद्ध होणाऱ्या भिन्न भिन्न जातींच्या कार्यांचा उदय संभवणार नाहीं."

राजा जनमेजया, असें बोलून युधिष्ठिर सर्परूपी नहुषास पुनः म्हणाला—"हे महामते अजगरा, तूं एकाच वेळीं सर्व विषयांचें ग्रहण कां करीत नाहींस, एवढेंच आतां मला सांग. या प्रश्नाच्या उत्तरानें माझे सर्व संशय निवृत्त होतील."

अजगर—हे आयुष्मन्, तर्कमतामध्यें प्रसिद्ध असलेलें जें सुख-दुःखादि गुणांचें आश्रयभूत द्रव्य, तें स्थूल-सूक्ष्म उपाधींचा अवलंब करण्यासाठीं बुद्ध्यादिकांनीं युक्त होतें. जाग्रदादि तीन अवस्था, याच उपाधींनीं युक्त असलेलें जें सुखादिकांचें भान, तें आत्म्यामध्यें जरी प्रतीत होत असलें, तरी तें त्याचें स्वाभाविक नव्हे. कारण एक अवस्था सोडून दुसऱ्या अवस्थेंत गेल्यावर आत्म्याला त्याचा अनुभव येत नाहीं. त्यामुळें उपाधिविशिष्ट आत्मतत्त्व इंद्रियाधिष्ठित होत्सातें विविध भोग भोगतें.

याविषयीं काठकोपनिषदांत 'शरीर, इंद्रियें व मन यांनीं युक्त झालेला आत्मा भोक्ता होतो' असें विद्वानांचें मत सांगितलें आहे. ( का. १. ३. ४. )

राजा, ज्ञान म्हणजे रूपाद्याकार बुद्धिवृत्ति व त्याचीं साधनभूत इंद्रियें. बुद्धि म्हणजे कर्त्रादिधर्मक विज्ञान. मन म्हणजे सर्व बाह्य इंद्रियांवर अनुग्रह करणारें अंतःकरण. हीं तीन्ही त्या जीवाच्या भोगाधिकरणभूत देहांत राहतात.

धर्मराजा, याप्रमाणें विकार पावणाऱ्या विज्ञानादिकांना करणत्व आहे, हें सांगून त्यांहून पृथक् असलेलें जें अकर्त्रात्मक अधिष्ठान त्याचें विवेचन मीं केलें. आतां तुझ्या दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर ऐक. भूतात्मा जीव क्षेत्रांतून भिन्न भिन्न द्वारांनीं बाहेर पडतो, व इंद्रियस्थ मनासह क्रमानें भिन्न भिन्न विषयांचें ग्रहण करितो. मन हें व्यापक करण आहे. तें सर्व इंद्रियांशीं संबद्ध होतें. म्हणूनच जीव 'माझें मन दुसऱ्या विषयांत गुंतलें होतें, त्यामुळें मीं शब्द ऐकला नाहीं, रूप पाहिलें नाहीं,' इत्यादि आपला अनुभव सांगत असतो, व श्रुतीनेंहि त्याचा अनुवाद केला आहे.

हे नरश्रेष्ठा, विषयाचें ग्रहण करावयाचें झालें असतां बुद्धिरूप कर्त्याकडून मन त्या त्या विषयामध्यें नियुक्त केलें जातें. अर्थात् मनाचा विषयग्रहणकाल भिन्न भिन्न असल्यामुळें तें एकाच वेळीं अनेक विषयांचें ग्रहण करूं शकत नाहीं. युधिष्ठिरा, कर्तृरूप विज्ञान म्ह० बुद्धि मनाची जरी प्रेरक असली तरी ती स्वतः जीवाकडून प्रेरित होते. जो आत्मा बुद्धि, मन व इंद्रियें यांनीं युक्त होऊन भोक्ता बनतो, तो स्वतः अभोक्ताच आहे. पण उपाधिलक्षण आत्मा भ्रूमध्यभागीं स्थित होऊन बुद्धीला रूपादियुक्त ग्राह्य द्रव्यांमध्यें प्रेरित करितो. आत्म्याकडून प्रेरित झालेली ती बुद्धि मनाला प्रेरणा करिते. पण बुद्धिप्रेरक आत्मा दुसऱ्या कोणाकडून प्रेरित होत नाहीं.

हे धर्मा, तूं कदाचित् असें म्हणशील कीं, बुद्धीलाच कर्तृत्व असल्यामुळें तीच सर्व व्यवहाराचा निर्वाह करूं शकेल. व्यवहारनिर्वाहासाठीं क्लीबसदृश असलेला हा निष्फल आत्मा काय करावयाचा आहे! तर वत्सा, असें समजूं नको. कारण बुद्धि व तिचा अभाव, या दोहोंचेंहि साक्षिरूप ज्ञान बुद्धीहून अगदीं पृथक् आहे आणि आत्मानात्मविवेकी योगी युक्तीनें व अनुभवानें बुद्धीहून अगदीं पृथक् असलेल्या साक्षिज्ञानाचें ग्रहण करितात. हे राजश्रेष्ठा, हें साक्षिज्ञानच आत्मप्रकाशक प्रमाण आहे. कारण तें स्वप्रकाश आहे. लय व उदय पावणाऱ्या बुद्धीला आत्मत्व संभवत नाहीं. कारण तिलाच आत्मा मानिल्यास कृतनाश व अकृताभ्यागम हे दोष येतात. ( मागें अ. ३२ पृ. ३२ पहा. )

अजगराचें हें युक्तियुक्त भाषण ऐकून 'बुद्धि व मन यांतील एकालाच कर्तृत्व व करणत्व आहे, अशी कल्पना करावी. त्यासाठीं बुद्धि व मन अशीं दोन इंद्रियें मानण्याचें काय कारण आहे!' अशा आशयानें युधिष्ठिर म्हणाला— "हे सर्पराज, बुद्धि व मन यांचें मुख्य लक्षण मला सांग. अध्यात्मवेत्त्यांचें हें परम कर्तव्य सांगितलें आहे. म्ह० त्यांनीं यांचें यथार्थ लक्षण समजून घेणें अवश्य आहे.

'बुद्धि व मन यांचें कार्य भिन्न भिन्न असल्यामुळें त्यांचा भेद मानावा लागतो' अशा आशयानें अजगर म्हणाला—" हे पांडुपुत्रा, अग्नीशीं तादात्म्य पावणाऱ्या लोखंडाच्या गोळ्याप्रमाणें बुद्धि आत्म्याशीं अत्यंत तादात्म्य पावते. त्यामुळें आत्मचैतन्यानें व्याप्त झालेली ती बुद्धि उत्क्रांत्यादिकांकडून स्वाधीन केली जाते व उत्क्रान्त्यादिकांनीं युक्त असलेल्या तिला अनुसरणारा आत्माहि जलेंचंद्र-न्यायानें उत्क्रांत्यादिकांनीं युक्त होतो.

हे राजा, या माझ्या कथनानें मीं तुला बुद्धि व आत्मा यांचा अन्योन्याध्यास कसा होतो, हें दाखविलें आहे. याच अन्योन्याध्यासाचा आश्रय करून तार्किक बुद्धि हा आत्म्याचा धर्म व आत्मा तिचा धर्मी असें मानितात.

युधिष्ठिर—उपहितामध्यें उपाधींच्या धर्मांचा अध्यास होतो, हें तुमचें म्हणणें मला पटतें. कारण घटाकाशामध्यें घट ही उपाधि व त्यांतील आकाश

---

१ उत्क्रांति म्हणजे शरीर सोडून जाणें. आदिशब्दानें जन्म व स्थिति या अवस्था घ्याव्या.

२ जल हालूं लागलें असतां त्यांतील चंद्राचें प्रतिबिंबहि हालूं लागल्यासारखें दिसतें, त्यावरून चंद्रहि चंचल आहे, असें भासतें. हाच जलचंद्रन्याय होय.

हें उपहित आहे. घट नेऊं लागलें असतां त्यांतील उपहित आकाशहि त्याच्या बरोबर जातें. पण याच्या उलट उपहित आकाशाचे अस्पर्शत्वादि धर्म 'घट' या उपाधीमध्यें दिसत नाहींत.

अजगर—बुद्धि आत्म्याच्याच आश्रयानें रहाते व आत्मचैतन्य बुद्ध्याश्रित आहे, हें प्रसिद्ध आहे. म्हणूनच बौद्ध 'बुद्धीच चेतना आहे' असें म्हणतात. त्यावरून जल-चंद्रदृष्टांतांत जलाचें चांचल्य चंद्रावर व चंद्राचा आकार व प्रकाश जलामध्यें जसा प्रतीत होतो त्याप्रमाणें बुद्धीचा धर्म आत्म्यावर व आत्म्याचा धर्म बुद्धीवर प्रतीत होतो. त्यामुळें उपाधि व उपहित यांचा अन्योन्याध्यास प्रसिद्ध आहे.

युधिष्ठिरा, तूं दिलेल्या दृष्टान्तांतहि आकाशाचा शब्द हा धर्म घटामध्यें व घटाची गति आकाशामध्यें प्रतीत होते. त्यावरून तेथेंहि अन्योन्याध्यास प्रसिद्धच आहे.

युधिष्ठिर—पण हे अजगरा, अध्यासामध्यें परस्परांच्या धर्मांचाच तेवढा अध्यास होतो, किंवा धर्मी पदार्थांचाहि अध्यास होतो ? 'धर्मांचाच अध्यास होतो' असें म्हटल्यास दोन्ही पदार्थांची समान सत्ता सिद्ध होते व त्यामुळें द्वैतप्राप्ति होते व 'धर्मींचाहि परस्पर अध्यास होतो' असें म्हटल्यास दोन्ही पदार्थ मिथ्या ठरतात व त्यामुळें शून्यवादप्रसंग येतो.

अजगर—राजा, रज्जुसर्प स्वतःच्या सिद्धीसाठीं आपल्या अधिष्ठानभूत रज्जूची जशी अपेक्षा करितो, तशी बुद्धि स्वतःच्या सिद्धीसाठीं 'आत्मा' या अधिष्ठानाची इच्छा करिते. त्यावरून धर्मांचाच परस्पर अध्यास होतो, धर्मी पदार्थांचा होत नाहीं. शुक्तीवर रजताचा जसा अध्यास होतो, तसा रजतावर शुक्तीचा अध्यास होत नाहीं, त्यामुळें तूं सांगितलेले दोष संभवत नाहींत.

युधिष्ठिर—सर्पा, पण सर्व प्रमाणांनीं सिद्ध असलेली जी बुद्धि तिला मिथ्या म्हणतां येत नाहीं !

अजगर—राजा, विषयेंद्रियसंयोगादि कार्यांमुळें बुद्धि उत्पन्न होते व तें कार्य निवृत्त झालें म्हणजे बुद्धीहि निवृत्त होते. त्यामुळें बुद्धीचें अनित्यत्व प्रसिद्ध आहे. अनित्य बुद्धि व नित्य आत्मा यांचा धर्म-धर्मिभाव संभवत नाहीं. कारण आत्मा धर्मी व बुद्धि धर्म, असें मानिल्यास आत्म्याचा मोक्ष कधींच सिद्ध होणार नाहीं. कारण कोणताहि धर्म धर्मीला सोडीत नाहीं. असा

नियम आहे. आत्मा व बुद्धि यांचा संयोगहि संभवत नाहीं. कारण कोणताहि संयोग दोन्ही पदार्थांच्या कर्मांनीं किंवा निदान एका पदार्थाच्या कर्मानें संभवतो. दोन मल्लांचा संयोग दोघांच्याहि गतीनें संभवतो किंवा वृक्ष व पक्षी यांचा संयोग एकट्या पक्ष्याच्याच गतीनें संभवतो. ( तर्कसंग्रहसार पृ. २९. )

पण घटाचा आकाशाशीं जसा संयोग होत नाहीं, त्याप्रमाणें विभु आत्म्याचा बुद्धीशीं संयोग संभवत नाहीं. शिवाय सावयव पदार्थांचाच संयोग होतो. आत्मा निरवयव आहे, यामुळेंहि आत्मा व बुद्धि यांचा संयोग संभवत नाहीं. तार्किक त्यांचाहि संयोग मानितात, पण तो युक्तिशून्य आहे. यास्तव रज्जु व सर्प यांच्या संयोगाप्रमाणें आत्मा व बुद्धि यांचा संबंध अनिर्वचनीय आहे.

रज्जूप्रमाणें आत्मा नित्य असून, रज्जुसर्पाप्रमाणें बुद्धि आविर्भाव व तिरोभाव यांनीं युक्त आहे. त्यामुळेंच ती मिथ्या होय.

युधिष्ठिर—पण बुद्धीला जर असें आकस्मिकत्व असेल तर तिच्या दुःखादि धर्मांनाहि आकस्मिकत्व प्राप्त होईल, त्यामुळें पूर्वोक्त कृतनाश व अकृताभ्यागम हे दोष कसे प्रवृत्त होणार नाहींत !

अजगर—हे राजा, पण मन सदा उत्पन्न झालेलेंच आहे. म्हणजे बुद्धीचा जरी नाश झाला, तरी बुद्धिजन्य वासनातंतूंचा प्रवाह हेंच ज्याचें स्वरूप आहे, असें मन–अंतःकरण विद्यमान असतेंच. त्यामुळें पूर्व वासनेनें बुद्धि उत्पन्न होते. बुद्धीच्या योगानें वासना वाढतात. याप्रमाणें बुद्धि व वासना यांचा हा परस्पर कार्यकारणभाव बीजांकुराप्रमाणें अनादि व अनंत आहे. बुद्धीनें सुखादिरूप परिणाम धारण केल्यानें अन्तःकरण त्याच्या वासनांनीं युक्त होतें. अर्थात् बुद्धीला उपादेयत्व म्ह० कार्यत्व असून मनाला उपादानत्व–कारणत्व आहे. त्यामुळें पट व तंतु यांप्रमाणें बुद्धि व मन यांचा भेद आहे.

वत्सा, याप्रमाणें कार्यभेदामुळें मन व बुद्धि यांचा भेद सिद्ध होतो आणि वासनाबीजाचा नाश झाल्यानें संसाररूपी अंकुर उत्पन्न होत नाहीं. हे पांडुपुत्रा, तूंहि तत्त्वज्ञ आहेस. तुला हा माझा विचार मान्य आहे कीं नाहीं ?

युधिष्ठिर—हे बुद्धिमानांतील श्रेष्ठा, तुझी ही बुद्धि सर्वथा निर्दोष आहे. तूं धन्य आहेस. तुला सर्व ज्ञातव्य ज्ञात झालें आहे. मग मला कशाला विचारतोस ! आतां मला एकच संशय राहिला आहे. तूं सर्वज्ञ असून अद्भुत कर्मांच्या बलावर स्वर्गामध्यें उत्तम स्थान मिळविलेंस. तुला देवेंद्रत्व प्राप्त

झालें. पण स्वर्गांत निवास करणाऱ्या तुला हीन योनि देणारा हा मोह कसा प्राप्त झाला !

( २ ) अजगर—हे कौंतेया, ऐखादा मोठा बुद्धिमान् किंवा शूर पुरुष जरी असला तरी त्याला ऐश्वर्य मोहित करितें. त्यावरून सुखाचा अनुभव घेत असलेला प्रत्येक जीव अविवेकी बनतो, असा माझा दृढ निश्चय झाला आहे. वत्सा युधिष्ठिरा, मी सुद्धां ऐश्वर्यमोहानें मत्त झालों व या अधोगतीला प्राप्त झाल्यावर सावध झालों. म्हणून मी तुलाहि आतां सावध करितों.

ऐश्वर्यमदानें अंध होणें हें पुढील विपत्तीचें चिह्न आहे, हें तूं लक्षांत ठेव. हे महाराज, तूं आज माझें फार मोठें कार्य केलेंस. तुझ्याशीं संभाषण केल्यामुळें माझा अतिशय क्लेशकर शाप निवृत्त झाला. पूर्वी स्वर्गलोकीं मी दिव्य विमानांतून संचार करीत असतां अभिमानानें मत्त झालों. मीं न्याय व अन्याय यांचा कांहीं विचार केला नाहीं. त्रैलोक्यांत वास करणारे सर्व ब्रह्मर्षि, देव, गंधर्व, यक्ष, राक्षस व पन्नग मला कर देत असत. हे भूपाला, मी आपल्या चक्षूनें ज्या प्राण्याकडे पहात असें त्याचें तेज तत्काल हरण करीत असें. त्या वेळीं माझ्या दृष्टीचें एवढें सामर्थ्य होतें. एक सहस्र ब्रह्मर्षि माझी शिबिका वहात असत.

हे राजा, माझ्या त्या अन्यायानेंच मला त्रैलोक्यैश्वर्यापासून च्युत केलें. माझी शिबिका वहाणाऱ्या ब्रह्मर्षींतील अगस्त्य-मुनीला मीं आपल्या पायानें स्पर्श केला. तो ब्राह्मण आपल्या खांद्यावर शिबिका वहात असतां माझ्या पायाचा स्पर्श झालेला पाहून अतिशय क्रुद्ध झाला व 'हे मूढा, तुझा नाश होवो. तूं सर्प होऊन अधोगतीस जा' असें म्हणाला.

राजन्, त्या अगस्त्य-महर्षींच्या अमोघ वाणीचा काय प्रभाव सांगावा ! त्याच्या मुखांतून हे शब्द निघतांच माझीं सर्व शुभ लक्षणें लुप्त झालीं व मी तत्काल त्या श्रेष्ठ विमानांतून खालीं पडलों. वत्सा, अधोमुख होऊन खालीं पडत असतां मीं स्वतःला प्रचंड सर्पाकार झालेलें पाहिलें आणि 'हे भगवन्, माझ्या या शापाची निवृत्ति करा' असें दीन वचन बोललों.

त्या महर्षीला माझी दया यावी, म्हणून मीं त्याची अशी प्रार्थना केली—"हे प्रभो, मी ऐश्वर्यानें मत्त झालों होतों, मला कार्याकार्यांचें भान राहिलें

१ उत्पन्न झालेलेंहि ज्ञान ऐश्वर्यमदानें नाश पावतें. यास्तव तत्त्ववेत्त्यानेंहि क्षमादिकांचा आश्रय करावा, हें या पुढील अध्यायशेषाचें तात्पर्य आहे.

नाहीं, त्यामुळें माझ्या हातून हा प्रमाद घडला. आपण कृपासागर आहां, मला क्षमा करा."

माझें हें प्रार्थनावचन ऐकून तो द्विजश्रेष्ठ अधोमुख होऊन खालीं पडणाऱ्या मला परम कृपेनें म्हणाला—"धर्मराज युधिष्ठिर तुला या शापापासून सोडवील. तुझा घोर अभिमान व पाप यांचें क्लेशरूप फल क्षीण झालें असतां, तुला पुण्यफल मिळेल."

हे युधिष्ठिरा, त्या ब्राह्मणाचें हें तपोबल पाहून मला मोठा विस्मय वाटला. त्यामुळें मीं तुला ब्रह्म व ब्राह्मणत्व, यांविषयीं प्रश्न केला. सत्य[1], दम, तप, दान, अहिंसा, व धर्मनित्यता हींच पुरुषाला निःश्रेयस देणारीं साधनें आहेत. पुरुषाची जाति व कुल हीं पुरुषार्थसाधनें नव्हेत.

हे राजा, हा तुझा महाबलाढ्य भीमसेन भ्राता अक्षत शरीरानें युक्त आहे, तो दीर्घायु व सदा विजयी होवो. तुझें कल्याण असो. हे महाराज, मी आतां पुनरपि स्वर्गलोकीं जाईन.

वैशंपायन—हे पांडवेया, असें बोलून व अजगराचें शरीर सोडून नहुषराजानें दिव्य देह धारण केला आणि तो युधिष्ठिर, धौम्य व भीमसेन यांच्या समक्ष स्वर्गलोकीं निघून गेला. धर्मात्म्या युधिष्ठिरानेंहि मृत्युमुखांतून सुटलेल्या वृकोदराला आलिंगन दिलें. त्यानंतर तो श्रीमान् व यशस्वी पांडुपुत्र धौम्य पुरोहितासह आपल्या आश्रमास परत आला. तेव्हां वनांतील वृत्त विचारण्यासाठीं सर्व ब्राह्मण युधिष्ठिरापाशीं आले असतां धर्मराजानें सर्व वृत्तांत त्यांस निवेदन केला. तो ऐकून सर्व द्विज, त्याचे तीन भ्राते व यशस्विनी द्रौपदी हीं सर्वच लज्जित झालीं. नंतर सर्व विप्रश्रेष्ठ पांडवांच्या हितेच्छेनें भीमाच्या साहसाची निंदा करीत 'हे वीरा, तूं असें घोर कृत्य पुनः करूं नको,' असें म्हणाले आणि पांडव जीवितसंशयापासून मुक्त झालेल्या महाबलाढ्य भीमसेनाला पाहून अतिशय हृष्ट झाले व ते सर्व प्रसन्न मनानें काम्यक वनांत विहार करूं लागले. ३. ११. १८१.'

येथें अकरावें आजगरपर्व समाप्त झालें.

---

१ सत्यं दमस्तपो दानमहिंसा धर्मनित्यता।
साधकानि सदा पुंसां न जातिर्न कुलं नृप॥

# मार्कंडेयसमास्यापर्व १२.



## अध्याय १८२ वा.

[१ वर्षाकालाचें वर्णन. २ शरदृतु लागतांच पांडवांचें काम्यकवनांत गमन.]

(१) वैशंपायन—राजा जनमेजया, पांडुपुत्र त्याच अरण्यांत रहात असतां ग्रीष्मांतील ऊष्मा घालविणारा, व सर्वभूतांना सुखावह होणारा वर्षाकाल प्राप्त झाला. त्या वेळीं आकाश आणि सर्व दिशा यांना आच्छादून टाकणारे व प्रचंड गर्जना करणारे कृष्णवर्ण मेघ रात्रंदिवस सतत वृष्टि करूं लागले. वर्षाकालाचें जणुंकाय चिह्नच अशा असंख्य मेघांनीं सूर्यकिरणांचें निवारण केलें. ते विद्युद्युक्त असल्यामुळें त्यांची निर्मल शोभा प्रकट झाली.

विपुल जलवृष्टीमुळें पृथ्वीवर सर्वत्र कोमल तृण उगवलें. त्याबरोबरच मत्त डांस व सर्प यांची समृद्धि झाली. जलसिंचनामुळें सर्व प्रदेश शांत व मनोहर दिसत होता. भूमि जलानें आवृत्त झाल्यामुळें सम-विषम प्रदेश, नद्या व त्यांचे तीर यांतील कांहींच ओळखूं येईनासें झालें. वर्षा-ऋतूंत तुडुंब भरलेल्या, बाणा-प्रमाणें अतिशय वेगानें वहाणाऱ्या व महाघोष करणाऱ्या नद्यांनीं तें अरण्य सुशोभित केलें.

तेथें पर्जन्यवृष्टीनें आच्छादिलेल्या वराहादि पशु-पक्ष्यांचे विविध प्रकारचे शब्द ऐकूं येऊं लागले. चातक, मोर व कोकिलांचे समूह मत्त होऊन इतस्ततः धावूं लागले व बेडूक दृप्त होऊन कर्कश ध्वनि करूं लागले.

(२) याप्रमाणें पर्वतावरील रूक्ष स्थानांतून संचार करणाऱ्या पांडवांचा मेघनादानें युक्त व बहुविध आकाराचा तो वर्षाकाल सुखानें गेला. त्यानंतर क्रौंच व हंस यांना आह्लाद देणारा शरत्काल आला. तेव्हां पर्वतशिखरें तृणांनीं व्यापून गेलीं. नद्यांचें जल प्रसन्न व शांत झालें. आकाश स्वच्छ होऊन नक्षत्र-युक्त दिसूं लागलें व तो वनप्रदेश पशु-पक्ष्यांनीं व्यापिला. अशाप्रकारें महात्म्या पांडवांना तो शरदृतुहि सुखकर झाला.

---

१ पूर्वी सांगितलेल्याच ब्रह्मविद्येचा मार्कंडेयाच्या मुखानें नाना आख्यानरूपानें विस्तार करण्यासाठीं त्याचा उपोद्घात, या रूपानें पांडवांचा काम्यकवनांतील प्रवेश या अध्यायांत वर्णिला आहे.

त्या वेळीं धूलि शांत झाली. शीतल मेघांनीं युक्त असलेली रजनी ग्रह-नक्षत्रसमुदाय व चंद्रमा यांच्या योगानें शोभूं लागली. नद्या आणि पुष्क-रणी शीतल जल व विपुल कमलें यांनीं अलंकृत झाल्या. सरस्वती नदी आकाशासारख्या नील वर्ण तटानें व तीरावर उगवलेल्या वेलींनीं व्याप्त झाली होती. तिचें पवित्र जल अतिशय प्रसन्न दिसत असून ती तुडुंब भरली होती. अशा त्या पुण्यतीर्थ सरस्वतीला पाहून त्या धनुर्धरांना आल्हाद झाला. ते वीर मोठ्या हर्षानें तिच्या तीरावर संचार करूं लागले.

राजा जनमेजया, अशाप्रकारें शरदृतूंतील कार्तिकी पौर्णिमेपर्यंत पांडवांनीं संतुष्ट चित्तानें त्याच वनांत वास्तव्य केलें. ती रात्र गेली असतां वद्य प्रति-पदेस पुण्यकर्में करणाऱ्या महात्म्या तापसांसह त्या भरतश्रेष्ठांनीं आपलीं रथादि वाहनें सर्व सामग्रीनें भरलीं आणि ते वीर, सारथि, पौरोगव इत्यादि परिवा-रासह धौम्यमुनींना बरोबर घेऊन काम्यकवनाकडे जावयास निघाले. ३. १२. १८२.

---

## अध्याय १८३ वा.

[ १ काम्यकवनांत गेलेल्या पांडवांकडे श्रीकृष्णाचें भामेसह आगमन. २ कृष्णानें केलेलें पांडवांचें सान्त्वन व धर्मराजाची प्रशंसा. ३ द्रौपदीला तिच्या पुत्रांचें कुशल वृत्तकथन. ४ मार्कंडेयाचें आगमन. ५ त्यास युधिष्ठिराचा पारलौकिक गतीविषयीं प्रश्न. ६ मार्कंडेयाचें उत्तर. ]

( १ ) वैशंपायन—हे राजेंद्रा, युधिष्ठिरादि सर्व पांडव काम्यकवनांत जाऊन पोंचले असतां त्या वनांतील मुनिगण कृष्णेसह त्यांचा सत्कार करून त्यांच्या समीप बसले. नंतर कांहीं काल विश्रांति घेऊन ते द्विजांनीं परिवेष्टित असलेले पांडुनंदन तेथें सुखानें राहूं लागले. तेव्हां अर्जुनाचा प्रिय सखा अस-लेला कोणी एक ब्राह्मण त्यांस म्हणाला—" हे कुरुश्रेष्ठहो, तुम्ही येथें आल्याचें वृत्त महाबाहु जितेंद्रिय कृष्णाला कळलें आहे. तो उदार अंतःकरणाचा हरि इतक्यांत येथें येईल. तो वासुदेव तुमच्या दर्शनाची आकांक्षा करणारा व श्रेय चिंतिणारा आहे. त्याचप्रमाणें दीर्घायु, स्वाध्याय व तप यांनीं युक्त अस-लेला महातपस्वी मार्कंडेयहि लवकरच तुम्हांला येऊन भेटेल."

राजा, तो विप्र जों असें बोलत आहे, तोंच शैब्य व सुग्रीव या दोन अश्वांनीं युक्त असलेल्या रथांतून, शचीसह येणाऱ्या इंद्राप्रमाणें, सत्यभामेसह

येत असलेला रथिश्रेष्ठ केशव त्यांच्या दृष्टीं पडला. देवकीनंदनहि त्या कुरुश्रेष्ठांना पाहतांच त्यांच्या समीप आला. वासुदेवानें रथांतून उतरतांच धर्मराज व भीम यांना यथाविधि वंदन केलें, धौम्यमुनीचें पूजन केलें, गुडाकेश अर्जुनाला आलिंगन दिलें आणि द्रौपदीचें सान्त्वन केलें. त्या वेळीं नकुल-सहदेवांनींहि त्याला अभिवादन केलें.

आपला प्रियसखा अर्जुन दीर्घ कालानें दृष्टीं पडल्यामुळें त्या दाशार्ह श्रीकृष्णानें मोठ्या प्रेमानें त्याला पुनः पुनः आलिंगन दिलें. त्याचप्रमाणें श्रीकृष्णाच्या प्रिय राज्ञीनें—सत्यभामेनें पांडवांच्या प्रियभार्येला आलिंगन दिलें. त्यानंतर ते सर्व पांडव द्रौपदी व पुरोहित यांसह पुंडरीकाक्ष मुकुंदाचा सत्कार करून त्याच्या सभोंवार बसले. त्या वेळीं असुरांना तिरस्कृत करणाऱ्या धनंजयासह असलेला मधुसूदन कार्तिकेयासह असलेल्या साक्षात् भूतपति भगवान् चंद्रशेखराप्रमाणें शोभला.

हे पांडवेया, त्यानंतर पार्थानें माधवाला वनांतील समग्र वृत्तांत निवेदन करून 'सुभद्रा व अभिमन्यु कसे आहेत' असें पुनः विचारिलें. तेव्हां त्या द्वारकाधीशानें पांडव, द्रौपदी व पुरोहित यांचा योग्य सत्कार केला व युधिष्ठिरासह सुखासनावर बसून त्यांची प्रशंसा करीत म्हटलें—"हे युधिष्ठिरा, राज्यलाभाहून धर्म श्रेष्ठ आहे आणि धर्माच्या वृद्धीसाठीं तपच सांगितलेलें आहे. सत्य व आर्जव यांच्या योगानें स्वधर्माचरण करणाऱ्या तूं इह व पर हे दोन्ही लोक जिंकले आहेस.

हे राजन्, तूं प्रथम ब्रह्मचर्यादि व्रताचरणानें अध्ययन केलेंस, नंतर समग्र धनुर्वेदाचें सम्यक् ज्ञान संपादिलेंस, क्षात्रधर्मानें धन मिळवून सर्व सनातन यज्ञ केलेस. हे नरेंद्रा, तुझी ग्राम्यधर्मांत यत्किंचित्हि प्रवृत्ति नसून तूं कोणतेंहि कार्य सकाम करीत नाहींस. द्रव्यलोभानें धर्माचा कदापि त्याग करीत नाहींस. याच प्रभावानें तूं धर्मराज 'म्हटला' जातोस. हे पृथापुत्रा, तुला राज्य व धनादि भोग जरी प्राप्त झाले तरी दान, सत्य, तप, श्रद्धा, बुद्धि, क्षमा व धैर्य, यांमध्येंच तुझी नित्य रति असते.

हे अजातशत्रो, जेव्हां कुरुजांगलांतील जनसमूहानें असहाय कृष्णेला सभेंत नेलेलें पाहिलें, तेव्हां तो धर्मविरुद्ध व्यवहार हे पांडवा, तुझ्यावांचून अन्य कोणींहि सहन केला नसता! खरोखर, तुझ्या सर्व इच्छा परिपूर्ण होऊन तूं

सत्वरच सर्व प्रजेचें योग्य प्रकारें निःसंशय पालन करशील. हे धर्मज्ञा, तुझी ही प्रतिज्ञा पूर्ण होतांच कुरूंचा निग्रह करण्यास आम्ही समर्थ आहों."

इतकें बोलून तो भगवान् दाशार्हश्रेष्ठ मुरारि धौम्य, भीम, युधिष्ठिर व उभयतां माद्रीपुत्र आणि कृष्णा, यांजकडे पाहून म्हणाला—"हा अर्जुन कृतास्त्र व संतुष्ट होऊन अक्षत शरीरानें परत आला, हें महद्भाग्य होय." त्यानंतर सुहृज्जनांसह असलेला यादवेंद्र कृष्ण याज्ञसेनीकडे वळून तिच्याशीं भाषण करूं लागला.

( ३ ) कृष्ण—हे द्रौपदी, धनंजय सुखरूपपणें परत येऊन तुला भेटला ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. हे कृष्णे, धनुर्वेदाचीच प्रीति असलेले तुझे सुशील पुत्र श्रेष्ठ सज्जनांनीं आचरिलेल्या मार्गालाच सदैव अनुसरतात. तुझ्या पित्यानें व भ्रात्यानें राज्य व राष्ट्र देण्याचा लोभ दाखवून जरी तुझ्या पुत्रांना बोलाविलें तरी बाल असूनहि त्यांना यज्ञसेनराजाकडे किंवा मातुलाच्या गृहीं राहणें आवडत नाहीं. धनुर्वेदाची रुचि असलेले ते तुझे प्रतिविंध्यादि पुत्र द्वारकाभिमुख होऊन, वृष्णिपुरांत प्रवेश करून तेथें सुखानें रहात आहेत. त्यांना देवत्वाचीहि इच्छा होत नाहीं.

हे पांचालि, तूं किंवा आर्या कुंतीनें जसें त्यांना सद्वर्तन शिकविलें असतें त्यांहूनहि अधिक सुभद्रा त्यांना सदाचारांत नियुक्त करीत असते. ती त्यांच्याकडे यत्किंचित्‌हि दुर्लक्ष करीत नाहीं. रौक्मिणेय प्रद्युम्न ज्याप्रमाणें अनिरुद्ध, अभिमन्यु, सुनीथ, किंवा भानु यांचा शिक्षक व नेता आहे, त्याचप्रमाणें तो तुझ्या पुत्रांनाहि मनःपूर्वक शिक्षण देत असतो.

हे द्रौपदि, कुमार अभिमन्युहि उत्तम शिक्षक असून तो तुझ्या निरलस व शूर पुत्रांना गदा, खड्ग व ढाल यांचें ग्रहण, अस्त्रविद्या, व अश्व-रथादि वाहनें योग्यप्रकारें चालविणें इत्यादि शिक्षण सतत देत असतो. शिवाय प्रद्युम्नहि त्यांना उत्तमप्रकारें शिक्षण देऊन व यथाविधि शस्त्रें अर्पण करून तुझे आत्मज व सौभद्रेय यांचा पराक्रम पाहून संतुष्ट होतो. हे याज्ञसेनि, तुझे पुत्र जेव्हां विहार करण्यासाठीं बाहेर जातात, त्या वेळीं त्या प्रत्येकाच्या मागून रथ, हत्ती व वाहनें जात असतात.

राजा, कृष्णेला असें सांगून तो देवकीनंदन धर्मराजाला म्हणाला—" हे राजन् , हे सर्व कुक्कुर व अंधक योद्धे तुझी आज्ञा पालन करीत तुझी इच्छा

असेल तेथें उभे राहतील. त्याचप्रमाणें धनुष्याच्या वेगानें वायु उत्पन्न करणारी व हलधर बलराम जिचा नियंता आहे, अशी रथ, अश्व, पदाति व गज यांनीं युक्त असलेली यादवांची चतुरंग सेना तुझ्या सेवेंत तत्पर आहे. हे पांडवा, तूं त्या महापातकी धृतराष्ट्रपुत्र सुयोधनाला सर्व आप्त व परिवार यांसह नरकासुर व शाल्व यांच्या मार्गानें घालवून दे. हे नरेंद्रा, तूं सभेमध्यें जशी प्रतिज्ञा केली आहेस, त्याप्रमाणेंच वर्तन ठेव आणि दाशार्ह योद्धयांनीं ज्यांतील योद्धे मारले आहेत, अशा हस्तिनापुराला तुझी प्रतीक्षा करूं दे.

हे युधिष्ठिरा, क्रोधरहित व निष्पाप असलेला तूं वनांत यथेष्ट विहार केल्यानंतर शोकशून्य होऊन सर्वराष्ट्रासह हस्तिनापुराला प्राप्त होशील."

पुरुषोत्तमाचें हें वचन मान्य करून व त्याच्याकडे अवलोकन करून धर्मराज त्याची प्रशंसा करीत हात जोडून म्हणाला—" हे केशवा, तूंच पांडवांची गति आहेस, यांत संशय नाहीं. आम्ही सर्व पार्थ तुला शरण आलों आहों. योग्यकालाचा उदय झाला असतां तूं अवश्य कर्म करशील, यांत संशय नाहीं. आम्हीं आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें हा द्वादश वर्षांचा दीर्घ काल या निर्जन अरण्यामध्यें संचार करण्यांत घालविला आहे. आतां हे केशवा, आमचा अज्ञातवास यथाविधि संपल्यावर आम्ही सर्वस्वी तुझ्याच अधीन आहों. हे केशवा, 'पांडव सत्यधर्मांत स्थित आहेत' ही तुझी बुद्धि अशीच स्थिर राहो. आम्हीं सर्व पांडवांनीं दान, धर्म, स्वजन, भार्या व बांधव यांसह तुझाच आश्रय केला आहे.

( ४ ) वैशंपायन—हे भारता, याप्रमाणें वार्ष्णेय व धर्मराज यांचें संभाषण चाललें असतां सहस्र वर्षें आयुष्य असलेला तपोवृद्ध धर्मात्मा मार्कंडेय ऋषि त्यांच्या दृष्टीं पडला. तो अजर, अमर आणि रूप-औदार्यादि गुणांनीं युक्त असलेला अतिवृद्ध तपस्वी जणुकाय पंचवीस वर्षांच्या युवकाप्रमाणें दिसत होता. अशा त्या सहस्रावधि वर्षांच्या वृद्ध ब्राह्मणाला आलेलें पहातांच सर्व ब्राह्मण, पांडव आणि कृष्ण यांनीं त्याचें पूजन केलें. त्यानंतर त्या ऋषिश्रेष्ठानें आसनावर बसून पूर्ण विश्रांति घेतल्यावर पांडुनंदन व ब्राह्मण यांच्या संमतीनें केशव त्याला असें वचन बोलला—

कृष्ण—हे मार्कंडेया, हे ब्राह्मण, पांडव, द्रौपदी, सत्यभामा व मी असे आम्ही सर्व तुझें श्रवणीय परम वचन ऐकण्यासाठीं येथें उत्सुकतेनें जमलों

आहों. यास्तव पुरातन राजे, ऋषि आणि स्त्रिया यांच्या पुण्यप्रद कथा व सनातन सदाचार आम्हांला कथन कर.

**वैशंपायन**—राजा, इतक्यांत भगवान् विशुद्धात्मा नारदमुनीहि पांडवांना भेटण्याच्या इच्छेनें तेथें प्राप्त झाला. तेव्हां त्या महात्म्याचाहि त्या सर्व पुरुष-श्रेष्ठांनीं पाद्य-अर्घ्यादिकांनीं यथाविधि सत्कार केला. त्या वेळीं मार्कंडेय कथा सांगणार आहे, हें ऐकून देवर्षि नारदानेंहि त्यास अनुमोदन दिलें. तेव्हां कालज्ञ श्रीकृष्णानें हंसून म्हटलें—"हे ब्रह्मर्षे, तुला पांडवांना जें कांहीं सांगावयाचें असेल तें सांग."

केशवाचें हें वचन ऐकून महातपस्वी मार्कंडेय म्हणाला—"हे धर्मज्ञहो, क्षणभर स्वस्थ बसा. मला पुष्कळ सांगावयाचें आहे."

**वैशंपायन**—राजा, त्या वृद्ध मुनीनें असें म्हटलें असतां, सर्व प्रजेनें मध्याह्नींच्या सूर्याकडे जसें पहावें, तसे ते सर्व पांडव द्विजांसह त्या महामुनीकडे पहात बसले. नंतर मार्कंडेय कांहीं तरी बोलण्याच्या विचारांत आहे, असें पाहून कुरुराज युधिष्ठिरानें कथा सुचविण्यासाठीं त्या महामुनीला अशी प्रेरणा केली.

(५) **युधिष्ठिर**—भगवन्, आपण पुरातन असल्यामुळें देव, दैत्य, महात्मे ऋषि व सर्व राजे यांचीं चरित्रें जाणतां. उपासना व सेवा करण्यास योग्य असलेल्या आपली आम्ही फार दिवसांपासून प्रतीक्षा करीत होतों. हा देवकीनंदन आम्हांला भेटण्याच्या इच्छेनें नुक्ताच येथें आला आहे. हे मुनिवरा, मी सर्व ऐश्वर्यापासून च्युत झालों असून दुराचरणी धृतराष्ट्रपुत्रांचा सर्व प्रकारें उत्कर्ष होत आहे. धर्म आणि अधर्म यांच्या फलाचा हा असा विपर्यास पाहून माझ्या मनांत असे प्रश्न उद्भवतात. शुभ किंवा अशुभ कर्मांचा कर्ता पुरुष आहे. तो आपल्या कर्मांचें फल कसें भोगतो व ईश्वर कर्ता कसा आहे!

हे ब्रह्मज्ञा, मनुष्यांना सुख-दुःख स्वभावतःच प्राप्त होतें कीं कर्मामुळें? तें कर्मामुळेंच जर प्राप्त होत असेल तर तें केवल या लोकींच मिळतें कीं पर-लोकींहि अनुवृत्त होतें? देही आत्मा देहाचा त्याग करून गेल्यावर शुभाशुभ कर्में जणु काय त्याचा शोधच करीत असतात. पण त्याच्याशीं त्या कर्मांचा संयोग कसा होतो! परलोकीं कीं या लोकीं! कर्मांचें फल इहलोकींच मिळतें कीं परलोकीं? मरून गेलेल्या प्राण्यांचीं कर्में कोठें रहातात!

(६) मार्कंडेय—हे वक्तृश्रेष्ठा युधिष्ठिरा, तुला शोभण्यासारखाच तूं हा प्रश्न केला आहेस. वस्तुतः तुला ज्ञातव्य असें कांहींच राहिलेलें नाहीं. तथापि तूं लोकशिक्षणासाठीं मला हें विचारीत आहेस. तुझ्या या कर्मविषयक प्रश्नांचें उत्तर मी तुला सांगेन. तूं तें सावधान चित्तानें ऐक. त्यावरून पुरुष या लोकीं व परलोकींहि सुख-दुःखांचा उपभोग घेतो, हें तुझ्या लक्षांत येईल. सर्व कार्यांच्या पूर्वीं उत्पन्न झालेल्या प्रजापतीनें प्राण्यांचीं शरीरें प्रथम अतिशय शुद्ध, निर्मल व धर्मप्रधान अशींच उत्पन्न केलीं. हे कुरुश्रेष्ठा, पुराणपुरुष सत्य-संकल्प, सुव्रत, सत्यवादी, पुण्यवान् व ब्रह्मभूत होते. ते सर्व देवांसारखे प्रभा-वशाली असून स्वच्छंदानें अंतरिक्षांतूनहि संचार करीत असत व स्वेच्छेनें पुनः या लोकीं येत. त्यांचें मरण व संचार हीं दोन्ही त्यांच्या इच्छेवर अवलंबून असत. त्यांना अल्पपीडा होत असे. त्यांना रोगांचेहि क्लेश सहन करावे लागत नसत. त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण होत असून त्यांना कोणापासून उपद्रवहि होत नसे. ते देवसंघ व महात्मे ऋषि यांचें प्रत्यक्ष दर्शन घेत. ते सर्व धर्म प्रत्यक्ष जाणत असत. ते दमनशील व निर्मत्सर असत. त्यांचें आयुष्य हजारों वर्षें असून त्यांना विपुल संतति होत असे.

पण पुढें दीर्घकालानें त्यांचें सामर्थ्य नष्ट होऊन ते पृथ्वीवरच संचार करूं लागले. काम-क्रोधांनीं व्याकुल झाले. कपट व दंभ यांवर उपजीविका करूं लागले. लोभ व मोह यांनीं पराभूत झाले. त्यामुळें ते अल्पायु झाले. अशुभ कर्मांच्या योगानें पापी बनलेले ते पशु-पक्ष्यादि तिर्यक् व नरकयोनींत जन्म घेऊं लागले. त्या मूढांना विचित्र संसारामध्यें पुनः पुनः असह्य दुःख होऊं लागलें. त्यांचीं यज्ञ-यागादि कर्में, संकल्प व ज्ञान हीं सर्व निष्फल झालीं. ते सर्वांविषयीं साशंक होऊन स्वतःला आणि इतरांना क्लेश देऊं लागले. अशुभ कर्मांच्या योगानें त्यांचीं शरीरें दुश्चिह्नांनीं चिह्नित झालीं. त्यांचा जन्म दुष्कु-लांत होऊं लागला. त्यांना अनेक व्याधींनीं ग्रासलें. त्यांची बुद्धि दुष्ट झाली व ते प्राणिमात्राला पीडा देऊं लागले. ते पापी जीव अल्पायु होऊन आपल्या भयंकर कर्मांचें फल भोगूं लागले. ते मूढ सर्व भोगांची कामना करूं लागले व अविवेकामुळें नास्तिक बनले.

हे युधिष्ठिरा, आतां 'मृत जंतूची त्याच्याच कर्मांमुळें होणारी गति, ज्ञानी व मंदबुद्धि यांचा कर्मसंचय कोठें राहतो व तो जंतु पुण्य व पाप यांचें फल

कोठें स्थित होऊन भोगतो' असे जे प्रश्न तूं मला केले होतेस, त्यांचें उत्तर ऐक.

राजा, धर्माधर्मांनें किंवा धर्माधर्मादिकांना अनुसरणाऱ्या ईश्वरानें उत्पन्न केलेल्या आदि शरीरानें म्हणजे मोक्ष होईपर्यंत अवस्थित होणाऱ्या लिंगदेहानें हा मानव शुभ व अशुभ कर्मांचा फार मोठा संचय करितो. म्हणजे सर्ववासनामय लिंग-शरीर हाच कर्मांचा आश्रय आहे. त्यामुळें कर्म स्वरूपतः क्षणभंगुर जरी असलें तरी त्याचे संस्कार फलकालापर्यंत रहातात. शरीराचें आयुष्य संपलें म्हणजे हें क्षीण झालेलें स्थूल शरीर टाकतांना तो एकाच वेळीं दोन शरीरांनीं युक्त होतो. (म्हणजे पूर्वशरीराचा त्याग करण्यापूर्वीच तो उत्तर शरीराचा संकल्प करितो.) 'पूर्वदेह टाकिल्यावर उत्तरशरीराचें ग्रहण करितो, हें म्हणणें सर्वथा अयोग्य आहे. त्यामुळें देहांतराच्या वेळींहि तो एक क्षणभरहि संसाररहित नसतो. त्या दुसऱ्या स्थूल देहांत त्याचें पूर्वकर्म छायेप्रमाणें त्याच्याबरोबर जातें व तें तेथें फलद्रूप होतें. त्यामुळें तो जीव सुखी किंवा दुःखी होतो. मरणोत्तर पुढील गर्भवासापर्यंत सूक्ष्मशरीरानें युक्त असलेला तो देही स्वर्ग, भू, अंतरिक्ष किंवा नरक या स्थानीं असतो, अशी जी समजूत आहे, ती केवळ स्थूलदृष्ट्याच होय. कारण स्थूल व सूक्ष्म या दोन्ही देहांत भोगाचें साम्य असल्यामुळें त्या दोन शरीरांत वस्तुतः कांहींच भेद नाहीं. यमानें पुण्य-पापफलभोगाविषयीं केलेली आज्ञा सर्वथा मान्य करून तो त्याप्रमाणें शुभाशुभ लक्षणांनीं युक्त होतो. तो प्राप्त सुख व दुःख यांचें निवारण करण्यास असमर्थ असतो. ज्ञानदृष्टि लोक त्याच्या लक्षणावरून हा जीव स्वकर्मांच्या योगानेंच यमराजाच्या अंकित कसा झालेला असतो, हें चांगलें ओळखतात.

हे युधिष्ठिरा, मीं तत्वज्ञानरहित पुरुषांची ही स्वर्ग-नरकरूप गति तुला सांगितली. आतां ज्ञानवानांची पुनर्जन्मरहित गति सांगतों, ऐक. जे मानव मोठे तपस्वी, सर्व शास्त्रपरायण, स्थिरव्रत, सत्यनिष्ठ, गुरुशुश्रूषेमध्यें रत, सुशील, योगजन्य शुक्लधर्म म्हणजे शुद्ध सात्त्विक धर्म संपादन करण्यांत तत्पर, क्षमाशील, दान्त व अति तेजस्वी असतात, ते पवित्र योनीमध्यें उत्पन्न होतात व प्रायः शुभलक्षणसंपन्न असतात. ते जितेंद्रिय असल्यामुळें समर्थ, सदाचार-संपन्न असल्यामुळें नीरोगी व निर्बीज समाधीच्या प्रभावानें प्रारब्धप्राप्त दुःखालाहि प्रतिबंध करण्यास समर्थ असतात. ते आपल्या ज्ञानदृष्टीनें च्युत होणाऱ्या, उत्पन्न होत असलेल्या व गर्भामध्यें स्थित असलेल्या स्वतःच्या व

दुसऱ्यांच्या आत्म्याला सर्वप्रकारें जाणतात. त्यांची ज्ञानदृष्टि कधींहि लुप्त होत नाहीं. ते लोकानुग्रहासाठीं स्वेच्छेनें एका शरीरांतून दुसऱ्या शरीरांत जातात. एका गृहांतून निघून दुसऱ्या गृहांत जसा प्रवेश करावा, तसेंच त्यांचें जन्म-मरण त्यांच्या इच्छेच्या अधीन असतें. त्यांचा हा जन्म-मरणरूप संसार कर्माधीन नसल्यामुळें दुःखद होत नाहीं.

जडभरतासारख्या कित्येकांना केवल दैवानें फल मिळतें. विश्वामित्रासारख्यांना हठयोगानें फल मिळतें व इतरांना स्वकर्मांनें फल प्राप्त होतें. यास्तव कर्मफलाचा प्रकार एकच आहे, असें तूं समजूं नको. आत्मवेत्ते स्वतंत्र असतात व अनात्मवेत्यांचे चार प्रकार संभवतात. तेच आतां मी तुला सांगतों.

हे युधिष्ठिरा, मनुष्यलोकांतील श्रेयच श्रेष्ठ आहे, असें मी समजतों. अथवा मनुष्यलोकांतच परम श्रेय प्राप्त होतें, असा माझा निश्चय आहे. एखाद्याला याच लोकीं परम श्रेय मिळतें, परलोकीं मिळत नाहीं. कोणाला परलोकींच श्रेय मिळतें, यालोकीं मिळत नाहीं. कित्येकांना या लोकीं व परलोकींहि मिळतें व कांहींना दोन्ही लोकीं श्रेयःप्राप्ति होत नाहीं. [1]ज्यांच्यापाशीं विपुल धन असतें, ते आपलीं अंगें आभरणादिकांनीं भूषित करण्यांत नित्य रत असतात, त्या देहसुखामध्यें रत झालेल्या मानवांना हाच लोक आहे, परलोक नाहीं. जे योगयुक्त, तपःप्रसक्त, स्वाध्यायशील, जितेंद्रिय व अहिंसक होऊन आपल्या देहांना झिजवितात, त्यांच्यासाठीं परलोक आहे, हा लोक नाहीं. जे प्रथम धर्माचरणच करितात आणि धर्मानें धन मिळवून व योग्यकालीं स्त्रीपरिग्रह करून विविध याग संपादन करितात, त्यांचे इह व पर हे दोन्ही लोक आहेत. पण जे मूढ

---

१ धनानि येषां विपुलानि संति नित्यं रमंते सुविभूषितांगाः ।
तेषां अयं शत्रुवरघ्न लोको नासौ सदा देहसुखे रतानाम् ॥
ये योगयुक्तास्तपसि प्रसक्ताः स्वाध्यायशीला जरयंति देहान् ।
जितेंद्रियाः प्राणिवधे निवृत्तास्तेषामसौ नायमरिघ्न लोकः ॥
ये धर्ममेव प्रथमं चरंति धर्मेण लब्ध्वा च धनानि काले ।
दारानवाप्य क्रतुभिर्यजन्ते तेषामयं चैव परश्च लोकः ॥
ये नैव विद्यां न तपो न दानं न चापि मूढाः प्रजने यतन्ति ।
न चानुगच्छन्ति सुखान्न भोगांस्तेषां अयं नैव परश्च लोकः ॥

विद्या, तप, दान व प्रजोत्पादन यांविषयीं यत्न करीत नाहींत, सुख व भोग भोगीत नाहींत, त्यांना हाहि लोक नाहीं व परलोकहि नाहीं.

पण तुम्ही सर्व पांडव अतिवीर्य, सत्त्व, ओज, दिव्य सामर्थ्य व सुदृढ शरीर यांनीं युक्त अहां. तुम्हीं सर्व विद्यांचें अध्ययन उत्तमप्रकारें केलें आहे व देवकार्यासाठीं स्वर्गलोकांतून या लोकीं आलां आहां. यास्तव हे शूरहो, तुम्ही महत्कर्में करून तप, दम, आचार व विहार यांनीं युक्त होऊन, सर्व देव, ऋषि व प्रेतगण यांस यथाविधि तृप्त करून स्वकर्मांनीं पुण्यवानांच्या स्वर्गस्थ श्रेष्ठ निवासस्थानास क्रमानें प्राप्त व्हाल. हे कौरवेंद्रा, स्वतःचे क्लेश पाहून धर्माधर्मांच्या फलाविषयीं तूं असा साशंक होऊं नको. खरोखर तूं सुखालाच पात्र आहेस. ३. ११. १८३.

---

## अध्याय १८४ वा.

[ १ मार्केडेयानें कथन केलेलें हैहयराजांचें वृत्त. २ तार्क्ष्य मुनीचें माहात्म्य. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, ब्रह्मवेत्त्यांचें स्वच्छंदमरणादि महाभाग्य ऐकून त्याचेंच अधिक विवरण ऐकण्याच्या इच्छेनें सर्व पांडुपुत्र महात्म्या मार्केडेयाला म्हणाले—"हे भगवन्, द्विजश्रेष्ठांचें माहात्म्य ऐकण्याची आमची इच्छा आहे. तें आम्हांला कथन करा." पांडवांची ही प्रार्थना ऐकून तो महातपस्वी, महातेजस्वी व सर्वशास्त्रविशारद मार्केडेय त्यांस अशी कथा सांगूं लागला—

**मार्केडय**—राजा, पूर्वीं हैहयकुलाचा एक वंशकर राजा होता. तो शत्रूंचा नाश करणारा रूपसंपन्न व बलाढ्य कुमार मृगया करीत फिरत असे. एकदा तो अविवेकी कुमारनृपति तृणलतायुक्त अरण्यांतून संचार करीत असतां तेथें समीपच कृष्णाजिनानें आपलें शरीर आच्छादित करून बसलेला एक मुनि त्याच्या दृष्टीं पडला. तेव्हां 'हा मृगच आहे' असें समजून त्या भूपतीनें त्या मुनीचा वध केला. परंतु लगेच तो ऋषि आहे, हें कळून येतांच प्रमादानें घडलेल्या त्या घोर कर्मामुळें त्याचें मन व्यथित झालें व शोकानें विवेकहीन होऊन तो प्रसिद्ध हैहयनृपालांकडे गेला आणि त्या पृथिवीपति कुमारानें घडलेला सर्व वृत्तान्त त्यांस यथार्थ निवेदन केला.

तेव्हां, हे राजा, फलमूलाशन करणाऱ्या मुनीची अशाप्रकारें हत्या झालेली ऐकून ते सर्व हैहय चिंताक्रांत झाले व 'तो मुनि कोण आहे' याचा शोध

करण्यासाठीं ते सर्वजण अरण्यांत इतस्ततः फिरूं लागले. ते लवकरच कश्यपाचा पुत्र जो अरिष्टनेमि त्याच्या आश्रमापाशीं आले. त्या नियतव्रत मुनीला अभिवादन करून ते त्याच्या समीप उभे राहिले. तेव्हां मुनीनें त्यांच्यासाठीं अर्घ्यपाद्यादि साहित्य आणिलें.

तें पाहून ते सर्व नृपाल त्या महात्म्याला म्हणाले—हे मुने, आम्ही तुझ्या या सत्काराला पात्र नाहीं. आमच्या पूर्वकर्मांच्या दोषानें आमच्या हातून ब्रह्महत्या घडली आहे.

त्यांचें हें भाषण ऐकून तो विप्रर्षि म्हणाला—तुम्हीं ब्राह्मणाची हिंसा कशी केलीत व तो कोठें आहे? हें मला सांगा, म्हणजे तुम्ही सर्व माझें तपोबल पहाल.

तेव्हां त्या सर्वांनीं घडलेला इत्थंभूत वृत्तान्त त्याला यथार्थ सांगितला व जेथें त्या ब्राह्मणाचा वध झाला होता, तेथें ते सर्व मिळून गेले. परंतु त्या ठिकाणीं तो गतप्राण झालेला मुनि त्यांस आढळला नाहीं. तेव्हां त्याचा शोध करणारे ते सर्व लज्जित व स्वप्नवत् भ्रांतचित्त होऊन पुनः आश्रमांत परत आले.

( २ ) त्यांस पाहून अरिष्टनेमि तार्क्ष्यमुनि म्हणाला—"हे नृपहो, तुम्ही ज्या ब्राह्मणाचा नाश केलात, तो हा तर नव्हे?" असें म्हणून त्यानें तेथें समीपच बसलेल्या एका द्विजाकडे बोट दाखवून पुनः म्हटलें—"हा माझा तपोबलानें युक्त असलेला पुत्र आहे."

राजा युधिष्ठिरा, त्या वध पावलेल्या ऋषीला जिवंत पाहून ते सर्व हैहयराजे अतिशय विस्मित होऊन 'हें महदाश्चर्य आहे' असें बोलले व तार्क्ष्य मुनीला म्हणाले—"हे मुनिश्रेष्ठा, हा गतप्राण झालेला विप्र पुनः जिवंत कसा झाला? ज्याच्या योगानें पुनः जिवंत होतां येतें असें कोणतें तपःसामर्थ्य आहे! हे विप्रर्षे, हें जर आम्हांला ऐकण्यासारखें असेल तर तें श्रवण करण्याची आमची इच्छा आहे."

तें ऐकून अरिष्टनेमि म्हणाला—हे भूपालहो, आमच्यावर मृत्यूचा प्रभाव चालत नाहीं. याचें संक्षिप्त कारण व मृत्युंजयाचीं साधनें मी तुम्हांला सांगतों तीं ऐका. आम्ही केवळ सत्यच जाणतों, मनानेंहि असत्संकल्प करीत नाहीं आणि स्वधर्मांचेंच अनुष्ठान करितों, त्यामुळें आम्हांला मृत्यूचें भय नाहीं. आम्ही नित्य ब्राह्मणनिंदाशून्य व केवळ स्तुतिपरच कथा बोलतों. विप्रांच्या

दुश्चरिताचा आम्ही उच्चारहि करीत नाहीं. अतिथींना अन्नपानानें व भार्यादिकांना पोषणाखेरीज दान-मानादिकांनीं संतुष्ट करून मग अवशिष्ट राहिलेल्या अन्नादिकांचें सेवन करितों. शिवाय आम्ही शांत, दांत, क्षमाशील, तीर्थदानपरायण होऊन गंगातीरादि पुण्यप्रदेशीं वास करितों व योगसिद्धांच्या सन्निध रहातों. त्यामुळें आम्हांला मरणाचें भय नाहीं. हें केवळ लेशमात्र तुम्हांला सांगितलें आहे. आमच्याशीं हें संभाषण केल्यानेंच तुम्ही या हत्यादोषापासून मुक्त झालां अहां. तुम्हांला आतां त्या पापाचें भय नाहीं. यास्तव निर्मत्सर होऊन तुम्हीं सर्व परत जा.

युधिष्ठिरा, हें भाषण ऐकून ते सर्व हैहयकुलोत्पन्न राजे त्या महामुनीचें पूजन करून हृष्ट मनानें स्वदेशीं परत गेले. २. ११. १८४.

---

## अध्याय १८५ वा.

[ १ मार्कंडेयानें कथन केलेलें वैन्य-राजर्षीचें आख्यान. २ अत्रि व गौतम, या ऋषींचा विवाद. ३ सनत्कुमारानें केलेलें अत्रिपक्षाचें समर्थन. ४ वैन्यराजानें विपुल धनादिकांनीं केलेली अत्रीची संभावना. ]

**वैशंपायन**—जनमेजया, याप्रमाणें सत्यादिधर्म मृत्युंजयाचा हेतु आहे, असें सांगितलें. परंतु सत्यादि धर्म वनस्थांनाच विहित आहेत. ते गृहस्थांना युक्त नाहींत. कारण त्यांच्या ठिकाणीं दुष्प्रतिग्रह, ब्रह्मवेत्त्यांचा द्वेष इत्यादि दोषांची प्रसक्ति असल्यामुळें सत्यादि धर्मांचा असंभव असतो, अशा आशयानें मार्कंडेय म्हणाला—" हे धर्मराजा, ब्राह्मणांचें आणखींहि महद्भाग्य मी तुला सांगतों ऐक. "

( १ ) पूर्वीं ' वैन्य '-नामक एक राजर्षि होता. त्यानें अश्वमेध यज्ञाची दीक्षा घेतली होती. तेथें अत्रि-ऋषि वित्तासाठीं गेला होता, असें आम्हीं ऐकलें आहे. पण राजा, तो अत्यंत अर्थार्थी नव्हता. कारण, धर्माची फलद्वारा अभिव्यक्ति झाली असतां तो धर्म नष्ट होतो. यास्तव धर्मरक्षणार्थ त्यानें विपुल धनाची इच्छा केली नाहीं. त्या महर्षीनें विचार करून वनांतच जाण्याचा निश्चय केला आणि आपली धर्मपत्नी अनसूया व पुत्र यांस बोलावून म्हटलें—" मी अरण्यगमनानें ' मोक्ष ' या नांवाचें विपुल व अक्षय फल प्राप्त करून घेणार आहें. तें सर्व गुणांनीं श्रेष्ठ असल्यामुळें तुम्हांला सत्वर रुचावें, अशी माझी इच्छा आहे."

तें ऐकून यज्ञादि धर्मांचाच आश्रय करणारी त्याची साध्वी भार्या धर्माचरणासाठीं धनसंपादन करण्याच्या आशयानें म्हणाली—"हे भगवन्, आपण महात्म्या वैन्यराजर्षीकडे जाऊन विपुल धन मागून आणा. त्या राजर्षीनें यज्ञदीक्षा घेतलेली असल्यामुळें धनार्थी असलेल्या आपल्याला तो पुष्कळ द्रव्य देईल. हे प्रभो, याप्रमाणें विपुल धन संपादन करून तें अतिथि, देवतादि, व भार्या-सुतादिक यांस त्यांच्या प्रीत्यर्थ विभागून द्या आणि मग आपल्या इच्छेप्रमाणें वनांत जा. मन्वादिकांनीं गृहस्थांचा हाच परम धर्म सांगितला आहे.

अत्री—हे महाभागे, वैन्यराजा सत्यव्रतामध्यें स्थित व धमार्थयुक्त आहे. परंतु तेथें माझा द्वेष करणारे कांहीं ब्राह्मण आहेत, असें मला पूर्वींच महात्म्या गौतमानें सांगितलें आहे. शिवाय पशुहिंसक ( कसाई ) नित्य दशसहस्र हिंसांचा दोष आपल्या माथीं वहात असतो, राजाहि तितकाच पापी आहे, यास्तव मनूनें राजप्रतिग्रहांत घोर पातक सांगितलें आहे. हा दोष जाणत असतां मला हा व्यवसाय करणें योग्य दिसत नाहीं.

हे कल्याणि, मी तेथें जाऊन धर्म-कामार्थ-युक्त शुभ वाणी जरी बोललों तरी माझे शत्रु तिच्या विरुद्ध व निरर्थक भाषण करतील आणि कदाचित् वृथा भाषण करणाऱ्या त्यांचा मीं जरी पराभव केला, तरी तोहि पापावह होईल. कारण ' गुरूचा तिरस्कार व ब्राह्मणांचा वादामध्यें पराभव करणारा विद्वान् अरण्यांतील निर्जल प्रदेशीं ब्रह्मराक्षस होतो, ' असें स्मृतिवचन आहे. तथापि हे प्राज्ञे, स्नेहवश होऊन मी तेथें जाईन. तुझें म्हणणें मला मान्य आहे. तो वैन्य राजा मला गायी व विपुल धन देईल.

असें बोलून तो महातपस्वी अत्रि-ऋषि सत्वर वैन्याच्या यज्ञस्थानीं जावयास निघाला. त्यानें त्या यज्ञमंडपांत जाऊन वैन्य-राजाची मंगलमय वचनांनीं स्तुति व पूजा केली. अत्रि म्हणाला—

"हे राजन्, तूं धन्य आहेस. तूं या पृथ्वीचा नियंता असून हिरण्यगर्भाप्रमाणें अग्रज व मनुष्यांचें रक्षण करणारा आहेस. सर्व मुनिगण तुझी स्तुति करितात. तुझ्यासारखा दुसरा धर्मवेत्ता नाहीं."

( २ ) अत्रीचें हें वचन ऐकून परलोकालाच श्रेष्ठ मानणारा महातपस्वी गौतमऋषि क्रोधानें म्हणाला—" हे अत्रे, पुनः असें बोलूं नको. तुझी बुद्धि स्थिर नाहीं. आम्हांला महेंद्र व प्रजापति अग्रेसर आहेत."

यावर वित्तार्थी अत्रि परपक्षाला दूषण देत म्हणाला—"हें तुझें म्हणणें योग्य नाहीं. हा राजाच विधाता आहे. परलोकीं जसा इंद्र किंवा प्रजापति तसा या लोकीं राजा श्रेष्ठ होय. तूंच मोहानें भ्रांत झाला आहेस. तुला मुळींच ज्ञान नाहीं."

गौतम—हे ब्राह्मणा, मी सर्व यथार्थ जाणतों, मी भ्रांत झालों नाहीं. पण तूंच मोहित झाला आहेस. राजाचें दर्शन व्हावें या इच्छेनें तूं या राजसभेंत त्याची अशी स्तुति करीत आहेस. तूं परम धर्म जाणत नाहींस, किंवा तुला प्रयोजन कळत नाहीं. तूं मूर्ख व अविवेकी आहेस, केवळ नाममात्र वृद्ध झाला आहेस.

राजा युधिष्ठिरा, त्या यज्ञांत जमलेल्या सर्व मुनींच्या समक्ष ते दोघे याप्रमाणें विवाद करीत उभे असतां सर्व ब्राह्मण 'हे दोघे कोण आहेत! या दोघां वाद करणाऱ्या ब्राह्मणांना या यज्ञमंडपांत कोणीं येऊं दिलें? त्यांचा प्रवेश येथें कसा झाला! हे दोघे येथें कोणत्या हेतूनें उच्च स्वरानें वाद करीत आहेत!' असें विचारूं लागले.

तेव्हां परम धर्मवेत्त्या काश्यपानें येथें आलेले हे दोघे वादी कोण आहेत, हें त्यांस निवेदन केलें. त्या वेळीं त्या सभासदश्रेष्ठ मुनींना गौतमानें म्हटलें—"हे द्विजश्रेष्ठहो, आम्हां दोघांच्या वादांचा प्रश्न सांगतों ऐका. हा अत्रि वैन्य राजाला विधाता म्हणत आहे, याविषयीं आम्हां दोघांनाहि मोठा संशय आहे."

गौतमाचें हें भाषण ऐकतांच ते सर्व महात्मे मुनि संशयनिवृत्ति करण्यासाठीं मोठ्या त्वरेनें धर्मज्ञ सनत्कुमारापाशीं गेले. तेव्हां त्यांचें सर्व यथार्थ वचन ऐकून महातेजस्वी सनत्कुमार म्हणाला—

( १ ) हे धर्मज्ञहो, ज्यावेळीं ब्रह्मतेज क्षत्रतेजानें संयुक्त होतें, किंवा क्षत्रिय व ब्राह्मण संयुक्त होतात, तेव्हां अग्नि व वायु संयुक्त झाले असतां ते जसे वनाला दग्ध करितात, तसे हे दोघे शत्रूंचा नाश करितात.

---

१ ब्राह्मणाच्या बलानें क्षत्रियाचें बल वाढतें. त्याचें तें स्वाभाविक बल नव्हे. हा सनत्कुमाराच्या निर्णयवचनांतील सारभूत अर्थ आहे. त्यामुळें गौतमानें केलेली राजाची निंदाहि व्यर्थ नाहीं व अत्रीची राजस्तुतिहि निर्मूल नाहीं. जरी स्तुतिपक्षीं लोभमूलकत्व हें अप्रामाण्याचें स्पष्ट कारण असलें, तरी 'अविद्यमान विशेषणांनींहि म्हणजे राजामध्यें नसलेल्या गुणांनींहि धनार्थी ब्राह्मणानें त्याची स्तुति करावी' असा सनत्कुमाराचा आशय आहे.

राजाच प्रसिद्ध धर्मस्थापक, प्रजेचा पति, तोच रक्षिता शक्र, नीतिज्ञ शुक्र, धाता-जनक, हितोपदेष्टा बृहस्पति, प्रजापति, विराट्, सम्राट्, क्षत्रिय व नृपति आहे. यास्तव जो कोणी या शब्दांनीं राजाची स्तुति करितो, त्याचा सत्कार कोण करणार नाहीं ! राजा धर्मप्रवर्तक असल्यामुळें तो पुरायोनि—सर्वांचा अग्रेसर आहे. संग्रामांत जयकर्तृत्वानें उपद्रवनाशक असल्यामुळें युधाजित् म्हटला आहे. तो प्रजेचें संरक्षण करण्यासाठीं सर्वदा तत्पर असतो म्हणून 'अभिया' तो आनंदी असल्यामुळें 'मुदित,' प्रजेचा ईश्वर असल्यामुळें 'भव,' स्वर्गगामी असल्यामुळें 'स्वर्णेता,' जयशीलत्वामुळें 'सहजित्' व विष्णुस्वरूपी असल्यामुळें 'बभ्रु' म्हटला जातो. तो सत्ययोनि, वेदवेत्ता व सत्यधर्मप्रवर्तक आहे.

पूर्वी ऋषींनीं अधर्माच्या भीतीनें आपलें सर्व ब्राह्म बल क्षत्रियामध्यें स्थापिलें. त्यामुळें स्वर्गलोकीं देवतांतील आदित्य जसा आपल्या तेजानें तमाचा नाश करितो, त्याप्रमाणें भूलोकीं नृप अधर्माचा नाश करितो. याप्रमाणें शास्त्रप्रामाण्यानें राजाला प्रधानत्व आहे. तस्मात् ज्यानें राजाची स्तुति केली त्याचाच उत्तर पक्ष सिद्ध होतो.

( ४ ) मार्कंडेय—युधिष्ठिरा, अशाप्रकारें उत्तर पक्ष सिद्ध झाला असतां हृष्ट झालेला तो उदार बुद्धि राजा, ज्यानें त्याची पूर्वी स्तुति केली होती, त्या अत्रि ऋषीला मोठ्या प्रेमानें म्हणाला—हे विप्रर्षे, ज्या अर्थी तूं मला पूर्वी मनुष्यलोकीं वरिष्ठ, देवतांना संमत व श्रेष्ठ म्हटलें आहेस, त्याअर्थी मी तुला विविध व विपुल धन वस्त्रालंकारांनीं भूषविलेल्या कृष्णवर्ण सहस्र दासी, एक कोटि सुवर्णाचें नाणें व दहा भार[1] सुवर्ण देतों. तूं सर्वज्ञ आहेस, असा माझा निश्चय झाला आहे.

तेव्हां महातपस्वी अत्रि-ऋषि न्यायानें मिळालेल्या त्या सर्व संपत्तीचा स्वीकार करून आपल्या गृहीं परत आला आणि सत्यादि धर्माचें फल वनांतच सिद्ध होतें, अशा निश्चयानें तें सर्व धन मोठ्या प्रीतीनें पुत्रादिकांस देऊन तो जितेंद्रिय महर्षि तपश्चर्येसाठीं वनांत निघून गेला. ३.११.१८५.

---

१ एक भार म्हणजे आठ हजार तोळे. राजानें अत्रीला ऐंशी हजार तोळे सुवर्ण दिलें.